ओ३म्

आर्यधर्म मासिक पुस्तकांतून प्रसिद्ध झालेल्या विषयांची ग्रन्थमाला.

प्रथमपुष्प.

# वैदिक धर्मस्वरूप.



पुस्तक

**श्रीदास विद्यार्थी**

यांनीं लिहिलें

तें

**शिवकर बापूजी तलपदे**

यांनीं

शुद्ध करून

**शामराव कृष्ण** आणि **मंडळी**

यांनीं

**मुंबईंत**

"तत्वविवेचक" छा० छा० प्रसिद्ध केलें.

---

सन १९०५. शके १८२७.

---

**किंमत १ रुपया.**

# विषयानुक्रम.


विषय ... पृष्ठ.

( १ ) ईशप्रार्थना ... ... ... ... ... ... ... ... ... १

( २ ) वेदांची उत्पत्ति... ... ... ... ... ... ... ... ... ४

निराकार परमेश्वरानें वेद कसे रचले ? वेद मनुष्यकृत नाहींत कशावरून ? (६ पृ.) वेद कां उत्पन्न केले? ( ७ पृ.) आप्त पुरुषांचें लक्षण; शब्दप्रमाण, ( ९ पृ. ) वेदांविषयीं उपनिषदें व स्मृतिग्रंथांतील प्रमाणें ( १० पृ.)

( ३ ) वेदोत्पत्तीचा काळ ... ... ... ... ... ... ... ११

मनु व मन्वंतरें ( ११ पृ. ) युगांचें प्रमाण; दैवी युगाचें प्रमाण; ( १२ पृ. ) वेद उत्पन्न होऊन किती वर्षें झालीं? ( पृ. १३ )

( ४ ) वेदांचें नित्यत्व... ... ... ... ... ... ... ... ... १५

शब्द दोन प्रकारचे आहेत; प्रलय कालची स्थिति सृष्टिप्रवाहानें नित्य आहे. ( १५ पृ. ) वेदांच्या नित्यत्वाविषयीं व्याकरणादि शास्त्रांचीं प्रमाणें ( १६ ते २२ पृ. )

( ५ ) वेदांमध्यें कोणते विषय आहेत ? ( **ज्ञानकाण्ड** ) ... ... ... २२

विज्ञान, कर्म, उपासना व ज्ञान; परमेश्वराचें ज्ञान करून घेणें हें मुख्य कर्तव्य; परमेश्वराचे वाचक शब्द. प्रणव, ओंकार इ०; ( पृ. २२ )

**वेदांमधील विषय—**

( ६ ) कर्मकांड ... ... ... ... ... ... ... ... ... २५

कर्मांचे भेद; सकाम व निष्काम कर्म; यज्ञ; हविर्द्रव्यांचे चार प्रकार; हवनाचा वृष्टीशीं संबंध ; हवनीय द्रव्यांवर संस्कार करणें; ( २५ पृ. ) तुपाच्या हवनाचे परिणाम ; जनतेच्या सुखासाठीं यज्ञाची आवश्यकता; यज्ञामुळें मेघ कसे बनतात; ( २६ पृ. ) यज्ञानें अन्न, जल व वायु हे शुद्ध होतात; ईश्वरकृत यज्ञ; यज्ञाचा मनुष्याच्या शरीराशीं संबंध, ( २७ पृ. ) मनुष्यानेंच कां यज्ञ करावा? हवन केलेले पदार्थ नाश पावतात कीं काय? प्रमाणें आठ आहेत. (२८ पृ.) अष्टविध प्रमाणांचें स्वरूप ( २९ पृ. ); हवन केलेलें द्रव्य नाश पावत नाहीं. हवनाचा आरोग्याशीं संबंध ( ३० पृ. ); एका देशांत केलेल्या हवनापासून

दुसऱ्या देशांतहि लाभ पोंचतो. यज्ञाच्या वेळीं वेदमंत्र कां म्हणावे? ( ३१ पृ. ).

( ७ ) यज्ञांतील देवता ... ... ... ... ... ... ... ३२
देवतांचीं नांवें. ( ३२ पृ. ); मंत्राची देवता कशी ओळखावी? ( ३३ पृ. ) ऋचांमधील भेद; परमात्म्याचा यज्ञाशीं संबंध; कर्मकांडांतील देवता. ( ३४ पृ. ) देवता शब्दाचा अर्थ; मुख्य देवता; ( ३५ पृ. ); मंत्र व छंद; ( ३६ पृ. ); तेहेतीस देवता. ( ३७–३८ पृ. ); वसु व रुद्र; लोक; उपास्य देवता एकच आहे; ( ३९ पृ. ); देव शब्दाचा अर्थ. पूजा करण्याची रीति ( ४० पृ. ); मूर्तिपूजा; युरोपियन विद्वानांचें चुकीचें मत. ( ४१ पृ. ), सर्व व्यापक परमात्म्याची उपासना ( ४२ ते ४८ पृ. ); मोक्षमुल्लराची भ्रामक समजूत. ( ४८ पृ. ), सर्व मंत्र एकाच कालीं प्रगट झाले; श्रुति–वेद–निगम–छंद यांत भेद नाहीं. ( ४९ ते ५१ पृ. )

( ८ ) वेद ही संज्ञा कशाला आहे? ... ... ... ... ... ... ५२
ब्राह्मणग्रंथ व मंत्र यांतील भेद. वेदांमध्यें मनुष्याचा इतिहास नाहीं. ( ५२ पृ. ) आयुष्याची मर्यादा; पुराणें कोणतीं? ( पृ ५३ ), इतिहास व नाराशंसी ( पृ. ५४ ) विधि; अर्थवाद व अनुवाद ( ५५ पृ. ); स्तुति, निंदा, परकृति व पुराकल्प ( ५६ पृ. ) ब्राह्मणग्रंथ हे वेदांचीं व्याख्यानें. ( पृ. ५७ )

( ९ ) ब्रह्मविद्या ... ... ... ... ... ... ... ... ५८
परमेश्वराचें स्वरूप; व्यापकता ( ५९ पृ. ). ईश्वर एकच आहे ( पृ. ६० )

( १० ) वेदांमध्यें सांगितलेला धर्म ... ... ... ... ... ... ६१
ऐक्य, वादविवाद, सुसंस्कृतपणा, ईश्वरोपासना ; ( ६१ पृ.) समानत्व ; ( ६२ पृ. ) मनाच्या वृत्ति; ( ६३ पृ.) सत्य व असत्य, प्राणिमात्रांचें हित करणें ( ६४ पृ. ). सत्याचरणाची प्रतिज्ञा, पुरुषार्थाचें फल. ( ६५ पृ. ), श्रद्धा, उत्साह, दीक्षा, तप, ( ६६ पृ. ) चातुर्वर्ण्यांतील लोकांचीं कर्तव्यें. ( ६७–६८ पृ. )

( ११ ) धर्माविषयीं तैत्तिरीय शाखेंतील प्रमाणें ... ... ... ... ६९
शम, दम, तप, इ० ( पृ. ६९–७५ ), धर्माचें लक्षण. खरा धर्म एकच आहे. ऐहिक व पारमार्थिक सुखाचें साधन. ( ७६ पृ. )

( १२ ) सृष्टीच्या उत्पत्तीविषयीं माहिती ... ... ... ... ... ७६
सृष्टीच्या पूर्वीची स्थिति, परमाणू, ( ७८ पृ. ); सृष्टीचा स्वामी. ( ७९ पृ. ); हिरण्यगर्भ, पुरुषसूक्त व त्याचा अर्थ. ( ८० ते ९३ पृ. )

( १३ ) पृथिव्यादि गोलांचें भ्रमण ... ... ... ... ... ... ९३
पृथिवी सूर्याभोंवतीं फिरते. ( ९३ पृ. ); "गौः" चा अर्थ, ( ९४ पृ.)

( १४ ) आकर्षण व अनुकर्षण ... ... ... ... ... ... ९५
सूर्य इतर गोलांनां आकर्षितो, ( ९५ पृ. ) सूर्याच्या आकर्षणानें इतर गोल जागच्या जागीं राहतात. ( ९६ पृ. )

( १५ ) प्रकाश्यप्रकाशकतेविषयीं ... ... ... ... ... ... ९८
चंद्र स्वयंप्रकाशी नसून सूर्याच्या प्रकाशानें प्रकाशतो ( ९९ पृ. )

( १६ ) गणितविद्या ... ... ... ... ... ... ... ... १००
अंकगणित ( १०० पृ. ) बीजगणित ( १०२ पृ. ), भूमिति ( १०२ पृ. )

( १७ ) ईश्वराची स्तुति, प्रार्थना, याचना, समर्पण, उपासना ... ... १०३
प्रार्थना ( १०४ पृ. ); "स्वाहा" शब्दाचा अर्थ; आशीर्वाद ( १०५ पृ. ); याचना ( १०७ पृ. ); समर्पणा ( १०८ पृ. );...

( १८ ) ईश्वरोपासना ... ... ... ... ... ... ... १०८
मनाचें स्थिरीकरण ( १०९ पृ. ), योगाभ्यासांत नाड्यांचा संबंध; ( १११ पृ. ) "शाचिपति" अर्थ ( ११२ ); एक ईश्वराची उपासना. ( ११३।११४ पृ. )

( १९ ) उपासना करण्याची रीति ... ... ... ... ... ... ११४
जागा ( ११४ पृ ) स्मृतीचे पांच प्रकार ( ११५ पृ. )

( २० ) ईश्वराचें लक्षण ... ... ... ... ... ... ... ११६
गुरु, प्रणव, जप, ( ११७ ) जपाचें फल; चित्ताची चंचलता कां होते? ( ११८ पृ. ), त्याच्या स्थिरीकरणासाठीं उपाय ( ११९ पृ. ) प्राणायाम, यमनियम ( १२० पृ. ) अहिंसेचें फल, सत्याचरणाचें फल ( १२१ पृ. ), यमनियमांचीं फलें ( १२२ पृ. ), आसन व त्याचें फल; प्राणायामाचे प्रकार (१२३ पृ.), धारणा, प्रत्याहार. ( १२४ पृ.)

( २१ ) उपासनेविषयीं वेदांतील प्रमाणें ... ... ... ... ... १२५
सगुणोपासना व निर्गुणोपासना ( १२७ पृ. )

( २२ ) मुक्ति ... ... ... ... ... ... ... ... १२८

पंचक्लेश, त्यांचीं लक्षणें ( १२८ पृ. ); मुक्तीची व्याख्या ( १२९ पृ. ) मुक्तावस्थेंतील स्थिति ( १३०।१३२ पृ. ), परमेश्वर मोक्षदाता आहे. ( १३२।१३५ पृ. )

( २३ ) नौका व विमानें ... ... ... ... ... ... ... १३५

( २४ ) तारायंत्रविद्या ... ... ... ... ... ... ... १४२

( २५ ) वैद्यशास्त्र ... ... ... ... ... ... ... ... १४३

( २६ ) पुनर्जन्म ... ... ... ... ... ... ... ... १४३

( २७ ) विवाहविषय ... ... ... ... ... ... ... ... १४८

( २८ ) नियोगप्रकरण ... ... ... ... ... ... ... १५०

आपत्कालींच नियोग करावा, संतति किती असावी ? ( १५२ पृ. `; जास्त संतति नसावी, स्त्रीचीं कर्तव्यें, तिचें घरांतील इतर मनुष्यांशीं वर्तन ( १५३ पृ. )

( २९ ) राजाचा व प्रजेचा धर्म ... ... ... ... ... ... १५४

"आर्यविद्यासभा, धर्मसभा, राजकार्यसभा; ब्राह्मणक्षत्रियांचीं कार्यें (१५५पृ.) राजाला अवश्य लागणारे गुण. (१५६ पृ.) राजा प्रजेसाठीं आहे. ( १५७ पृ. ) गुप्तदूत राजानें नेमावे, शौर्य व विद्या वाढवावी. ( १५८ पृ. ), सभाध्यक्ष व लोकनियुक्त प्रतिनिधी, त्यांचीं कर्तव्यें. (१६३पृ.) साम्राज्य सुखदायी कशानें होतें ? (१६५ पृ.) क्षात्रतेजाची आवश्यकता; युद्ध-संग्राम; शूर लोक. ( १६६ पृ. )

( ३० ) वर्णाश्रमधर्म... ... ... ... ... ... ... ... १६७

वर्णधर्म. ( १६७ पृ. ); चारवर्ण, आश्रमधर्म. ( १६८ पृ. ) ब्रह्मचर्याश्रम. ( १६९ पृ. ) ब्रह्मचर्याचें महत्व, विद्वत्तेचें महत्व. ( १७० पृ. ) ब्रह्मचाऱ्यानें पृथ्वीपर्यटन करावें व लोकांस उपदेश करावा. ( १७१ पृ. ) आचार्याची व्याख्या, ब्रह्मचर्य हें सुखाचें साधन; ( १७२ पृ. )

( ३१ ) गृहस्थाश्रम ... ... ... ... ... ... ... ... १७३

परोपकार, सामाजिक नियमपालन, व्यापार, देवघेव. ( १७३ पृ. )

( ३२ ) वानप्रस्थाश्रम... ... ... ... ... ... ... ... १७५

( ३३ ) संन्यास ... ... ... ... ... ... ... ... १७६

( ३४ ) पंचमहायज्ञ ... ... ... ... ... ... ... ... १७९

संध्या, ( १७९ ते १८४ पृ. ) अग्निहोत्र, ( १८५ पृ. ) पितृयज्ञ,

( १९८ पृ. ) ऋषितर्पण, ( १९९ पृ. ) पितृतर्पण, (२०० ते २१२ पृ.) बलिवैश्वदेव, ( २१२ पृ. ) अतिथयज्ञ. ( २१५ पृ )

( ३५ ) ग्रंथप्रामाण्य ... ... ... ... ... ... ... ... ... २१६

षडंगें, उपवेद, दशोपनिषदें, षड्दर्शनें ( २१७ पृ. ) अप्रमाणग्रंथ ( २१८ पृ. ) पुराणांतील कल्पित कथा, शाक्तांच्या तंत्र ग्रंथांतील श्लोक ( २१९ पृ. )

( ३६ ) ब्रह्मदेवाचें जारकर्म ... ... ... ... ... ... ... ... २१९

( ३७ ) सती अहल्या... ... ... ... ... ... ... ... ... २२१

( ३८ ) वृत्रासुर ... ... ... ... ... ... ... ... ... २२२

( ३९ ) देव व राक्षस... ... ... ... ... ... ... ... ... २२६

( ४० ) कश्यपाची कथा ... ... ... ... ... ... ... ... २३०

( ४१ ) तीर्थें ... ... ... ... ... ... ... ... ... ... २३१

गया. ( २३१ पृ. ) विष्णुपद. ( २३२ पृ ) गंगा व यमुनासंगम, इडा व पिंगळा, तीर्थांचें खरें स्वरूप (२३५ पृ.) मूर्तिपूजा, नामस्मरण. ( २३६ पृ. ) प्रतिमा शब्दाचा अर्थ ( २३८ पृ. )

( ४२ ) नवग्रहांचे मंत्र ... ... ... ... ... ... ... २३९

रवी, चंद्र, मंगळ, बुध, बृहस्पती ( २३९ पृ. ) शुक्र, शनी, राहू व केतु यांसाठीं मानलेले मंत्र व त्यांचे अर्थ. ( २४० ते २४२ पृ. )

( ४३ ) पठनाचा अधिकार ... ... ... ... ... ... ... ... २४२

( ४४ ) वर्ण व जाती... ... ... ... ... ... ... ... ... २४३

( ४५ ) पठनपाठनाचा क्रम ... ... ... ... ... ... ... ... २४४

वर्णोच्चार व स्वरोच्चार नीट असावे; ( २४४ पृ. ) इतर शिक्षण; घोकंपट्टी; अर्थज्ञानासह अध्ययन यांची तुलना; ( २४६ पृ. ), वेदांचें ज्ञान झाल्यानें ईश्वरीय ज्ञान होतें. ( २४८ पृ. )

( ४६ ) वेदांवरील भाष्यें ... ... ... ... ... ... ... २४९

सायणाचार्यांचें भाष्य. ( पृष्ठ २४९।५० ); महीधर भाष्याची व ब्राह्मण ग्रंथांतील मंत्रार्थाची तुलना. ( २५१ ते २६० पृ. ) धर्मविषयक प्रश्नोत्तरें ( २६१ पृ. ) " ऋक्, यजु, साम, अथर्व " या शब्दांचे अर्थ; ऋषी मंत्रद्रष्टे कसे? ( पृ २६२ ) अग्नि, वायु, इंद्र, अश्विनौ, सरस्वतीवगैरे शब्दांचा वेदार्थ व रूढार्थ ( पृ. २६३ ते २६४ ) वेदांतील शब्द प्रयोगांसंबंधानें विशेष नियम व मंत्रांच्या अर्थाचे प्रकार ( पृ २६५ ) स्वरव्यवस्था, ( पृ. २६६ ) व्याकरणाचे सामान्य नियम. ( पृ २६७ ) अलंकारभेद. ( पृ. २७१ )

ओ३म् ।

# आर्यधर्म.

धार्मिक–मासिक–पुस्तक.

वर्ष १ लें. } चैत्र शके १८२६. मार्च सन १९०४. { अंक १ ला.

## प्रार्थना

पाहि नो अग्ने रक्षसः पाहि धूर्तेरराव्णः ॥
पाहि रीषत उत वा जिघांसतो बृहद्भानो
यविष्ठ्य ॥१२॥ ऋ०अ० १।३।१०।१५ ॥

" हे अग्ने, सर्व पापदाहक परमेश्वरा,! ( रक्षसः ) हिंसाशील व दुष्टस्वभाव अशा देहधारी प्राण्यांपासून आमचें रक्षण कर. ( धूर्तेरराव्णः ) धूर्त व कृपण अशा माणसांपासून आमचें रक्षण कर ( रीषतः ) आम्हांला मारणाऱ्यांपासून व ( जिघांसतः ) आमचा नाश करूं इच्छिणाऱ्यांपासून आमचें रक्षण कर. ( बृह० ) हे महातेजस्विन्! ( यवि० ) हे सर्वसामर्थ्यवान्! सर्वप्रकारें आमचें संरक्षण कर. "

## उद्देश.

सध्यां या आर्यावर्ताची किती व कशी नीचतम स्थिति झाली आहे, हें सांप्रत काळच्या विचारी विद्वानांला सांगण्याची जरुरी नाहीं. जो आर्यावर्त देश एकवेळ सर्व तऱ्हेच्या उच्चतम स्थितीमध्यें होता, तोच देश आज सर्व देशांच्या तोंडाकडे अत्यंत दुःखी व केंविलवाण्या मुद्रेनें पाहत आहे. अशी स्थिति कां झाली? पूर्वी आपण काय करीत होतों व सध्यां काय करीत आहों, याचा स्थूल दृष्टीनें जरी आपण विचार केला तरी आपणांस एवढें आढळून येईल कीं, पूर्वी आम्ही धर्माचें रक्षण करीत होतों व सध्यां आम्ही धर्माबद्दल उदासीन होत आहों.

## ॥ धर्मो रक्षति रक्षितः ॥

" धर्माचें जर आपण रक्षण केलें तर तो आपलें करितो." यावर आमच्या पूर्वजांचा पूर्ण विश्वास होता व ते धर्माच्या रक्षणासाठीं आपल्या प्राणांचीही पर्वा करीत नसत; म्हणूनच धर्म त्यांना उन्नतीच्या उच्चतम शिखरावर नेऊन, तेथें त्यांचें उत्तम

प्रकारें रक्षण करी. पण दुःखाची गोष्ट ही कीं, आम्हांला सध्यां धर्मापेक्षां इतर गोष्टीच जास्त प्रिय वाटतात व त्यांच्या नादानें आम्ही धर्मापासून दूरदूर जात आहों. अर्थातच सध्यां आमचें रक्षण धर्म करीत नाहीं व याचाच परिणाम ही सध्यांची आमची दशा होय. धर्मामध्यें काय विलक्षण सामर्थ्य आहे या विषयीं कणाद महर्षी वैशेषिक दर्शनांत येणेंप्रमाणें लिहितात:—

**यतोऽभ्युदयनिश्रेयससिद्धिः स धर्मः ॥ १ ॥ वैशे० द०**

" ज्यापासून ऐहिक उन्नति व अंतीं मोक्षप्राप्ती होते तो धर्म होय " सध्यां कांहीं लोक असें म्हणतात कीं, धर्माचा व ऐहिक उन्नतीचा कांहीं संबंध नाहीं, इतकेंच नव्हे तर मनुष्य धर्माचरण करूं लागला असतां त्याची व्यवहारांत पीछेहाट होते. अशी ज्यांची समजूत असेल त्यांणीं वरील कणाद महर्षीचें धर्माविषयीं मत मननपूर्वक पहावें. असो. यावरून निश्चयात्मक एवढें ठरलें कीं, धर्माच्या योग्य आचरणानें ऐहिक व्यवहारांत भरभराट होऊन शेवटीं मोक्षही मिळतो. ज्याकाळीं ज्या देशांत ज्या प्रमाणें धर्माचें परिपालन होईल, त्याकाळीं त्यादेशांतील लोकांची त्यामानानें उन्नति होते. ज्याअर्थी ही गोष्ट खरी आहे, त्याअर्थी प्रत्येक मनुष्यानें आत्मोन्नतिसाठीं धर्माचें ज्ञान करून घेऊन त्याचें योग्य आचरणही केलें पाहिजे. भगवद्गीतेमध्यें योगेश्वर श्रीकृष्णानें अर्जुनास सांगितलेला उपदेश याठिकाणीं सर्वांनीं ध्यानांत ठेवण्यासारखा आहे.

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ॥**
**आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः॥ गीता अ.६ श्लो.५॥**

" आपण आपली उन्नति करून घेतली पाहिजे. आपण आपली अवनति कधींही करून घेऊं नये कारण, आपणच आपले मित्र व आपणच आपले शत्रू आहोंत." जर आपली उन्नति झाली पाहिजे, तर आपणच धर्माचें ज्ञान करून घेतलें पाहिजे व आपणच त्याचें आचरण सक्तीनें व नियमानें केलें पाहिजे.

याठिकाणीं धर्म एक आहे कीं अनेक आहेत ? प्रचलित मतमतांतरांमध्यें खरेखोटेपणाचा भाग किती आहे? वेद व इतर पुस्तकें यांपैकीं ईश्वरप्रणित धर्मज्ञान खरोखर कशांत आहे इत्यादी अनेक प्रश्न उपस्थित होणें शक्य आहे. या प्रश्नांचा योग्य निकाल लावून तो मराठी वाचकांस सादर करावा व अशा रीतीनें जिज्ञासूंला आर्यांच्या वैदिकधर्माचें ज्ञान करून द्यावें हाच हें मासिक पुस्तक सुरू करण्याचा मुख्य उद्देश आहे. तर या धर्मकार्याला वेळोवेळीं योग्य मदत देऊन त्याला सर्व वाचक तडीला नेतील अशी आशा आहे. शेवटीं " हे परमेश्वरा ! सर्वांला धर्ममार्गानें जाण्याची बुद्धी दे " अशी त्या परमात्म्याची प्रार्थना करून हा लेख संपवितों.

**प्रकाशक.**

# ओ३म्.

## ईशप्रार्थना.

**ओ३म् । सह नाववतु सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै ॥ तेजस्वि नावधीतमस्तु । मा विद्विषावहै ॥ ओ३म् शान्तिः शान्तिः शान्तिः ॥ तैत्ति० आर० १।१॥**

**अर्थ**—( सहनाव० ) हे सर्वशक्तिमान् ईश्वरा ! तुझी कृपा, तुझें पाठबळ, व तुझें सहाय्य, यांच्या योगें आम्ही परस्परांचें रक्षण करावें. ( सह नौ० ) तसेंच आम्ही सर्वांनीं प्रीतियुक्त अंतःकरणानें एकत्र होऊन उत्तम ऐश्वर्य अर्थात चक्रवर्ती राज्यादि सामग्री पासून उत्पन्न होणारा आनंद, तुझ्या अनुग्रहानें, सदोदित अनुभवावा. ( सह वीर्य० ) हे कृपानिधे ! तुझ्या सहाय्यानें, आम्ही सर्वांनीं मिळून पुरुषार्थाची वृद्धी करीत असावें. ( तेजस्वि० ) हे प्रकाशमय ! सर्वविद्यादानशील परमेश्वरा! तुझ्या सामर्थ्यानेंच आम्ही शिकलेलें व शिकवलेलें ज्ञान सर्व जगांत प्रकाशित व्हावें. तसेंच आमचें ज्ञान सदैव वाढत रहावें. ( मा विद्वि० ) आम्ही परस्परांमध्यें कधींही विरोध, भांडण, द्वेष वगैरे करूं नये. सदोदित परस्पर मैत्रीची वृद्धि करावी. असें केलें असतां, ( ओम् शान्तिः ३ ) रोगादिकांपासून उत्पन्न होणारा आध्यात्मिक ताप, दुसऱ्या प्राण्यांपासून होणारा आधिभौतिक ताप व मनादी इंद्रियांपासून उत्पन्न होणारा आधिदैविक ताप या तीनही प्रकारच्या दुःखांचें निरसन तुझ्या कृपेनें होईल.

**विश्वानि देव सवितर्दुरितानि परासुव ॥ यद्भद्रं तन्न आसुव ॥ १ ॥ यजु० ३०।३॥**

**अर्थ**—हे सच्चिदानंदस्वरूप! हे परमकारुणिक! हे सर्वविद्यामय! हे विद्याविज्ञानप्रद! ( देव ) सर्व जगत्संबंधीं विद्यांचा प्रकाश करणाऱ्या व सर्व आनंद देणाऱ्या ( सवितः ) सर्व जग उत्पन्न करणाऱ्या परमेश्वरा! ( नः ) आमचीं ( विश्वानि ) सर्व ( दुरितानि ) दुःखें व आमच्यांतील सर्व दुष्ट गुण ( परासुव ) नाहींसे कर.

( यत् ) जें ( भद्रं ) कल्याणकारक, दुःखरहित व सद्विद्येच्या योगानें उन्नति व मोक्ष यांना प्राप्त करून देणारें असेल ( तत् ) तें ( नः ) आम्हांला ( आसुव ) प्राप्त करून दे.

**यो भूतं च भव्यं च सर्वं यश्चाधितिष्ठति ॥ स्वर्यस्य च केवलं तस्मै ज्येष्ठाय ब्रह्मणे नमः ॥ १ ॥ यस्य भूमिः प्रमान्तरिक्षमुतोदरम् ॥ दिवं यश्चक्रे मूर्द्धानं तस्मै ज्येष्ठाय ब्रह्मणे नमः ॥ २ ॥ यस्य सूर्यश्चक्षुश्चन्द्रमाश्च पुनर्णवः ॥ अग्निं यश्चक्र आस्यं तस्मै ज्येष्ठाय ब्रह्मणे नमः॥३॥ यस्यवातः प्राणापानौ चक्षुरंगिरसो भवन्॥ दिशो यश्चक्रे प्रज्ञानीस्तस्मै ज्येष्ठाय ब्रह्मणे नमः ॥४॥ अथर्ववेद १०।२३।४॥ मंत्र १।३२।३३।३४ ॥**

**अर्थ**—( यः ) जें ( भूतं च भव्यं च ) भूत, भविष्य व वर्तमान काल यानें बोधित होणाऱ्या ( सर्वं ) सर्वजगाच्याही ( अधितिष्ठति ) पलीकडे असून प्रकाशमान आहे, ( स्वर्यस्य ) ज्याचें स्वरूप केवळ पूर्ण सुखमय आहे, जेथें दुःखलेशही नाहीं, अर्थात जें आनंदघन आहे ( तस्मै ) त्या श्रेष्ठ ( ब्रह्मणे ) सर्वोत्तम ब्रह्माला नमस्कार असो. ॥ १ ॥ ( यस्य ) ज्याचें ( भूमिः ) पृथ्वि हें ( प्रमा ) यथार्थ ज्ञान करून घेण्याचें साधन आहे. ( अन्तरिक्षं ) अंतरिक्ष हें ज्याला उदरासारखें आहे ( दिवं ) सूर्याच्या प्रकाशानें दैदिप्यमान होणारें आकाश हें ज्याला मस्तकाप्रमाणें आहे त्या सर्वोत्तम ब्रह्माला आमचा नमस्कार असो ॥२॥ (यस्य सूर्यः) जें सूर्य व चंद्र यांना

( पुनः ) पुनःपुनः सृष्टीच्या उत्पत्तीच्यावेळीं ( नवः ) नवीन ( चक्षुः ) [ जणूं काय ] डोळेच असे उत्पन्न करतें, ( अग्निं ) व जें अग्नीला ( आस्यं ) तोंडाप्रमाणें मुख्य बनवितें, त्या श्रेष्ठ ब्रह्माला आमचा नमस्कार असो ॥ ३ ॥ ( यस्य वातः ) ज्याला वायू हा प्राण व अपान यांचेप्रमाणें आहे. ( अंगिरसः ) प्रकाशक किरण ( चक्षुः ) डोळ्यांप्रमाणें आहेत व ज्याणें दिशांना ( प्रज्ञानीः ) सर्व व्यवहारसाधक अशा केल्या आहेत; त्या सर्वज्ञ ब्रह्माला आमचा सतत नमस्कार असो ॥४॥ [या मंत्रांतील "अंगिरस" शब्दाचा अर्थ निरुक्तामध्यें "अंगिरा अंगारा अंकना अंचना ॥ निरु० अ. ३ खं. १७" असा केला आहे. त्यावरून त्याचा अर्थ "प्रकाशक" असा वर घेतला आहे. ]

**य आ॑त्म॒दा ब॑ल॒दा यस्य॒ विश्व॑ उ॒पास॑ते प्र॒शिष॒ं यस्य॑ दे॒वाः ॥ यस्य॑ छा॒याऽमृत॒ं यस्य॑ मृ॒त्युः कस्मै॑ दे॒वाय॑ ह॒विषा॑ विधेम ॥ ५ ॥ यजु० अ० २५।१३ ॥**

अर्थ—( यः ) जो ( आत्मदाः ) विद्या व विज्ञान देणारा, ( बलदाः ) शरीर, इंद्रियें, प्राण, मन व आत्मा यांना पुष्टि, उत्साह, पराक्रम, दृढत्व वगैरे देणारा, ( यस्य ) ज्याला ( विश्वे ) सर्व ( देवाः ) विद्वान ( उपासते ) भजतात, मानतात किंवा ज्याणें दिलेलें वैदिक ज्ञान प्रमाण मानतात, ( यस्य छाया ) ज्याची अवकृपा ( मृत्युः ) हीच जन्ममरणकारक व ज्याची कृपा ( अमृतं ) मोक्षदायक आहे, ( कस्मै ) त्या प्रजापती ( देवाय ) परमेश्वराची ( हविषा ) प्रेममय भक्तीनें उपासना ( विधेम ) करूं या.

**द्यौः शान्ति॑र॒न्तरि॑क्ष॒ꣳ शान्तिः॑ पृथि॒वी शान्ति॒रापः॒ शान्ति॒रोष॑धयः॒ शान्तिः॑ ॥ वन॒स्पत॑यः॒ शान्ति॒र्विश्वे॑दे॒वाः शान्ति॒र्ब्रह्म॒ शान्तिः॒ सर्व॒ꣳ शान्तिः॒ शान्ति॑रे॒व शान्तिः॒ सा मा॒ शान्ति॑रेधि ॥ ६ ॥ यजु० ३६।१७॥**

अर्थ—हे परमेश्वर ! हे सर्वशक्तिमान् ! तुझ्या कृपेनें व तुझ्या भक्तीनें अंतरिक्ष,

आकाश, पृथिवी, पाणी, औषधि, वनस्पति, सर्व विद्वान, वेद व इतर सर्व जग आमच्यावर शांत होऊं दे अर्थात आम्हांस सुखकारक व निरुपद्रवी होऊं दे. हे भगवन्! विद्या, बुद्धि, विज्ञान, आरोग्य इत्यादी आम्हांला तूं दे व आमची उन्नति कर.

**यतो यतः समीहसे ततो नो अभयं कुरु ॥ शन्नः कुरु प्रजाभ्योऽभयं नः पशुभ्यः ॥ ७ ॥ यजु० अ० ३६।२२ ॥**

**अर्थ**— ( यतो० ) ज्या ज्या ठिकाणीं जगताचें रचणें व पालन इत्यादिकांसाठीं ( समीहसे ) तुझा व्यापार चालला असेल, ( ततः ) त्या त्या स्थानापासून तूं आमचें भय नाहींसें कर. अर्थात आमचें पूर्णपणें रक्षण कर. तुझ्या कृपेनेंच आमचें सर्व तऱ्हेनें रक्षण होईल. ( प्रजाभ्यः ) त्या त्या देशांत असणाऱ्या प्रजांपासून व ( पशुभ्यः ) पशूंपासून आमचें रक्षण करून आमचें कल्याण कर. अर्थात ज्या योगें धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारही पुरुषार्थ आम्हांला साध्य होतील असें सत्वर कर.

**यस्मिन्नृचः सामयजूꣳषि यस्मिन् प्रतिष्ठिता रथनाभाविवाराः ॥ यस्मिंश्चित्तꣳ सर्वमोतं प्रजानां तन्मे मनः शिवसंकल्पमस्तु ॥ ८ ॥ यजु० ३४।५ ॥**

**अर्थ**—रथनाभीमध्यें ज्याप्रमाणें आरे बसविलेले असतात त्याप्रमाणें ज्या मनांत ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद हे जडविले आहेत, किंवा सूत्रामध्यें ज्याप्रमाणें मणि ओंवितात त्या प्रमाणें ज्या मनांत सर्व प्रजांचें चित्त ओंविलें गेलें आहे, तें माझें मन सदोदित शिवसंकल्प करणारें असो. अर्थात माझें मन सदोदित सद्विचारी असो.

---

## वेदांची उत्पत्ति.

**तस्माद्यज्ञात्सर्वहुत ऋचः सामानि जज्ञिरे ॥ छंदांꣳसि जज्ञिरे तस्माद्यजुस्तस्मादजायत ॥ १ ॥ यजु० ३१।७ ॥**

**अर्थ**—( तस्मात ) त्या सच्चिदानंद ( सर्वहुतः ) सर्वपूज्य अशा पूर्ण पुरुषापासून

( ऋचः ) ऋग्वेद ( सामानि ) सामवेद ( यजुः ) यजुर्वेद (छंदांसि) अथर्ववेद हे चार वेद ( अजायत ) उत्पन्न झाले.

या मंत्रांत वेद परमेश्वरापासून झाले असें स्पष्ट सांगितलें आहे. या मंत्रांतील "सर्वहुतः" हें पद "वेदां"चेंही विशेषण होऊं शकतें कारण, ते वेद सर्वांनीं "पूज्य मानून स्वीकारण्यास योग्य" आहेत. या मंत्रांतील "जज्ञिरे व अजायत" हीं दोन क्रियापदें वेदांमध्यें अनेक विद्या आहेत असें दाखवितात. कोणी असें म्हणेल कीं, अथर्ववेदाचें या मंत्रांत नांवही नाहीं. म्हणून वेद तीनच आहेत; तर त्यास उत्तर असें कीं, ज्या अर्थीं सर्व वेद गायत्र्यादिछंदांनीं युक्त असतां पुनः वरच्या मंत्रांत "छंदांसि जज्ञिरे" असें निराळें म्हटलें आहे त्या अर्थीं हें विधान अथर्ववेदाचें स्पष्ट द्योतक आहे यांत शंका नाहीं.

या मंत्रांतील "यज्ञ" शब्द "विष्णू"चा वाचक आहे. शतपथ ब्राह्मणांत:—

**यज्ञो वै विष्णुः ॥ श. कां. १ अ. १ ब्रा. १ कं. १३ ॥**

असें सांगितलें आहे. अर्थात यज्ञ म्हणजे विष्णु व विष्णु म्हणजे सर्वव्यापक परमेश्वर होय. ( वेवेष्टि व्याप्नोति चराचरं जगत् स विष्णुः परमेश्वरः ) याच्या पासूनच सर्व सृष्टि उत्पन्न झाली आहे. सृष्टिकर्ता हाच व वेदही याच्याचपासून झाले आहेत. पहा—

**इदंविष्णुर्विचक्रमे ॥ यजु० ५।१५ ॥**

"या सर्व-व्यापी परमेश्वरानेंच हें सर्व जग उत्पन्न केलें." तसेंच—

**यस्मादृचो अपातक्षन् यजुर्यस्मादपाकषन् ॥ सामानि यस्य लोमानिथर्वांगिरसो मुखम् ॥ स्कंभं तं ब्रूहि कतमः स्विदेव सः ॥ २ ॥ अथर्व० कां० १० प्र० २३ अनु० ४।२० ॥**

**अर्थ**—( यस्मात् ) ज्या सर्व शक्तिमानापासून ( ऋचः ) ऋग्वेद ( अपातक्षन् ) उत्पन्न झाला. तसेंच ज्यापासून ( यजु० ) यजुर्वेद प्रकट झाला. तसेंच ( सामानि ) सामवेद ( लोमानि ) ज्यापासून अंगावरील केंसाप्रमाणें सहज उत्पन्न झाला व

( अथर्वा० ) अथर्ववेद हा ज्यापासून ( मुखं ) मुख्यत्वेंकरून उत्पन्न झाला. सारांश ज्यापासून हे चारही वेद उत्पन्न झाले आहेत ( सः ) तो ( कत्तमःस्विद् ) कोण बरें आहे ( ब्रूही ) तें सांगा. हे जिज्ञासू गण ( तं ) तो ( स्कंभं ) जगताचा आधार परमेश्वर आहे असें जाणा. त्या सर्व शक्तिमान् परमात्म्याहून दुसरा कोणीही वेदकर्ता नाहीं असें सर्वांनीं समजावें. तसेंच—

**एवं वा अरेऽस्य महतो भूतस्य निश्वसितमेतत् ।**
**यदृग्वेदो यजुर्वेदःसामवेदोऽथर्वांगिरसः ॥ शत. कां.१४।५**
**ब्रा० ४ कं. १० ॥**

**याज्ञवल्क्य म्हणतो**—"हे मैत्रेयी ! त्या आकाशापेक्षांही मोठ्या परमेश्वरापासून श्वासोच्छ्वासाप्रमाणें सहज ऋग्वेदादि चारही वेद उत्पन्न झाले." ज्याप्रमाणें श्वास शरिरांतून सहज बाहेर पडून पुनः आंत जातो, तद्वत् परमेश्वरापासून सृष्टीच्या आरंभीं हे वेद सहज उत्पन्न होऊन प्रलयकाळीं त्याच्यांतच लीन होतात.

या प्रमाणें वेदांच्या उत्पत्तीविषयीं वैदिकप्रमाणें आहेत. आतां या ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या शंकांचें समाधान करणें अवश्य आहे. ( जिज्ञासूचा प्रश्न ) निराकार परमेश्वरापासून शब्दमय वेद कसा उत्पन्न होतो कारण, शब्द उत्पन्न होण्याला साकार वस्तु पाहिजे. ( ऋषीचें उत्तर ) परमेश्वर सर्वशक्तिमान् असल्यामुळें त्याला हस्तपादादि अवयव नसतांही तो जशीं जगद्रचनेसारखीं अचाट कामें करतो, त्याचप्रमाणें या वेदरचनेविषयींही समजावें. किंवा शब्द मोठ्यानें उत्पन्न करण्यास तोंडाची आवश्यकता आहे पण मनांत विचार करीत असतां जे शब्द उत्पन्न होतात त्यांस तोंडासारख्या अवयवाची जरूरी नाहीं. म्हणून जसे निराकार मनाकडून शब्द उत्पन्न होतात, तसेच परमेश्वराकडून वेद झाले असें समजावें. तो सर्व शक्तिमान् असल्यामुळें ही शंकाही त्या ठिकाणीं येत नाहीं. ज्याप्रमाणें आमचें हरएक सहाय्यावांचून प्रत्येक ठिकाणीं अडतें, तसें त्या सर्वशक्तिमानाचें नाहीं. निराकार परमेश्वरानें हें जसें आश्चर्यकारक विश्व उत्पन्न केलें आहे तद्वतच त्याणें वेदही रचले. ( प्रश्न ) पहा ! जग रचण्यास परमेश्वरावांचून दुसरा कोणीही समर्थ नाहीं हें खरें तरी पण अन्य ग्रंथांच्या रचनेप्रमाणें वेद विद्वान मनुष्य रचूं शकेल. ( उत्तर ) मनुष्यमात्रानें वेदांचें अध्ययन केल्यावरच त्यास ज्ञान होऊन दुसरे ग्रंथ करतां येतील. नाहीं तर नाहीं. कोणीही शिकविल्यावांचून विद्वान होऊं शकत नाहीं. सध्यां सुद्धां कोणत्या तरी शास्त्राचें अध्ययन करून, उपदेश ऐकून किंवा व्यवहार पाहूनच मनुष्यांना ज्ञान होतें. मानवी प्राणी उत्पन्न होतांक्षणींच निर्जन अरण्यांत जर नेऊन ठेवला व तेथें त्याच्या अन्नपाण्याची व्यवस्था केली

व कोणाचाही शब्द आमरणांत जर त्याच्या कानांत पडला नाहीं, तर त्याला कशाचेंही यथार्थ ज्ञान होणार नाहीं. निर्जन अरण्यांतील मनुष्यें पशुंप्रमाणेंच असतात त्याचें कारण तरी उपदेशाचा अभाव हेंच होय. जर वेदांचा उपदेश जगाच्या आरंभीं झाला नसता, तर सृष्टीच्या आरंभापासून आतांपर्यंत पशूसारखींच सर्व मनुष्यें राहिलीं असतीं. सध्यांचें ग्रंथरचनेचें व इतर जें ज्ञान दिसत आहे तें वैदिक ज्ञानाच्या उपदेशाचेंच साक्षात् किंवा परंपरेनें फळ होय ( प्रश्न ) छे: असें नाहीं. ईश्वरानें मनुष्यांना स्वाभाविक ज्ञान दिलें आहे. तें सर्व ग्रंथांपेक्षां पुष्कळ उत्तम आहे. जर तें स्वाभाविक ज्ञान नसेल तर वेदांतील शब्दार्थसंबंधीं ज्ञान कधींही होणें शक्य नाहीं. हें स्वाभाविक ज्ञान माणसांनीं आपल्या प्रयत्नांनीं वाढवून सध्यांचा ग्रंथसंग्रह बनवला आहे. त्याला वेदांचीही जरूरी नाहीं व ते ईशप्रणीत आहेत असें म्हणण्याचीही आवश्यकता नाहीं. ( उत्तर ) महान अरण्यांतील लोकांनांही ईश्वरानें स्वाभाविकज्ञान दिलें आहे. मग ते अरण्यस्थ लोक किंवा आम्ही शिकल्यावांचून किंवा वेदाध्ययनावांचून कां बरें विद्वान होत नाहीं? यावरून उघड होतें कीं, अध्ययन व अध्यापनाशिवाय नैसर्गिक ज्ञानानेंच निर्वाह होत नाहीं. सध्यां आम्ही जी ग्रंथरचना करतों ती दुसऱ्या विद्वानांच्या ग्रंथांच्या अभ्यासानंतर होय. यावरून उघड होतें कीं, ईश्वरीज्ञान सृष्टीच्या आरंभीं अवश्य असलें पाहिजे सृष्टीच्या आरंभीं कोणता ग्रंथही नव्हता व पठनपाठन व्यवस्थाही नव्हती. अशा वेळीं जर परमेश्वराचा उपदेश नसला तर पुढील ज्ञानपरंपरा किंवा ग्रंथरचना तरी कशी संभवेल? कारण स्वाभाविक ज्ञानानेंच सर्व ज्ञान मिळूं शकत नाहीं व नैमित्तिक ( शिकून ) ज्ञान मिळवण्याचें दुसरें साधन नाहीं. याकरितां प्रारंभीं परमेश्वरीय ज्ञानाची आवश्यकता आहे. ( प्रश्न ) स्वाभाविक ज्ञान, जें हरएक मनुष्यमात्राला आहे, त्याच्या सहाय्यानें हलके हलके अनुभव मिळवून मनुष्यांनीं ज्ञानामध्यें प्रगती केली असें कां म्हणूं नये? (उत्तर) मनुष्याचें नैसर्गिक ज्ञान हें डोळ्याप्रमाणें परावलंबी साधन आहे. जसे डोळे मनाच्या सहाय्यावांचून पाहूं शकत नाहींत, त्याचप्रमाणें वैदिक ज्ञानाच्या सहाय्यतेवांचून मनुष्यमात्राचें स्वाभाविक ज्ञान कांहीं करूं शकत नाहीं. ( प्रश्न ) ईश्वराला वेद उत्पन्न करण्याचें कारण काय? ( उत्तर ) याचें उत्तर आम्हीं सांगूं पण वेद न उत्पन्न करण्यामध्यें ईश्वराचा काय हेतू हें तुम्ही सांगू शकाल काय? ( प्रश्न ) नाहीं. पण आमच्या प्रश्नाचें उत्तर काय? ( उत्तर ) तर आतां वेद उत्पन्न करण्याचें कारण ऐका. ईश्वराजवळ अनंत विद्या आहेत व त्या विद्या लोकांसाठीं व स्वतः परमेश्वरासाठीं आहेत. परमेश्वर परोपकार करणारा असल्यामुळें आपल्याकडील विद्या तो सृष्टीच्या आरंभीं लोकांना देतो. जर तो त्या विद्या उपदेशद्वारा लोकांना सांगणार नाहीं, तर त्या निष्फळ असल्याप्रमाणें होतील. कारण, विद्या ह्या जशा स्वतःसाठीं आहेत

तशा त्या दुसऱ्यांसाठींही आहेत. म्हणूनच परमेश्वरानें वेदविद्यांचा उपदेश आरंभीं केला. परमेश्वर हा परम दयाशील आहे. जसा बाप आपल्या मुलांस सदय अंतःकरणानें उपयुक्त ज्ञानाचा उपदेश करतो त्याचप्रमाणें मनुष्यमात्राच्या हितासाठीं त्यानें वेदांचा उपदेश केला. नाहींतर धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारही पुरुषार्थ साधणें अशक्य होऊन, कोणालाही परम आनंद लाभला नसता. ज्या कृपाळू परमेश्वरानें कंद, मुळें, फळें व तृणादि पदार्थ प्राणिमात्रांसाठीं उत्पन्न केले, तो सर्व सुखदायी वेदविद्या कां बरें लोकांना देणार नाहीं? ब्रह्मांडांतील इतर पदार्थांपासून उत्पन्न होणारा आनंद हा विद्येच्या आनंदाच्या सहस्राव्या हिश्शाचीही बरोबरी करूं शकणार नाहीं. अर्थात् विद्या ही श्रेष्ठ आहे व ती वेदद्वारा परमेश्वरानें सर्वांना सांगितली आहे यांत शंका नाहीं. (प्र०) शाई, लेखणी व कागद हे ईश्वरानें कोठून आणले व त्यानें वेद कसे लिहिले? (उ०) ही शंका फार चमत्कारीक आहे. निरवयवी परमेश्वरानें हात पाय नसतांही हें स्थूल विश्व रचलें, त्या प्रमाणें वेदही रचले. त्यानें वेदाचीं पुस्तकें लिहिलीं असें आमचें म्हणणें नाहीं. त्यानें ऋग्वेदादि ज्ञानमय चार वेद उत्पन्न केले व ते अनुक्रमें–अग्नि, वायू, आदित्य व अंगिरस् या चार महात्म्यांच्या अंतःकरणांत प्रेरित केले. (प्र०) अग्नि, वायू, आदित्य व अंगिरस हे तर जड पदार्थ आहेत, त्यांच्यांत कसे हो वेद प्रेरित केले? (उ०) अग्नि, वायू, आदित्य व अंगिरस् या नांवाचे मनुष्यदेह-धारी महात्मे सृष्टीच्या प्रारंभीं होऊन गेले. त्यांच्या अंतःकरणांत वेदांची स्फूर्ति झाली. जडपदार्थांत वेद उत्पन्न झाले नाहींत बरें! कोणी आप्त पुरुषानें जर असें म्हटलें कीं, "मंचाःआक्रोशन्ति।" तर त्याचा अर्थ "माचे ओरडतात" असा करावयाचा नसून "मांच्यावर बसलेले पुरुष ओरडत आहेत" हा जसा समजावयाचा, त्याच प्रमाणें येथेंही संदर्भानें समजावें. याला आधार—

**तेभ्यस्तप्तेभ्यस्त्रयो वेदा अजायंताग्नेर्ऋग्वेदो वायोर्यजुर्वेदः सूर्यात्सामवेदः॥ श. कां. ११ अ. ५॥**

"त्या तपोनिष्ठ अग्नि, वायू व सूर्य यांपासून ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद अनुक्रमानें झाले." (प्र०) आम्हांला असें सरळ वाटतें कीं, परमेश्वरानें त्यांना जें ज्ञान दिलें त्या योगानें त्यांनीं वेद रचले. (उ०) परमेश्वरानें वेदविषयक ज्ञान त्यांच्यांत उत्पन्न केलें व त्यांच्या द्वारानें वेद प्रकाशित केले. ज्या अर्थीं वैदिकज्ञान हें मुळचें परमेश्वराचेंच त्या अर्थीं जरी तें त्यांच्या द्वारानें प्रगट झालें तरी त्यांनीं तें उत्पन्न केलें असें म्हणतां येणार नाहीं. ज्याचें ज्ञान त्यानेंच ते प्रणित केलें असें म्हणणें सर्वथा युक्त होय. (प्र०) ईश्वर जर न्यायकर्ता आहे तर त्यानें चारांच्याच अंतःकरणांत कां वेदांचा प्रकाश पाडला? सर्वांच्या कां नाहीं? (उ०) ईश्वर पूर्ण न्यायकर्ता आहे व

पक्षपाताचा लेशही त्याच्याठिकाणीं नाहीं. या चारांच्या हृदयांत वेद उत्पन्न करण्यांत त्यानें न्यायच केला. जो जसें कर्म करतो त्याला तसें फल तो देतो. त्यांचें पूर्व पुण्य इतकें बलवत्तर होतें म्हणूनच त्यांच्या अंतःकरणांत त्यानें वेद प्रकाशित केले. (प्र०) सृष्टीच्या आरंभीं ते उत्पन्न झाले असल्यामुळें त्यांचें पूर्व पुण्य कोठून असणार? (उ०) सर्व जीव अनादी आहेत व सृष्टीही प्रवाहरूपानें अनादी आहे. सर्व जीवांचीं कर्मेंही अनादीच आहेत (या अनादित्वाविषयीं प्रमाणपूर्वक प्रतिपादन पुढें करण्यांत येईल.) याठिकाणीं इतकें सांगितलें असतां पुरे होईल कीं, त्यांचें पूर्वसृष्टींतील संचित पुण्य मोठें होतें म्हणून त्यांच्या अंतःकरणांत परमेश्वरानें वेद उत्पन्न केले.

(प्र०) काय? गायत्र्यादिक छंदांची रचनाही परमेश्वरानेंच केली? (उ०) ही शंका निरर्थक आहे. काय! सर्वज्ञ परमेश्वराला छंदज्ञान नाहीं? तो सर्व विद्या जाणणारा असल्यामुळें त्यानें छंदरचनाही केली. (प्र०) चतुर्मुख ब्रह्मदेवानें वेद निर्माण केले असें इतिहासावरून दिसतें तेव्हां खरें कोणतें? (उ०) पुराणवचनें सर्वच प्रमाणभूत नाहींत. इतिहास प्रमाणभूत आहे पण तो आप्तोपदिष्ट पाहिजे.

**आप्तोपदेशः शब्दः ॥ न्यायशास्त्र. अ. १ सू० ७ ॥**

"आप्तपुरुषानें उपदेश केलेलें शब्दमय वचन प्रमाणभूत आहे" असें गौतमाचार्यांनीं न्यायशास्त्रांत सांगितलें आहे. याच सूत्रावरील वात्स्यायन मुनीच्या भाष्यांत—

**आप्तः खलु साक्षात्कृतधर्मा यथा दृष्टस्य**
**अर्थस्य चिख्यापयिषया प्रयुक्त उपदेष्टा**
**साक्षात्करणमर्थस्याप्तिस्तयाप्रवर्तत इत्याप्तः ॥**

"ज्यानें पदार्थांचे धर्म यथावत् जाणले आहेत व जाणल्याप्रमाणेंच परोपकार-बुद्धीनें जो लोकांस सांगण्यास इच्छितो तो आप्त होय. सर्व पदार्थांविषयीं सर्व सत्यज्ञान होणें याचें नांव "आप्ति" होय व ती ज्याला प्राप्त झाली आहे तो आप्त म्हणावा" असें सांगितलें आहे. अशा तऱ्हेच्या आप्त पुरुषांच्या उपदेशावर सर्वांनीं विश्वास ठेवावा. इतिहास सत्य असेल तोच घ्यावा. खोटा, प्रमाण मानूं नये. जो आप्तपुरुषानें सांगितलेला सत्य इतिहास तोच प्रमाण मानावा इतर हवें तें वचन कधींही प्रमाण मानूं नये. "व्यासानें व ऋषींनीं वेद रचले," "ब्रह्मदेवानें (चतुर्मुख) वेद रचले" इत्यादि पुराणांतील व तंत्रांतील विधानें प्रमत्तगीताप्रमाणेंच अग्राह्य आहेत. (प्र०) जो मंत्रसूक्तांचा ऋषि आहे त्यानेंच ते मंत्र रचले असें कां म्हणूं

नये? (उ०) प्राचीन काळीं ब्रह्मादिकांनींही वेदांचें अध्ययन केलें होतें याविषयीं प्रमाणें आहेत.—

**यो वै ब्रह्माणं विदधाति पूर्वं यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै० ॥ श्वेताश्वतर उपनिषद्**

"ज्यानें सृष्टीच्या प्रारंभीं ब्रह्याला उत्पन्न केला व त्याला वेद शिकविले इ०" या श्वेताश्वतरोपनिषदाच्या आधारावरून ऋषींच्या उत्पत्तीपूर्वीच वेद होते हें सिद्ध झालें. तसेंच

**अग्निवायुरविभ्यस्तु त्रयं ब्रह्म सनातनम् ॥**
**दुदोह यज्ञसिध्यर्थं ऋग्यजुः सामलक्षणम् ॥ मनु. अ. १**
**अध्यापयामास पितॄन् शिशुरंगिरसः कविः ॥ मनु. अ. २**

"अग्नि वायू व रवी यांपासून यज्ञसिद्धीसाठीं ऋग्वेदादि सनातन वेद (ब्रह्यानें) अध्ययन केले" "अंगिरसानें पित्याला (वेद) शिकविला" याप्रमाणें अग्न्यादि महात्म्यांपासून ब्रह्यानें वेदाध्ययन केलें. यावरून उघड आहे कीं, व्यासादि ऋषि किंवा त्या त्या सूक्तांचे ऋषि हे त्या त्या मंत्रांचे कर्ते नव्हत.

"वेद व श्रुति हीं दोन नांवें वेदाला अर्थावरून देण्यांत आलीं आहेत. (विद्) ज्ञाने (विद्) सत्तायाम् (विद्लृ) लाभे (विद्) विचारणे." या धातूंवरून "हलश्च" या सूत्रानें "घञ" प्रत्यय करून "वेद" हा शब्द सिद्ध झाला आहे. तसें "(श्रु) श्रवणें" या धातूवरून "क्तिन्" प्रत्यय करून "श्रुति" हा शब्द बनतो. त्यावरून होणारा अर्थ असा—

**विन्दन्ति जानन्ति, विद्यन्ते भवन्ति विन्दन्ते लभन्ते विन्दन्ते विचारयन्ति सर्वे मनुष्याः सर्वाः सत्यविद्याः यैर्येषुवा तथा विद्वांसश्च भवन्ति ते वेदाः**

"सर्व मनुष्यें ज्यांत विद्वान होऊं शकतात किंवा सर्व मनुष्यें ज्यांच्या सहाय्यानें सर्व विद्या जाणतात, ज्ञानी होतात, ज्ञान मिळवतात, (अज्ञेयाविषयीं) विचार करतात ते वेद होत" तसेंच—

**आदिसृष्टिमारभ्याद्यपर्यंतं ब्रह्मादिभिः सर्वाः सत्यविद्याः श्रूयन्तेऽनया सा श्रुतिः ॥**

"सृष्टीच्या आरंभापासून आजपर्यंत जिच्या सहायानें सर्व सत्यविद्या ब्रह्मादिकांनीं ऐकल्या ती श्रुति (वेद) होय."

निराकार परमेश्वरापासूनच वेद उत्पन्न झाले असल्यामुळें आजपर्यंत कोणींही कोणत्याही माणसानें वेद रचले असें पाहिलें नाहीं. अग्नि, वायू, आदित्य व अंगिरस हे सुद्धां वेद प्रकट करण्यास कारणीभूत झाले इतकेंच. त्यावरून त्यांनीं वेद रचले असें समजावयाचें नाहीं. वेदांमधील शब्दार्थसंबंध परमेश्वरनिर्मितच आहे. मनुष्यकृत नाहीं. यावरून एवढें सिद्ध झालें कीं, अग्नि, वायू, आदित्य व अंगिरस या चार देहधारी जीवांच्या द्वारानें परमेश्वरानें ( श्रुति ) वेद प्रकाशित केले.

---

# वेदांच्या उत्पत्तीचा काळ.

" ओं तत्सत् । श्रीब्रह्मणो द्वितीये परार्द्धे वैवस्वत मन्वंतरे अष्टाविंशतितमे कलियुगे कलिप्रथम-चरणे अमुक संवत्सर-अयन-ऋतु-मास-पक्ष-दिन-नक्षत्र-लग्न-मूहूर्ते अत्र इदं कृत्यं क्रियते । "

या प्रकारचा संकल्प आर्यावर्तांतील आर्य लोक अजूनपर्यंत करीत आहेत. यामध्यें वर्तमान सृष्टीला किती वर्षें झालीं आहेत हें दिलें आहे. त्याचा अर्थ--"ओंतत्सत्. त्या ब्रह्माच्या दुसऱ्या परार्धांतील वैवस्वत मन्वंतर सध्यां चालू आहे. त्या मन्वतरांतील अठ्ठाविसावें कलियुग सध्यां सुरू असून, त्याच्या पहिल्या चरणांतलि अमुक संवत्सर, अयन इ० आज आहे. अशा दिवशीं अमुक कृत्य मी करतों." या संकल्पावरून आपणांस जगदुत्पत्तीचा व वेदोत्पत्तीचा काल काढतां येईल. तो असा--

सध्यां हें वैवस्वत मन्वंतर चाललें आहे. याच्या पूर्वी स्वायंभवः, स्वारोचिष, औत्तमि, तामसः, रैवतः व चाक्षुषः असे सहा मनु पुरे झाले आहेत. या सृष्टींत आणखी सात मनु पुढें येणार आहेत. मिळून एका ब्राह्मदिवसामध्यें १४ चवदा मनु होतात. एका मनूचा काल एकाहात्तर चतुर्युगें हा स्थूल मानानें समजण्यांत येतो; पण वास्तविक एका ब्राह्मदिवसामध्यें ( १४ मनु होऊन ) १००० एक सहस्र चतुर्युगें होतात व तेवढाच काल रात्रीचाही समजावा. सृष्टि हा ब्राह्म दिवस व प्रलय ही रात्र होय. आजच्या ब्राह्म दिवसांतील सहा मनु पूर्ण होऊन सातवा वैवस्वत चालला आहे. या वैवस्वत मनूपैकीं २७ चतुर्युगें पुरीं होऊन हें अठ्ठाविसावें चतुर्युग सुरू आहे. यापैकीं कृत, त्रेत व द्वापार हीं तीन युगें पूर्ण होऊन कालियुगाचीं ५००५ इतकीं वर्षें पुरीं झालीं आहेत. सध्यां कलीचें ५००६ वें वर्ष सुरू आहे. ह्याला आर्य लोक विक्रम संवत् १९६० ( व

शालीवाहन शक १८२६ ) असें म्हणतात. असो. यावरून आपणांस कालगणना करतां येईल. कालगणनेविषयीं प्रमाणें—

ब्राह्मस्य तु क्षपाहस्य यत्प्रमाणं समासतः ॥
एकैकशो युगानां तु क्रमशस्तान्निबोधत ॥ १ ॥
चत्वार्याहुःसहस्राणि वर्षाणां तु कृतं युगम् ॥
तस्य तावच्छती संध्या संध्यांशश्च तथा विधः ॥ २ ॥
इतरेषु ससंध्येषु ससंध्यांशेषु च त्रिषु ॥
एकापायेन वर्तन्ते सहस्राणि शतानि च ॥ ३ ॥
यदेतत्परिसंख्यातमादावेव चतुर्युगम् ॥
एतद्द्वादशसाहस्रं देवानां युगमुच्यते ॥ ४ ॥
दैविकानां युगानां तु सहस्रं परिसंख्यया ॥
ब्रह्ममेकमहर्ज्ञेयं तावती रात्रिरेव च ॥ ५ ॥
तद्वै युगसहस्रांतं ब्राह्मं पुण्यमहर्विदुः ॥
रात्रिंच तावतीमेव तेऽहोरात्र विदोजनाः ॥ ६ ॥
यत्प्राग्द्वादशसाहस्रमुदितं दैविकं युगम् ॥
तदेकसप्ततिगुणं मन्वंतरमिहोच्यते ॥ ७ ॥
मन्वंतराण्यसंख्यानि सृष्टिसंहार एव च ॥
क्रीडन्निवैत त्कुरुते परमेष्ठी पुनः पुनः ॥ ८ ॥

मनु. अ. १

**अर्थ**—ब्राह्मरात्र व ब्राह्मदिवस यांचें व युगांचें प्रमाण क्रमानें ऐका. ( दैवी ) चार हजार वर्षांचें एक कृतयुग; व चारशें वर्षांचा त्यांचा प्रत्येकीं संध्या व संध्यांशकाल होय. इतर युगांची व त्यांच्या संध्या व संध्यांश कालांची संख्या एकेका अंकानें कमी कमी होत जाते. ( कृत ४ हजार, त्रेत तीन हजार, द्वापार २ हजार व कलियुग १ हजार याप्रमाणें जाणावें. ) या चतुर्युगांच्या बारा हजार वर्षांना एक दैवीयुग असें म्हणतात. अशीं दैवयुगें एक हजार झालीं म्हणजे एक ब्राह्मदिवस होतो व तेवढ्याच कालाची एक ब्राह्मरात्र होते. एकाहात्तर दैविक युगांचें एक मन्वंतर होतें. सृष्टि व

संहार हा, तो परमात्मा सहज करीत आहे व या त्याच्या व्यापाराला अनंत मन्वंतरें झालीं आहेत. ( यामध्यें सांगितलेलीं वर्षें हीं देववर्षें आहेत असें समजावें. )

| | | |
|---|---|---|
| ४००० | देववर्षें झालीं म्हणजे एक | कृतयुग होतें. |
| ४०० | ” | कृतयुग संध्या ” |
| ४०० | | कृतयुगसंध्यांश. |
| ३००० | ” | त्रेतायुग ” |
| ३०० | | संध्या |
| ३०० | | संध्यांश. |
| २००० | ” | द्वापारयुग ” |
| २०० | | संध्या |
| २०० | | संध्यांश |
| १००० | ” | कलीयुग ” |
| १०० | | संध्या |
| १०० | | संध्यांश |
| १२००० | देववर्षें | |

१२०००×३६०=४३२०००० त्रेचाळीस लक्ष वीस हजार मानुष वर्षें मिळून कृत, त्रेत, द्वापार व कली हीं चार युगें होतात. अर्थात

| | |
|---|---|
| १७२८००० | कृतयुगाचीं मानवी वर्षें ( संध्या व संध्यांशासहित. ) |
| १२९६००० | त्रेतायुग ” ” ” |
| ८६४००० | द्वापारयुग ” ” ” |
| ४३२००० | कलीयुग ” ” ” |
| ४३२०००० | चतुर्युगी. |
| ×७१ | ( चतुर्युगें ७१ झालीं म्हणजे एक मनु होतो. ) |
| ३०६७२०००० | एका मनूचीं वर्षें. |
| ×६ | ( सहा मनू पुरे झाले ) |
| १८४०३२०००० | त्यांचीं वर्षें. |
| १२०५३३००५ | ( २७ चतुर्युगें + तीन युगें + गतकली ५००५ मिळून वर्षें झालीं तीं. ) |
| १९६०८५३००५ | इतकीं वर्षें सृष्टी उत्पत्ति होऊन आजपर्यंत झालीं. ( एक अब्ज शाण्णव कोटी आठ लक्ष त्रेपन्न हजार पांच ) पहिल्या प्रकरणांत |

सृष्टीच्या आरंभीं वेद झाले हें सिद्ध केलेंच आहे त्यावरून या सृष्टीमध्यें वेद प्रकाशित होण्यालाही इतकींच वर्षें झालीं असें समजावें.

ब्राह्म रात्र व ब्राह्म दिवस या संज्ञा केवळ संकेतासाठींच केल्या आहेत. त्यांवरून सृष्टीच्या उत्पत्तीचा काल व वेदोत्पत्तीचा काल बरोबर काढतां येतो. प्रत्येक मन्वंतरामध्यें सृष्टींतील नैमित्तिक गुणांमध्यें बदल होतो, तो समजण्यासाठीं मन्वतरांच्या संज्ञा केल्या आहेत. वर्षसंख्या ( किंवा संख्या) कशी मोजावी हें सूर्य सिद्धांतांत सांगितलें आहे.–

**एकं दशशतं चैव सहस्रमयुतं तथा ॥**
**लक्षंच नियुतं चैव कोटिरर्बुदमेव च ॥ १ ॥**
**वृन्दः खर्वो निखर्वश्च शंखः पद्मंच सागरः ॥**
**अंत्यं मध्यं परार्द्धंच दशवृद्ध्या यथाक्रमम् ॥ २ ॥**

—सूर्यसिद्धांत.

अर्थ—एकं, दहं, शतं, सहस्र, अयुत, लक्ष, नियुत, कोटी, अर्बुद, वृंद, खर्व, निखर्व, शंख, पद्म, जलधि, अंत्य, मध्य व परार्द्ध हीं स्थानें आहेत. मागच्याच्या दसपट पुढचें आहे या प्रमाणें मागें लिहिलेलीं वर्षें वाचावीं व समजावीं. वेदामध्येंही या कालासंबंधानें सूक्ष्मरूपानें सांगितलें आहे.—

**सहस्रस्य प्रमासि सहस्रस्य प्रतिमासि ॥ यजु. अ. १५।६५ ॥**
**सर्वं वै सहस्रं । सर्वस्य दातासि ॥ शतपथ कां. ७ अ. ५ ॥**

"सहस्र म्हणजे सर्व जग. हे परमेश्वरा! त्याचा तूं परिमाणकर्ता आहेस, किंवा सहस्र महायुग संख्येनें परिमित जो ब्राह्मदिन त्याला तूंच जाणणारा आहेस." ही ब्राह्मदिवसाची गणना एका क्षणापासून तों पूर्ण ब्राह्मदिवसापर्यंत आर्यांनीं बरोबर केलेली आहे. अनादिकालापासून प्रत्येक दिवशीं त्याची गणना कशी केली जाते हें आरंभीं दाखविलेंच आहे. तेव्हां त्यांत शंका घेण्यास जागा नाहीं. कारण, या आर्यावर्तांतील आबालवृद्ध अद्यूनपर्यंत याच बिनचूक गणणेनें आपलीं कृत्यें करीत आहेत.

यावरून विलसनसाहेब, मोक्षमुल्लर वगैरे लोक यांचें मत कीं, वेद मनुष्यरचित असून ते परमेश्वरप्राणित नाहींत व त्यांस उत्पन्न होऊन अडीच तीन हजारच वर्षें झालीं आहेत हें मत भ्रममूलक आहे असें जाणावें. त्याचप्रमाणें प्राकृत भाषेंत व्याख्यान करणारे रा. शंकर पांडुरंग यांचेंही मत भ्रममूलक आहे असें समजावें.

# वेदांचें नित्यत्व.

पूर्वीच्या प्रकरणामध्यें ईश्वरापासून वेदांची उत्पत्ति ठरवली आहे. ज्या अर्थी परमेश्वराचें सर्व सामर्थ्य नित्य आहे, त्या अर्थी वेदही नित्यच असले पाहिजेत. (प्र०) वेद शब्दमय असल्यामुळें नित्य असूं शकत नाहींत. शब्द हा कार्यरूपी असल्यामुळें घटा॰ प्रमाणें अनित्य आहे. घट जसा उत्पन्न होऊन नाश पावतो त्याच प्रमाणें शब्दही उत्पत्तीनंतर नाश पावतो. म्हणून शब्द अनित्य आहे व अर्थातच शब्दमय वेदही अनित्य आहेत. (उ०) हा कोटिक्रम ठीक नाहीं. शब्द दोन प्रकारचे आहेत. एक नित्यशब्द व दुसरा कार्यशब्द. जे परमेश्वरीय ज्ञानामध्यें शब्द-अर्थ-संबंध आहेत. ते नित्य होत व जे आमच्या व्यवहारांत आहेत ते कार्यशब्द असल्यामुळें अनित्य समजावे. ज्या परमात्म्याचें ज्ञान व कर्म हें स्वभावसिद्ध, अनादि अर्थात् नित्य आहे त्याचें सर्व सामर्थ्य नित्यच असलें पाहिजे. परमेश्वरीय ज्ञानमय वेद असल्यामुळें तेहि नित्यच असले पाहिजेत; कधींहि ते अनित्य होऊं शकत नाहींत. (प्र०) काय हो! ज्यावेळीं प्रळय होतो व सर्व जगत् कारण प्रकृतीमध्यें लीन होतें व ज्यावेळीं या दृश्यमान स्थूलपैकीं कांहींहि राहत नाहीं, त्यावेळीं पठनपाठन व्यवहार किंवा पुस्तकें यांपैकीं कांहींच राहत नसल्यामुळें वेद तरी कसे बरें राहूं शकतील व ते नित्य कसे होऊं शकतील? (उ०) हें आपलें म्हणणें पुस्तकांच्या पानांबद्दल व आमच्या इतर व्यवहारांबद्दल ठीक आहे. पण आम्ही म्हणतों कीं, ज्ञानमय ईश्वरीय वेद नित्य आहेत. ते ज्या पानांवर लिहिले असतील तीं जरी नाश पावलीं तथापि ज्ञान नाश पावत नाहीं; किंवा पठनपाठन परंपरा लोपली असतांही ज्ञान नाश पावत नाहीं. कारण, वेदज्ञान ईश्वराकडे सदैव विद्यमान आहे. ईश्वरीय ज्ञान नित्य व अव्यभिचारी असल्यामुळें जसे वेदांतील शब्दार्थसंबंध आज आहेत तसेच ते पूर्वीच्या कल्पांत होते व तसेच पुढेंही राहणार.

## सूर्याचंद्रमसौ धाता यथा पूर्वमकल्पयत् ॥

ऋ. ८ । ८ । ४८ ॥

“परमेश्वरानें पूर्वीच्या कल्पांमध्यें जशी सर्व सृष्टीची ( सूर्यचंद्रादिकांची ) रचना केली होती तशीच त्याणें या सृष्टीमध्येंही केली आहे.” ईश्वराचें ज्ञान नाश व वृद्धि पावणारें नसल्यामुळें त्याची सृष्टीरूप कृती एकसारखी व त्याचें वैदिक ज्ञानही नेहेमीं एकसारखेंच असतें. म्हणून वेद नित्य आहेत.

# वेदांच्या नित्यत्वाविषयीं व्याकरणादि शास्त्रांचीं प्रमाणें.

शब्दांच्या नित्यत्वाबद्दल भगवान् पतंजलिमुनि लिहितातः—

**"नित्याः शब्दाः नित्येषु शब्देषु कूटस्थैरविचालिभिर्वर्णैर्भवितव्यमनपायोपजनविकारिभिरिति"**

—व्याकरण महाभाष्य १ आन्हिक.

"वर्णाला लोप, ( अपाय ) आगम, ( उपजन ) आदेश ( विकार ) होत नाहींत. अशा विकार न पावणाऱ्या अक्षरांनीं शब्द बनलेला असतो. म्हणून तो नित्य असलाच पाहिजे." ( प्र० ) गणपाठ, अष्टाध्यायी, महाभाष्य इत्यादि व्याकरण ग्रंथांमध्यें लोप, आगम वगैरे सांगितले आहेत, असें असतां शब्दांला ते होत नाहींत हें म्हणणें सयुक्तिक कसें बरें होईल? (उ०) महाभाष्यकार पतंजलीनें "**दाधाघ्वदाप्**" या सूत्रावरील भाष्यांत म्हटलें आहे—

**सर्वे सर्वपदादेशा दाक्षीपुत्रस्य पाणिनेः ।**
**एकदेश विकारे हि नित्यत्वं नोपपद्यते ॥ १ ॥**

—महाभाष्य.

**अर्थ**—सर्व पदांच्या ठिकाणीं इतर पदसमूह आदेशरूपानें येऊन बसतो (यावरून त्या मूळच्या शब्दांना विकार झाला असें समजावयाचें नाहीं कारण,) एक देशीं विकार झाला अशी जरी कल्पना केली तरी शब्द नित्य होणार नाहींत (ह्मणून शब्दांना विकार उत्पन्न होत नाहींत एका शब्दसमुदायाच्या ठिकाणीं दुसरा शब्दसमुदाय येऊन बसतो.) उदाहरण—"**वेदपार । गम् । ड् । सु । भू । शप् । तिप् ॥**" या शब्दसमुदायाच्या ठिकाणीं "**वेदपारगोऽभवत् ।**" हा दुसरा शब्दसमुदाय येऊन बसतो. या ठिकाणीं कित्येकांचा भ्रम असा होतो कीं, मूळच्या शब्दांना विकार होऊन दुसरे शब्द बनले. पण वास्तविक तसें नाहीं. एका शब्दाच्या ठिकाणीं दुसरा शब्द येणें हा भाग निराळा व एका शब्दामध्यें विकार होऊन त्याचाच दुसरा शब्द होणें निराळें. तात्पर्य व्याकरणाच्या दृष्टीनें शब्दांना विकार होत नाहींत, पण शब्दांतराचा प्रयोग एका शब्दाच्या जागीं होतो. अर्थात शब्द अविनाशी आहेत. तसेंच —

**श्रोत्रोपलब्धिर्बुद्धिनिर्ग्राह्यः प्रयोगेणाभिज्वलित आकाश देशः शब्दः ॥ महाभाष्य अइउण् सूत्रे ॥**

"कर्णेंद्रियाला जो समजतो, बुद्धीनें ज्याचें ग्रहण होतें, उच्चार करण्यानें ज्याचा स्फोट होतो व ज्याचें स्थान आकाश आहे तो शब्द होय" या महाभाष्यांतील शब्दाच्या

लक्षणावरूनही शब्द नित्य आहे असेंच ठरतें कारण, आकाश नित्य आहे व त्याचा गुण शब्द आहे; म्हणून तो नित्य असलाच पाहिजे. "ऐकणें व बोलणें" या आमच्या क्रिया तत्क्षणींच नाश पावणाऱ्या आहेत. त्या जरी क्षणभंगुर आहेत तथापी त्यांणीं ग्रहण केला जाणारा शब्द अनित्य होणार नाहीं. म्हणूनच महाभाष्यामध्यें—

## "एकैकवर्णवर्तिनी वाक्"

असें म्हटलें आहे. "वाणी ही प्रत्येक वर्णाच्या ठिकाणीं अन्य अन्य होत जाते, म्हणून ती अनित्य आहे." पण शब्द तसा अनित्य नाहीं. तो अखंड एकरस असा आहे. तात्पर्य, आमच्या इंद्रियांच्या क्रिया जरी अनित्य असल्या तथापि तीं इंद्रियें ज्याचें ग्रहण करतात तो नित्यच आहे. (प्र०) अहो, उच्चारण करण्यापूर्वी व उच्चारल्यानंतर शब्द ऐकूं येत नाहीं. उच्चार होत असतांना मात्र शब्द विद्यमान असतो; यावरून उघड होतें कीं, वाणीप्रमाणेंच शब्दही अनित्य आहे. (उ०) तसें नव्हे. आकाशाप्रमाणें शब्द पूर्वींही असतोच पण त्याचें आविष्करण, साधनांच्या अभावामुळें होत नाहीं. प्राण, वाणी व प्रयत्न यांणीं त्याचें आविष्करण होतें. "गौः" हा शब्द उच्चारतांना जेव्हां वागिंद्रिय "ग्" या वर्णावर असतें तेव्हां "औ" चें उच्चारण होत नाहीं व जेव्हां "औ" स्वर उच्चारला जातो तेव्हां विसर्ग अनुच्चारित असतो. या प्रमाणें वाणीमध्यें लोप, विकार होतात. शब्दांत नव्हे, म्हणून शब्द सर्वत्र एकरस–एक सारखा–आहे. ज्या ठिकाणीं वायू, वाणी व प्रयत्न होत नाहींत तेथें आविष्करण होत नाहीं. (ज्या प्रमाणें दोन लांकडांमध्यें अग्नि सदोदित असतोच पण घर्षणानें उघड होतो, त्याचप्रमाणें आकाशांत सदैव असणारा शब्द उच्चारणप्रयत्नानें प्रकट होतो.) यावरून पूर्वी शब्द नव्हता, मग उत्पन्न झाला असें म्हणतां येणार नाहीं. तो नित्य आहे. तात्पर्य, व्याकरणवाद्यांच्या मतानें लौकिक व वैदिक हे दोनही शब्द नित्य आहेत.

## पूर्व मीमांसाकर्ते जैमिनीमुनि

यांच्या मतानेंही शब्द नित्यच आहे. "**नित्यस्तुस्याद्दर्शनस्य परार्थत्वात् ॥** पूर्व मीमांसा. अ. १।१।१८ ॥" याचा अर्थ—"शब्द नित्य आहे कारण, उच्चारानें अर्थबोध होतो." शब्द नित्य अर्थात नाशरहित आहे. उच्चारणानें जें शब्दाचें श्रवण होतें तें अर्थज्ञानासाठीं होय. शब्दोच्चाराबरोबर तो ज्ञानांत स्थिर होऊन तेथून त्याच्या अर्थाची संगति होते. जर शब्द उच्चारल्याबरोबर नाश पावणारा असता, तर ऐकणाऱ्याला अर्थाची प्रतीती झाली नसती. शिवाय अनेक स्थलीं एकाच काळीं जसें "गौ" या एकाच शब्दाचें उच्चारण होतें तसेंच तें वारंवार होऊं शकतें. जर तो शब्द नित्य व सर्वव्यापक नसता तर त्याचें सर्वत्र व सर्वदा उच्चारण होणें अशक्य होतें असो. याप्रमाणें अनेक हेतू देऊन जैमिनी मुनीनीं शब्दाचें नित्यत्व स्थापन केलें आहे

## वैशेषिककर्ते कणादमुनि

यानींही "तद्वचनादाम्नायस्य प्रामाण्यम् ॥ वैशे० १।१।३ ॥" या सूत्रामध्यें शब्दाचें प्रामाण्य व नित्यत्व सांगितलें आहे. "वेदांमध्यें धर्माविषयीं ( कर्तव्याकर्तव्यते-बद्दल ) विवेचन आहे व ते ईश्वरोक्त आहेत म्हणून चारही वेद नित्य व प्रमाण आहेत." याप्रमाणें कणादमुनींचें मत आहे.

## न्यायशास्त्रकार गौतममुनि

यानीं, "मंत्रायुर्वेद प्रामाण्यवच्च तत्प्रामाण्यमाप्त प्रामाण्यात् ॥ न्याय० २।१।६७॥" या सूत्रामध्यें वेद प्रमाणभूत व नित्य आहेत असें सांगितलें आहे. त्याचा अर्थ-"( तत्प्रामाण्यम् ) ते वेद प्रमाण आहेत असें सर्वांनीं मानावें कारण, ( आप्तप्रामाण्यात् ) त्यांचें प्रामाण्य, सर्व धर्मात्मे, कपटछलादिदोषरहित, दयाळू, सत्याचा उपदेश करणारे, विद्यापारंगत, महायोगी अशा ब्रह्मादिकांनीं—आप्तांनीं—मानलें आहे. ज्या प्रमाणें ( मंत्रायुर्वेद० ) पदार्थविद्याप्रकाशक मंत्रांचें अर्थात विचारांचें प्रामाण्य मानावयाचें, किंवा आयुर्वेदाचें – वैद्यशास्त्राचें—प्रमाण मानावयाचें, ( त्यांतील एका औषधानें गुण आला असतां जसा त्या पुस्तकांतील इतर भागही प्रमाण मानतात, ) त्याच प्रमाणें वेदांतील प्रत्यक्षार्थक भागाच्या सत्यतेवरून अदृष्टार्थक जो इतर वेदभाग त्याचेंही प्रामाण्य मानावें." या सूत्रावर वात्स्यायनमुनि येणें प्रमाणें भाष्य करतात.

"द्रष्टृप्रवक्तृसामान्याच्चानुमानम् । य एवाप्ता
वेदार्थानां द्रष्टारः प्रवक्तारश्च त एवायुर्वेदप्रभृतीना
मित्यायुर्वेद प्रामाण्यवद्वेदप्रामाण्य मनुमातव्यमिति ।
नित्यत्वाद्वेदवाक्यानां प्रमाणत्वे तत्प्रामाण्यमाप्त
प्रामाण्यादित्युक्तम् ॥ —वात्स्यायनः ।

अर्थ—"जे आप्त पुरुष वेदमंत्रांचा अर्थ जाणतात व सांगतात तेच आयुर्वेदाचेही कर्ते आहेत. ज्याअर्थी त्यांचा आयुर्वेदग्रंथ प्रमाण आहे त्याअर्थी त्यांणीं प्रमाण मानलेले वेदही प्रमाण असलेच पाहिजेत ( सर्व प्रकारें आप्तपुरुष जो ईश्वर त्यानें सांगितलेले व इतर महर्षींनीं प्रमाण मानलेले वेद हे सर्वांनीं प्रमाण मानण्यास योग्य असलेच पाहिजेत. ) वेद हे ईश्वरीविद्यामय असल्यामुळें नित्य होत. इ०" याच विषयासंबंधानें

## योगशास्त्रकार पतंजलिमुनि

यानीं आपल्या दर्शनांत "सपूर्वेषामापि गुरुः कालेनानवच्छेदात् ॥योगद.।१।१।२६।॥" असें सांगितलें आहे "तो परमेश्वर जसा सृष्टीच्या प्रारंभीं उत्पन्न झालेल्या अग्नि, वायू इत्यादिकांचा व प्राचीन ब्रह्मादिकांचा गुरु आहे तसा तो वर्तमान काळच्या

व भविष्यकालच्या सर्वांचा गुरु आहे." वेदांच्या द्वारानें सर्वांना सत्यविद्येचा उपदेश करतो म्हणून तो परमेश्वर "गुरु" होय. तो परमात्मा सदा नित्य आहे. त्याठिकाणीं कालाची गति नाहीं. अविद्यादि क्लेश व पापवासना त्याठिकाणीं मुळींच नाहींत. त्या परमेश्वराचे ठिकाणीं निरतिशय, नित्य, स्वाभाविक असें ज्ञान सदैव वास करीत आहे. अशा ईश्वरानें वेद सांगितले आहेत म्हणून ते नित्य व सत्यविद्यायुक्त असलेच पाहिजेत असें जाणावें.

## कपिल महामुनि

यानींही आपल्या सांख्यसूत्रांमध्यें "**निजशक्त्यभिव्यक्तः स्वतः प्रामाण्यम् ॥** सांख्य द० ५१ ॥" म्हणजे "परमेश्वराच्या स्वाभाविक ज्ञानशक्तीपासून उत्पन्न झालेले वेद असल्यामुळें ते प्रमाणभूत व नित्य आहेत असें समजावें." असें स्पष्ट सांगितलें आहे. तसेंच

## कृष्णद्वैपायन व्यासमुनि

यांनीं आपल्या वेदांतदर्शनामध्येंही असेंच सांगितलें आहे. "**शास्त्रयोनित्वात् ॥** वेदान्तद० १।१।३॥" याचा अर्थ="ऋग्वेदादि जे चार वेद आहेत, ते सर्व सत्य विद्यांचा प्रकाश सूर्याप्रमाणें करणारे आहेत;" "म्हणून त्यांचा कर्ता सर्वज्ञ परब्रह्मा-वांचून दुसरा कोणीही होऊं शकत नाहीं. व्याकरणादि एक देशीय शास्त्रें पाणिनी आदी निरनिराळ्या मुनींनीं केलीं व तसें करणें शक्यही आहे कारण, कोणताही जीव संस्कारविशेषानें एक शास्त्रांत पारंगत होईल पण वेद हे अनंत विद्यायुक्त असल्यामुळें त्यांचा कर्ता परमेश्वरावांचून दुसरा कोणीही नाहीं." याप्रमाणें शंकराचार्यांनीं वरील सूत्राच्या भाष्यांत विवरण केलें आहे. यावरून उघड आहे कीं, सर्वज्ञ परमेश्वर-प्रणित वेद आहेत म्हणून ते सर्वार्थज्ञानयुक्त व नित्य आहेत. म्हणूनच व्यासानीं त्याच अध्यायामध्यें "**अतएव च नित्यत्वम् ॥ ३।२९ ॥**" असें सांगितलें आहे. याचा अर्थ—"वेद ईश्वरोक्त असल्यामुळें ते स्वतः प्रमाण, सर्व विद्यायुक्त, सर्व कालीं सारखे नित्य आहेत असें सर्वांनीं मानावें." वेद प्रमाण आहेत हें सिद्ध करण्यासाठीं अन्य ग्रंथांचीं प्रमाणें नकोत कारण, ते सूर्याप्रमाणें स्वतः प्रमाण आहेत. हीं इतर प्रमाणें साक्षिरूप आहेत. ज्या प्रमाणें सूर्य स्वयंप्रकाशी असल्यामुळें तो जगांतील अणूपासून पर्वतापर्यंत सर्व पदार्थांला प्रकाशित करतो व दाखवितो तद्वत् वेदहि स्वयंज्ञानमय असल्यामुळें ते सर्व विद्यांचा प्रकाश करतात, असें समजावें. या विषयीं स्वतः परमेश्वरानें वेदांच्या व स्वतःच्या नित्यत्वाविषयीं सांगितलें आहे:—

**स पर्य॑गाच्छु॒क्रम॑का॒यम॑व्र॒णम॑स्नावि॒रꣳ शु॒द्धमपा॑पविद्धम् ॥ क॒विर्म॑नी॒षी प॑रि॒भूः स्व॑यं॒भूर्या॑थातथ्य॒तोऽर्था॒न्व्यद॑धाच्छाश्व॒तीभ्यः॒ समा॑भ्यः ॥** यजु. अ. ४०।८ ॥

अर्थ—( सः ) तो सर्वव्यापक ईश्वर ( पर्यगात् ) सर्वगत आहे. एक अणूरेणूसुद्धां त्याच्याशिवाय नाहीं. ( शुक्रं ) तो सर्व जगत्कर्त्ता, वीर्यवान्, अनंत बलयुक्त आहे. ( अकायं ) तो स्थूल, सूक्ष्म व कारण या तीनही प्रकारच्या शरीरांशिवाय आहे. ( अव्रणं ) तो छेदरहित व क्षतरहित आहे. ( अस्नाविरं ) स्नायू, शिरा इत्यादि बंधनरहित, ( शुद्धं ) अविद्यादि दोषांहून सदैव दूर असणारा, ( अपापविद्धं ) तो कधींही पापयुक्त असत नाहीं, तो (कविः) सर्वज्ञ ( मनीषी ) सर्वांच्या मनांतलि जाणणारा-सर्वसाक्षी-( परिभूः ) सर्वांवर विराजमान ( स्वयंभूः ) निमित्त-उपादान-साधारण अशीं तीनही कारणें ज्याला नाहींत, जो स्वयं असलेला, जो सर्वांचा पिता व ज्याचा पिता कोणी नाहीं तो परमेश्वर स्वसामर्थ्यानें सदा प्रकाशित होत आहे. ( शाश्वतीभ्यः ) अशा प्रकारचा तो परमेश्वर निरंतर ( समाभ्यः ) प्रजांना, लोकांना ( याथातथ्यतः ) यथार्थपणानें वेदोपदेश करून ( अर्थान् व्यदधात् ) सर्वांला व्यवस्थित करतो. अर्थात् ज्यावेळीं सृष्टि करतो त्यावेळीं तो सर्व प्रजांच्या हितासाठीं सर्व विद्यामय वेदांचा उपदेश करतो म्हणून कोणीही वेद अनित्य मानूं नयेत कारण, परमेश्वराची विद्या सदैव एकसारखी असते.

ज्या प्रमाणें शास्त्रप्रमाणांनीं वेद नित्य आहेत असें ठरतें त्या प्रमाणें युक्तीनेंही ठरतें पहा–**आहे तें नाहींसें होत नाहीं व नाहीं तें आहेसें होत नाहीं. सद्वस्तूंचा अभाव होत नाहीं व असद्वस्तूंचा सद्भावही होत नाहीं. जें असेल तेंच होईल.** या न्यायानेंही वेद नित्यच ठरतात. कारण, ज्याला मूळ नाहीं त्याला शाखा वगैरे कशा असतील? व ज्याला शाखा असतलि त्याला मूळ नसेल कसें? जर मुळावांचून शाखा मानल्या तर वंध्यापुत्राचें लग्न होण्यास काय हरकत आहे? तात्पर्य, ज्याप्रमाणें वंध्यापुत्राचें अस्तित्व संभवत नाहीं त्याप्रमाणें मुळावांचून शाखा होणें असंभाव्य आहे. जर ईश्वराजवळ अनंत विद्या नसेल, तर तो तिचा उपदेश करूं शकणार नाहीं व जर त्याचा उपदेश सृष्टीच्या आरंभीं झाला नाहीं तर पुढें कोणालाही विद्या येणार नाहीं. या जगांत मुळाशिवाय कोणताही अंकूर वाढत नाहीं. ज्यावर ज्या गोष्टीचा जसा संस्कार झाला असेल त्याला त्याविषयीं तितकें ज्ञान असतें. जो संस्कृत शिकेल त्याला संस्कृत येईल व जो दुसरी भाषा शिकेल त्याला ती दुसरी भाषा येईल. संस्कार झाल्याशिवाय स्मरण होत नाहीं व स्मरणाशिवाय ती ती विवक्षित विद्याही येणें शक्य नाहीं; हें अगदीं उघड आहे. जर सृष्टीच्या आरंभीं परमेश्वरानें उपदेश व अध्यापनरूप संस्कार केले नसते तर पुढें कोणालाही कोणतीच विद्या आली नसती. असें होऊं नये म्हणूनच परमेश्वरानें वेदविद्येचा उपदेश सर्गारंभीं केला. (प्र०) ईश्वरानें वेदोपदेश केला असें मानण्याची गरज नाहीं कारण, मनुष्यांला स्वाभाविक ज्ञान आहे, व त्यांस हरएक कामामध्यें सुखदुःखाचा अनुभव येत

आहे. या अनुभवानेंच त्यांनीं त्यांचें ज्ञान वाढवलें असें कां म्हणूं नये? (उ०) याचें उत्तर वेदोत्पत्ति प्रकरणांत दिलेंच आहे. शिकविल्याशिवाय कोणीही विद्वान होऊं शकत नाहीं. यावरून उघड आहे कीं, ईश्वरोपदेशावांचून कोणीही विद्वान होऊं शकला नसता. अरण्यामध्यें लहान मुलास नेऊन ठेवलें असतां त्यास व रानांतील माणसांस स्वाभाविक ज्ञान असतांही विद्यालेशही नसतो. हें मनांत आणलें असतां, परमेश्वर हाच सर्व विद्यांचें उगमस्थान आहे यांत शंका वाटणार नाहीं. म्हणून ईश्वरापासूनच वेदविद्या आली व ती नित्य आहे असें ठरलें. जी वस्तु नित्य आहे, तिचें नांव, गुण, व कर्मही :नित्यच असतें. आधार नित्य असल्यामुळें नाम–गुण–कर्मादिक जें आधेय आहे तेंही नित्यच असलें पाहिजे. "नित्य" म्हणजे "उत्पत्ति व विनाश यांहून भिन्न." "उत्पत्ति" म्हणजे "भिन्न द्रव्यांचा संयोग" व "नाश" म्हणजे "ऐक्य पावलेल्या भिन्न द्रव्यांचें पृथक् होणें." "अदर्शन" शब्दानेंही नाशाचाच अर्थ दाखविला जातो. ईश्वर सदैव एकरस सर्वत्र सारखा असल्यामुळें त्याचे ठिकाणीं संयोगवियोग अर्थात उत्पत्ति व विनाश संभवतच नाहीं. पहा–

**सदकारणवन्नित्यम् ॥ १ ॥ वैशेषिक द० ४।४।१॥**[1]

"जें कार्य कारणापासून उत्पन्न झालेलें असतें, तें उत्पत्तीच्या पूर्वी विद्यमान नसल्यामुळें "अनित्य" समजावें." पण जें कधींही कार्यरूप बनत नाहीं, सदोदित कारणावस्थेंतच असतें तें नित्य असें समजावें" जें संयोगजन्य असतें त्याला कर्त्याची अपेक्षा असते. व तो कर्ताही जर संयोगजन्य असला तर त्याचा दुसरा आणखीं कर्ता मानला पाहिजे. या प्रमाणें शेवटीं कोणता तरी असा कर्ता मानला पाहिजे कीं, जो संयोगजन्य नाहीं. नाहीं तर "अनवस्था" नामक दोष होईल. या करतां असा संयोगविरहित कर्ता शेवटीं मानणें भाग आहे. दुसरें असें कीं, जें संयोगजन्य द्रव्य असतें, तें कधींही मूळ प्रकृती परमाणूंच्या संयोगाला कारण आहे असें म्हणतां येणार नाहीं कारण, सूक्ष्म हें स्थूलाचें कारण होऊं शकतें. सूक्ष्म स्थूलांत राहूं शकतें. अग्नि सूक्ष्म असल्यामुळें तो लोखंडांत जाऊन तेथें पृथक्त्व उत्पन्न करतो. तसेंच जल पृथिवीपेक्षां सूक्ष्म असल्यामुळें तें पृथ्वींत शिरून तिचें एकीकरण किंवा पृथक्करण करूं शकतें. त्याच प्रमाणें सर्वांहून सूक्ष्म व विभू असा जो परमेश्वर तो प्रकृतीच्या परमाणूंमध्यें संयोगविभागात्मक कार्यें करून जगताची रचना किंवा नाश करतो. आम्ही प्रकृतीच्या परमाणूंत बांधलेले असल्यामुळें आम्ही जगद्रचनेचें काम करण्यास समर्थ नाहीं. त्यास प्रत्येक परमाणूंत व्यापक असणाऱ्या परमात्म्याचीच गरज आहे. परमेश्वर प्रकृतीच्या संयोगापासून किंवा वियोगापासून उत्पन्न झाला नाहीं, तो यांहून निराळा आहे. तो पूर्ण रीतीनें निराळा असल्यामुळेंच सृष्टिरचना व संहार हीं कार्यें करूं शकतो.

१ पान. ७

( ज्याप्रमाणें भांडें भांड्याला बनवूं शकत नाहीं तर कुंभार भांड्याला बनवतो. पार्थिव परमाणूंचा संयोग होऊन भांडें बनतें व या संयोगाहून कुंभार निराळा असतो त्याच प्रमाणें वरील बाबतींत समजावें. ) तात्पर्य, निर्विकार, अनादि, नित्य, सत्यसामर्थ्य व सर्वशक्तिमान् अशा ईश्वरापासून सृष्टीच्या आरंभीं वेद उत्पन्न झाले; यासाठीं व ते सदैव त्याच्या ज्ञानामध्यें विद्यमान असतात म्हणून ते नित्य आहेत असें सिद्ध झालें.

# वेदांमध्यें कोणते कोणते विषय आहेत?

## १ विज्ञानकाण्ड.

वेदांमध्यें मुख्यत्वें करून चार विषय आहेत. ( १ ) विज्ञान, ( २ ) कर्म, ( ३ ) उपासना, व ( ४ ) ज्ञान, हे ते चार विषय होत. या चारहि विषयांमध्यें, पहिल्या " विज्ञान " या विषयानें, तृणापासून तों परमेश्वरापर्यंत यच्चयावत् पदार्थांचा यथावत् बोध होत असल्यामुळें, तो विषय सर्वांत मुख्य मानला जातो. विज्ञानकाण्डानें सर्व पदार्थांचें ज्ञान होतें खरें पण त्यांतही " ईश्वराचें ज्ञान होणें " हा विज्ञानकाण्डाचा मुख्य उद्देश आहे; कारण सर्व पदार्थांपेक्षां परमेश्वर प्रधान-( श्रेष्ठ )-आहे, म्हणून संपूर्ण वेदांचा मुख्य इत्यर्थ " परमेश्वराचें ज्ञान होणें " हाच आहे. पहा—

**सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपा ँसि सर्वाणि च यद्वदन्ति ॥ यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत् ॥ कठोपनि० व० २।१५॥**

अर्थ—( सर्वे वेदा० ) सर्व वेद ज्या परब्रह्मप्राप्ति—लक्षण, सर्वानंदमय व सर्वदु:खविरहित अशा मोक्षरूपी पदाचें-अर्थात् ज्याला " ओम् " हें मंगल नांव आहे, त्या परमेश्वराचें-( आमनन्ति ) मुख्यत्वेंकरून वर्णन करतात. ( तपांसि स० ) सत्यधर्मानुष्ठानरूपी सर्व तपें हीं त्याच परमेश्वरप्राप्तीसाठींच आहेत, व ( यदिच्छन्त: ) ज्या परमेश्वराच्या प्राप्तीची इच्छा करणारे लोक ( ब्रह्मचर्य ) ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास हे चारही आश्रम स्वीकारून त्या त्या आश्रमांचीं कर्तव्यें करतात, त्या ओंकाररूपी पदाविषयीं मी ( यम ) ( हे नचिकेत: ) तुला संक्षेपानें सांगतों, तसेंच—

**तस्य वाचकः प्रणवः ॥ योगदर्शन १।१।२७॥**
**ओम् खं ब्रह्म ॥ यजु. अ. ४० ॥**
**ओमिति ब्रह्म ॥ तैत्तिरीयारण्यक प्र. ७।८ ॥**

" त्या परमेश्वराचा ' प्रणव" हाच वाचक आहे. प्रणव म्हणजे ओंकार. ओम् हें त्या सर्वव्यापक ब्रह्माचें—परमेश्वराचें—नांव आहे." तसेंच.—

**तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्ववेदः शिक्षाकल्पो व्याकरणं निरुक्तं छन्दो ज्योतिषमिति ॥ अथ परा यया तदक्षरमधिगम्यते ॥ १ ॥**

**यत्तदद्दश्यमग्राह्यमगोत्रमवर्णमचक्षुः श्रोत्रं तदपाणि पादं नित्यं विभुं सर्वगतं सुसूक्ष्मं तदव्ययं यद्भूतयोनिं परिपश्यन्ति धीराः ॥ २ ॥ मुण्डक उप० १।१।५।६॥**

अर्थ—ऋग्वेदादि चारहि वेदांमध्यें दोन विद्या आहेत, (१) परा व (२) अपरा. जिच्या अध्ययनानें अव्यय, सूक्ष्म, सर्वव्यापी, विभू, नित्य, निरवयव, चक्षुश्रोत्रांला अविषय, वर्णरहित, अदृश्य, अग्राह्य व अगोत्र अशा परमेश्वराचें ज्ञान होतें ती परा —श्रेष्ठ—विद्या होय. व जिच्या योगानें तृणापासून प्रकृतीपर्यंत सर्व पदार्थांचें ज्ञान होतें ती 'अपरा' होय. 'अपरा' विद्येपेक्षां 'परा' विद्या ही श्रेष्ठ आहे कारण, ती विद्या ब्रह्मज्ञानसंबंधीं आहे. तसेंच—

**तद्विष्णोः परमं पदं सदा पश्यन्ति सूरयः ॥ दिवीव चक्षुराततम् ॥ १ ॥**

ऋग्वेद १ । २ । ७ । ९ ॥

**अर्थ**—जें ( विष्णोः ) सर्वव्यापक परमेश्वराचें ( परमं ) परमानंद स्वरूप व ( पदं ) सर्वांनीं मिळविण्यास योग्य असें मोक्षाख्य स्थान आहे तें ( सूरयः ) विद्वान लोक ( सदा ) सर्वदा ( पश्यन्ति ) पाहतात. तें ( आ ) सर्व ठिकाणीं ( ततम् ) विस्तार पावलेलें, व्यापलेलें, देशकालवस्तू इत्यादींनीं परिछिन्न न झालेलें असें आहे. तें व्यापक असल्यामुळें सर्वांना सर्वकाळीं प्राप्त होण्यासारखें आहे. ज्याप्रमाणें ( दिवि ) सूर्य प्रकाशामध्यें ( चक्षुः ) डोळ्यांचा व्यवहार होतो, त्याच प्रमाणें सर्वांला प्राप्त व्हावें म्हणून तें चोहोंकडे व्यापून राहिलें आहे. ज्ञानी लोक त्याला पाहण्याची व मिळवण्याची इच्छा करतात म्हणून सर्व वेद विशेषेंकरून त्याच पदाचें स्पष्टीकरण करीत आहेत. याविषयीं वेदान्तदर्शनामध्यें व्यासमुनी असें लिहितात—

**तत्तु समन्वयात् ॥ वे० द० १ । १ । ४ ॥**

"त्या ब्रह्माचेंच वर्णन सर्व वेदवाक्यांत पूर्ण रीतीनें केलेलें आहे." कोठें साक्षात् आहे तर कोठें परंपरेनें आहे. तात्पर्य कीं, वेदांमधलि मुख्य विषय "ब्रह्म" हा आहे. याविषयीं यजुर्वेदांतील प्रमाण—

**यस्मान्न जातः परो अन्यो अस्ति य आविवेश भुवनानि विश्वा ॥ प्रजापतिः प्र-**

**जर्या स ँ रराण स्त्रीणि ज्योती ँ षि सचते स षोडशी ॥ यजु० ८।३६ ॥**

**अर्थ**—( यस्मात् ) ज्या परमेश्वराहून ( अन्यः ) कोणीहि दुसरा ( परः ) उत्तम पदार्थ ( न जातः ) झालेला नाहीं. म्हणजे जो सर्वांहून उत्तम आहे व ( यः ) जो ( प्रजापतिः ) प्रजांचें रक्षण करणारा परमात्मा ( विश्वा ) सर्व ( भुवनानि ) लोक-लोकान्तरांमध्यें ( आविवेश ) व्यापला आहे. तो ( संरराणः ) सर्व प्राण्यांला सुख-देणारा ( त्रीणि ज्योतींषि ) सूर्य, अग्नी व विद्युत् या प्रकाशमान तीन ज्योतींचा ( प्रजया ) इतर उत्पन्न केलेल्या सृष्टीशीं ( सचते ) संयोग करतो. म्हणूनच ( सः ) त्या परमेश्वराला ( षोडशी ) षोडशकला उत्पन्न करणारा असें म्हणतात. षोडश कलांचीं नांवें खालीं दिलीं आहेत—( १ ) ईक्षण म्ह० यथार्थ विचार, ( २ ) प्राण म्हण० विश्वाला धारण करणारी शक्ति, ( ३ ) श्रद्धा म्ह० सत्यावर विश्वास, ( ४ ) आकाश, ( ५ ) वायु, ( ६ ) अग्नि ( ७ ) जल, ( ८ ) पृथिवी, ( ९ ) इंद्रिय, ( १० ) मन, ( ११ ) अन्न, ( १२ ) वीर्य, ( १३ ) तप म्ह० धर्मानुष्ठान, सत्याचार, ( १४ ) मंत्र म्हणजे वेदविद्या, ( १५ ) कर्म व ( १६ ) नाम म्ह० दृश्य व अदृश्याची संज्ञा या त्या सोळा कला होत. याच सर्व सृष्टीमध्यें आहेत. या षोडशकला त्या परमेश्वरानें उत्पन्न केल्या म्हणून त्याला " षोडशी " असें म्हणतात. असा हा परमेश्वर सर्वांहून श्रेष्ठतम् आहे. तसेंच—

**ओमित्येतदक्षरमिद ँ सर्वं तस्योपव्याख्यानम् ॥**

**मांडूक्य उपनिषद् ॥**

" ओम् हें ज्याचें नांव आहे, तें ( अक्षर ) कधींहि नाश न पावणारें असें ब्रह्म आहे. त्याचेंच व्याख्यान वेदांत आहे." असो. येथवर दिलेल्या आधारांवरून हें लक्षांत येईल कीं, सर्व वेद शास्त्रें व सर्व जग या परमात्म्याचेंच व्याख्यान करीत आहेत. सर्वांच्या वर्णनाचा मुख्य विषय हाच आहे. उघडच आहे—

**प्रधानाप्रधानयोः प्रधाने कार्यसम्प्रत्ययः ॥**

**व्याकरणमहाभाष्य ॥**

" मुख्य व गौण यांतून सर्व मुख्याचेंच ग्रहण करतात." त्याचप्रमाणें सर्व वेदां-मध्येंहि मुख्यत्वें करून, सर्वांत मुख्य अशा परमेश्वराचेंच वर्णन आहे. परमेश्वरप्राप्ति हाच सर्व वैदिक उपदेशांचा इत्यर्थ आहे. म्हणून वेदोपदेशाप्रमाणें कर्म, उपासना व

ज्ञान या तीनहि कांडांचें, पारमार्थिक व व्यावहारिक फल मिळावें म्हणून व परोपकार घडावा म्हणून सर्व मनुष्यांनीं, अनुष्ठान ( योग्य आचरण ) करावें.

# वेदांमधील विषय—२ कर्मकाण्ड.

वेदांमधील कर्मकांड हा दुसरा विषय आहे. हा क्रिया प्रधान आहे. सामान्य विचाराच्या अंतीं सर्वांस हें कळेल कीं, कर्माशिवाय विद्याभ्यास व ज्ञानप्राप्ति होणें शक्य नाहीं. मन हें बाह्य व आंतरिक व्यवहारांत सारखें गुंग असतें. या दृष्टीनें पाहतां कर्मकांड हें विशेष महत्वाचें आहे. याचे जरी अनेक प्रकार असले तथापि याचे दोन भाग मुख्य आहेत. ( १ ) निष्काम कर्म व ( २ ) सकाम कर्म. केवळ मोक्षच साधण्याच्या इच्छेनें ईश्वराची स्तुति, प्रार्थना, उपासना, त्याच्या आज्ञेचें पालन, धर्मानुष्ठान व ज्ञान हीं केवळ परम पुरुषार्थासाठींच केलीं जातात; व तीं करीत असतां जें कर्म होतें तें निष्काम कर्म होय यामध्यें परमेश्वर प्राप्ति हेंच श्रेष्ठ फल असल्यामुळें व यामध्यें अनंत सुखें स्वभावतः मिळणारीं असल्यामुळें हें कर्म श्रेष्ठ आहे. दुसरें लौकिक व्यवहार सिद्ध होण्यासाठीं धर्मानें, अर्थ व काम मिळवण्याची इच्छा करून जें केलें जातें तें सकाम कर्म होय. याचें जन्ममरण हें फल असल्यामुळें निष्काम कर्मापेक्षां हें कमी प्रतीचें आहे. या दुसऱ्या प्रकारामध्यें अग्निहोत्रापासून तों अश्वमेधापर्यंत सर्व यज्ञांचा अंतर्भाव होतो या सर्व यज्ञांमध्यें ( १ ) सुगंधित, ( २ ) मिष्ट, ( ३ ) पुष्टिकारक व ( ४ ) रोग नाशक अशा चार प्रकारच्या व निरनिराळ्या संस्कारांनीं शोधन करून सुसंस्कृत बनवलेल्या द्रव्यांचें, हवन होत असल्यामुळें वायू व वृष्टिजल यांची शुद्धि होते व त्यायोगें सर्व जगाला सुख होतें. तसेंच भोजन, आच्छादन, यान, कलाकौशल्य, यंत्र, सामाजिक नियम इत्यादिकांची सिद्धि होण्याकरतां जो यज्ञरूपी कर्म करतो, त्याचें फल विशेषेंकरून स्वतः पुरतेंच असतें.

## हवनीय द्रव्यांवर संस्कार.

होमामध्यें हवन करण्याच्या द्रव्यांवर विशेष संस्कार करावा या विषयीं, पूर्वमीमांसेमध्यें सांगितलें आहे—

**द्रव्यसंस्कारकर्मसु परार्थत्वात्फलश्रुतिरर्थवादः स्यात् ॥**
**द्रव्याणां तु क्रियार्थानां संस्कारः क्रतुधर्मः स्यात् ॥**

पूर्व मी० अ० ४।३। सूत्र १।८

" पूर्वोक्त सुगंधादि गुणयुक्त चार प्रकारचीं द्रव्यें घेऊन त्यांवर परस्पर उत्तमोत्तम गुण उत्पन्न व्हावे म्हणून संस्कार करावे. ( १ ) द्रव्यसंपादन, ( २ ) संस्कार व,

( ३ ) कर्म हे तीन प्रकार यज्ञकर्त्यानें अवश्य केले पाहिजेत. संस्काराचें फळ फार आहे. ज्याप्रमाणें अन्नावर विशेष संस्कार करण्यासाठीं तुपाची फोडणी देतात, तूप चमचांत घालून तापवून त्यांत सुगंधित पदार्थ टाकतात, नंतर तें तापून त्यांतून धूर निघूं लागल्यावर ज्याला फोडणी द्यावयाची त्यामध्यें तें घालतात व त्या भांड्याचें तोंड बंद करून तें हालवतात. या योगानें त्या भांड्यांतील सर्व पदार्थाला या दिलेल्या फोडणीचा सुवास येतो; व त्या योगें तो पदार्थ पौष्टिक व रुचकर होतो.—त्याचप्रमाणें यज्ञापासून उत्पन्न होणारी वाफ वायूला व पाण्याला निर्दोष करते व त्यामुळें सर्वांला सुख होतें. म्हणून म्हटलें आहे—

**यज्ञोपि तस्यै जनतायै कल्पते यत्रैवं विद्वान्**
**होता भवति ॥ ऐतरेय ब्रा० १ । २ ॥**

"जनसमूहाच्या सुखासाठीं यज्ञ केला जातो. ज्या यज्ञांत या प्रकारचा विद्वान मनुष्य सुसंस्कृत द्रव्यांचा अग्नींत होम करतो ( तो यज्ञ सर्वांला सुखदायी होतो )." यज्ञ हा ( परार्थत्वात् ) परोपकारासाठींच आहे. यज्ञाच्या योगानें अनर्थकारक दोष दूर होऊन सर्वांला सुख होतें. हवनीय द्रव्यांवर विद्वान पुरुषांनीं योग्य संस्कार करणें हाच क्रतुधर्म समजावा. अशा प्रकारच्या यज्ञांनींच धर्म होतो अन्यथा नाहीं." तसेंच

**अग्नेर्वै धूमो जायते धूमादभ्रमभ्राद्वृष्टिरग्नेर्वा**
**एता जायन्ते तस्मादाह तपोजा इति ॥ शतपथ ब्रा० । ३ ॥**

"ज्यावेळीं हवन केलेल्या वृक्ष, वनस्पति, ओषधि, जल आदि पदार्थांत अग्नि शिरून त्यांतील रसांचें पृथक्करण करतो, तेव्हां धूर व वाफ असे मुख्यतः दोन पदार्थ उत्पन्न होतात. भूमींतील जलांशाला वाफ व शुष्क पृथिवीच्या अंशाला धूर असें म्हणतात. हे धूर व वाफ वजनांत कमी असल्यामुळें वायूच्या आधारानें आकाशांत जातात. तेथें जलसंचय होऊन त्यांचीं अभ्रें–मेघ–बनतात. त्यांपासून वृष्टि होते. म्हणून अग्नीपासूनच या वनस्पती व ओषधी उत्पन्न होतात. असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्या वनस्पतींचें अन्न व अन्नाचें वीर्य बनतें. वीर्यापासून शरीर होतें." तसेंच—

**तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः**
**आकाशाद्वायुः वायोरग्निः अग्नेरापः अद्भ्यः**
**पृथिवी पृथिव्या ओषधयः ओषधिभ्योऽन्नं**

**अन्नाद्रेतः रेतसः पुरुषः सवा एष पुरुषोऽन्नरसमयः**
**तैत्तिरीयोप० आनंदव. अ. १ ॥**

"त्या प्रकृत्यात्म्यापासून आकाश, आकाशापासून वायू वायूपासून अग्नि, अग्नीपासून पाणी, पाण्यापासून पृथिवी, पृथिवीपासून ओषधि, ओषधींपासून अन्न, अन्नापासून रेत व रेतापासून पुरुष झाला. म्हणून हा पुरुष अन्न-रस-मय आहे. तसेंच—

**स तपो तप्यत स तपस्तप्त्वा अन्नं ब्रह्मेति व्यजानात् । अन्नाध्द्येव खल्विमानि भूतानि जायन्ते अन्नेन जातानि जीवन्ति अन्नं प्रयन्त्य-भिसंविशंतीति ॥ तैत्तिरी० भृगुवल्ली अ० २ ॥**

" अन्न हें ब्रह्म होय. कारण तें जीवनाचा मोठा आधार आहे. शुद्ध अन्न, जल व वायू यांच्या द्वारानेंच प्राणिमात्रांला सुख होतें. सर्व अन्नापासून उत्पन्न होतात, अन्नाच्या योगानें जगतात व शेवटीं अन्नांतच लय पावतात." असो या आधारांवरून अन्न, जल व वायू यांच्या शुद्धीसाठीं यज्ञ करावा हें ठरलें.

सृष्टीमध्यें ईश्वरकृत यज्ञ चाललेलाच आहे. त्याच्याबरोबर मनुष्यकृत यज्ञहि सुरू असला पाहिजे. अशा रीतीनें दोनहि प्रयत्न अव्याहत चालले असले म्हणजे सर्वांस उत्तम सुख मिळतें. ईश्वरानें अग्निमय सूर्य उत्पन्न करून त्याच्या द्वारानें पुष्पें, वनस्पती इत्यादिकांतून सुगंधी व रोगनाशक इत्यादि रस आकर्षिले जात आहेत. या मोठ्या यज्ञाच्या योगानें जसें जगांतील सुगंधित रसांचें आकर्षण होतें तसें तें दुर्गंधियुक्त रसांचेंहि होतें. यामुळें स्वाभाविक रीतीनें होणाऱ्या यज्ञाच्या योगानें जल व वायू इष्टानिष्ट गुणयुक्त होतात. अर्थात तें मध्यम प्रकारचे असतात. या मध्यम प्रकारच्या जल व वायूपासून मध्यम प्रकारच्या ओषधी व त्यामुळें मध्यम रेत व शरीरें होतात. अशीं मध्यम शरीरें झाल्यामुळें बल, बुद्धि, पराक्रम, वीर्य, धैर्य, शौर्य आदि गुणसुद्धां मध्यमच होणार; कारण **जसें कारण तसें कार्य.** कोणी असें म्हणतील कीं, हा ईश्वरसृष्टीचा दोष आहे! नाहीं. हा दोष मनुष्यांचा आहे. मनुष्यांपासून दुर्गंधाची उत्पत्ति होते, म्हणून तिचा प्रतीकार मनुष्यांनींच केला पाहिजे. ( तो जर मनुष्यांनीं केला नाहीं तर वरच्याप्रमाणें सदोष जल व वायु होतात. ज्या ठिकाणीं मनुष्यें कमी आहेत किंवा मूळींच नाहींत तेथील जल व वायू परमेश्वरीय यज्ञानें स्वच्छ असतात. पण जेथें मनुष्यें जास्ती प्रमाणानें राहतात, तेथें स्वाभाविक होणाऱ्या यज्ञानें काम भागत नाहीं. म्हणून प्रत्येकानें निराळा यज्ञ केला पाहिजे.) "**यज्ञ करा**"

ही परमेश्वराची आज्ञा आहे. तिचें उल्लंघन करणारा मनुष्य पापी होतो व क्लेश भोगतो. ज्याप्रमाणें सत्यभाषण करण्याविषयींची आज्ञा मोडल्यानें मनुष्य दोषी ठरून दुःख भोगतो त्याचप्रमाणें यज्ञाविषयीं समजावें. जितके मनुष्य एके ठिकाणीं जास्त राहतील. ( मोठ्या शहरांत राहतात त्याप्रमाणें ) तितका दुर्गंध त्या ठिकाणीं जास्त होतो. मनुष्यें आपल्या सुखासाठीं हत्ती, घोडे वगैरे आपल्या जवळ पाळून ती आणखी जास्त घाण त्यांत उत्पन्न करतात. या सर्वांला ज्या अर्थी मनुष्येंच कारण आहेत त्या अर्थी अशा रीतीनें उत्पन्न होणाऱ्या दुर्गंधाचें निवारण मनुष्यांनींच केलें पाहिजे.

शहरादिकांमध्यें जरी सर्व प्राणी दुर्गंध उत्पन्न करीत असले तथापि त्यांत उपकार व अपकार यांचा विचार करणारा एकटा मनुष्यच असल्यामुळें त्यालाच त्या दोषांचें निरसन करणें अवश्य आहे. "**मननान्मनुष्यः ।**" परमेश्वरानें सर्व प्राण्यांमध्यें विचार करण्यास योग्य अशी अवयव रचना व परमाणूंची घटना मनुष्यांमध्येंच केलेली आहे. म्हणून मनुष्यांनींच धर्माधर्म कर्तव्याकर्तव्यतेचा विचार केला पाहिजे; व अनिष्ट दोष यांचें निरसन यज्ञद्वारा केलें पाहिजे. तात्पर्य यज्ञ करून मनुष्यांनीं सर्वांवर उपकार केले पाहिजेत. ( प्र० ) कस्तुरी आदि सुगंधित द्रव्यांचा होम अग्नीमध्यें केला असतां तीं जळून नाहीशीं होतात, असें असतां त्यांपासून परोपकार होतो हें तुमचें म्हणणें कसें बरें खरें मानतां येईल? जर या द्रव्यांपासून परोपकार करणें असेल, तर ते ते पदार्थ मनुष्यांना द्यावे, तसेंच मनुष्यांची अन्नानें तृप्ति करावी म्हणजे झालें. यज्ञ करून पदार्थ जाळून टाकण्यांत काय फायदा? ( उ० ) **असलेल्या पदार्थांचा अत्यंत विनाश कधींही होत नाहीं.** दृष्ट पदार्थाचें अदर्शन झालें म्हणजे त्याला सामान्य लोक नाश असें म्हणतात, पण वास्तविक तो पदार्थ त्यावेळीं नाश पावलेला नसतो. हें आठ प्रमाणांनीं आपणांस सिद्ध करतां येईल.—

**इंद्रियार्थसंन्निकर्षोत्पन्नं ज्ञानमव्यपदेश्यमव्यभिचारि-**
**व्यवसायात्मकं प्रत्यक्षम् ॥ १ ॥ अथ तत्पूर्वकं त्रिविध-**
**मनुमानम् पूर्ववच्छेषवत्सामान्यतो दृष्टं च ॥ २ ॥**
**प्रसिद्ध साधर्म्यात्साध्यसाधनमुपमानम् ॥ ३ ॥**
**आप्तोपदेशः शब्दः ॥ ४ ॥ अ० १ सू० ४ । ५ । ६ । ७ ॥**
**—न्यायशास्त्रे गौतमाचार्याः ।**

( १ ) "प्रत्यक्ष, ( २ ) अनुमान, ( ३ ) उपमान, ( ४ ) शब्द, ( ५ ) ऐतिह्य, ( ६ ) अर्थापत्ति ( ७ ) संभव व ( ८ ) अभाव हीं आठ प्रकारचीं प्रमाणें आहेत.

( १ ) इंद्रियें व त्यांचे अर्थ यांच्या संबंधापासून जें खरें व संशयरहित ज्ञान होतें तें प्रत्यक्ष ज्ञान होय. उदा०-"हा मनुष्य आहे." असें मनुष्याला पाहिल्यानंतर जें ज्ञान होतें तें ( २ खुणेवरून ती खुण ज्याचें चिन्ह आहे त्याचें ज्ञान होणें तें अनुमान ज्ञान होय. जसें— मुलगा पाहिल्यानंतर "याचा बाप असला पाहिजे" हें ज्ञान अनुमान ज्ञान होय. ( ३ ) सादृश्य ज्यानें दाखवलें जातें तें उपमान होय. जसें— जसा देवदत्त आहे तसाच यज्ञदत्तही आहे. ( ४ ) ज्यानें दृष्ट व अदृष्टार्थाची प्रतीति होते त्याला शाब्दिकज्ञान असें म्हणतात. जसें—"**ज्ञानान्मोक्षः**=ज्ञानानें मोक्ष होतो" हें शब्दप्रमाणानें जाणावयाचें. ( ५ )—

**न चतुष्ट्वमैतिह्यार्थापत्तिसंभवाभावप्रामाण्यात् ॥ ५ ॥**
**शब्दऐतिह्यानर्थान्तरभावादनुमानेऽर्थापत्तिसंभवाऽभावानर्थान्तरभावाच्चाप्रतिषेधः ॥ ६ ॥**

**—न्यायशास्त्र. अ० २। आ० २।१।२ ॥**

( ५ ) ऐतिह्य म्हणजे आप्तपुरुषानें सांगितलेला वृत्तान्त होय. जसें-"देव व असुर यांचें युद्ध झालें." ( ६ ) अर्थाच्या संबंधावरून जो बोध होतो ती अर्थापत्ति समजावी. जसें—मेघ असले तर पाऊस पडेल या वाक्यावरून "मेघ नसले तर वृष्टि होणार नाहीं" हा जो बोध होतो ती अर्थापत्ति होय. ( ७ ) जें असण्याची शक्यता आहे तो संभव होय. जसें—मातापित्यांपासून संतानोत्पत्ति होणें संभवनीय आहे. पण जर कोणी सांगिलतें कीं, "कुंभकर्णाचे केश चार कोस लांब होते, सोळा कोस लांब नाक होतें;" हें असंभवनीय समजावें. ( ८ ) जेथें जो पदार्थ असावयाचा तेथें तो नसणें याचें नांव अभाव जसें-कोणी कोणाला भांडें आणावयास सांगितलें असतां, त्या जागीं भांडें न पाहून तो म्हणतो "येथें तें भांडें नाहीं." याचें नांव अभाव होय. हीं आठ प्रकारचीं प्रमाणें आहेत. सर्व व्यवहार या अष्टविध प्रमाणांवर चालला आहे. कोणतीहि गोष्ट-खरी कीं, खोटी याचा निकाल-या आठ प्रमाणांवरून करावयाचा आतां हवन केलेल्या पदार्थाचा नाश होतो कीं काय हें आपण या कसोटीनें तपासून पाहूं—

पहा, जर एखाद्यानें मातीचें ढेंकुल हातांत घेऊन त्याचें बारीक चूर्ण केलें व तें जोरानें सोंसाट्याच्या वाऱ्यांत फेंकलें. तर त्याचा नाश[१] झाला असें पाहणाऱ्याला सकृ-

---

१ "णश्-अदर्शनें" या धातूवरून घञ् प्रत्यय केला असतां "नाश" हा शब्द सिद्ध होतो.

इंद्रियांनीं वाटेल. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. हातांमध्यें ढेंकुळ असेपर्यंत तें डोळ्यांला दिसत होतें म्हणून त्याला आपण आहे असें म्हटलें; व त्याचे परमाणू भिन्न भिन्न होऊन आकाशांत गेल्यावर आपण त्याचा नाश झाला असें म्हटलें. हवेंत फेंकल्यानंतर जरी तें ढेंकूळ आपल्या नजरेला दिसेनासें झालें तथापि त्याचे रजःकण हवेंत व्यापून राहले होते. हें विसरतां नये. जेव्हां ते एकत्र जमतात व त्यांचा एक स्थूल आकार बनतो तेव्हां तो आपल्या स्थूल इंद्रियाला दिसतो व तेच परमाणू निरनिराळे झाले म्हणजे तो पदार्थ दिसेनासा होतो. पण त्याचे सूक्ष्म अवयव-परमाणू-आकाशांत असतातच हें आपल्यास अनुमानानें समजतें.

अग्नीमध्यें हवन केलेल्या द्रव्याचेंही याचप्रमाणें समजावें. अग्नीमध्यें घातलेलें द्रव्य पृथक्करण पाऊन परमाणू रूपानें सर्व हवेंत मिसळून राहतें. म्हणून त्याचा नाश झाला असें म्हणतां येणार नाहीं. म्हणून दुर्गंधादि दोषनिवारक सुगंधित द्रव्यांचा होम अग्नींत केला असतां त्यापासून वायु, वृष्टि व जल शुद्ध होतात हें म्हणणें सयुक्तिक आहे. हे तीन पदार्थ निर्दोष झाले असतां सर्वांवर उपकार होतात म्हणून यज्ञ केलाच पाहिजे. ( प्र० ) अहो! वायु व वृष्टिजल यांची शुद्धि करणें हेंच जर यज्ञाचें प्रयोजन आहे तर ते ते सुगंधित पदार्थ घरांत ठेवले असतांही तें कार्य होईल. मग त्यांच्या हवनाची आवश्यकता काय आहे? ( उत्तर ) अग्नीच्या योगानें अशुद्ध वायु हलका होऊन वर जातो व तेथें शुद्ध वायू येतो. जर अग्नि न पेटवितां नुसतीं द्रव्यें घरांत ठेवलीं तर त्यांचा सुगंध त्या अशुद्ध वायूमध्यें मिसळेल इतकेंच. पण त्या अशुद्ध वायूचा अभाव होऊन तेथें शुद्ध वायू येणार नाहीं. व तसें न झालें तर आरोग्यही वाढणार नाहीं. म्हणून अशुद्ध वायूला तेथून काढून टाकण्यासाठीं अग्नीमध्येंच हवन करण्याची आवश्यकता आहे.

ज्यावेळीं एखाद्या घरामध्यें हवन केलें जातें त्यावेळीं त्या घरांतील अशुद्ध वायू अग्नीच्या योगानें हलका होऊन वर आकाशांत जातो; व तेथें चारही दिशांतून स्वच्छ वायू येतो. त्यामुळें तें घर आरोग्यकारक वायूनें युक्त होतें.

होमामध्यें घातलेल्या सुगंधित द्रव्यांच्या मिश्रणानें शुद्ध झालेला वायू वर आकाशांत जाऊन, तो तेथील पर्जन्याची शुद्धि करतो; व त्या योगानें पाऊस जास्तहि पडूं शकतो. अशा रीतीनें शुद्ध पाण्याची वृष्टि जास्त झाल्यानें वनस्पतींची वाढ व त्यांची शुद्धि होते. व त्या योगें सर्वांला सुख होतें. हें फल अग्नींत हवन केल्यानेंच होतें, अन्यथा होणें नाहीं; म्हणून हवन करणें अवश्य आहे.

दूरस्थळीं हवन होत असलेल्या सुगंधित पदार्थांचा वास बऱ्याच अंतरापर्यंत येऊं

शकतो. अर्थात त्या त्या द्रव्यांचे सूक्ष्म परमाणू वायुतून बऱ्याच अंतरापर्यंत जातात. व ते परमाणू आपल्या नाकावाटे आंत गेल्यावर आपणास येथें सुगंध आहे असें वाटतें. जितकें जितकें अंतर जास्त होत जातें तितका तितका तो सुगंध सूक्ष्म सूक्ष्म होत जातो. अती सूक्ष्म झाला म्हणजे आपणास कळेनासा होतो. त्यामुळें कित्येक म्हणतात कीं, येथें सुगंध नाहीं. पण जरी तो समजण्यांत आला नाहीं तथापि हुत द्रव्य सूक्ष्मरूपानें–जसें दुसऱ्या ठिकाणीं तसें तेथेंहि–असतेंच. सूक्ष्मत्वामुळें आपणास समजत नाहीं इतकेंच. असो. याप्रमाणें होमापासून होणारे अनेक फायदे विद्वानांनीं विचार करून जाणावे. ( प्र० ) जर होम करण्यापासून हाच फायदा आहे तर मग होम करतेवेळीं वेदमंत्र कां म्हणावे बरें ? ( उ० ) त्याचें कारण असें आहे पहा. आपण होम करतेवेळीं हातांनीं हवनीय द्रव्यें अग्नींत टाकतों, डोळ्यांनीं यज्ञ क्रिया पहातो, स्पर्शेंद्रियानें हवनीय द्रव्यांना स्पर्श करतों, त्याचप्रमाणें वाचेलाही कांहीं योग्य उद्योग पाहिजे. ईश्वर, स्तुति, प्रार्थना व उपासना हे वाणीचे व्यवहार होत व ते वेदमंत्रांत उत्तम रीतीनें ग्रथित असल्यामुळें त्यांचें पठन होमाच्या वेळीं करतात. शिवाय वेदमंत्रांमध्यें यज्ञाचें फल दिलेलें असतें, यज्ञ कसे करावे तें असतें म्हणून त्यांचा पाठ होमाच्या वेळीं इष्ट आहे. तसेंच वेदमंत्रांचें रक्षणही पठनानें होत असतें. शिवाय परमेश्वराची प्रार्थना सर्व कर्मांमध्यें करणें इष्ट आहे व ईशप्रार्थना वेदमंत्रांत आहे म्हणून त्यांचा पाठ केला पाहिजे. ( प्र० ) वेदमंत्रांशिवाय दुसरें कांहीं म्हटलें तर आपलें काम होईल कीं, नाहीं ? ( उ० ) नाहीं. वेदविरहित इतर वाक्यांमध्यें पूर्ण सत्याचा अंश नसतो व तीं ईश्वरोक्त नसतात म्हणून गौण समजावीं. जें जें इतरत्र आपणास सत्यज्ञान दिसत आहे तें तें वेदांतूनच गेलेलें आहे व जें जें असत्य आहे तें तें त्या त्या मनुष्यांच्या अज्ञानाचें फल होय. पहा मनुस्मृतींत म्हटलें आहे—

**त्वमेको ह्यस्य सर्वस्य विधानस्य स्वयंभुवः ॥**
**अचिंत्यस्याप्रमेयस्य कार्यतत्वार्थवित्प्रभो ॥ १ ॥**
**चातुर्वर्ण्यं त्रयो लोकाश्चत्वारश्चाश्रमाः पृथक् ॥**
**भूतं भव्यं भविष्यच्च सर्वं वेदात्प्रसिद्ध्यति ॥ २ ॥**
**बिभर्ति सर्व भूतानि वेदशास्त्रं सनातनम् ॥**
**तस्मादेतत्परं मन्ये यज्जन्तोरस्य साधनम् ॥ ३ ॥**

**मनु० अ० १२ श्लोक० ९७-९९**

" मनूला ऋषिलोक म्हणतात कीं, हे मनो ! या अचिंत्य वेदाला जाणणारा असा

तूं एकच आहेस. भूत वर्तमानादि सर्व विद्या व चार आश्रम व वर्ण हे वेदाच्या आधारानेंच पूर्ण होतात. वेदापासून सर्वांला विद्या मिळत असल्यामुळें वेदाच्या आधारानेंच सर्वांना सुख प्राप्त होतें " तात्पर्य असें वेदांचें महत्व आहे. म्हणून इतर गौण वाक्यें सोडून वेदमन्त्रांचा पाठ करणें सर्वदा इष्ट आहे.

यज्ञाचें अनुष्ठान करण्यासाठीं भूमि खणून वेदी करणें, प्रणीतादिपात्रें जमविणें, कुश दर्भ आणणें, यज्ञशाला बांधणें व ऋत्विज बोलावणें वगैरे कामें युक्तिसिद्ध असतील तेवढीं करावीं. पहा योग्य प्रमाणानें वेदी केली असतां अग्नि चांगला प्रदीप्त होतो व हवन केलेलीं द्रव्यें लवकर पृथक्करण पावतात. तसेंच वेदी करण्यासाठीं त्रिकोण, चतुष्कोण गोल श्येनाकार इत्यादि आकार करावे लागत असल्यामुळें रेखागणित-भूमिति-सहज येते. इष्टिकांचें परिगणन करावें लागत असल्यामुळें गणितविद्याही साध्य होते. याप्रमाणें इतर क्रियाही उपयुक्त आहेत. पण अमुक केलें असतां पाप होतें व अमुक केलें तर पुण्य लागतें, या समजुती निवळ भ्रामक होत कारण या क्रियांचा पापपुण्याशीं संबंध मुळींच नाहीं. म्हणून यज्ञादि कर्में कर्तव्य असतां युक्तिसिद्ध सर्व क्रिया कराव्या, कारण त्या न केल्या असतां कर्म योग्य रीतीनें पुरें होणार नाहीं.

---

## यज्ञांतील देवता.

यज्ञांमध्यें देवता शब्दानें कशाचा बोध होतो; व वेदोक्त देवता कोणत्या? याविषयीं प्रमाणें खालीं दिलीं आहेत.—

**अग्निर्देवता वातो देवता सूर्यो देवता चन्द्रमा देवता वसवो देवता रुद्रा देवतादित्या देवता मरुतो देवता विश्वेदेवा देवता बृहस्पतिर्देवतेन्द्रो देवता वरुणो देवता ॥ १ ॥**

यजु० १४ । २० ॥

"अग्नि, वायु, सूर्य, चंद्र, वसु, रुद्र, आदित्य, मरुत, विश्वेदेव, बृहस्पति, इंद्र व वरुण या देवता होत." कर्मकांडामध्यें वेदमंत्र ह्याच देवता होत, कारण ( **छंदांꣳसि**

वै देवः । शत० ८ । २ ) गायत्र्यादि छंदांनांच अग्न्यादि देवता असेंहि म्हणतात. ज्या मंत्रांत 'अग्नि" शब्दाच्या अर्थाचें प्रतिपादन असतें त्या मंत्राची "अग्नि" ही देवता होते. याचप्रमाणें वायू, सूर्य, चंद्र इत्यादिविषयीं जाणावें. हे शब्द ज्या ज्या मंत्रांत असतात तो तो मंत्र त्या त्या देवतेचा आहे असें समजलें जातें; कारण ईश्वरानें तसाच संबंध तेथें ठेवला आहे.

**कर्मसंपत्तिर्मन्त्रो वेदे ॥ निरु० अ० १ । २ ॥ यास्काचार्यः**

"अग्निहोत्रादिक व शिल्पविद्यादिक कर्मांची पूर्ण संपन्नता ज्यानें होते त्याला वेदांमध्यें देवता असें म्हणतात. किंवा कर्मांची संपत्ति अर्थात मोक्ष किंवा ईश्वरप्राप्ति ज्यानें होते त्या मंत्राला देवता असें म्हणतात." तसेंच —

**अथातो दैवतं तद्यानि नामानि प्राधान्यस्तुतीनां देवतानां तद्दैवतमित्याचक्षते सैषा देवतोपपरीक्षा यत्काम ऋषि र्यस्यां देवतायामर्थपत्यमिच्छन् स्तुतिं प्रयुङ्क्ते तद्दैवतः स मंत्रो भवति तास्त्रिविधा ऋचः परोक्षकृताः प्रत्यक्षकृता आध्यात्मिक्यश्च ॥ निरु० अ० ७।१ ॥**

" ज्या मंत्रांत ज्यांची मुख्यत्वें करून स्तुति आलेली असते त्या मंत्रांच्या त्या देवता समजाव्या. वेदमंत्रांत जीं नांवें ज्या अर्थानें आलीं असतील, ती त्या मंत्राच्या देवतेची खूण समजावी. जसें —

**अ॒ग्निं दू॒तं पु॒रो द॑धे हव्य॒वाह॒मुप॑ब्रुवे ॥ दे॒वाँ २ आ सा॑दयादि॒ह ॥ १ ॥ यजु० २२।१७ ॥**

या मंत्रांत " अग्नि " हें चिन्ह असल्यामुळें या मंत्राची " अग्नि " ही देवता समजावी. अर्थात ज्या ठिकाणीं " अमुक देवता " असा निर्देश असेल तेथें त्या देवतेचें चिन्ह ज्या मंत्रांत असेल तो मंत्र घ्यावा. तसेंच ज्या देवतेचा उल्लेख ज्या छंदानें केला जातो, तो छंदही त्या त्या देवतेचा वाचक समजावा. हीच देवता ओळखण्याची रीति आहे मंत्रांचा ऋषि जो ईश्वर त्यानें ज्या देवतेला उद्देशून मंत्रांत गुण वर्णन केलें आहे, तीच त्या मंत्राची देवता होय. अमूक मंत्रांत अमुक पदार्थांचें गुण वर्णन करीन असें मनांत आणून जिची स्तुति-( यथार्थ गुणवर्णनात्मक ) केलेली असते तीच त्या

मंत्राची देवता समजावी. अर्थात ज्या मंत्रामध्यें जिचें यथार्थ गुण वर्णन असतें ती त्या मंत्राची देवता समजावी. (**याभिर्विद्वांसः सर्वाः सत्यविद्याः स्तुवन्ति प्रकाशयन्ति ता ऋचः**) ज्यांच्या सहाय्यानें विद्वान लोक सर्व सत्यविद्यांचा प्रकाश करतात त्या ऋचा होत. या ऋचांचे तीन भेद आहेत. ( १ ) परोक्षकृत, ( २ ) प्रत्यक्षकृत व ( ३ ) आध्यात्मिक्य. ज्या परोक्षार्थ प्रतिपादक आहेत त्या परोक्षकृत; ज्यांचा अर्थ प्रत्यक्ष अनुभवास येतो त्या प्रत्यक्षकृत; व ज्यांमध्यें जीव व परमेश्वर यांविषयीं ज्ञान असतें त्या आध्यात्मिक्य ऋचा समजाव्या.

**तद्येऽनादिष्ट देवता मंत्रास्तेषु देवतोपपरीक्षा यद्देवतः स यज्ञो वा यज्ञांगं वा तद्देवता भवन्त्यथाऽन्यत्र यज्ञात्प्राजापत्या इति याज्ञिका नाराशंसा इति नैरुक्ता अपि वा सा कामदेवता स्यात् प्रायो देवता वास्ति ह्याचारो बहुलं लोके देवदेवत्यमतिथिदेवत्यं पितृदेवत्यं याज्ञदैवतो मंत्र इति ॥ निरु० अ० ७।४ ॥**

ज्या ठिकाणीं मंत्राच्या देवतेचा निर्देश केला नसतो त्या ठिकाणीं खालीं दिलेल्या पद्धतीप्रमाणें त्या त्या मंत्राची देवता ओळखावी. अशा मंत्रांची "यज्ञ" किंवा "यज्ञांग" ही देवता समजावी ज्या मंत्राचा उपयोग यज्ञांत होत नसतो किंवा जे मंत्र यज्ञाहून इतरत्रहि उपयोगांत येतात त्यांची "प्रजापती ( परमेश्वर )" ही देवता आहे असें याज्ञिक समजतात. निरुक्तवादी लोक ते मंत्र "नाराशंस ( म्ह० मनुष्य विषयक )" आहेत असें मानतात. सकाम कर्म करणारे लौकिक जन आप आपली "इष्ट देवता" हीच त्या मंत्राची देवता असें मानतात या प्रमाणें मंत्रांच्या देवतांविषयीं विकल्प पुष्कळ प्रकारानें लोकांत प्रचलित झालेला आहे. पुष्कळ ठिकाणीं देव, यज्ञादिकर्में, माता, पिता, विद्वान, अतिथि इत्यादि लोक सत्कार करण्यास योग्य असल्यामुळें देवतांच्या ठिकाणीं मानले गेले आहेत; कारण हे पूज्य आहेत व त्यांच्या ठिकाणीं लोकोपकार करण्याचा भाव वसत असल्यामुळें तेवढ्यापुरती त्यांच्या ठिकाणीं देवतेची कल्पना करतात. वास्तविक यज्ञासाठींच मंत्र झाले असल्यामुळें "यज्ञरूपी परमेश्वरच" सर्व मंत्रांची मुख्य देवता आहे असें समजावें.

गायत्र्यादि छंदांनीं युक्त असलेले वेदमंत्र, त्यांत सांगितलेली परमेश्वराची आज्ञा, यज्ञ, यज्ञांग, प्रजापती ( परमेश्वर ), नर, काम ( इच्छा ), विद्वान, अतिथि, माता, पिता, आचार्य इत्यादि कर्मकांडांतील देवता होत. या गौण देवता

समजाव्या. यज्ञामध्यें मुख्यत्वेंकरून वेदमंत्र व परमेश्वर याच दोन मुख्य देवता आहेत असें निश्चयपूर्वक सर्व समजतात. त्याच प्रमाणें देवतेचें लक्षण पुढें दिलें आहे.

**देवो दानाद्वा दीपनाद्वा द्योतनाद्वा द्युस्थानो भवतीति वा ॥ निरुक्त० अ० ७ । १९ ॥**

"कोणत्याही पदार्थावरील आपलें सत्व पूर्णपणें स्वखुषीनें नाहींसें करून तो दुसऱ्याला देऊन त्यावर पूर्ण अधिकार चालवण्यास त्यास मोकळीक देणें याचें नांव दान होय; दीपन म्हणजे प्रकाशमान होणें; द्योतन म्ह० उपदेशादिक करणें. हे गुण ज्यांत असतात तो देव. दान हा गुण विद्वानादि मनुष्यांत असल्यामुळें त्यांना देवता असें म्हणतात. प्रकाशादि गुण सूर्यादिकांत असल्यामुळें ते देवतासंज्ञक होतात ; व मातापिता, आचार्य, अतिथि हे उपदेशादिक करीत असल्यामुळें ते देव संज्ञेला योग्य होतात. तसेंच "द्यौः" हें "सूर्यकिरण, प्राण, सूर्य" इत्यादिकांचें नांव आहे. अशा या "द्यौ" मध्यें ज्याचें स्थान आहे तो "द्युस्थान" अर्थात परमेश्वर होय. ही देवत प्रकाशकांनाही प्रकाश देणारी असल्यामुळें सर्वांत मुख्य आहे. पहा—

**न तत्र सूर्यो भाति न चन्द्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः ॥ तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥ कठोपनि० व० ५ । १५ ॥**

"सूर्यचंद्रादिक प्रकाशमान असणारे गोल परमेश्वराच्या ठिकाणीं प्रकाश पाडूं शकत नाहींत. पण परमेश्वराच्या प्रकाशानेंच हे सर्व प्रकाशित होतात." हे सूर्यचंद्रादिक स्वयंप्रकाशी नाहींत. परमेश्वरावर यांचा प्रकाश अवलंबून आहे म्हणून परमात्मा हाच मुख्य देव आहे व तोच उपासना करण्यास योग्य आहे.

**नैनद्देवा आप्नुवन्पूर्वमर्शत् ॥ यजु० ४०।४ ॥**

"मन आदिकरून सहा इंद्रियें परमात्म्याचें ग्रहण करण्यास समर्थ झालीं नाहींत" इत्यादि ठिकाणीं "देव" शब्दानें "इंद्रियांचें ग्रहण करावयाचें कारण तीं शब्द स्पर्श-रूप-रस-गंध या विषयांचें व सत्यासत्यतेचें द्योतन करतात. "देव" शब्दावरून "**देवात्तल्**" या सूत्रानें "तल्" प्रत्यय स्वार्थीं होऊन "देवता" शब्द बनतो. म्हणून या दोन शब्दांमध्यें कांहीं भेद नाहीं. देवता स्तुतिरूप वेदमंत्रांलाच मंत्र व छंद अशीं दोन अन्वर्थक नांवें आहेत.

**मन्त्रा मननात् छन्दांसि छादनात् ॥ निरु० ७।१२ ॥**

" मनन करण्याचा विषय असतो म्हणून त्यांना मंत्र असें म्हणतात व ते अज्ञानाचें छादन-नाश-करतात म्हणून त्यांस छंद असें म्हणतात " हें सर्व स्तुतीच्या योगानें होतें. पदार्थमात्रांचे यथार्थ गुणदोष सांगणें ही स्तुति होय. या स्तुतीच्या मननानेंच अज्ञानाचें छादन होतें. स्तुतीमध्यें यथार्थ गुण वर्णनच पाहिजे. ( जास्त वर्णन करणें ही एक प्रकारची निंदाच होय. ) जसें-ही तरवार फारच तीक्ष्ण आहे. हिच्या योगानें एका घावांत दोन तुकडे सहज होतात. हिचें पाणी उत्तम असून धनुष्याप्रमाणें वांकविली तरी ही मोडत नाही इ० स्तुति होय. व याहून विपरीत बोलणें ही स्तुति नव्हे. याचप्रमाणें इतर देवताविषयक स्तुतीविषयींही समजावें. कर्मकांडांत तर हा नियम सार्वत्रिक आहे. या नियमाला अनुसरूनच तीनही कांडांचें अनुष्ठान केलें पाहिजे. निष्काम-कर्म करावयाचें असतां परमात्मा हाच इष्टदेव मानला पाहिजे; कारण निष्कामकर्म हें केवल परमेश्वर प्राप्तीसाठींच आहे. व सकामकर्मामध्येंहि इष्टविषय भोग मिळण्यासाठीं परमेश्वराचीच प्रार्थना केली जाते तात्पर्य या दोनही प्रकारच्या कर्मांमध्यें त्या परमात्म्याशिवाय दुसरा कोणीहि इष्ट देव मानला जात नाहीं. याविषयीं प्रमाण—

**महाभाग्याद्देवताया एक आत्मा बहुधा स्तूयते एकस्या-**
**त्मनोऽन्येदेवा प्रत्यङ्गानि भवन्ति ।**
**कर्मजन्मान आत्मजन्मान आत्मैवैषां रथो भवत्यात्माऽश्वा**
**आत्मायुधमात्मेषव आत्मा सर्वं देवस्य देवस्य ॥**

**निरुक्त० ॥ ७।४ ॥**

परमात्मा ( महाभाग्या० ) सर्वशक्तिमान असल्यामुळें सर्व व्यवहारोपयोगी देवतां मध्यें तोच मुख्य देव गणला जातो. त्याच्यापुढें इतर देवता गौण समजण्यांत येतात. वेदांमध्यें तर या असहाय्य अशा एका सर्वव्यापक परमेश्वराचीच ( बहुधा ) पुष्कळ प्रकारें स्तुति केलेली आहे. म्हणून अन्य देव हे त्याचींच प्रत्यंगें होत ( **अङ्गं अङ्गं प्रति अञ्चति** ) अर्थात ते त्याच्या एकदेशाच्या अंशमात्र प्रभावानें प्रकाशीत होणारे आहेत. ( कर्मजन्मा० ) ते देव कर्मामुळें उत्पन्न झालेले व परमेश्वराच्या सामर्थ्या पासून उत्पन्न झालेले आहेत. परमात्मा हाच ( रथः ) त्यांचा रमणीय आश्रय होय. तोच ( अश्वा ) त्यांच्या गतीला करण, तोच ( आयुध ) त्यांचा विजय करून देणारा ( इषवः ) तोच त्यांच्या दुःखांचा नाश करणारा आहे. तोच परमात्मा

( देवस्य० ) सर्व देवतांचा ( सर्व ) उत्पादक, पालक, अधिष्ठाता, व मंगलकारी आहे. याच्या शिवाय दुसरा उत्तम देव कोणीहि नाहीं." या विषयीं आणखीं दुसरें प्रमाण—

**ये त्रिंशति त्रयस्परो देवासो बर्हिरासदन् ।**
**विदन्नहद्वितासनम् ॥ १ ॥**

ऋग्वेद ६ । २ । ३९ । १ ॥

**त्रयस्त्रिꣳशतास्तुवत भूतान्यशाम्यन्प्र-**
**जापतिः परमेष्ठ्यधिपतिरासीत् ॥ २ ॥**

यजु० १४ । ३१ ॥

"देव तेहतीस आहेत. त्या सर्वांचा अधिपति परमेष्टि प्रजापति अर्थात परमात्मा आहे." तसेंच—

**यस्य त्रयस्त्रिंशद्देवा निधिं रक्षन्ति सर्वदा ॥**
**निधिं तमद्य को वेद यं देवा अभिर-**
**क्षथ ॥ ३ ॥**
**यस्य त्रयस्त्रिंशद्देवा अंगे गात्रा विभेजिरे ॥**
**तान्वै त्रयस्त्रिंशद्देवानेके ब्रह्मविदो वि-**
**दुः ॥ ४ ॥**

—अथर्व० १० । २३ । ४ मं० २३ । २७ ॥

"सदोदित त्या परमात्म्याचा निधि तेहतीस देव राखत असतात हे देव त्याच्या प्रत्यंगाच्या ठिकाणीं राहतात. ब्रह्मज्ञानीलोकांनाच या देवांची पूर्ण माहिती होते."

**स हो वाच महिमान एवैषामेते त्रयस्त्रिꣳशत्त्वेव देवा इति ।**
**कतमे ते तयस्त्रिꣳशदित्यष्टौ वसव एकादश रुद्रा**

द्वादशादित्यास्त एकत्रिंशदिंद्रश्चैव प्रजापतिश्च त्रय स्त्रिं॰ शाइति ॥ ३ ॥ कतमे वसव इति । अग्निश्च पृथिवी च वायुश्चान्तरिक्षं चादित्यश्च द्यौश्च चन्द्रमाश्च नक्षत्राणि चैते वसव एतेषु हीद॰ सर्वं वसुहितमेते हीद॰ सर्वं वासयन्ते तद्यदिद॰ सर्वं वासयन्ते तस्माद्वसव इति ॥ ४ ॥ कतमे रुद्रा इति ॥ दशेमे पुरुषे प्राणा आत्मैकादशस्ते यदास्मा न्मर्त्याच्छरीरादुत्क्रामन्त्यथ रोदयन्ति तद्यद्रोदयन्ति तस्मा- द्रुद्रा इति ॥ ५ ॥ कतम आदित्या इति ॥ द्वादशमासाः संवत्सरस्यैत आदित्या एते हीद॰ सर्वमाददानायन्ति तद्य- दिद॰ सर्वमाददानायन्ति तस्मादादित्या इति ॥ ६ ॥ कतम इन्द्रः कतमः प्रजापतिरिति ॥ स्तनयित्नुरेवेन्द्रो यज्ञः प्रजा- पतिरिति कतमस्तनयित्नुरित्यशनिरिति कतमो यज्ञ इति पशव इति ॥ ७ ॥ कतमे ते त्रयो देवा इतीम एव त्रयो लोका एषुहीमे सर्वे देवा इति ॥ ८ ॥ कतमौ द्वौ देवावि- त्यन्नं चैव प्राणश्चेति । कतमोऽध्यर्ध इति योऽयं पवत इति ॥ ९ ॥ तदाहुः । यदयमेक एव पवतेऽथकथमध्यर्ध इति यदस्मिन्निदं सर्वमध्यार्ध्नोत्तेनाध्यर्ध इति । कतम एको देव इति सब्रह्मत्यदित्याचक्षते ॥ १० ॥

शतपथ ब्रा. कां. १४ । ५ ॥

शाकल्याला याज्ञवल्क्य म्हणतो=" देव तेहेत्तीसच आहेत.–आठ वसु + अकरा रुद्र + बारा आदित्य=मिळून एकतीस व इंद्र आणि प्रजापति मिळून तेहेतसि होत. ( १ ) अग्नि, पृथिवी, वायु, अंतरिक्ष, आदित्य, द्यौ, चन्द्रमा व नक्षत्रें मिळून आठ वसू होतात. आदित्य म्हणजे सूर्यलोक व त्याचा पृथिवीपर्यंत व्यापणारा प्रकाश हीं द्यौ समजावी. या आठांच्या योगानेंच सर्व वस्तुमात्राचें धारण होतें–अर्थात सर्व वस्तु- मात्रांला वास करण्यास हे स्थान देतात ( **वासयति इति वसुः** ) म्हणून यांना वसु

असें म्हणतात. ( २ ) प्राण, अपान, व्यान, उदान, समान हे पांच प्राण व नाग कूर्म, कृकल, देवदत्त, धनंजय हे पांच उपप्राण व एक आत्मा मिळून अकरा रुद्र होतात. ज्या वेळीं हे शरीरांतून निघून जातात त्यावेळीं हे मरणाराच्या नातेवाईकांना रडवितात म्हणून ( **रोदयन्ति ते रुद्राः** ) त्यांना रुद्र असें म्हणतात. ( ३ ) चैत्रादि बारा महिने हेच ते बारा आदित्य होत. हे चक्राप्रमाणें भ्रमण करीत असून हे प्रतिक्षणीं वस्तुमात्राचें आयुष्य हरण करतात व त्याला लयाकडे घेऊन जातात म्हणून यांस आदित्य असें म्हणतात. विद्युत्-वीज हीच सर्वांत देदीप्यमान असल्यामुळें हिलाच ( **इदि परमैश्वर्ये** ) इन्द्र असें म्हणतात. यज्ञ व पशू यांना प्रजापति असें म्हणतात; कारण या दोहोंच्या योगानें प्रजांचा सांभाळ होतो. हे सर्व मिळून तेहेत्तीस देव होत. या ठिकाणीं पूर्वी सांगितलेलें **देवोदानाद्वा॰** ( पान ३५ ) हें निरुक्तांतिल लक्षण व्यावहारीक रीत्या लागू पडतें. तीन लोकांविषयीं निरुक्तकार म्हणतात—

**धामानि त्रयाणि भवन्ति स्थानानि नामानि जन्मानीति ॥ निरु० ९ । २८ ॥ त्रयोलोका एत एव ॥ वागेवायं लोको मनोन्तरिक्षलोकः प्राणोऽसौ लोकः ॥ शतपथ० १४ । ४ ॥**

" स्थान, नाम व जन्म हे तीन लोक होत. किंवा वाचा, मन व प्राण हे तीन लोक समजावे. " हेच तीन देव आहेत असें वरील शतपथांतील उताऱ्यांत म्हटलें आहे. अन्न व प्राण हे दोन देव. अध्यर्ध्य हा सर्व ब्रह्मांडाचा सूत्रात्मा सर्व जगाची वृद्धि करणारा असा वायुदेव आहे असें समजावें. आतां उपासना करण्यास योग्य असा जो एकच देव आहे त्याविषयीं सांगतात. ( स ब्रह्म॰ ) सर्व जग करणारें, सर्व शक्तिमत्, सर्वांला इष्ट सर्वांनीं उपासना करण्यास योग्य, सर्वाधार, सर्वव्यापक, सर्वकारण, अनादि, सच्चिदानंदस्वरूप, अज, न्यायकारि इत्यादी विशेषण युक्त जें ब्रह्म आहे तोच मुख्य व सर्वांनीं पूजनीय असा एक देव आहे. वेदोक्त मार्गानें चालणारे आर्य याचीच अनादि कालापासून उपासना करीत आले आहेत, करीत आहेत व पुढेंहि करतील. याहून भिन्न कशाची उपासनाकरणें हें उघड अनार्यत्वाचें चिन्ह आहे. याविषयीं प्रमाण—

**आत्मेत्येवोपासीत स योऽन्यमात्मनः प्रियं ब्रुवाणं ब्रूयात् प्रिय ँ रोत्स्यतीतीश्वरोह तथैव स्यादात्मानमेव प्रियमुपासीत सय आत्मानमेव प्रियमुपास्ते न हास्याप्रियं प्रमा-**

**युक्तं भवति ॥ योऽन्यां देवतामुपास्ते न स वेद यथा पशुरेव ऽस देवानाम् ॥ शतपथ. १४।४ ॥**

"परमात्म्याचीच उपासना करावी. तोच हितकरणारा आहे असें समजावें. जो त्याहून दुसऱ्याची उपासना करील व त्या दुसऱ्यालाच चांगलें मानील त्याला फार दुःख होइल. जो परमात्म्याचीच उपासना करतो त्याचें कल्याण होतें. जो अन्य-देवतांची उपासना करतो तो पशु होय." यावरून उघड होतें कीं परमेश्वरावांचून दुसऱ्या कोणाची उपासना आर्य करीत नसत व त्यांनीं दुसऱ्या कोणाची करतां नये हें ठरलें.

देव शब्दामध्यें "दिव्" धातू "क्रीडा-विजिगीषा-व्यवहार-द्युति-स्तुति-मोद-मद-स्वप्न-कान्ति- गतिषु" हे दहा अर्थ दाखणारा आहे. परमात्मा व इतर तेहेत्तीस देवता यांच्या ठिकाणीं हे दहाहि अर्थ सारख्या रीतीनें लागू पडतात. पण अन्य देवता परतंत्र आहेत व तो स्वयंप्रकाश आहे हें लक्ष्यांत ठेवावें; (क्रीडा) खेळ करणें (विजिगीषा) दुष्टांचा पराजय करण्याची इच्छा, व्यवहार, (स्वप्नः) निद्रा, (मदः) गर्व, हे मुख्यत्वेंकरून अग्न्यादि लौकिक देवतांमध्यें प्रधान दिसतात. परमात्म्याचे ठिकाणीं–तो सर्वाधार असल्यामुळें–सूक्ष्मत्वानें दिसतातच. तसेंच (द्युतिः) द्योतन, प्रकाशन, (स्तुतिः) गुणवर्णन, (मोदः) हर्ष, (कान्तिः) प्रसन्नता, शोभा, (गतिः) गमन, ज्ञान, प्राप्ति हे मुख्यत्वेंकरून परमात्म्याला लागतात व इतर देवतांना गौणत्वानें लागतात हें विचार करून जाणावें. याप्रमाणें गौण किंवा मुख्य प्रमाणानें दोनहि (परमात्मा व इतर तेहेतीस देव या) ठिकाणीं या वरील गुणांचा संबंध येत असल्यामुळें त्यांना देवता ही संज्ञा लावण्यांत येते. (प्र०) वेदांमध्यें जड व चेतन अशा दोहोंचीहि उपासना व पूजा सांगितली आहे कीं काय? (उ०) नाहीं. जडांची उपासना–वेदांमध्यें सांगितली नाहीं. पूजन म्हणजे, सत्कारकरणें, किंवा प्रिय व अनुकूल आचरण करणें होय. ईश्वरानें पदार्थमात्राचे ठिकाणीं नियमित गुणधर्म स्वतंत्र-तेनें ठेवले आहेत उदा० डोळ्यांनीं दिसतें, म्हणून डोळस पाहतात. याठिकाणीं जर कोणी म्हणेल कीं डोळे व सूर्य यांशिवाय कां बरें परमेश्वरानें पाहण्याची शक्ति आम्हांस दिली नाहीं? तर ही त्याची शंका व्यर्थ होय. डोळ्यांत परमेश्वरानें पाहण्याची शक्ति ठेवली आहे. व त्या मानानें डोळे आदरास योग्य आहेत. मनुष्यमात्र डोळ्यांचा सत्कार सर्वदा करतात तो या दिव्य गुणामुळेंच होय. याचप्रमाणें अग्न्यादि पदार्थांचे ठिकाणीं अर्थद्योतकत्व, विद्योपयोगित्व, क्रियासहाय्यत्व इत्यादि गुणामुळें जें देवत्व आलें आहे तें पूजा सत्कार करण्यास व त्यांच्या अनुकूल आचरण करण्यास (व त्यांच्या गुणधर्मा-

प्रमाणें आचरण करून त्यांकडून आपला फायदा करून घेण्यास ) योग्य आहे. या देवत्वाचा स्वीकार करण्यास कांहीं हरकत नाहीं. पण वेदामध्यें जेथें जेथें उपासनेचा भाग आलेला आहे तेथें तेथें देवताशब्दानेंच परमेश्वराचेंच ग्रहण होतें एवढें लक्षांत ठेवावें म्हणजे झालें. तसेंच—

**मातृदेवो भव पितृदेवो भव आचार्यदेवो भव अतिथिदेवो भव ॥ तैत्तिरीयोप० प्र० ७।११ ॥**

**त्वमेव प्रत्यक्षं ब्रह्मासि त्वामेव प्रत्यक्षं ब्रह्म वदिष्यामि ॥ तैत्तिरीयोप० प्रपा० ७।१ ॥**

"माता, पिता, आचार्य व अतिथि या विग्रहाराधना—मूर्तिपूजा—करण्याच्या देवता होत. ब्रह्म हें मात्र निराकार असल्यामुळें अविग्रहवान् आहे व तें सर्वांनीं उपासना करण्यास योग्य आहे." याप्रमाणें कोणत्या मूर्तींचीं पूजा करावी व कोणत्या निराकाराची उपासना करावी याविषयीं विचार झाला.

पूर्वीं सांगितलेल्या तेहेत्तीस देवतांमध्यें अग्नि, पृथिवी, आदित्य, चन्द्रमा, नक्षत्रें हे पांच वसू मूर्तिमान्-देहधारी-साकार-आहेत. अकरा रुद्र, बारा आदित्य, मन, पंच-ज्ञानेंद्रियें, वायू, अंतरिक्ष, द्यौः, वेदमंत्र या शरीररहीत-निराकार-अमूर्त देवता होत. त्याच प्रामाणें वीज ( स्तनयित्नु ) व विधियज्ञ हे दोन देव साकार व निराकार असे दोनहि प्रकारचे आहेत. या सर्व फक्त व्यवहारोपयोगी देवता आहेत. माता, पिता, आचार्य व अतिथि या व्यवहारोपयोगी असून शिवाय परमार्थाचा प्रकाश करणाऱ्याहि आहेत. परमेश्वरमात्र इष्टोपयोगी असल्यामुळें सर्वांना उपास्य आहे. परमेश्वराहून दुसरी कोणतीहि देवता पूज्य किंवा उपास्य म्हणून वेदांमध्यें मुळींच सांगितलेली नाहीं. तात्पर्य वेददृष्ट्या परमेश्वर हा एकच उपास्य होय हें ठरलें.

या वरून, सध्यांचे आर्यावर्तातलि कांहीं लोक व बहुतेक युरोपांतील विद्वान असें समजतात, कीं "प्राचीन आर्यलोक भौतिक देवतांचें पूजन करीत व पुढें पुष्कळ काळानंतर त्यांना परमात्माच पूजनीय आहे असें समजलें," ही समजूत अगदीं चुकीची आहे, हें उघड होईल. कारण सृष्टीच्या आरंभापासून आर्य इंद्र वरुण-अग्न्या-दिनांवांनीं-परमात्म्याच्या निरनिराळ्या गुणांमुळें ठेवलेल्या नांवांनीं-एका परमेश्वराचीच उपासना वैदिक रीतीनें करीत आले आहेत.

इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यः स सुपर्णो गरुत्मान् ॥ एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ॥ १ ॥

"तो परमात्मा एकच आहे पण त्याला त्याच्या निरनिराळ्या गुणांवरून विद्वान लोक इन्द्र, मित्र, वरुण इत्यादि नांवें देतात." इ०

तदेवाग्निस्तदादित्यस्तद्वायुस्तदु चन्द्रमाः ॥ तदेवशुक्रं तद्ब्रह्म ता आपः स प्रजापतिः ॥२॥

यजु० ३२।१ ॥

"अग्नि, वायु इत्यादि नांवें त्याच परब्रह्माचीं आहेत. त्यालाच प्रजापति, शुक्र, अप् असेंही म्हणतात. इ०

तमीशानं जगतस्तस्थुषस्पतिं धियं जिन्व-मवसे हूमहे वयम् ॥ पूषानो यथा वेद-सामसद्वृधे रक्षिता पायुरदब्धः स्वस्तये ॥३॥

ऋ० १।६।१५।५ ॥

"त्या ज्ञान मय परमेश्वराचीच आम्ही उपासना करीत आहों, कारण तोच ज्ञानाचा उगम व आम्हां सर्वांचा रक्षक आहे इ०

हिरण्यगर्भः समवर्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत् ॥ स दाधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम ॥४॥

ऋ० ८।७।३।१ ॥

"उत्पन्न झालेल्या वस्तुमात्राचा स्वामी व ज्याणें पृथिव्यादिकांना आधार दिला आहे त्या सुखस्वरूप परमात्म्याचीच आम्ही उपासना करतों.

प्रतद्वोचेदमृतं नु विद्वान् गंधर्वो धाम विभृतं गुहासत् ॥ त्रीणि पदानि निहिता गुहास्य यस्तानि वेद स पितुः पितासत् ॥

यजु० ३२।९ ॥

" मुक्तीचें स्थान, सर्वांचा आधार, सर्वांचा पोषक इ० असा परमात्मा आहे. जो मनुष्य त्याला जाणतो तो विद्वानांतही विद्वान आहे असें समजावें."

सनो बन्धुर्जनिता स विधाता धामानि वेद भुवनानि विश्वा ॥ यत्र देवा अमृतमानशानास्तृतीये धामन्नध्यैरयन्त ॥ ६ ॥

यजु० ३२।१० ॥

" तो परमेश्वर सर्वांचा बन्धु, उत्पादक व आधार आहे. त्याच्या मुक्तिरूप पदामध्यें ज्ञानी लोक नेहमीं राहतात व आनंद मिळवतात.

परीत्य भूतानि परीत्य लोकान् परीत्य सर्वाः प्रदिशो दिशश्च ॥ उपस्थाय प्रथमजामृतस्यात्मनात्मानमभिसंविवेश ॥ ७ ॥

य० ३२।११ ॥

" सर्व भूतमात्र व सर्व दिशा यांचे ठिकाणीं तो परमेश्वर पूर्ण भरला आहे. त्याची उपासना करून त्याच्या आनंदस्वरूपांत ज्ञानी लीन होतो.

वेदाहमेतं पुरुषं महान्तमादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ तमेव विदित्वातिमृत्युमेति नान्यः पन्था विद्यतेऽयनाय ॥ ८ ॥

—यजु० ३१।१८ ॥

"त्या अज्ञानाच्या पलीकडे असणाऱ्या परमेश्वराला मी ओळखतों त्याला जाणलें असतांच जन्ममरण यातना सुटतात.

तदेजति तन्नैजति तद्दूरे तद्वन्तिके ॥ तदन्त-
रस्य सर्वस्य तदु सर्वस्यास्य बाह्यतः ॥ ९ ॥

यजु० ४० । ५ ॥

"तें ब्रह्म जवळ, दूर, आंत बाहेर सर्वत्र व्याप्त आहे.

य इमा विश्वा भुवनानि जुह्वदृषिर्होता
न्यसीदत्पिता नः ॥ स आशिषा द्रविण
मिच्छमानः प्रथमच्छदवराँ २ आविवेश
॥ १० ॥ यजु० १७ । १७ ॥

जो सर्वज्ञ, दीनदयाळ, सर्व भूतांचा उत्पादक असा परमेश्वर आहे. त्याची आम्हीं प्रगति इच्छिणारांनीं उपासना करावी.

किꣳ स्विदासीदधिष्ठानमारम्भणं कतम-
स्वित् कथासीत् ॥ यतो भूमिं जनयन्वि-
श्वकर्मा विद्यामौर्णोन्महिना विश्वचक्षाः
॥ ११ ॥ यजु० १७ । १८ ॥

सर्वसाक्षी, विश्वोत्पादक, सर्वज्ञ परमेश्वरच या जगाचा आधार व उत्पादक आहे व तो सर्वत्र भरला आहे.

विश्वतश्चक्षुरुत विश्वतो मुखो विश्वतो बा-
हुरुत विश्वतस्पात् ॥ सं बाहुभ्यां धमति
संपतत्रैर्द्यावा भूमीं जनयन्देव एकः ॥ १२ ॥

यजु० १७ । १९

"सर्वव्यापक सर्व द्रष्टया परमेश्वरानेंच हें सर्व विश्व केलें. तो एक आहे अनेक नाहींत.

याप्रमाणें यजुर्वेदांत पुष्कळ मंत्र आहेत. त्याच प्रमाणें सामवेदाच्या उत्तरार्चिकाच्या अकराव्या त्रिकांत वरील अर्थाचे मंत्र आहेत त्यांपैकीं कांहीं खालीं दिले आहेत—

अभित्वा शूरनो नुमोऽदुग्धा इव धेनवः ॥
ईशानमस्य जगतः स्वर्दृशमीशानमिन्द्रतस्थुषः ॥ ११ ॥
नत्वा वाँ अन्यो दिव्यो न पार्थिवो न जातो न जनिष्यते॥
अश्वायन्तो मघवन्निन्द्रवाजिनो गव्यं तस्त्वा हवामहे॥१२॥

हे सामवेदांतील मंत्र आहेत. यांत सर्वव्यापक परमेश्वराचीच उपासना सांगितली आहे. तसेंच ऋग्वेदांतहि—

नासंदासीन्नोसदांसीत्तदानीं नासीद्रजो नो व्योमापरोयत् ॥ किमावरीवः कुहकस्य शर्म्मन्नम्भः किमासीद्गहनं गभीरम् ॥१३॥
इयं विसृष्टिर्यतं आबभूव यदिंवादधे यदिं वा न ॥ यो अस्याध्यक्षःपरमे व्योमन्त्सो अङ्गवेद यदिंवा न वेदं ॥ १४ ॥

ऋ. ८।७।१७। मं. १ पासून ७ ॥

"नासदासी०" पासून "इयं विसृष्टि०" पर्यंत सातहि मंत्र एका परमात्म्याची उपासना स्पष्ट सांगत आहेत. तसेंच अथर्ववेदांत—

यत्परममंवमं यच्चं मध्यमं प्रजापंतिः ससृजे विश्वरूपम् ॥ कियंता स्कम्भः प्रविंवेश तत्र यन्न प्राविंशात्कियत्तद्बभूव ॥१५॥

**यस्मिन्भूमिरन्तरिक्षं द्यौर्यस्मिन्नध्याहिता ॥ यत्राग्निश्चन्द्रमाः सूर्यो वातस्तिष्ठन्त्यार्पिता स्कम्भं तं ब्रूहि कतमःस्विदेव सः ॥१६॥**

अथर्व— १०।४ मं. ८।१२

या वर दिलेल्या सोळा मंत्रांपैकीं कांहींचे अर्थ पूर्वी खुलासेवार आले आहेत व इतरांचे पुढें प्रकरणशः येणार आहेत म्हणून येथें दिले नाहींत. म्हणून त्या त्या प्रकरणांत त्या त्या मंत्रांचा खुलासा वाचकांनीं पहावा. आतां परमात्म्याच्या उपासनेबद्दल उपनिषदांतील आधार—

**अणोरणीयान्महतो महीयानात्मास्य जन्तोर्निहितो गुहायाम् ॥ तमक्रतुः पश्यति वीतशोको धातुप्रसादान्महिमानमात्मनः ॥ १ ॥ अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथाऽरसं नित्यमगन्धवच्च यत् ॥ अनाद्यनन्तं महतः परं ध्रुवं निचाय्य तं मृत्युमुखात्प्रमुच्यते ॥ २ ॥ यदेवेह तदमुत्र यदमुत्र तदन्विह ॥ मृत्योःसमृत्युमाप्नोति यइह नानेव पश्यति ॥ ३ ॥ एको वशी सर्वभूतान्तरात्मा एकं रूपं बहुधा यः करोति ॥ तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरास्तेषां सुखं शाश्वतं नेतरेषाम् ॥ ४ ॥ नित्यो नित्यानां चेतनश्चेतनानामेको बहूनां यो विदधाति कामान् ॥ तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरास्तेषां शान्तिः शाश्वती नेतरेषाम् ॥ ५ ॥** कठोपनिषद्—

" परमात्मा सूक्ष्माहून सूक्ष्म व मोठ्याहून मोठा आहे. त्याला ज्ञानी मनुष्यच पाहूं शकतो. शब्दस्पर्शाहून तो निराळा आहे. त्याच्या ज्ञानानें जन्ममरण चुकतें. तो जसा इथें आहे तसा तो इतर ठिकाणींहि आहेच. जो त्या परमात्म्याला एक मानीत नाहीं तो जन्ममरणांच्या दुःखांत पडतो. ज्यांना सर्वभूतांच्या आंत व्यापून राहणाऱ्या त्या एकाची ओळख पटते त्यांना शाश्वत सुख मिळतें. तो नित्यांमध्यें नित्य व चेतनांमध्यें चेतन आहे. त्याला जाणिल्यानें शाश्वतची शांति मिळते."

दिव्यो ह्यमूर्तःपुरुषःस बाह्याभ्यन्तरो ह्यजः ॥
अप्राणो ह्यमनाः शुभ्रोऽक्षरात्परतः परः ॥ ६ ॥
स सर्वज्ञः सर्वविद्यस्यैष महिमा भुवि ॥
दिव्ये ब्रह्मपुरे ह्येष व्योम्न्यात्मा प्रतिष्ठितः ॥ ७ ॥

—मुंडकोपनिषद्

" निराकार व दिव्य तेजानें युक्त असा परात्पर पुरुष तो आहे. तो सर्व जाणणारा आहे व तो आकाशाप्रमाणें सर्वत्र आहे." इ०.

नान्तः प्रज्ञं न बहिःप्रज्ञं नोभयतः प्रज्ञं न प्रज्ञानघनं
न प्रज्ञं नाप्रज्ञम् ॥ अदृष्टमव्यवहार्यमग्राह्यमलक्षण
मचिन्त्यमव्यपदेश्यमेकात्म्यप्रत्ययसारं पञ्चोपशमं
शान्तं शिवमद्वैतं चतुर्थं मन्यन्ते स आत्मा स विज्ञेयः ॥८॥

-मांडूक्य उप०

" परमात्मा अदृष्ट, अव्यवहार्य इत्यादी प्रकारांनीं विशिष्ट आहे. त्याचें आमच्या मनालाहि ज्ञान होत नाहीं व बाह्य इंद्रियांनाहि होत नाहीं."

सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म यो वेद निहितं गुहायाम् ॥
परमेव्योमन्त्सोऽश्नुते सर्वान्कामान् ब्रह्मणासह
विपश्चितेति ॥ ९ ॥ तैतरीय उप०

" ज्याला आत्म्याच्याहि पलीकडे असणारें सत्य ब्रह्म जाणतां येतें त्याला सर्व आनंद मिळतो."

यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति भूमैव
सुखम् ॥ भूमात्वेव विजिज्ञासितव्य इति ॥ यत्र
नान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति स
भूमा ॥ अथ यत्रान्यत्पश्यत्यन्यच्छृणोत्यन्यद्वि-

**जानाति तदल्पम् ॥ यो वै भूमा तदमृतमथ यदल्पं तन्मर्त्य ७ स भगवः कस्मिन्प्रतिष्ठित इति स्वे महिम्नि ॥**

**छान्दोग्य उप०**

" परमात्मा आनंदमय आहे. प्रकृति दुःखमय आहे. म्हणून परमात्म्याचें ज्ञान मिळवावें. ज्याठिकाणीं त्या एकाशिवाय दुसरें कांहीं नसतें तें मोक्षस्थान होय व ज्याठिकाणीं मनाला अनेक आकर्षणें असतात तो संसार जाणावा. परमात्मा स्वतःच्या सामर्थ्यावर राहिला आहे इ." याप्रमाणें वरील वचनांचे संक्षेपानें अर्थ होतात. विस्तारानें पुढें प्रकरणशः देण्यांत येतील. या आधारांवरून एवढें उघड आहे कीं, अत्यंत प्राचीन काळचे—सृष्टीच्या प्रारंभींचे आर्य, परमात्म्याचीच उपासना करीत असत; व वेदांमध्येंहि परमात्मोपासनाच सांगितलेली आहे. भौतिक उपासना वेदविरुद्ध आहे, असो. यावरून मोक्षमुल्लरादिकांचीं मतें भ्रामक आहेत हें वाचकांच्या लक्षांत येईल.

तसेंच मोक्षमुल्लरानें " **हिरण्यगर्भः समवर्तताग्रे०**" या मंत्राच्या व्याख्यानाच्या प्रसंगीं आपल्या " संस्कृतसाहित्य " नामक ग्रंथांत जीं विधानें केलीं आहेत तींहि भ्रामक–खोटीं–आहेत. तो म्हणतो–" वेदाचे दोन भाग आहेत; एक छंद व दुसरा मंत्र. ज्यामध्यें सामान्य तऱ्हेचें वर्णन, अज्ञानी विचार, कोत्या समजुती, अडाणी लोकांच्या तोंडांतून सहज निघण्यासारख्या कल्पना आहेत ते छंद होत. या छंदांना उत्पन्न होऊन जास्तींत जास्ती एकतीसशें वर्षें झालीं असावीं. मंत्रभाग हा त्याहून अर्वाचीन आहे. त्याला फार तर एकोणतीसशें वर्षें झालीं असतील." या म्हणण्यास मोक्षमुल्लर प्रमाणें देतो तीं. "**अग्निः पूर्वेभिर्ऋषीभिरीड्यो नूतनैरुत**" यांतील " पूर्वेभिः" या पदावरून हा मंत्र अर्वाचिन आहे असें त्याचें म्हणणें व " हिरण्यगर्भः" हाहि एक शब्द मंत्रांचें अर्वाचीनत्व दाखवितो असें तो म्हणतो. पण या प्रमाणांवरून व त्याच्या एकंदर प्रतिपादनावरून त्याला वैदिक शब्दांचे अर्थ बरोबर कळले नाहींत असें वाटतें. पहा—

**ज्योतिर्वै हिरण्यं ज्योतिरेषोऽमृत ७ हिरण्यम् ॥**

**शत० ब्रा० ६।७॥**

**केशी केशा रश्मयस्तैस्तद्वान्भवति । काशनाद्वा—प्रकाशनाद्वा केशीदं ज्योतिरुच्यते ॥ निरु० १२।२९॥**

**यशो वै हिरण्यम् ॥ ऐतरे० ब्रा० ७।३॥**

**ज्योतिरेवायं पुरुष इत्यात्मज्योतिः ॥ शत० ब्रा० १४।७॥**
**ज्योतिरिन्द्राग्नी ॥ शत० ब्रा० १०।४॥**

"ज्योति म्हणजे विज्ञान हाच गर्भ आहे ज्याचा तो हिरण्यगर्भ जाणावा. त्याच प्रमाणें हिरण्य म्हणजे ज्योति, प्रकाश, अमृत, मोक्ष, आदित्य, किरण, यश, कीर्ति, धन्यवाद, आत्मा, जीव, इंद्र (सूर्य, अग्नि) हे सर्व ज्याच्या सामर्थ्यामध्यें (गर्भे) असतात तो हिरण्यगर्भ जाणावा." हे अर्थ पाहतांना "हिरण्यगर्भ" शब्दावरून वेदांचें सनातनत्वच सिद्ध होतें. अर्थात त्याणें जें अर्वाचिनत्व सिद्ध केलें आहे तें भ्रममूलक जाणावें. "**अग्निः पूर्वेभिः**" या मंत्रावरूनहि वेद नवीन आहेत असें ठरत नाहीं. ईश्वर भूतभविष्यवर्तमान या तीनहि काळीं होणारें जाणतो. तो त्रिकालज्ञानी आहे. म्हणून त्याणें "तीनहि काळांमध्यें मंत्रद्रष्टेऋषि, मंत्र, प्राण व तर्क यांच्या योगानें माझी स्तुति करीत होते, करीत आहेत व करतील" असें लिहिलें. जे वेदादिशास्त्रांचें अध्ययन करून विद्वान झाले ते "पूर्वींचे" व जे अध्ययन करीत आहेत ते नवीन आहेत असें समजावें. या सर्वांकडून परमेश्वराची स्तुति केली जाते. एवढा "**अग्निः पूर्वेभिर्ऋषीभिरीड्यो नूतनैरुत**" याचा अर्थ. यावरून छन्द प्राचीन व मंत्र नवीन असें ठरत नाहीं. पहा—

**तत्प्रकृतीतरद्वर्तन सामान्यादित्ययं मन्त्रार्थचिन्ताभ्यूहोऽभ्यूढोऽपि श्रुतितोऽपितर्कतो न तु पृथक्त्वेन मन्त्रा निर्वक्तव्याः प्रकरणश एव तु निर्वक्तव्याः। न ह्येषु प्रत्यक्षमस्त्यनृषेरतपसो वा पारोवर्य्यवित्सु तु खलु वेदितृषु भूयोविद्यः प्रशस्यो भवतीत्युक्तं पुरस्तान्मनुष्या वा ऋषिषूत्क्रामत्सु देवानब्रुवन् को न ऋषिर्भविष्यतीति तेभ्य एतं तर्कमृषिं प्रायच्छन् मन्त्रार्थचिन्ताभ्यूहमभ्यूढं तस्माद्यदेव किंचानूचानोऽभ्यूहत्यार्षं तद्भवति ॥ निरु. १३।१२॥**

"मंत्रांमध्यें पद-शब्द-अक्षर यांच्या समुदायांचा विशेष्यविशेषणादि सामान्य संबंध परस्पर असल्यामुळें मंत्रांच्या अर्थाविषयीं मनांत चिंता उत्पन्न होते. या मंत्रांचा अर्थ काय असेल याचा तर्क मनुष्यांनीं आपल्या बुद्धीनें करावा. त्यांणीं केवळ ऐकून किंवा केवळ तर्कानें मंत्रांचा अर्थ बनवूं नये. तर प्रकरणानुकूल पूर्वापर संबंध पाहून मंत्रांचा अर्थ करावा. कारण मंत्रांमध्यें अज्ञान्यांला सहज समजेल असें ज्ञान नाहीं.

जों पर्यंत विद्वांनांमधून एखादा पुष्कळ विद्या जाणणारा विद्वान पुढें होऊन तर्कानें वेदार्थ करणार नाहीं तों पर्यंत मंत्रार्थ योग्य होणें अशक्य आहे. या विषयीं एक इतिहास आहे तो हा—पूर्वी ज्यावेळीं ऋषि या लोकांतून जाऊं लागले त्यावेळीं इतर मनुष्यांनीं विद्वानांला विचारलें कीं, आम्ही कोणत्या ऋषींच्या मदतीनें वेदार्थ जाणावा ? त्यांना त्यांणीं "तर्क" हा ऋषि दिला व ते म्हणाले कीं, तुमच्या जवळ हा ऋषि असूंदे. तर्क हा मंत्रार्थविज्ञान करणारा आहे. अर्थात कोणी विद्वान तर्काच्या सहाय्यानें जें व्याख्यान करतो तें ऋषिप्रोक्त व्याख्यान आहे असें समजावें;" अल्पज्ञ मनुष्यानें केलेलें व्याख्यान अर्थात चुकीचें असणार, म्हणून त्याचा कोणीहि आदर करूं नये कारण, अशा व्याख्यानांपासून अनर्थ होतो. तसा अनर्थ मोक्षमुल्लराच्या व्याख्यानापासून होणारा असल्यामुळें त्याचीं व्याख्यानें सर्वत्याज्य आहेत असें सर्वांनीं समजावें. "अग्निः पूर्वेभिः" याचा अर्थ "सृष्टीच्या आरंभीं झालेल्या विद्वानांकडून, सध्यांच्या व पुढच्या ज्ञात्यांकडून परमेश्वराचीच उपासना केली जाते" असा व पूर्वी दाखविल्याप्रमाणें करावा. या मंत्रावरून परमेश्वराशिवाय दुसरें कोणतेंहि आर्यांचें उपास्यदैवत नाहीं हें स्पष्ट होतें व "वेद नवीन आहेत" हा दोष नाहींसा होतो हें तेव्हांच वाचकांच्या लक्षांत येईल. तसेंच—

**प्राणा वा ऋषयो दैव्यासः ॥** ऐतरे० ब्रा० २।४॥

"कारणप्रकृतीमध्यें असणारे प्राण हे प्राचीन ऋषि व कार्यप्रकृतीमध्यें असणारे प्राण हे नूतन ऋषि होत." या दोनहि प्रकारच्या प्राणांनीं ( ऋषींनीं ) परमेश्वराची स्तुति केली जाते असाहि अर्थ "अग्निः पूर्वेभि०" या मंत्राचा होतो. तात्पर्य या मंत्रावरून तो मंत्र नवीन आहे असें ठरत नाहीं.

मोक्षमुल्लरादिकांचें दुसरें अनर्थकारक विधान, "मंत्र व छंद हे निराळे आहेत" हें होय वास्तविक "छंद, वेद, निगम, मंत्र, श्रुति" हे एकार्थवाचक शब्द आहेत. पण मोक्षमुल्लराला त्यांत भेद दिसतो! "छंद" शब्दाचे पुष्कळ अर्थ आहेत. हा शब्द जसा वैदिक गायत्र्यादि वृत्तांना लागतो तसा तो आर्या, हरिणी आदि लौकिक वृत्तांनाहि लागूं होतो. "स्वतंत्रता" या अर्थींहि "छंद" शब्दाचा प्रयोग होतो.

**मन्त्रा मननाच्छन्दाँसि छादनात् स्तोमः स्तवनाद्यजुर्यजतेः साम सम्मितमृचा ॥** निरु. ७।१२॥

"अविद्यादि दुःखांचें निवारण होऊन सुखांचा लाभ ज्याच्या योगानें होतो तो छंद ( वेद ) समजावा. "**चदि–आल्हादे दीप्तौच**" या धातूवरून "**चन्दे-**

रादश्च छः" ॥ 'या औणादिक सूत्रानें' "छंद" शब्द सिद्ध होतो. अर्थात "ज्याच्या अध्ययनानें मनुष्यमात्राला आनंद होऊन ज्ञान वाढतें" तो छंद समजावा कारण—

**छन्दा ꣳ सि वै देवा वयोनाधाश्छन्दोभिर्हीद ꣳ सर्वं वयुनं नद्धम् ॥ शत. ब्रा. ८।२॥**

**एता वै देवताश्छन्दा ꣳ सि ॥ शत. ब्रा. ८।३॥**

"मन्त्रि—गुप्तभाषणे" या धातूवरून "हलश्च" या सूत्रानें "घञ्" प्रत्यय करून "मंत्र" शब्द बनतो. "गुप्त पदार्थांविषयीं ज्यांत वर्णन आहे तो वेदमंत्र होय." त्यांच्या अवयवांनाहि मंत्र ही संज्ञा प्राप्त होते कारण, ते एकाच अर्थाचे असतात. तसेंच "मन्-ज्ञानें" या धातूवरून "सर्व धातुभ्यः ष्ट्रन्" या औणादिक सूत्रानें "ष्ट्रन्" प्रत्यय होऊन "मंत्र" शब्द बनतो. (मन्यन्ते ज्ञायन्ते मनुष्यैः सत्याःपदार्था येन सः मंत्रः) ज्याच्या सहाय्यानें सर्व सत्य पदार्थांचें यथावत् ज्ञान होतें त्याला (वेदाला) मंत्र म्हणावें. त्या मंत्राचे (वेदाचे) अवयवरूप जे "अग्निमीळे" इत्यादि आहेत तेहि मंत्रच होत. म्हणून (छंदांसि) गायत्र्यादिक छंद हे सर्व विद्यांचा प्रकाश करणारे असल्यामुळें ते (देवाः) देव आहेत असें समजावें, अर्थात छंद याच देवता होत. (वयोनाधाः) त्यामध्यें सर्व कर्मांविषयीं व्यवस्था लिहिली आहे. त्या वेदमंत्रांनीं (सर्वं) हें सर्व विश्व (बद्धं) बांधून टाकलें आहे. ज्या अर्थी वेदांमध्यें सर्व विद्यांचें यथावत् ज्ञान आहे, त्याअर्थी त्यांस छंद व मंत्र असें त्या त्या अर्थावरून म्हणतात. हे दोनहि शब्द एकच अर्थ दाखवणारे असल्यामुळें त्यांत मुळींच भेद नाहीं. "**श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो**" असें मनुस्मृतींत म्हटलें आहे त्यावरून व "**इत्यपि निगमो भवति**" असें निरुक्तांत म्हटलेलें आहे त्यावरूनहि वरील म्हणणेंच बरोबर ठरतें. "श्रुति, वेद, मंत्र, छंद, निगम" हे सर्व शब्द "वेद" शब्दाचे पर्यायशब्द आहेत. (श्रूयन्ते सकला विद्या यया) जिच्या योगानें सर्व विद्या ऐकल्या जातात ती श्रुति होय. (**निगच्छन्ति नितरां जानन्ति सर्वा विद्या यस्मिन्**) ज्याच्या योगानें सर्व विद्यांचें पूर्ण ज्ञान होतें तो निगम होय. या अर्थावरून वरील वेदवाचक अनेक शब्दांत एकच अर्थ आहे, भेद मुळींच नाहीं असें उघड दिसेल. तसेंच—

**मन्त्रे घसह्वरणशवृदहाद्वृच्कृगमिजनिभ्यो लेः ॥**

**अष्टा. २।४।८०**

**छन्दसि लुङ् लङ् लिटः। अष्टा. ३।४।६॥**
**वा षपूर्वस्य निगमे ॥ अष्टा. ६।४।९॥**

या सूत्रांमध्यें "मंत्र, छंद व निगम" हे तीन शब्द पाणिनीनें एकाच अर्थी योजिले आहेत, ते पाहिले म्हणजे छंद व मंत्र यांत भेद करणें व मानणें हें अज्ञानाचें द्योतक आहे असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. अर्थात त्यांत भेद मुळींच नाहीं.

---

## वेद ही संज्ञा कशाला आहे?

वेद म्हणजे काय? मंत्रभागालाच वेद म्हणतात कीं, शतपथादि ब्राह्मणांचाहि वेद शब्दानें बोध होतो? हा एक विचारणीय विषय आहे. कात्यायन ऋषीच्या "**मन्त्रब्राह्मणयोर्वेदनामधेयम्**" या विधानाप्रमाणें मंत्र व ब्राह्मणें यांनां वेद असें कित्येक म्हणतात. पण वास्तविक दृष्टीनें विचार करतां, आपणांस असें आढळून येईल कीं, "**मंत्रभाग हाच वेद होय.**" शतपथादि ब्राह्मणांना वेद असें कधींहि म्हणतां येणार नाहीं. याला खालीं दिलेलीं पांच कारणें मुख्य आहेत. (१) ब्राह्मणांला पुराण व इतिहास या संज्ञा आहेत, (२) ब्राह्मणें हीं वेदमंत्रांवरील ऋषींनीं लिहिलेलीं व्याख्यानें होत, (३) तीं ईश्वरोक्त नाहींत, (४) कात्यायनाशिवाय दुसऱ्या कोणीहि ब्राह्मणांला वेद मानलेलें नाहीं व (५) तीं मानवी बुद्धीनें रचलेलीं आहेत. या मुख्य कारणांवरून ब्राह्मणग्रंथ हे वेद नाहींत असें ठरतें. ज्याप्रमाणें नामलेखपूर्वक मनुष्यांचे इतिहास ब्राह्मणांत आहेत, तसे मंत्रभागांत नाहींत.

**त्र्यायुषं जमदग्नेः कश्यपस्य त्र्यायुषम् ॥**
**यद्देवेषु त्र्यायुषं तन्नो अस्तु त्र्यायुषम् ॥ १ ॥**

**यजु० ३।६२॥**

अशा प्रकारच्या मंत्रांत येणारीं जमदग्नि वगैरे नांवें मनुष्यवाची नसून त्यांचा अर्थ त्याहून अगदीं भिन्न आहे. या नांवांवरून वेदमंत्रांतहि मनुष्यांचाच इतिहास आहे असें समजूं नये कारण,—

**चक्षुर्वै जमदग्निर्ऋषिर्यदेनेन जगत्पश्यत्यथो मनुते तस्माच्चक्षुर्जमदग्निर्ऋषिः ॥ शत-ब्रा० ८।१॥**
**कश्यपो वै कूर्मः प्राणो वै कूर्मः ॥ शत-ब्रा० ७।५॥**

प्राण नाभिप्रदेशांत कूर्माकार असल्यामुळें त्याला कूर्म किंवा कश्यप असें म्हणतात. हा, मंत्रांत आलेल्या कश्यप शब्दाचा अर्थ आहे. या अर्थावरून होणारा प्रार्थनात्मक अर्थ खालीं दिला आहे:— "हे जगदीशा! तुझ्या कृपेनें (जमदग्नेः) चक्षुरादि (मनासह) सर्व इंद्रियांचें (त्र्यायुषं) तिप्पट आयुष्य अर्थात तीनशें वर्षें आयुष्य असो. (कश्यपस्य) प्राणाचेंहि तीनशें वर्षें आयुष्य होवो."

## विद्वा ँ सो हि देवाः ॥ शत. ब्रा. ३।७॥

[विद्वानांना देव असें म्हणतात] (यद्देवेषु) "विद्वानांचें जसें विद्याप्रभावयुक्त तिप्पट आयुष्य असतें तसें आमचेंहि होवो व त्या सर्व आयुष्यांत आमचीं सर्व इंद्रियें व मन उत्तम कामें करणारीं राहोत. त्यांच्या योगानें आम्ही सुखी होऊं व तीनशें वर्षेंपर्यंत उत्तम सुखाचा उपभोग घेऊं." तात्पर्य सामान्य आयु शंभर वर्षांचें आहे, त्याच्या तिप्पट आयुष्य ब्रह्मचर्यादि नियम पाळले असतां होऊं शकतें, तसें आमचें दीर्घायु होवो ही प्रार्थना वरील मंत्रांत आहे. वेदमंत्रांतील जमदग्न्यादि शब्द वरील प्रमाणें अर्थविधायक आहेत. हें जाणून वेदमंत्रांत इतिहासाचा लेशहि नाहीं असें निःसंशय सर्वांनीं समजावें. सायणाचार्यादिकांनीं आपल्या भाष्यामध्यें कित्येक ठिकाणीं इतिहासपर अर्थ वेदमंत्रांचा केला आहे तो त्यांचा भ्रम आहे असें समजावें. तात्पर्य, ब्राह्मणग्रंथांना पुराण व इतिहास हीं नांवें आहेत; म्हणून ते वेद नाहींत. (प्रश्न) ब्रह्मवैवर्त वगैरे ग्रंथ, पुराण शब्दानें प्रसिद्ध आहेत असें असतां तुम्ही ब्राह्मणांनाच पुराण म्हणतां हें कसें? शिवाय ब्राह्मणसूत्रग्रंथांमध्यें "ब्राह्मणें, इतिहास, पुराणें, कल्प, नाराशंसी **(ब्राह्मणानीतिहासान्पुराणानि कल्पान् गाथा नाराशंसिः)**" इत्यादी वचनें आहेत, त्यांवरून्हि ब्राह्मण व पुराणें निराळीं आहेत असें दिसतें. त्याचप्रमाणें अथर्ववेदांतहि—

**सबृ॑हतीं दिश॒मनु॒व्य॑चलत्। तमि॑तिहा॒सश्च॑ पु॒रा॒णं च॒ गाथा॑श्च नाराशं॒सीश्चा॑नु॒व्य॑चलत्। इ॒ति॒हा॒सस्य॑ च॒ वै सपु॑रा॒णस्य॑ च॒ गाथा॑नां च नाराशं॒सीनां॑ च प्रि॒यं धाम॑ भवति॒ य ए॒वं वेद॑ ॥ १ ॥** अथर्ववेद १५।३०।१।४॥

या वेदवचनावरूनहि ब्राह्मणांशिवाय भागवतादिपुराणग्रंथ निराळे आहेत असें मानावें लागतें. मग तुम्ही म्हणतां तें खरें कसें बरें होईल?—(उत्तर) या प्रमाणांनीं ब्राह्मणग्रंथांचाच बोध होतो. पहा. **(देवासुराःसंयत्ताआसन्)** "देव व राक्षस यांचें युद्ध झालें" अशा ब्राह्मणग्रंथस्थ वचनांना इतिहास असें म्हणावें.

**सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् ॥** छांदोग्य.॥प्र.६॥
**आत्मा वा इदमेक एवाग्र आसीन्नान्यत् किंचन मिषत् ॥**
—ऐतरेय० उप. १॥१॥

**आपो ह वा इदमग्रे सलिलमेवास ॥** शत-ब्रा. ११॥१॥
**इदं वा अग्रे नैव किंचिदासीत् ॥**

"जगाच्या पूर्वी हें एकच होतें. आत्म्याशिवाय पूर्वी कांहीं हालचाल करणारें नव्हतें. पूर्वी आत्मत्वच सर्वत्र होतें. पूर्वी अशी सृष्टि मुळींच नव्हती." इत्यादि प्रकारचीं ब्राह्मणांतलि वचनें हीं पुराणें होत कारण, यांत जगाच्या पूर्वीचें वर्णन आहे. **(इषेत्वोर्जेत्वेति वृष्ट्यै तदाह।यदाहेषेत्वेत्यूर्जेत्वेति यो वृष्टादूर्ग्रसो जायते तस्मै तदाह॥सविता वै देवानां प्रसविता सवितृप्रसूता ॥** शत. ब्रा. १।७॥) "वृष्टीविषयीं व झाडांच्या रसांविषयीं इषेत्वोर्जेत्वा या मंत्रांत सांगितलेलें आहे" "सविता हा सर्वांचा उत्पादक आहे" अशाप्रकारचीं ब्राह्मणग्रंथांतील वचनें कीं, ज्यांच्यांत मंत्रांच्या अर्थांचें स्पष्टीकरण आहे, त्यांना कल्प असें म्हणतात. याज्ञवल्क्य व जनक, गार्गी, मैत्रेयी यांच्या संवादात्मक जे भाग ब्राह्मणांत आहेत, त्या गाथा होत. तसेंच—

**नाराशंसो यज्ञ इति कथक्यो नरा अस्मिन्नासीनाः शंसन्त्यग्निरिति शाकपूणिर्नरैःप्रशस्यो भवति ॥** निरु. ८।९॥

"नरांचीं ज्यांत प्रशंसा आहे किंवा नरांनीं (मनुष्यांनीं) ज्यांत प्रशंसा केली जाते ते ब्राह्मणनिरुक्तांतलि भाग नाराशंसी आहेत असें जाणावें. अर्थात "ब्राह्मण" हा शब्द "इतिहास, गाथा, कल्प" इत्यादिकांच्या समुदायांचा वाचक समजावा व त्यावरून मागील वचनाचा (ब्राह्मणानीतिहा० याचा) अर्थ— "ब्राह्मणें हींच इतिहास, पुराणें, नाराशंसी, गाथा, कल्प आहेत" असा करावा. तात्पर्य, इतिहास व पुराणें हीं ब्राह्मणांतर्गतच होत. ब्राह्मणें वेद नव्हत याविषयीं न्यायदर्शन भाष्यांतील प्रमाण—

**वाक्यविभागस्य चार्थग्रहणात् ॥ १ ॥** न्या. अ. २।१।सू.६०॥

भाष्यम्—प्रमाणं शब्दो यथा लोके विभागश्च ब्राह्मणवाक्यानां त्रिविधः ॥ वात्स्यायनः ॥

"ब्राह्मणग्रंथांतील शब्द लौकिक आहेत. वैदिक नव्हत. त्यांत तीन भेद आहेत." ते हे—

**विध्यर्थवादानुवादवचनविनियोगात् ॥ २ ॥**

न्या. २।१।६१॥

भाष्यम्—त्रिधा खलु ब्राह्मणवाक्यानि विनियुक्तानि विधि वचनान्यर्थवादवचनान्यनुवादवचनानीति ॥ वात्स्या० ॥

"ब्राह्मणग्रंथांत तीन प्रकारचीं वाक्यें आहेत. (१) विधिवचन, (२) अर्थवादवचन व (३) अनुवादवचन."

**विधिर्विधायकः ॥ ३ ॥** न्या० २ । १ । ६२ ॥

भाष्यम्—यद्वाक्यं विधायकं चोदकं स विधिः विधिस्तु नियोगोऽनुज्ञावा यथाग्निहोत्रं जुहुयात्स्वर्गकाम इत्यादि ॥ ब्राह्मणवाक्यानामिति शेषः ॥ वात्स्या० ॥

"ज्या वाक्यापासून प्रेरणा केली जाते त्याला विधिवाक्य असें म्हणतात. विधि म्हणजे आज्ञा, संमति किंवा प्रेरणा, जसें-सुखप्राप्ति इच्छिणाऱ्यानें यज्ञ करावा."

**स्तुतिर्निन्दापरकृतिः पुराकल्प इत्यर्थवादः ॥ ४ ॥**

न्या० २ । १ । ६३ ॥

भाष्यम्—विधेः फलवादलक्षणा या प्रशंसा सा स्तुतिः ॥ सम्प्रत्ययार्थं स्तूयमानं श्रद्दधीतेति प्रवर्तिका च फलश्रवणात्प्रवर्तते सर्वं जिता वै देवाः सर्वमजयन् सर्वस्याप्त्यै सर्वस्य जित्यै सर्वमेवैतेनाप्नोति सर्वं जयतीत्येव मादि। अनिष्टफलवादो निन्दावर्जनार्थं निन्दितं न समा चरेदिति । स एष वा प्रथमो यज्ञो यज्ञानां यज्ज्योतिष्टोमो य एतेना निष्ट्वाऽन्ये न यजते गर्ते पतत्ययमेतज्जीर्यते वा इत्येवमादि । अन्यकर्तृकस्य व्याहतस्य विधेर्वादः परकृतिः । हुत्वावपामेवाग्रेभिघारयन्ति । अथ पृषदाज्यं तदुह चरकाध्वर्यवः पृषदाज्यमेवाग्नेभिघारयन्ति । अग्नेः प्राणाः पृष-

**दाज्यं स्तोममित्येवमभिदधतीत्येवमादि । ऐतिह्यसमाचरितो विधिः पुराकल्प इति । तस्माद्वा एतेन ब्राह्मणा । हविःपवमानं सामस्तोममस्तौषन् योनेर्यज्ञं प्रतनवामहा इत्येवमादि ।** वात्स्यायनः ॥

" ब्राह्मणग्रंथांतील वाक्यांचा दुसरा प्रकार अर्थवाद हा होय. याचे चार प्रकार आहेत. ( १ ) स्तुति, ( २ ) निंदा, ( ३ ) परकृति व ( ४ ) पुराकल्प. ( १ ) गुणांची प्रशंसा ज्यांत असते त्यास स्तुति असें म्हणतात. अशा स्तुतिवाक्यांपासून ऐकणाऱ्यांच्या अंतःकरणांत तशीं कामें करण्याविषयीं इच्छा व श्रद्धा उत्पन्न होते. जसें—विद्वानांनीं सर्वांना जिंकून सर्व सुखांची प्राप्ति करून घेतली. सर्वत्र विजय प्राप्त झाला म्हणजे सर्व कांहीं मिळतें. इ० ( २ ) अनिष्टकथन ही निंदा होय ती गोष्ट कोणी करूं नये म्हणून त्याची निंदा केलेली असते. जसें—ज्योतिष्टोम हा मुख्य यज्ञ आहे, तो न करतां जो दुसरा यज्ञ करील तो दुःख भोगील. ( ३ ) दुसऱ्यानें केलेली कृति सांगणें ही परकृति होय. जसें-वपा हीच मुख्य मानतात. चरकाध्वर्यु दहीं व तूप यालाच वपा असें म्हणतात. तूप हे अग्नीचे प्राण आहेत. इ० ( ४ ) इतिहास सांगितलेला असतो हा पुराकल्प समजावा. जसें—ब्राह्मणांनीं पवमान सामस्तोम म्हटलें इत्यादि. हे ते चार प्रकारचे अर्थवाद होत.

## विधिविहितस्यानुवचनमनुवादः ॥ ५ ॥

न्या. २ । २ । ६४ ॥

**भाष्यम्—विध्यनुवचनं चानुवादो विहितानुवचनं च पूर्वः शब्दानुवादोऽपरोऽर्थानुवादः ॥**

"पूर्वी सांगितलेल्या गोष्टीचेंच पुनः स्मरणार्थ कथन करणें हा अनुवाद होय. हा दोन प्रकारचा आहे. ( १ ) शब्दानुवाद व ( २ ) अर्थानुवाद."

## न चतुष्ट्वमैतिह्यार्थापत्ति संभवाभावप्रामाण्यात् ॥ ६ ॥

न्याय. २।२।१॥

**भाष्यम्— न चत्वार्येव प्रमाणानि किं तर्हि । ऐतिह्यमर्थापत्तिः संभवोऽभाव इत्येतान्यपि प्रमाणानि।इति होचुरित्यनिर्दिष्ट प्रवक्तृकं प्रवादपारंपर्यमैतिह्यम्** "ऐतिह्य, अर्थापत्ति, संभव व अभाव हीं सुद्धां आणखीं चार प्रमाणें आहेत. "असें म्हणाले" अशा तऱ्हेचीं वाक्यें हीं ऐतिह्य प्रमाणांत येतात."

वास्तविक पाहतां ब्राह्मणें हीं वेदांचीं—वेदमंत्रांचीं व्याख्यानें आहेत. त्यांत "इषेत्वोर्जेत्वा" ( शत. ११७ ) इत्यादिमंत्रांचीं स्पष्टीकरणें आहेत. अर्थात स्पष्टीकरणें हीं मूल होऊं शकत नाहींत. मूल निराळें व टीका निराळी. वेद व ब्राह्मणें यांत भेद आहे याविषयीं महाभाष्यांतील प्रमाण—

**केषां शब्दानाम् । लौकिकानां वैदिकानांच । तत्र लौकिकास्तावत् । गौरश्वःपुरुषो हस्ती शकुनिर्मृगो ब्राह्मण इति । वैदिकाःखल्वपि । शन्नोदेवीरभिष्टये । इषेत्वोर्जेत्वा । अग्निमीळे पुरोहितम् । अग्न आयाहिवीतये ॥ व्या. म. भा.**

"लौकिक व वैदिक शब्दांचें व्याकरण केलें जात आहे. "गौः अश्वः०" हे लौकिक, "शब्द व शन्नोदे०" हे वैदिक शब्द होत." या ठिकाणीं पतंजलीनें वैदिक उदाहरणांमध्यें फक्त चार वेदांचींच प्रतीकें दिलीं आहेत. जर ब्राह्मणग्रंथ वेदच असते तर त्यांतीलहि उदाहरणें त्याणें दिलीं असतीं. ज्या अर्थीं ब्राह्मणग्रंथांतील उदाहरणें दिलीं नाहींत त्या अर्थीं उघड होतें कीं, महाभाष्यकाराच्या मतानें ब्राह्मणें हीं वेद नव्हेत. "गौःअश्वः" हीं उदाहरणें लौकिक शब्दांचीं आहेत. हीं ब्राह्मणग्रंथांतलिहि होऊं शकतील कारण, ब्राह्मणग्रंथांतील शब्द लौकिकच आहेत. तसेंच—

**द्वितीया ब्राह्मणे ॥ १ ॥ अष्टाध्या. २ । ३ । ६० ॥**
**चतुर्थ्यर्थे बहुलं छन्दसि ॥ २ ॥ अष्टा० २ । ३ ॥ ६२ ॥**
**पुराणप्रोक्तेषु ब्राह्मणकल्पेषु ॥ ३ ॥ अष्टा० ४ । ३ । १०५**

हीं अष्टाध्यायींतील पाणिनीमुनीकृत सूत्रें होत यांतहि वेद व ब्राह्मणें यांविषयीं भेद उघड दाखविला आहे. जर वेद व ब्राह्मणें एक असतीं तर "द्वितीया ब्राह्मणें" या सूत्रांतून "ब्राह्मणें" पदाची अनुवृत्ति येत असतां, पुनः पुढच्या सूत्रांत "छंदसि" हें पद घातलें नसतें. ज्याअर्थीं "छंदसि" हें पद घातलें आहे त्या अर्थीं ब्राह्मणग्रंथ व छंद ( वेद ) यांत भेद आहे. हे दोनहि एक नव्हेत हें उघड आहे. त्याचप्रमाणें ( पुराण प्रोक्तेषु ) ब्राह्मण व कल्पग्रंथ हे ( पुराण ) प्राचीन ब्रह्मादिक ऋषींनीं वेदांचीं व्याख्यानें करण्यासाठीं रचले असें ( अष्टा. ४ । ३ । १०५ ) या सूत्रांत सांगितलें आहे. त्यावरूनहि उघड होतें कीं, वेद हे मूळ असून, ब्राह्मणग्रंथ व्याख्यानें आहेत.

**ब्रह्म वै ब्राह्मणः क्षत्र ॅ राजन्यः ।**

शतपथ ब्रा. १३।१॥

**समानार्थावेतौ ब्रह्मन्शब्दो ब्राह्मणशब्दश्च ॥**

—व्या. भाष्य. ५।१।१॥

"ब्रह्म व ब्राह्मण हे दोन शब्द एकाच अर्थाचे आहेत. म्हणून ब्रह्मवादी व चार वेद जाणणारे असे जे विद्वान ब्राह्मण होते त्यांणीं वेदांचीं व्याख्यानें जीं केलीं तींच हीं ब्राह्मणें होत असें म्हणावें लागतें. कात्यायनानें तरी वेदांचा अर्थच ब्राह्मणांत आहे म्हणून दोनहि एकच आहेत असें समजून "**मन्त्र ब्राह्मणयोर्वेद नामधेयम् ।**" असें म्हटलें असावें. पण असें करणें ठीक नाहीं कारण, आतांपर्यंत दिलेल्या प्रमाणांवरून उघड होत आहे कीं, कात्यायनाप्रमाणें दुसरा कोणताहि ऋषि वेद व ब्राह्मणें यांना एक समजत नाहीं. इतकेंच नव्हे तर प्रत्येक ऋषि या दोनहि ग्रंथांत भेद मानीत आहे. तात्पर्य इतकेंच कीं, वेद निराळे व ब्राह्मणें निराळीं. अर्थात ब्राह्मणग्रंथांचें वेदाप्रमाणें प्रामाण्य मानावयाचें नाहीं. ब्राह्मणें हीं ईश्वरोक्त नसल्यामुळें परतः प्रमाण मानावीं. फक्त मंत्रभाग—अर्थात मूल वेद मात्र स्वतः प्रमाण आहेत.

---

## ब्रह्मविद्या.

वेदांमध्यें मूलरूपानें सर्वविद्या आहेत. त्या सर्वांत ब्रह्मविद्या मुख्य आहे, म्हणून तिचें संक्षेपानें दिग्दर्शन येथें करीत आहों:—

**तमीशा॑नं॒ जग॑तस्त॒स्थुष॒स्पतिं॑ धियं जि॒न्वम॑**
**वसे हूमहे व॒यम् ॥ पू॒षा नो॒ यथा॒ वेद॑सा॒-**
**मस॑द्वृ॒धे र॑क्षि॒ता पा॒यु॒रद॑ब्धः स्व॒स्तये॑ ॥१॥**

ऋग्वेद १ । ६ । १५ । ५ ॥

**तद्विष्णोः॑ प॒र॒मं प॒दं सदा॑ पश्यन्ति सू॒रयः॑**
**दि॒वी॑व॒ चक्षु॒रात॑तम् ॥ २ ॥**

अर्थ—( तं ) तो ( ईशानं ) जगत्कर्ता, जगाचा स्वामी व ( जगतः ) जंगम व

( तस्थुषः ) स्थावरसृष्टीचा ( पतिं ) स्वामी आहे. तसेंच ( धियं जिन्वं ) बुद्धीची तृप्ति करणारा आहे. ( अवसे ) आमच्या रक्षणासाठीं त्याची आम्ही ( वयं हूमहे ) प्रार्थना करतों. तो ( नः ) आम्हांला ( पूषा ) पुष्टि, बल वगैरे देणारा आहे. ( यथा ) ज्याप्रमाणें ( वेदसां ) विद्या, सुवर्णादि धनांच्या ( वृधे ) वृद्धीसाठीं हे परमेश्वरा! ( भवान् असत् ) तूं आहेस, त्याचप्रमाणें ( रक्षिता ) आमचें सर्वप्रकारें रक्षण करणाराहि तूं हो. त्याचप्रमाणें ( अदब्धः ) आळस सोडून अर्थात दुर्लक्ष्य न करतां ( पायुः स्वस्तये ) आमचें रक्षण व कल्याण करून, आम्हांला सुख देणारा हो. ( तद्विष्णोः ) या मंत्राचा अर्थ वेदविषयप्रकरणांत ( पान २३ ) सांगितला आहे तेथें पहावा.

परीत्यं भूतानिं परीत्यं लोकान् परीत्य सर्वाः प्रदिशो दिशंश्च ॥ उपस्थायं प्रथमजामृतस्यात्मनात्मानंमभिसंविवेश ॥ ३ ॥

यजु. ३२।११॥

अर्थ—जो परमेश्वर ( भूतानि ) आकाशादि महाभूतांमध्यें ( परीत्य ) व्यापून राहिला आहे तसेंच ( लोकान् परीत्य ) सूर्यादि लोकांमध्यें व ( सर्वाः दिशः प्रदिशःच परीत्य ) सर्व दिशा व उपदिशा यांमध्यें पूर्णपणें व्यापला आहे, तसेंच जो परमेश्वर ( ऋतस्य ) स्वतः सामर्थ्यमान आहे, अर्थात सामर्थ्याचा जो आत्मा आहे व जो ( प्रथमजा ) आरंभीं सूक्ष्म भूतें उत्पन्न करतो, त्या आनंदमय परमेश्वराची जो जीव ( उपस्थाय आत्मना ) अंतःकरणपूर्वक उपासना करतो, त्याला ( आत्मानं ) त्या परमात्म्याचें ज्ञान होतें व त्याला परमेश्वरप्राप्ति होऊन ( अभिसंविवेश ) मोक्षसुखाचाहि अनुभव मिळतो.

महद्यक्षं भुवंनस्य मध्ये तपंसि क्रान्तं संलिलस्यं पृष्ठे ॥ तस्मिञ्छ्रयन्ते य उ के चं देवा वृक्षस्य स्कन्धंः परीतं इव शाखाः ४

अथर्व० १०।२३।४।३८॥

अर्थ—( महत् ) सर्वांहून मोठें, ( यक्षं ) सर्व मनुष्यांनीं पूजा करण्यास योग्य, ( भुवनस्य ) सर्व जगाच्या ( मध्ये ) मध्यें परिपूर्ण असलेलें, ( तपसि क्रान्तं ) ज्ञानामध्यें

वृद्ध अर्थात सर्वाहून ज्ञानी-पूर्णज्ञानी- ( सलिलस्य ) अंतरिक्षाच्या किंवा कार्यरूप जगाच्या प्रलयानंतर राहणाऱ्या आकाशाच्या ( पृष्ठे ) पलीकडे असणारें असें तें ब्रह्म आहे. ( वृक्षस्य ) झाडाच्या ( स्कंधः ) बुंध्याच्या आधारानें ( परितः ) चहूंकडे जशा ( शाखाः ) फांद्या पसरल्या असतात, त्याप्रमाणें ( तस्मिन् ) त्याच्या ( श्रयन्ते ) आश्रयानें (य उ के च) हे ( देवा) (ते) वसु आदि तेहतीस देव राहतात. ( अर्थात सर्व विश्व रहातें. )

न द्वि॒तीयो॒ न तृ॒तीय॑श्चतु॒र्थो॑ नाप्यु॑च्यते ॥६॥
न प॒ञ्च॒मो न ष॒ष्ठः स॑प्त॒मो नाप्यु॑च्यते ॥७॥
नाष्ट॒मो न न॑व॒मो द॑श॒मो नाप्यु॑च्यते ॥८॥
तमि॒दं नि॒गतं॒ सहः॒ स ए॒ष एक॑ एकवृदेक॑ ए॒व ॥९॥

**अर्थ**—( न द्वितीयः ) इत्यादि शब्दांनीं तो परमात्मा एकच आहे असें स्पष्टपणें सांगून अनेक उपास्यें मानणारांचा पूर्ण निषेध वरील मंत्रांत केला आहे. दोन संख्येपासून अनंत संख्येपर्यंत कोणत्याहि द्वित्ववाचक संख्येनें तो दाखविला जात नसून, फक्त **एक** या एकत्व वाचक संख्येनेंच त्याचा बोध होतो. अर्थात तो एकच आहे अनेक नाहीं. त्या एका परमेश्वराचीच उपासना सर्वांनीं करावी दुसऱ्या कोणाचीहि करूं नये. तोच सर्व द्रष्टा असल्यामुळें जडचेतनात्मक सर्व जग पाहतो. त्याला पाहणारा कोणीहि नाहीं व तो कधीं डोळ्यांनीं दिसूं शकणारहि नाहीं. त्या परमेश्वरानें सर्व जग व्यापलें असल्यामुळें ( निगतं ) तो सर्वत्र गेलेला अर्थात भरलेला आहे. ( व्यापक व व्याप्य यांचा नित्य संबंध असतोच.) तो सर्व सहन करीत असल्यामुळें, ( सहः ) त्याला "सह" हें नांव आहे. ( स एकः ३ ) तो एकच आहे. सजातीय, विजातीय इत्यादि भेद त्यांत मुळींच नाहींत. अर्थात तो एक असून सर्वत्र एक सारखा आहे. ( एकवृत्त ) तो एक असून सर्व जगाला व्यापणारा व आधार देणारा असा आहे. ( अस्मिन् ) या सर्व शक्तिमान परमेश्वरामध्यें ( सर्वे देवाः ) वसु आदि सर्व देव ( एकवृतो भवन्ति ) राहतात. अर्थात त्याच्या आधारानेंच इतरांचें अस्तित्व आहे. प्रलयामध्यें किंवा सृष्टीमध्यें सर्वांना त्याचाच आधार आहे.

याप्रमाणें ब्रह्मोपासना प्रतिपादन करणारे वेदमंत्र चारहि वेदांमध्यें अनेक आहेत. पण विस्तारभयास्तव येथें इतकेच पुरेत. यावरून एक ब्रह्माची ( एका परमात्म्याचीच ) उपासना वेदांमध्यें सांगितली आहे असें समजावें.

---

# वेदामध्यें सांगितलेला धर्म.

**सङ्गच्छध्वं संवंदध्वं संवो मंनांसि जानताम् ॥ देवा भागं यथा पूर्वें संजानाना उपासंते ॥ १ ॥** ऋ. ८।८।४९।२॥

ईश्वर सर्व मनुष्यांना उपदेश करतो कीं, अहो मनुष्यहो! ( संगच्छध्वं ) तुम्ही मी सांगितलेल्या न्याय्य, पक्षपातरहित व सत्य लक्षणांनीं उज्वल अशा धर्माचा स्वीकार करा. आपापसांतील सर्व विरोध सोडून एक व्हा व धर्मज्ञान मिळवा. यामुळेंच तुम्हांला सदोदित सुख मिळेल व तुमच्या सर्व दुःखांचा नाश होईल. ( संवदध्वं ) जल्प, वितंडवाद, भांडण व तंटे सोडून प्रेमानें प्रश्नोत्तरें करा व सत्यविद्या-सत्यज्ञान मिळवा. ( वो मनांसि जानताम् ) तुमचीं मनें सर्वदा उत्तम संस्कारांनीं युक्त राहतील, उत्तम ज्ञान तुमच्या मनांत सदैव पूर्ण राहिल व ज्ञानजन्य आनंदाचा लाभ तुम्ही सदैव घ्याल असें पुरुषार्थ करून करा. तुम्ही सदोदित धर्माचेंच अनुष्ठान करावें, अधर्मानें कधींहि जाऊं नये यांतच तुमचें हित आहे. ( यथा ) ज्याप्रमाणें ( पूर्वे ) पूर्वीचें ( संजानानाः ) ज्ञानी, आप्तपुरुष, ( देवाः ) विद्वान व पक्षपातरहित लोक ( भागं ) भजनीय, पूजनीय अशा सर्वशक्तिमान परमेश्वराची ( उपासते ) उपासना करीत असत व आहेत तशी तुम्हींहि त्याचीच उपासना करा व वैदिक धर्माचा निःशंकपणें स्वीकार करून त्याचा प्रेमपूर्वक सर्वांस उपदेश करा.

**समानो मन्त्रः समितिः समानी समानं मनः सहचित्तमेषाम् ॥ समानं मन्त्रमभिमन्त्रये वः समानेन वो हविषा जुहोमि ॥२॥** ऋग्वेद. ८।८।४९।३॥

अहो मनुष्यहो! ( मन्त्रः ) तुमचे विचार—अर्थात तृणापासून परमेश्वरापर्यंत सर्व पदार्थांच्या यथार्थ गुणदोषांसंबंधीं विचार ( समानः ) समान-एक-असोत. [ विचार हाच मंत्र; म्हणूनच राजाजवळ जो सत्यासत्याचा **विचार**करणारा असतो, त्याला **मंत्री** म्हणतात. असो. ] अर्थात ज्यावेळीं पुष्कळ मनुष्यांनीं मिळून कांहीं विचार करावयाचा

असेल, त्यावेळीं सर्वांचीं निरनिराळीं मतें घेऊन, त्यांतून जें सर्वांच्या हिताचें सार निघेल त्याप्रमाणें सर्वांनीं एकविचारें वागावें. याप्रमाणें तुम्ही वागलांत तरच तुम्हांला दररोज ज्यास्तज्यास्त सुख प्राप्त होईल. (समितिःसमानी) समिति म्हणजे सामाजिक नियमव्यवस्था. अर्थात जिच्या योगानें सर्व मनुष्यांचा योग्य न्याय होतो, सर्वांना योग्य मान मिळतो व ज्ञान प्राप्त होतें, ब्रह्मचर्यादि आश्रमांचें पूर्णपणें पालन होऊन, विद्याभ्यास पूर्ण होऊन शुभगुण अंगीं येतात, राज्यव्यवस्था उत्तम चालते, परमार्थ व व्यवहार तडीस जातात, बुद्धि-शरीर-बल-आरोग्य यांची वृद्धि होते, अशा प्रकारची जी नियमांची मर्यादा असते ती तुम्हां सर्वांची एकच असो. म्हणजे तुम्ही सर्वांनीं सर्वांच्या सुखाकडे लक्ष्य पुरवून सामाजिक व इतर नियमांचें परिपालन करावें. (समानं मनः) मनाचे संकल्प व विकल्प असे दोन धर्म आहेत. संकल्प म्ह॰ इच्छा व विकल्प म्ह॰ द्वेष. म्हणून तुम्ही सर्वांनीं शुभगुण प्राप्त होण्याची इच्छा व अशुभ गुण दूर राखण्याविषयीं निश्चय द्वेषभाव सोडून करावा. तसेंच जें तुमचें (चित्तं) चित्त—स्मरणात्मक—आहे त्या चिंतन शक्तीचा उपयोग (समानं) समानबुद्धीनें सर्व प्राण्यांच्या दुःखाचा नाश करण्याकडे करा. तुमचें सर्व सामर्थ्य लोकांच्या दुःखाचा नाश करण्याकडे खर्च होवो. (एषां) जे लोक आपणांप्रमाणें सर्वांना समजून त्यांच्या दुःखांचा नाश करण्यास झटतात त्यांच्यावर मी दया करतों. (अभिमंत्रये वः) हाच पूर्वोक्त धर्म मी तुम्हांस सांगतों, त्याचप्रमाणें तुम्ही वागावें, त्याणेंच तुमचें कल्याण होईल. सत्यधर्माप्रमाणेंच घेणेंदेणें वगैरे सर्व व्यवहार करावें. त्यांत असत्यता मुळीं सुद्धां असूं नये. (समानेन वो हविषा जुहोमि) असें केलें असतां मी तुम्हांला धार्मिक बुद्धि वारंवार देईन. म्हणून मी सांगितलेल्या धर्माचेंच पालन तुम्ही करा.

## समानीव आकूतिः समाना हृदयानि वः ॥
## समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ॥

३॥ ऋ. ८।८।४९।४॥

**अर्थ**—अहो मनुष्य हो! तुम्ही सर्वांनीं ऐक्यानें राहून धर्माचें आचरण करावें व सर्वांचें सुख वाढवावें. (वः आकूतिः) तुमचे व्यवसाय, उत्साह व चालीरीति या सर्व (समानी) परस्परांवर उपकार करण्यामध्यें व सर्व जनांचें सुख वाढविण्यांत अव्याहत

(१) हे दोन शब्द "हु=दानादानयो" याधातूवरून झाले आहेत—"देणें व स्वीकारकरणें" हा त्यांचा धात्वर्थ आहे.

तत्पर राहोत. तुम्ही सर्वांनीं एकमतानें वागून मी सांगितलेल्या वैदिक धर्माचा उपदेश सर्वदा सर्वांना करून त्या धर्माचा लोप न होईल असें करावें. (वः हृदयानि) तुमचीं अंतःकरणें सदोदित (समाना) निर्वैर, प्रेमप्रचुर व आनंदित अशीं असावींत. (वः मनः) तुमचें मन आपल्या सर्व मनोवृत्तींसह (समानं) सदोदित सर्वांशीं प्रेमळ असावें. [या ठिकाणीं "मन" शब्दानें बराच व्यापक अर्थ दाखविला जातो. शतपथ ब्रा० १४।४ मध्यें मनाविषयीं—"**कामः सङ्कल्पो विचिकित्सा श्रद्धाऽश्रद्धा धृतिरधृति र्ह्रीर्धीर्भीरित्येतत्सर्वं मन एव तस्मादपि पृष्ठत उपस्पृष्टो मनसा विजानाति।**" असें म्हटलें आहे. त्याचा अर्थ—"मनाचा धर्म-विवेक करणें, मनन करणें हा आहे. **काम** म्हणजे शुभगुणांची इच्छा; त्यांच्या प्राप्तीच्या अनुष्ठानाची इच्छा करणें हा **सङ्कल्प**; प्रथमतः संशय उत्पन्न झाला असतां त्या विषयीं निश्चय करण्याची इच्छा करणें ही **विचिकित्सा**; **श्रद्धा** म्ह० ईश्वर व सत्यधर्म इत्यादिकांवर पूर्ण विश्वास; **अश्रद्धा** म्ह० निरीश्वरवाद व अधर्म इत्यादिकांविषयीं कायम निश्चय कांहीं नसणें; **धृति** म्ह० सुख होवो किंवा दुःख होवो-ईश्वर व धर्म यांवर सदैव निश्चय ठेवणें; अशुभ गुणांचें आचरण कधींहि न करणें-अर्थात वाईट आचरण करण्यास भिणें-या गुणाला **अधृति** असें म्हणतात; (मनुष्याला वाईट कामें करण्याचें धैर्य नसलेलेंच चांगलें.) **ह्रीः** म्ह० सत्यधर्माचें आचरण न करण्यांत व असत्यधर्माचें आचरण करण्यांत जी लज्जायुक्त व संकुचित मनोवृत्ति होते ती; **धीः** म्ह० शुभगुणांचें शीघ्र धारण करणारी बुद्धि; **भीः** म्हणजे असत्याचरण, ईश्वराच्या आज्ञेचें उल्लंघन, पापाचरण वगैरे करीत असतां ईश्वर आपणास पाहतो म्हणून मनांत जी भीति उत्पन्न होते ती होय. या मनाच्या वृत्ति आहेत. म्हणूनच मनानें सर्व कांहीं व्यवहारिक ज्ञान होतें. या मनोवृत्तींसह तुमचें मन सदोदित सत्कृत्यांत समान राहो, हें वरील मंत्राचें तात्पर्य."] (यथा वः सुसहासति) अहो मनुष्यहो! जो प्रयत्न केला असतां, तुमच्या सुखांची उन्नति होईल, तुम्ही परस्परांला सहाय्य कराल व एकमेकांचें सुख वाढवाल तो तुम्हीं सदोदित करावा. दुसरा सुखी पाहून तुम्हांला सुख व्हावें व दुसरा दुःखी पाहून तुम्हीं दुःखित व्हावें. दुसऱ्याच्या दुःखांत तुम्ही भर घालूं नये, पण शक्य तेवढा प्रयत्न करून सर्व लोक स्वतंत्र व सुखी होतील असें करावें.

**दृ॒ष्ट्वा रू॒पे व्याक॑रोत्सत्यानृ॒ते प्र॒जाप॑तिः ॥**
**अश्र॑द्धामनृ॒ते द॑धाच्छ्र॒द्धाँ स॒त्ये प्र॒जाप॑ति॥४॥**

यजु० १९।७७ ॥

**अर्थ**—परमेश्वर सर्वांना उपदेश करीत आहे कीं, सर्वांनीं सर्वदा व सर्व प्रकारें सत्यावर श्रद्धा ठेवून असत्यावर अश्रद्धा ठेवावी. ( प्रजापतिः ) परमेश्वरानें ( सत्यानृते ) धर्म व अधर्म या दोहोंचीं (रूपे) स्वरूपें कांहीं अंशीं प्रसिद्ध व कांहीं अंशीं अप्रसिद्ध आहेत असें जाणून ( व्याकरोत् ) आपल्या विद्येच्या सामर्थ्यानें त्या दोहोंतील भेद स्पष्ट केला. ( अश्रद्धां अनृते ) त्याणें अशी आज्ञा केली कीं, सर्वांनीं अधर्मावर कधींहि श्रद्धा ठेवूं नये; व ( सत्ये ) वेदशास्त्रप्रतिपादित, प्रत्यक्षादि सर्व प्रमाणांनीं सिद्ध, पक्षपातरहित, न्याय्य व सत्य अशा धर्मावर ( श्रद्धां ) सर्वांनीं विश्वास ( दधात् ) ठेवावा. अर्थात सर्वांनीं आपल्या चित्ताला अधर्मापासून मागें हटवून धर्ममार्गावर स्थिर करावें. अशी परमेश्वराची आज्ञा आहे.

**दृते दृꣳह मा मित्रस्य मा चक्षुषा सर्वाणि भूतानि समीक्षन्ताम् ॥ मित्रस्याहं चक्षुषा सर्वाणि भूतानि समीक्षे॥ मित्रस्य चक्षुषा समीक्षामहे ॥ ५ ॥ यजु० ३६।१८॥**

**अर्थ**—सर्व मनुष्यांनीं सर्वांबरोबर मित्रभाव ठेवावा. कोणाशींहि निष्कारण वैर करूं नये. सर्वांनीं ईश्वराची प्रार्थना करून पुढें लिहिल्याप्रमाणें वर्तन ठेवण्याचा निश्चय करावा. ( दृते ) हे सर्व दुःखविनाशक ईश्वरा ! माझ्यावर कृपा कर व मला धर्मबुद्धि दे. ( सर्वाणि भूतानि ) सर्व प्राणिमात्रांनीं ( मा ) मला ( मित्रस्य चक्षुषा ) मित्रत्वाच्या नात्यानें ( समीक्षन्ताम् ) पहावें. ( मां ) अशा सदिच्छेनें युक्त असणाऱ्या मला ( दृंह ) सदोदित उन्नतीयुक्त कर. ( अहं ) मी ( मित्रस्य चक्षुषा ) मित्रबुद्धीनें—आपल्यासारखींच इतर भूतें आहेत अशा बुद्धीनें—( सर्वाणि भूतानि समीक्षे ) सर्व भूतांकडे पाहीन. ( मित्र० चक्षु० समी० ) याचप्रमाणें आम्ही सर्वांनीं परस्परांना मित्रत्वानेंच-प्रेमबुद्धीनेंच-पहावें. आम्ही सर्वांनीं मिळून परस्परांच्या सुखवृद्धीच्या यत्नास झटून आरंभ करावा. हा ईश्वरोक्त ऐक्यमूलक धर्म जे पाळतील त्यांचेंच कल्याण होईल.

---

( १ ) बाह्य–सामान्य धर्म प्रसिद्ध व अभ्यंतर-आत्मिकधर्म अप्रसिद्ध होत.

**अग्ने व्रतपते व्रतं चरिष्यामि तच्छकेयं तन्मेराध्यताम् ॥ इदमहमनृतात्सत्यमु पैमि ॥ ६ ॥ यजु० १।५॥**

**अर्थ**—सर्व मनुष्यांनीं ईश्वराच्या सहाय्याची इच्छा करावी. त्याच्या सहाय्या-वांचून सत्यधर्माचें ज्ञान व त्याचें अनुष्ठान करण्याची शक्ति हीं येणार नाहींत. (अग्ने) हे ज्ञानस्वरूप परमेश्वरा, (व्रतपते) हे सत्यपते, (व्रतं) सत्यधर्माचें आचरण (चरि-ष्यामि) करण्याचा मीं निश्चय केला आहे. [ " **सत्यमेव देवा अनृतं मनुष्याः। एतद्ध वै देवा व्रतं चरन्ति यत्सत्यम्** ॥ शतप० १।१॥ "–सत्याचरण करतात ते देव व असत्य मार्गानें जातात ते मनुष्य हौत. या प्रमाणें शतपथब्राह्मणांत सांगितलें आहे. म्हणून सर्वांनीं सत्याचरण करावें. सत्याचरण हाच धर्म आहे. " ] (तत् शकेयम्) ज्या रीतीनें मी सत्यधर्माचरण करण्यास समर्थ होईन (तत् मे राध्यताम्) त्या रीतीची सिद्धि माझ्यापुढें सदैव तुझ्या कृपेनें असो. मी जें व्रत धारण करूं इच्छितों तें (इदं) हें आहे—(अहं) मी (अनृतात्) अधर्माचरणाला, असत्याला सोडून (सत्यं) सत्यधर्माचा (उपैमि) स्वीकार करतों. ईश्वराची प्रार्थना करून व स्वतः पुरुषार्थ करून या धर्माचें अनुष्ठान सर्वांनीं करावें. जो मनुष्य पुरुषार्थ करीत नाहीं, [ आळसांत दिवस घालवितो, ] त्याच्यावर परमेश्वर अनुग्रह करीत नाहीं. ज्या प्रमाणें डोळस पाहूं शकतो व आंधळा पाहूं शकत नाहीं त्याच-प्रमाणें पुरुषार्थ करणाऱ्या, धर्माचरण करणाऱ्या व ईश्वराचा अनुग्रह इच्छिणाऱ्या मनुष्यावरच परमेश्वर दया करतो. जीवाच्या जवळ पुरुषार्थ करण्याचीं साधनें परमे-श्वरानें पूर्वीच ठेवलेलीं आहेत; त्यांचा जो उपयोग करीत नाहीं त्याला परमेश्वराचें सहाय्य मिळणें शक्य नाहीं. ज्या पदार्थाचा जितका उपयोग करणें शक्य आहे तितका उपयोग केल्यानंतर ईश्वराच्या अनुग्रहाची इच्छा करावी. तात्पर्य पुरुषार्थ करण्यानेंच ईश्वर संतुष्ट होतो.

**व्रतेन दीक्षामाप्नोति दीक्षयाप्नोति दक्षिणाम् दक्षिणा श्रद्धामाप्नोति श्रद्धया सत्यमाप्यते॥७॥**

**–यजु. १९।३०।**

अर्थ—जो मनुष्य धर्माचा जिज्ञासू असेल त्यालाच सत्याचें ज्ञान होतें. या सत्यावरच सर्वांनीं विश्वास ठेवावा. असत्यावर कधींहि ठेवू नये. जे ( व्रतेन ) सत्याचें परिपालन करतात, त्यांनाच ( दीक्षां ) उत्तम अधिकार (आप्नोति) प्राप्त होतो. ( दीक्षया ) उत्तम गुणांनीं उत्तम अधिकारी बनल्यामुळें, त्याला ( दक्षिणां ) उत्तम फल सदासर्वदा सर्व ठिकाणाहून ( आप्नोति ) मिळतें अर्थात शुभ गुणांच्या अचरणानें सर्वांकडून मान मिळतो व इतर उत्तम फळेंहि प्राप्त होतात. [ या फलालाच " दक्षिणा" असें म्हणतात. ] ज्यावेळीं ब्रह्मचर्यादि सत्यव्रतांनीं ती ( दक्षिणा ) युक्त होते व जेव्हां सर्वांच्या सत्काराला प्राप्त होते तेव्हां तीवर सर्वांचा (श्रद्धां) विश्वास (आप्नोति) बसतो कारण, सत्याच्या आचरणानें सत्कार हा झालाच पाहिजे. ( श्रद्धया ) जसजशी श्रद्धा वाढत जाते तसतशी ( सत्यं) परमेश्वराची, मोक्षाची व धर्मज्ञानाची ( आप्यते ) प्राप्ति सत्वर होते. म्हणून श्रद्धा, उत्साह वगैरे पुरुषार्थसाधक गुण अंगीं आणून पुरुषार्थ करावा व मोक्षापर्यंत सर्व उत्तम फळाची प्राप्ति सर्वांनीं करून घ्यावी.

**श्रमेण तपसा सृष्टा ब्रह्मणा वित्तऋते श्रिता॥९॥**

**सत्येनावृता श्रिया प्रावृता यशसा परीवृता १०**

अथर्व० १२।५।१।२॥

अर्थ—" श्रमेण० " इत्यादि मंत्रांमध्यें धर्माचीं लक्षणें सांगितलीं आहेत. (तपसा) धर्मानुष्ठान हाच ( श्रमेण ) प्रयत्न किंवा पुरुषार्थ आहे. या पुरुषार्थासह परमेश्वरानें मनुष्यांना ( सृष्टाः ) उत्पन्न केलें आहे. अर्थात मनुष्यांना पुरुषार्थाच्या सर्व शक्ति दिल्या आहेत म्हणून त्यांणीं ( ब्रह्मणाः ) वैदिकज्ञानाच्या योगानें ज्ञानी व्हावें. ( ऋते ) सत्यता व पुरुषार्थ यांचा ( श्रिताः ) त्यांणीं आश्रय करावा. मनुष्यांनीं ( सत्येन ) वेदशास्त्र व प्रत्यक्षादि प्रमाणांनीं परिक्षित सत्य, या दोहोंचा ( आवृताः ) सर्वत्र व सर्वदा आश्रय करावा. ( श्रिया ) उत्तम सद्गुणांच्या योगानें शोभणाऱ्या चक्रवर्ति राज्यलक्ष्मीनें–( प्रावृताः )–युक्त लोकांनीं असावें. ( यशसा ) उत्कृष्ट गुण-ग्रहण व सत्यनिष्ठारूप यशानें–( परीवृता )–युक्त मनुष्यांनीं असावें.

**स्वधया परिहिता श्रद्धया पर्यूढा दीक्षया**

**गुप्ता यज्ञे प्रतिष्ठिता लोको निधनम्॥११॥**

**ओजंश्च तेजंश्च सहंश्च बलं च वाक् चेन्द्रि-
यं च श्रीश्च धर्मश्च ॥ १२ ॥**

अथर्व० १२।५ मं. ३।७॥

अर्थ—मनुष्यांनीं (स्वधया) आपल्या स्वतःच्या वस्तूंनींच–आपल्या मालमत्तेंतच संतुष्ट राहून (परी) सर्व प्रकारें (हिताः) सर्व मनुष्यांनां हितकारक व्हावें; इतरांनां सहाय्य करावें. (श्रद्धया) सत्यावर अचल विश्वास (पर्य्यूढाः) ठेवावा. (दीक्षया) सत्पुरुष, आप्त व विद्वान यांच्या उपदेशरूपी दीक्षेनें (गुप्ताः) लोकांचें रक्षण होवो व लोक इतरांचें रक्षण करोत. (यज्ञे) "यज्ञो वै विष्णुः।" सर्वव्यापक परमेश्वर प्राप्तीमध्यें व अश्वमेधादि यज्ञांत व शिल्पक्रियेमध्यें (प्रतिष्ठिताः) लोकांनीं उन्नति मिळवावी. (लोकः) हा भूलोक (निधानम्) सर्व मनुष्यांचें निधन आहे. अर्थात मृत्यु येईपर्यंत–आमरणांत–मनुष्यांनीं सत्कर्में व परोपकार करीत असावें. ही परमेश्वराची सर्वांस आज्ञा आहे. तसेंच (ओजःच) न्यायपालनयुक्त पराक्रम करावा, (तेजःच) प्रगल्भता, धैर्य, निर्भयपणा, दीनता नसणें हे गुण खऱ्या व्यवहारांत दाखवावे; (सहःच) सुख–दुःख–हानि–लाभ–इत्यादि क्लेशांपासून हर्ष व शोक न होतां सतत दुःखनिवारणार्थ प्रयत्न करीत असणें याला सहनशक्ति म्हणतात. ती सर्वांनीं अंगीं आणावी. (बलम्) ब्रह्मचर्यादि उत्तम नियमांनीं शरीर व बुद्धि यांचें आरोग्य वाढवणें, सर्व अवयव दृढ करून बुद्धि निश्चल करणें, मोठमोठीं साहसाचीं कामें करणें हें बल होय; तें सर्वांनीं वाढवावें. (वाक्) विद्या शिकवून खरें व गोड भाषण करण्यास शिकावें. (इन्द्रियम्) ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें यांनां पापापासून मागें सारून सत्यधर्माचरणरूपी उत्तम मार्गावर चालवावें. (श्रीः) साम्राज्यलक्ष्मी परम पुरुषार्थ करून मिळवावी. (धर्मः) वेदोक्त धर्माचा अवलंब सर्वांनीं करावा. सत्याचरण व परोपकार हाच धर्म आहे.

**ब्रह्मं च क्षत्रं च राष्ट्रं च विशंश्च त्विषिंश्च
यशंश्च वर्चश्च द्रविणं च ॥ १३ ॥ आयुंश्च
रूपं च नामं च कीर्तिश्च प्राणश्चांपानश्च
चक्षुंश्च श्रोत्रं च ॥ १४ ॥ पयंश्च रस-**

**श्राद्धं चान्नाद्यं च ऋतं च सत्यं चेष्टं च पूर्तं च प्रजा च पशवश्च ॥ १५ ॥**

अथर्व०–१२।९ ॥ मं० ८।९।१०॥

अर्थ—( ब्रह्म ) उत्तम विद्या मिळवणें, उत्तम गुण अंगीं आणणें, उत्तम कर्में करणें व सद्गुणांचा प्रचार करणें हीं कर्में सदैव करावीं. (क्षत्रम्) विद्या, चातुर्य, शौर्य, धैर्य, वीर्यादि पौरुषेय बलाची प्रयत्नानें उन्नति करावी. (राष्ट्रम्) सत्पुरुषांची सभा करून, उत्तम नियमांनीं लोकांनां सुख होईल अशी राज्यपद्धति करावी. ( विशः ) वैश्यांच्या व्यापाराला उत्तेजन देऊन पृथ्वीवर त्यांचा अप्रतिबद्ध व्यापार चालेल व धनवृद्धि होईल असें करावें. ( त्विषिः ) उत्तम गुणरूपी प्रकाश चहूंकडे पसरावा. ( यशः ) धर्माचरण करून कीर्ति संपादावी. ( वर्चः ) सद्विद्येचा प्रचार करणारें अध्ययनाध्यापनादि कर्तव्य योग्य रीतीनें करावें. ( द्रविणम् ) अप्राप्त पदार्थांच्या प्राप्तीची इच्छा न्याय्यमार्गानें करावी, मिळविलेल्याचें संरक्षण करावें, रक्षिताची वाढ करावी व अशा रीतीनें वाढलेल्या द्रव्याचा सत्कर्मामध्यें व्यय करावा. या चतुर्विध पुरुषार्थानें धनधान्य मिळवून सदैव उन्नति व सुखें मिळवावीत. ( आयुः ) वीर्याचें रक्षण करून भोजनाच्छादनादि सुखें नियमितपणानें घेऊन, ब्रह्मचर्याचें पालन करून आयुष्य वाढवावें. ( रूपम् ) विषयांचें निरंतर सेवन न करतां बेतानें राहून सौंदर्यादि गुणांचें रक्षण करावें. ( नाम ) उत्तम कामें करून नांवलौकिक संपादन करावा. असें केलें असतां इतरांसहि तशीं कामें करण्यास उत्साह येतो. ( कीर्तिः ) सद्गुणांचें कीर्तन व ईश्वराच्या गुणांचें वर्णन करावें, तसेंच आपली सत्कीर्ति वाढवावी. ( प्राणः अपानः ) प्राणायाम करून शरीरादिकांची शुद्धि करावी. शरीरांतून जो वायू बाहेर जातो तो प्राण व जो बाहेरून आंत येतो तो अपान होय. शुद्ध स्थानावर बसून यांचा प्राणायाम करावा व त्या योगें शरीर व बुद्धि यांची शुद्धि करावी. ( चक्षुः ) प्रत्यक्ष प्रमाण व ( श्रोत्रम् ) शब्द प्रमाणादि, अन्यप्रमाणें जाणावीं. (पयः) जल व (रसः) दूध दहीं वगैरे, यांची वैद्यकीच्या पद्धतीप्रमाणें शुद्धि करून त्यांचें सेवन करावें. ( अन्नम् ) भात व ( अन्नाद्यम् ) इतर भक्ष्यें हीं उत्तम रीतीनें तयार करून भक्षण करावींत. (ऋतम्) सत्य विद्येचें-(वेदाचें) अध्ययन करावें. (सत्यम्)–प्रत्यक्षादि पूर्वोक्त प्रमाणांनीं सत्याचा निर्णय करून जें सत्य ठरेल तेंच बोलावें व मानावें. ( इष्टम् ) ब्रह्माची उपासना करावी ( पूर्तम् ) सर्वोपकारक यज्ञांचें अनुष्ठान–काया, वाचा, मन यांहींकरून करावें. त्यांमध्यें लागणाऱ्या सर्व वस्तूंचा संग्रह पुरुषार्थ करून करावा. ( प्रजा ) संतान व राज्यांतील लोक यांना उत्तम विद्या शिकवून सुसंस्कृत करावे.

( पशव: ) हत्ती, घोडे वगैरे, यांची उत्तम काळजी घेऊन त्यांना उत्तम रीतीनें शिकवावें. या मंत्रांत अनेक "च" कार आलेले आहेत. त्या "च"कारांनीं इतर उत्तम गुणांचा बोध होतो. म्हणून इतर उत्तम गुण संपादन करावे. याप्रमाणें अनेक मंत्रांमध्यें परमेश्वरानें धर्माचा उपदेश केला आहे.

---

## धर्माविषयीं तैत्तिरीयशाखेंतील प्रमाणें.

**ऋतं च स्वाध्यायप्रवचने च सत्यं च स्वा० । तपश्च स्वा० । दमश्च स्वा० । शमश्च स्वा० । अग्नयश्च स्वा० । अग्निहोत्रं च स्वा० । अतिथयश्च स्वा० । मानुषंच स्वा० । प्रजाच स्वा० । प्रजनश्च स्वा० । प्रजातिश्च स्वा० । सत्यमिति सत्यवचा राथीतरः । तप इति तपोनित्यः पौरुशिष्टिः । स्वाध्याय प्रवचने एवेति नाको मौद्गल्यः । तद्धि तपस्तद्धि तपः ॥ १ ॥**

तैत्ति० आर० प्रपा० ७।९॥

**अर्थ**—सर्व मनुष्यांनीं ( स्वाध्याय ) वेदाध्ययन व ( प्रवचन ) त्याचा इतरांस उपदेश हीं दोन कृत्यें सर्वदा करावीं व त्याबरोबर ( ऋतम् ) यथार्थज्ञान मिळवणें किंवा ब्रह्मोपासना, ( सत्यम् ) सत्याचरण, ( तप: ) ज्ञान व धर्म यांणीं ठरविल्याप्रमाणें अगदीं तंतोतंत आचरण करणें, ( दम: ) इंद्रियांचा अधर्मापासून निग्रह करून त्यांनां धर्ममार्गावर लावणें, ( शम: ) मनानें अधर्माचें चिंतनहि न करणें, ( अग्नय: ) वेद, शास्त्र व अग्न्यादि पदार्थ यांच्यायोगानें पारमार्थिक व व्यावहारिक विद्यांचा लाभ सर्वांस होईल असें करणें, (अग्निहोत्रम्) नित्य होम व अश्वमेधादिक यज्ञ हे करून तद्द्वारा वायु, व वृष्टिजल यांची शुद्धि करून सर्वांस सुख होईल असें करणें, ( अतिथय: ) उपदेश करण्याकरितां फिरणारे पूर्णविद्वान व धर्मात्मे यांची सेवा करून, सत्याचें शोधन करून संशय दूर करणें, ( मानुषम् ) मनुष्यसंबंधीं राज्यादि व्यवहार यथायोग्य करणें, ( प्रजा ) धर्मानें संतानोत्पत्ति करून तिला धर्म व विद्या यांचें उत्तम शिक्षण देणें, ( प्रजन: ) वीर्याची वृद्धि करून ऋतुकालींच वीर्यदान करणें, ( प्रजाति: ) गर्भाची व्यवस्था, जन्मानंतर बालसंगोपन व नंतर त्याचें शरीर व बुद्धि यांची पूर्ण वाढ होईल असें करणें; इत्यादि धार्मिक गुण जाणून त्यांचें आचरण यथायोग्य करावें. ( सत्यम् )

सत्यभाषण हें मनुष्यांचें मुख्य कर्तव्य आहे असें सत्यप्रिय राथीतर ऋषींचें मत आहे. ( तपः ) सत्यविद्याध्ययन व धर्मानुष्ठान करणें हें पौरुशिष्टी आचार्यांच्या मतें मुख्य आहे. ( स्वाध्याय० ) वेद शिकणें व शिकविणें हें नाकोमौद्गल्याच्यामतानें मुख्य कर्तव्य आहे. ( तद्धितपः ) हें वर सांगितलेलेंच खरें तप आहे.

**वेदमनूच्याचार्योऽन्तेवासिनमनुशास्ति । सत्यं वद । धर्मं चर । स्वाध्यायान्मा प्रमदः । आचार्याय प्रियं धनमाहृत्य प्रजातन्तुं मा व्यवच्छेत्सीः । सत्यान्न प्रमदितव्यम् । धर्मान्न प्र० । कुशलान्न प्र० । भूत्यै न प्र० । स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्र० । देवपितृकार्याभ्यां न प्रम० । मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव । यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि नो इतराणि । यान्यस्माक ँ सुचरितानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि ॥ २ ॥**

तै० आर० प्र० ७।१०॥

**अर्थ**—( वेदम० ) आचार्य शिष्याला वेद शिकवून धर्माचा उपदेश पुढें दिल्याप्रमाणें करतात. ( सत्यंवद ) खरें बोल, ( धर्मं० ) धर्माचें आचरण कर, (स्वाध्या०) वेदाध्ययन सोडूं नको, ( आचार्याय० ) तुझ्या गुरूला इष्ट पदार्थ देऊन संतुष्ट कर व ( प्रजातन्तु ) संतान परंपरेचा नाश करूं नको—अर्थात योग्यकालीं विवाह करून **उत्तम संतान** उत्पन्न कर, ( सत्या० ) सत्याचरण सोडूं नको, ( धर्मा० ) धर्म सोडूं नको, ( कुशला० ) आपलें कुशल राखण्याची खबरदारी घे, ( भूत्यै० ) भरभराट होईल असें कर, ( स्वाध्याय० ) वेद शिकून लोकांस शिकव, ( देवपितृ० ) विद्वान व वाडवडील यांच्या संबंधाचीं सर्व कृत्यें जपून कर, त्यांत चुका करूं नकोस, ( मातृ० ) माता, पिता, आचार्य व अतिथि यांची सेवा कर, ( यान्यनव० ) जीं उत्तम कृत्यें आहेत तीं सदैव करावीं पण इतर वाईट कृत्यें कधींहि करूं नयेत. ( यान्यस्माकं० ) जे आमच्यांत सदाचार आहेत त्यांचेंच अनुकरण तूं करावेंस व आमच्यांत जें जें कांहीं वाईट असेल त्याचें तूं कधींहि अनुकरण करूं नयेस.

**येके चास्मच्छ्रेया ँसो ब्राह्मणाः । तेषां त्वयासनेन प्रश्वसितव्यम् । श्रद्धया देयम् । अश्रद्धया देयम् ।**

श्रिया देयम् । ह्रिया देयम् । भिया देयम् । संविदा देयम् । अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात् । ये तत्र ब्राह्मणाः सम्मर्शिनः । युक्ता आयुक्ताः । अलूक्षा धर्मकामाः स्युः । यथा ते तत्र वर्तेरन् तथा तत्र वर्तेथाः । अथाभ्याख्यातेषु ये तत्र ब्राह्मणाः सम्मर्शिनः । युक्ता आयुक्ता अलूक्षा धर्मकामास्युः । यथा ते तेषु वर्तेरन् । तथा तेषु वर्तेथाः । एष आदेशः । एष उपदेशः । एषा वेदोपनिषत् । एतदनुशासनम् । एवमुपासितव्यम् । एवमु चैतदुपास्यम् ।
तै. आर. प्र. ७।११॥

अर्थ—( येके चा० ) जे आमच्यामध्यें विद्वान व ब्रह्मज्ञ असतील त्यांचा संग तूं कर व त्यांच्याच शब्दावर विश्वास ठेव. ( श्रद्ध० ) प्रीति, अप्रीति, संपत्ति, लज्जा, भय किंवा प्रतिज्ञा यांपैकीं कोणत्याहि कारणांनीं मनुष्यांनीं वियादि पदार्थांचें दान सदैव करीत असावें. अर्थात प्रतिग्रहापेक्षां दान श्रेष्ठ आहे. ( अथ यदि० ) ज्या वेळीं तुला कर्तव्यकर्म किंवा धर्म्य आचरण यांविषयीं संशय उत्पन्न होईल त्यावेळीं जे तेथें विद्वान, पक्षपातरहित, योगी, ब्रह्मज्ञानी, धार्मिक व पापाचरण न करणारे असे ब्राह्मण असतील त्यांना आपली शंका विचार किंवा ( यथा ते० ) त्या कृत्यांविषयीं जसें ते आचरण करीत असतील तसें तूं आचरण करीत जा. हीच आज्ञा, हाच उपदेश, हीच वेदोपनिषत् ( वेद ज्ञान ), याप्रमाणें तुम्ही वागावें. असें आचरण करूनच श्रद्धायुक्त अंतःकरणानें सच्चिदानंदलक्षण ब्रह्माची उपासना करावी.

### तपाचें लक्षण.

ऋतं तपः सत्यं तपः श्रुतं तपः शान्तं तपोदमस्तपः शमस्तपो दानं तपो यज्ञस्तपो भूर्भुवः सुवर्ब्रह्मैतदुपास्वैतत्तपः ॥
तैत्ति० आर० १०।८ ॥

अर्थ—( ऋतं ) ब्रह्माची उपासना, ( सत्यं ) सत्यभाषण व सत्याचरण, ( श्रुतं ) विद्या ऐकणें व सांगणें, ( शान्तं ) मनाला अधर्मापासून आंवरून धर्मामध्यें त्याला गढवून टाकल्यापासून जी शांति उत्पन्न होते ती, ( दमः ) इंद्रियांना अधर्मा-

पासून दूर करून धर्माच्या बाजूला वळवणें, ( शमः ) मनोनिग्रह करून अधर्माचे विषय मनांतहि येऊं न देणें, ( दान ) विद्यादि पदार्थांचें दान, ( यज्ञ ) पूर्वोक्त हवनीय पदार्थांचा यज्ञ करणें हें सर्व तप आहे; तसेंच ( भू० ) सर्व लोकव्यापक ब्रह्माची उपासना करणें हेंहि एक उत्तम तप आहे. म्हणून त्या ब्रह्माची उपासना तूं कर.

**सत्यं परं पर ꣳ सत्य ꣳ सत्येन न सुवर्गाल्लोकाच्च्यवन्ते कदाचन सता ꣳ हि सत्यं तस्मात्सत्ये रमन्ते ॥ तप इति तपो नानशनात्परं यद्धि परं तपस्तद्दुर्धर्षं तद्दुराधर्षं तस्मा-तपसि० ॥ दम इति नियतं ब्रह्मचारिणस्तस्माद्दमे० ॥ शम इत्यरण्ये मुनयस्तस्माच्छमे० ॥ दान इति सर्वाणि भूतानि प्रश ꣳ सन्ति दानान्नाति दुष्करं तस्माद्दाने० ॥ धर्म इति धर्मेण सर्वमिदं परिगृहीतं धर्मान्नातिदुश्चरं तस्मा द्धर्मे० ॥ प्रजन इति भूया ꣳ सस्तस्माभूयिष्ठाः प्रजायन्ते तस्माद्भूयिष्ठाः प्रजनने० ॥ अग्नय इत्याह तस्मादग्नय आधातव्याः । अग्निहोत्रमित्याह तस्मादग्निहोत्रे० ॥ यज्ञ इति यज्ञेन हि देवा दिवं गतास्तस्माद्यज्ञे० ॥ मानसमिति विद्वा ꣳ स स्तस्माद्विद्वा ꣳ स एव मानसे रमन्ते ॥न्यास इति ब्रह्माब्रह्मा हि परः परो हि ब्रह्मा तानि वा एतान्यवराणि तपा ꣳ सि न्यास एवात्यरेचयत् । य एवं वेदेत्युपनि षद् ॥ १ ॥ तै० आ० प्र० १०।६२ ॥**

**अर्थ**—( सत्यं० ) सत्य हेंच खरोखर श्रेष्ठ आहे. सत्याचें पालन करीत असतां सुखस्थिति नाहींशी होत नाहीं. सत्पुरुषांचें सत्पुरुषपण सत्यानेंच राहतें; म्हणून मनुष्यांनीं सत्यामध्येंच रममाण व्हावें. ( तप० ) दुसऱ्याच्या पदार्थांचा अपहार न करणें हें मोठें तप आहे. तप जरी कठीण आहे तथापि सर्वांनीं तें करावें. सत्पुरुष तपामध्यें रममाण होतात. ( दम० ) जितें-द्रिय राहिल्यानेंच ब्रह्मचर्य पूर्णपणें राहून सर्व विद्यांचा अभ्यास पूर्ण होऊं शकतो. म्हणून सर्वांनीं इंद्रियें आपल्या ताब्यांत ठेवावीं. ( शम० ) मनाचा चंचलपणा घाल-

विण्यानेंच मनुष्य गहन विषयाचें मनन करण्यास समर्थ होतो. या शमाच्या योगानेंच अरण्यांत आश्रम बांधून राहणारे मुनी थोर योग्यतेस चढतात. म्हणून सर्वांनीं शमाचें अवलंबन करावें. ( दान० ) दानाची सर्व स्तुति करतात. दान योग्य रीतीनें करणें हें फार कठीण आहे. दान सर्वांनीं करावें. ( धर्म० ) धर्माचरण सर्वांत मुख्य आहे. धर्मानेंच सर्व कांहीं व्यवस्थित चालतें. धर्माचरण करणें फार कठीण आहे. सत्पुरुष धर्माचरण करण्यांत समाधान मानतात. ( प्रजन० ) प्रजांची वृद्धि होण्यासाठीं, वीर्यवान बनून ऋतुकालीं वीर्यदान करावें. ( अग्न० ) तीन वेद व अग्नि यांच्या सहाय्यानें सर्व विद्या व सर्व कला साध्य कराव्या. ( अग्निहोत्र० ) हवन करून वायुशुद्धीद्वारा सर्वांवर उपकार करावा. ( मानस० ) विचार करणारे विद्वान होतात, म्हणून विद्वान लोक विचार—मनन—करीत असतात; तसा सर्वांनीं विचार करावा. ( न्यास० ) विद्या शिकून ब्रह्मज्ञान मिळवावें व संन्यासाश्रम धारण करून धर्म व विद्या यांचा लाभ सर्वांस करून द्यावा हा मुख्य धर्म आहे तो सर्वांनीं करावा. याप्रमाणें धर्म आहे असें सर्वांनीं जाणावें. तसेंच—

प्राजापत्यो हारुणिः सुपर्णेयः प्रजापतिं पितरमुपससार किं भगवन्तः परमं वदन्तीति । तस्मै प्रोवाच । सत्येन वायुरावाति सत्येनादित्यो रोचते दिवि सत्यं वाचः प्रतिष्ठा सत्ये सर्वं प्रतिष्ठितं तस्मात्सत्यं परमं वदन्ति । तपसा देवा देवतामग्र आयन् तपसर्षयः सुवरन्वविन्दन् तपसा सपत्नान्प्रणुदामारातीस्तपसि सर्वं प्रतिष्ठितं तस्मात्तपः प० । दमेन दान्ताः किल्बिषमवधून्वन्ति दमेन ब्रह्मचारिणः सुवरगच्छन् दमो भूतानां दुराधर्षं दमे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्दमं प० । शमेन शान्ताः शिवमाचरन्ति शमेन नाकं मुनयोऽन्वविन्दञ्छमो भूतानां दुराधर्षं शमे सर्वं प्रतिष्ठितं तस्माच्छमं प० । दानं यज्ञानां वरूथं दक्षिणा लोके दातारꣳ सर्वभूतान्युपजीवन्ति दानेनारातीरपानुदन्त दानेन द्विषन्तो मित्रा भवन्ति दाने सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्दानं प० । धर्मो वि-

भस्य जगतः प्रतिष्ठा लोके धर्मिष्ठं प्रजा उपसर्पन्ति धर्मेण पापमपनुदन्ति धर्मे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्धर्मं प० । प्रजननं वै प्रतिष्ठा लोके साधु प्रजायास्तन्तुं तन्वानः पितॄणामनृणो भवति तदेव तस्य अनृणं तस्मात्प्रजनं प० । अग्नयो वै त्रयीविद्या देवयानः पन्था गार्हपत्य ऋक् पृथिवी रथन्तरमन्वाहार्य पचनो यजुरन्तरिक्षं वामदेव्यमाहवनीयः साम सुवर्गो लोको बृहत्तस्मादग्नीन्प० । अग्निहोत्र ॅं सायं प्रातर्गृहाणां निष्कृतिः स्विष्ट ॅं सुहुतं यज्ञ क्रतूनां प्रापण ॅं सुवर्गस्य लोकस्य ज्योतिस्तस्मादग्निहोत्रं प० । यज्ञ इति यज्ञेन हि देवा दिवंगता यज्ञेनासुरानपानुदन्त यज्ञेन द्विषन्तो मित्रा भवन्ति यज्ञे सर्वं प्रतिष्ठितं तस्माद्यज्ञं प० । मानसं वै प्राजापत्यं पवित्रं मानसेन मनसा साधु पश्यति मानसा ऋषय[1]ः प्रजा असृजन्त मानसे प्रतिष्ठितं तस्मान्मानसं परमं वदन्ति ॥

तैत्तिरीयारण्यक प्रपा० १० अनु० ६३ ॥

अर्थ—प्राजापत्य आरुणि सुपर्णेयानें आपल्या पित्याला विचारलें कीं, सर्वांत उत्तम व सर्वांत मोठें काय आहे? त्याला तो म्हणाला, (सत्येन०) सत्यस्वरूप ब्रह्म सर्वांत मुख्य आहे. त्याच्याच सत्तेनें वारा वाहतो, सूर्य प्रकाशतो, सर्वांचें अस्तित्व त्यावरच अवलंबून आहे, त्याच्या आधारानें सर्व विश्व आहे, म्हणून त्याला मुख्य असें म्हणतात. (तपसा०) पूर्वोक्त तपाचें आचरण करूनच विद्वान लोकांनीं परमेश्वरप्राप्ति करून घेतली; मंत्रद्रष्टे ऋषि तप करून मुक्त झाले; तपानें कामक्रोधादिक असुरांना जिंकितां येतें; तपाच्या योगानें धर्माचरण करतां येतें म्हणून तप मुख्य आहे. (दमेन०) इंद्रियांचें दमन करणारे पापांपासून दूर असतात, त्यांच्याचकडून पूर्ण ब्रह्मचर्य पाळलें जातें व त्यांनाच विद्या साध्य होते, आणि तेच लोक सुख भोगतात. इंद्रियदमन जरी फार कठीण आहे तथापि त्याच्या सहाय्यानें सर्व उत्तम

(१) मानस ऋषि म्ह० प्राण व विज्ञान.

फळें सिद्ध होतात म्हणून तप मुख्य आहे. ( शमेन० ) मनाचें शमन-मनाच्या चंचलतेचें दूरीकरण करणारे लोक उत्तम आचरणच करतात, मानसिक स्थैर्यानेंच मुनींना सुख मिळतें. हें फार कठीण आहे, तथापि याच्याच आधारानें सर्व सुखें असल्यामुळें हें मुख्य मानलें जातें. ( दानं० ) दान हें यज्ञांतील मुख्य अंग आहे. दान करणाऱ्याच्या आश्रयानें इतरांचें जीवन होतें. दानानें शत्रूंचा पराजय होतो व शत्रू मित्र बनतात. तात्पर्य दान हें मुख्य आहे. ( धर्मो० ) धर्म हा सर्व जगाचा आधार आहे. धार्मिकावर सर्व विश्वास ठेवतात. धर्माचरणानें पाप नाहींसें होतें म्हणून धर्म हा मुख्य आहे. ( प्रजननं० ) उत्तम प्रजा उत्पन्न केल्यानें पितृऋणापासून सुटका होते, म्हणून वीर्यवान् व विद्वान संतान उत्पन्न करणें हा मुख्य धर्म आहे. ( अग्नय: ) तीन वेद हे तीन अग्नि आहेत. यांच्या सांगोपांग अध्ययनानें पृथ्वि व आकाश यांतील सर्व विद्या सिद्ध होतात. म्हणून तीन वेद मुख्य आहेत (अग्निहो०) सकाळ संध्याकाळ अग्निहोत्र करण्यानें, त्यांत पूर्वोक्त सुगंधादि पदार्थांचें हवन होत असल्यामुळें-वृष्टिवायू वगैरे शुद्ध होऊन सर्वांना सुख होतें म्हणून अग्निहोत्र मुख्य आहे. ( यज्ञ० ) यज्ञ करून विद्वानांनीं सुख मिळविलें, यज्ञानेंच शत्रूंचा पराभव होतो, शत्रू असलेच तर यज्ञानें मित्र होतात, यज्ञापासून सर्व प्रकारचीं सुखें प्राप्त होतात म्हणून यज्ञ मुख्य आहे. ( मानसं० ) विद्वान लोक मन शुद्ध करून पवित्र अशा परमेश्वराला पाहतात. मन शुद्ध झाल्यानेंच पवित्र ज्ञानहि प्राप्त होतें. ज्ञानानेंच प्रजांची उन्नति होते. मनाच्या आधारानेंच सर्व कांहीं आहे म्हणून मन श्रेष्ठ आहे. अर्थात मनावर उत्तम विद्येचे संस्कार करणें हा परमधर्म आहे. या धर्माचें पालन मनुष्यांनीं करावें.

**सत्येन लभ्यस्तपसा ह्येष आत्मा सम्यङ्‌ ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम्‌ ॥ अन्तः शरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो यं पश्यन्ति यतयः क्षीणदोषाः ॥ १ ॥ सत्यमेव जयते नानृतं सत्येन पन्था विततो देवयानः ॥ येनाक्रमन्त्यृषयो ह्याप्तकामाः यत्र तत्सत्यस्य परमं निधानम्‌ ॥ २ ॥**

**मुंडकोपनि० ३।१ मं० ५।६॥**

अर्थ—( शरीरे० ) शरीराच्या आंत शुभ्र ज्योतिर्मय असा परमेश्वर आहे. त्याला शुद्ध अंत:करणाचे यति लोक पाहूं शकतात. ( सत्येन ) सत्य धर्माचरणरूप तपानें व उत्तम ब्रह्मचर्य पालनानें या परमेश्वराची प्राप्ति होते. ( सत्य० ) सत्य धर्माचरणानेंच मनुष्याचा जयजयकार होतो, तसा असत्याचरणानें होत नाहीं. त्याचप्रमाणें

( सत्येन ) सत्य धर्मानेंच ( देवयानःपंथा ) ज्ञानी लोकांना प्राप्त होण्यास योग्य असा आनंदमय मोक्ष मार्ग ( विततः ) स्पष्ट दिसतो. ( येन ) सत्यधर्मानुष्ठानानें प्रकाशित होणाऱ्या याच मार्गानें ( आप्तकामा ऋषयः ) परमात्म्याची इच्छा करणारे नित्य संतुष्ट असलेले महात्मे ( आक्रमन्ति ) जातात, ( सत्यस्य० ) सत्याचें परम आश्रय स्थान जें ब्रह्म, त्याप्रत प्राप्त होऊन मोक्षानंद भोगतात म्हणून सत्यधर्माचें अनुष्ठान व अधर्माचा त्याग सर्वांनीं करावा. तसेंच.

**चोदना लक्षणोऽर्थोधर्मः ॥ १ ॥ पूर्व मीमांसा १।१।२॥**

**यतोऽभ्युदयनिश्रेयससिद्धिः स धर्मः ॥ वैशेषिक १।१।२॥**

**अर्थ**—( चोदना० ) वेदद्वारा सत्यधर्माची जी प्रेरणा होते तोच धर्म होय. अनर्थकारक अशा अधर्माहून जो निराळा आहे तोच अर्थ धर्माच्या अंतर्भूत होतो असें जाणावें. परमेश्वरानें ज्याचा वेदामध्यें निषेध केला आहे तो अधर्म आहे असें जाणून सर्वांनीं त्याचा त्याग करावा. ( यतो० ) ज्याच्या आचरणानें ( अभ्युदय ) ऐहिक सांसारिक सर्व सुखांची प्राप्ति होते व ( निःश्रेयस ) ज्यानें पारमार्थिक मोक्षसुखहि मिळतें तो धर्म होय. याहून इतर सर्व अधर्म आहेत असें जाणावें.

याप्रमाणें वेदामध्यें परमेश्वरानें धर्माचा उपदेश केला आहे. दर्शनें व उपनिषदें वेदाचाच भावार्थ सांगत असल्यामुळें वेदानुकूल मतें जीं या ग्रंथांत आहेत तो वेदोपदेशच आहे असें मानण्यास मुळींच हरकत नाहीं. हा ईश्वरोपदिष्ट धर्म सर्व मनुष्यांचा एकच आहे, याहून दुसरा खरा धर्म असा कोणताच नाहीं म्हणून सर्व मनुष्यांनीं वैदिक धर्मांप्रमाणें आपलें आचरण ठेवून ऐहिक व परमार्थिक सुखें मिळवावीं.

---

## सृष्टीच्या उत्पत्तीविषयीं माहिती.

**नासदासीन्नोसदासीत्तदानीं नासीद्रजो नो व्योमा परोयत् ॥ किमावरीवः कुहकस्य शर्मन्नम्भः किमासीद्गहनं गभीरम् ॥ १ ॥ न मृत्युरासीदमृतं न तर्हि न रात्र्या अह्न आसीत्प्रकेतः ॥ आनीदवातं स्वधया त-**

देकं तस्माद्धान्यन्नपरः किंच नास ॥ २ ॥
तम आसीत्तमसा गूढमग्रेऽप्रकेतं सलिलं
सर्वमा इदम् ॥ तुच्छ्येनाभ्वपिहितं यदा-
सीत्तपसस्तन्महिना जायतैकम् ॥ ३ ॥
कामस्तदग्रे समवर्त्तताधि मनसो रेतः प्र-
थमं यदासीत् ॥ सतो बन्धुमसति निरविं-
न्दन्हृदि प्रतीष्या कवयो मनीषा ॥ ४ ॥
तिरश्चीनो विततो रश्मिरेषामधः स्वि-
दासी३दुपरि स्विदासी३त् ॥ रेतोधा आस-
न्महिमान आसन्त्स्वधा अवस्तात्प्रयतिः
परस्तात् ॥ ५ ॥ को अद्धा वेद क इह
प्रवोचत्कुत आजाता कुत इयं विसृष्टिः ॥
अर्वाग्देवा अस्य विसर्जनेनाथा को वेद
यत आबभूव ॥ ६ ॥ इयं विसृष्टिर्यत आ-
बभूव यदि वा दधे यदि वा न ॥ यो अ-
स्याध्यक्षः परमे व्योमन्त्सो अङ्ग वेद
यदि वा न वेद ॥ ७ ॥

ऋ० अ० ८ अ० ७ व० १७ ॥

भावार्थ—हें जें जग दिसत आहे, तें परमेश्वरानें केलें आहे. त्याचें तो संरक्षण करून प्रलयकालीं त्याचा नाश करतो. याप्रमाणें पुनः पुनः तो करतो. ही सृष्टि

उत्पन्न होण्याच्या पूर्वी ( असत् ) शून्य आकाशहि ( न आसीत् ) नव्हतें. म्हणजे त्याचा व्यवहार नव्हता. ( तदानीम् ) सृष्टीच्या पूर्वी ( सत् ) प्रकृत्यात्मक अव्यक्त असें जें ह्या सृष्टीचें सत् संज्ञक प्रधान कारण, तेंहि ( नो आसीत् ) नव्हतें. त्रिगुणात्मक प्रकृतीलाच प्रधान ही संज्ञा आहे. ( रजः ) रेंजपरमाणूसुद्धां ( न आसीत् ) नव्हते. ( व्योम ) स्थूल जगताचें रहाण्याचें स्थान जें आकाश तेंहि नव्हतें. पण परब्रह्माचें जणूं काय सामर्थ्यच असें जें सूक्ष्म व सर्वांचें आदिकारण ज्याला "परमकारण, महाकारण" असें म्हणतात. तें मात्र होतें. ज्याप्रमाणें ( कुहकस्य ) दंव पडतो, त्याचें ( अम्भः ) पाणी अति अल्प असल्यामुळें पृथिवीला ( आवरीवः किं? ) आच्छादूं शकेल काय? नाहीं, किंवा त्या पाण्यानें नदीला पूर येऊं शकेल काय? नाहीं. अर्थात तें दंवाचें पाणी ( गहनं, गभीरं किं? ) गहन किंवा गंभीर, आहे काय? नाहीं. त्याचप्रमाणें हें जग त्या ( शर्म्मन् ) शुद्ध व कल्याणकारक ब्रह्माच्या मानानें अल्प असल्यामुळें त्या ब्रह्माला ( किं आवरीवः? ) आवरण घालण्यास कसें समर्थ होईल? अर्थात समर्थ होणार नाहीं. ॥ १ ॥ ( तर्हि ) त्यावेळीं ( न मृत्युरासीदमृतम् ) मृत्यु व जीवन हीं नव्हतीं. ( न रात्र्या अह्न आसीत्प्रकेतः ) रात्र व दिवस ह्यांचाहि व्यवहार नव्हता. तर त्या वेळेस काय होतें? ( तत् एकम् ) तें एक ( अवातम् ) निश्चल परब्रह्म ( स्वधया आनीत् ) स्वधेसहित-स्वतः धारणकेलेल्या सामर्थ्यासहित जागृत होतें. ( तस्माद्धान्यन्नपरः ) त्या स्वधेसहित ब्रह्माच्या अतिरिक्त ( किञ्च नास ) दुसरें कांहींहि नव्हतें. ॥ २ ॥ ( इदम् ) हें जगत् ( अग्रे ) उत्पत्तीच्यापूर्वी ( तम आसीत् ) अन्धःकारानें आवृत असें होतें. ( तमसागूढम् ) त्यांत गतीचा अभाव असल्यामुळें तें जाणलें जाण्यास अयोग्य ( अप्रकेतं सलिलम् ) व्यवहारशून्य आकाशवत् होतें. ( तुच्छयेनाभ्वपि० ) हें परमेश्वरानें आपल्या सामर्थ्यानें कारणस्थितींतून कार्यरूपाला आणलें. त्याला महत्तत्व ही संज्ञा आहे. ज्याच्या सत्तेखालीं हें सर्व एकदेशी आच्छादित होतें त्या अनंत सामर्थ्यवान् परमेश्वरानें हें व्यवहारांत आणणें हें सहज करण्यासारखें काम होतें ॥ ३ ॥ ( तदग्रे कामः समवर्त्तत ) महत्तत्वाच्या उत्पत्तीनंतर व स्थूल मन इन्द्रियांच्या उत्पत्तीच्या पूर्वी काम—अहंकार उत्पन्न होत असतो. ह्याला त्रिगुणात्मक मन असेंहि म्हणतात. ( मनसो रेतः प्रथमं यत् अधि आसीत् ) ह्या मनाचें बीज पूर्वीचें असतें म्हणजे जगदुत्पत्तीचें बीजकारण, पूर्व कल्पांतील प्राण्यांचीं कर्में हेंच असतें.

---

१ पिण्ड बनविण्याच्या योग्यतेला आलेले परमाणू. २ संयोग वियोग सत्तारूप सत् व संसारबंधनांत टाकणाऱ्या कर्मसंस्कारांनीं युक्त असे जीव ही परमेश्वराची स्वधा होय. हेंहि त्याचें सामर्थ्य किंवा ऐश्वर्य आहे.

त्या कर्मांचा भोग देण्याकरितां परमात्मा पुन: सृष्टीची रचना करीत असतो. (कवय:) विद्वानलोक ( मनीषा ) बुद्धीनें ( हृदि प्रतीष्य ) हृदयामध्यें विचार करून ( असति ) अप्रतीयमान अवस्थेचें—जगताच्या मूळकारण अवस्थेचें—ज्ञान प्राप्त करून घेऊन ( सत: ) प्रतीयमान जगताचीं (बन्धुम् ) सहायक-जगताच्या बन्धनांत आणणारीं अशीं जीं कर्मे असतात त्यांना ( निरविन्दन् ) जाणतात व बन्धमुक्त होतात. ॥४॥ ह्या संपूर्ण सृष्टीचा प्रलय झाल्यावर (अध: स्विदासीत् उपरि स्विदासीत्) सर्वत्र खालींवर काय होतें ? ह्या प्रश्नाचें उत्तर ह्याच मंत्रांत पुढें दिलें आहे. ( एषाम् ) जगांतील ह्या सर्व सूक्ष्म व स्थूल पदार्थांचा ( रश्मि[१]: ) समूह ( तिरश्चीन: ) आपल्या कारणरूपांत अंतर्हित होऊन ( वितत: ) सर्वत्र खालींवर पसरलेला होता. ( रेतोधा[२]: ) आपल्या कर्मरूप बीजासहित असंख्य जीव सर्वत्र खालींवर ( आसन् ) होते. ( महिमान: ) कर्मरूप बीजाचा नाश करून मुक्त झालेले महात्मेहि ( आसन् ) होते. सदैव ईश्वराच्या आधीन असल्यामुळें ( अवस्तात् ) स्त्रीवत् गौणकोटींत असणारी ( स्वधा[३] ) निमित्त-कारण परमात्म्यावांचून स्वत:च कार्यरूप होण्याला असमर्थ स्वधाप्रकृति खालींवर होती आणि ( परस्तात् ) वर सांगितलेल्या सर्व पदार्थांचा स्वामी ( प्रयति: ) आपल्या आश्रित असणाऱ्या प्रकृतीच्या आधीन न होऊन तिला नियमांत ठेवणारा परमात्मा सर्वत्र खालीं वर होता. ह्या मंत्रांत अनादिकालापासून चालत आलेल्या जीव, परमात्मा आणि प्रकृति ह्या तिहींची प्रलयकालीं देखील विद्यमानता दाखविली आहे. ॥ ५ ॥ ( कुत: इयं विसृष्टि: आजाता ) कोणापासून ही विविध सृष्टि उत्पन्न झाली हें ( इह ) ह्या जगांत ( क: अद्धा वेद ) तत्वत: कोण जाणतो व ( क: प्रवोचत् ) कोण सांगूं शकतो ? हें विद्वान लोक सांगूं शकतील असें जर कोणी म्हणेल तर ( अस्य विसर्जनेन देवा: अर्वाक् ) ही सृष्टि उत्पन्न झाल्यानंतर देव म्हणजे विद्वान लोक उत्पन्न झाले आहेत तर मग ते आपल्या जन्माच्या पूर्वीची हकीकत कसे सांगूं शकतील ! (अथ) तर मग हें ( क: वेद ) कोण जाणतो ? ह्याचें उत्तर ( यत: आबभूव ) ज्या निमित्त-कारण परमात्म्यापासून ही सृष्टि झाली तोच जाणतो. ॥ ६ ॥ ( इयं ) ही प्रत्यक्ष दिसणारी ( विसृष्टि: ) विविध प्रकारची सृष्टि ( यत: ) ज्या परमेश्वरापासून उत्पन्न झाली आहे ( यदि वा दधे ) तो परमेश्वर हिला धारण करतो ( यदिवान ) कीं नाहीं ? ( य: ) तो ( अस्य ) या सर्व विश्वाचा ( अध्यक्ष ) स्वामी आहे. ( परमे ) ही सृष्टि त्या परमात्म्यामध्यें ( व्योमन् ) आकाशाप्रमाणें व्यापून असणाऱ्या परमेश्वरा-मध्येंच राहत आहे. प्रलयकालीं ही सृष्टि परमेश्वरांतच लीन होते. ( अङ्ग ) हे जीव,

---

१ अशूङ् व्याप्तौ सङ्घाते चेत्यस्माद्धातोर्मि प्रत्यय: रशादेशश्च. २ रेत: कर्मरूपं बीजं दधति ते रेतोधा: जीवा: ३ स्वयमीश्वरो दधातीति वा स्वभात्मानमीश्वरेण धापयतीति स्वधा.

( वेद ) जर तूं त्या परमेश्वराला जाणलेंस तरच तुला परम आनंद प्राप्त होईल पण ( यदि ) जर तूं त्याला ( नवेद ) जाणलें नाहींस तर तुला परमसुखाची प्राप्ति होणार नाहीं.

**हिरण्यगर्भः समवर्त्तताग्रे भूतस्य जातः पतिरेक आसीत् ॥ सदाधार पृथिवीं द्यामुतेमां कस्मै देवाय हविषा विधेम ॥१॥**

ऋ० ८।७।३ मं० १ ॥

**अर्थ**—( अग्रे ) सृष्टीच्या पूर्वीहि ( हिरण्यगर्भः ) परमेश्वर हा (जातस्य भूतस्य) या उत्पन्न झालेल्या सर्व सृष्टीचा ( एकः पतिः ) एकच स्वामी ( समवर्तत ) होता. अर्थात त्याच्याशिवाय दुसरें कांहीं नव्हतें, प्रलय पावलेली सृष्टि त्याच्यांतच लीन होती. ( सः ) त्याणें ( इमां पृथिवीं उत द्याम् ) या पृथ्वीला व या प्रकाशमय द्युलोकाला रचून ( दाधार ) धरलें आहे. अर्थात आपल्या आधारानें या विश्वाचें धारण केलें आहे. त्या ( कस्मै ) सुखस्वरूप ( देवाय ) परमेश्वराची आम्ही ( हविषा विधेम ) उपासना करतों.

पुरुषसूक्त व त्यांतील सृष्टीच्या उत्पत्तीचें वर्णन. ( यजु० अ० ३१ )

**सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् ॥ सभूमिं सर्वतस्पृत्वाऽत्यतिष्ठद्दशाङ्गुलम् ॥१॥**

**अर्थ**—या मंत्रांत " पुरुष " हें विशेष्य असून " सहस्रशीर्षा " इत्यादि शब्द विशेषणें आहेत. " पुरुष " शब्दाचा अर्थ खालीं दिल्याप्रमाणें निरुक्तांत आहे. " **पुरुषं पुरिशय इत्याचक्षीरन्** ॥ निरु० अ० १ खं० १३ ॥" तसेंच " **पुरुषः पुरिषादः पुरिशयः पूरयतेर्वापूरयत्यन्तरित्यन्तरपुरुषमभिप्रेत्य यस्मात्परं नापरमस्ति किंचिद्यस्मान्नाणीयो न ज्यायोस्ति किंचित् । वृक्ष इव स्तब्धो दिवि तिष्ठत्येकस्तेनेदं पूर्णं पुरिषेण सर्वमित्यपि निगमो भवति** ॥ निरु० २।३ ॥" यांचा अर्थ-( पुरि ) संसारामध्यें अर्थात या सर्व विश्वामध्यें ( शयः ) निजणारा अर्थात व्यापणारा तो पुरीशय किंवा पुरुष होय. अर्थात " पुरुष " शब्दाचा

( १ ) " क " म्हणजे सुख. त्या " क " शब्दाची " कस्मै " ही चतुर्थी आहे.

अर्थ "विश्वव्यापक परमेश्वर" असा होतो. तसेंच ( पुरि पादः ) सर्व जगांत व्यापून आणखींहि जो शिल्लक राहिला आहे, ( पूरयते: ) परमेश्वर सर्व जगांत भरून उरतो म्हणून त्यास पुरुष असें म्हणतात. ( अन्तर ) जीवाच्या आंतहि जो भरला आहे त्या सर्वान्तर्यामी पुरुषाविषयीं "यस्मात्परं" ही ऋचा आहे. ( यस्मात् ) या परात्पर पुरुषाहून ( परं न ) मोठें किंवा पुराण असें कांहीं नाहीं किंवा ( अपरम् ) अर्वाचीन असेंहि कांहीं नाहीं. ( अणीयः ) परमेश्वरापेक्षां सूक्ष्म किंवा ( ज्यायः ) मोठें असें कांहीं नाहीं. ( वृक्ष इव ) ज्याप्रमाणें शाखा, पत्र, पुष्प, फल वगैरेंना धारण करूनहि वृक्ष स्तब्ध असतो त्याप्रमाणें हा सूर्यचंद्रादिक सर्व लोकांना धारण करूनहि ( दिवि तिष्ठति ) आकाशामध्यें भरून राहिला आहे. ( पुरुषेण ) या अद्वितीय पुरुषानें ( सर्व पूर्ण ) सर्व जग पूर्ण भरलें आहे. हा मंत्र त्या परम पुरुषाबद्दल ( नियमः ) विशेष ज्ञान करून देत आहे." हा "पुरुष" शब्दाचा अर्थ झाला. "सहस्र" शब्दाचा अर्थ शतपथ ब्राह्मणांत पुढें दिल्याप्रमाणें दिला आहे. "**सर्वं वै सहस्र ँ सर्वस्य दातासि** ॥ शतप० ७।५ ॥" सहस्रशब्दानें या संपूर्ण जगताचा व असंख्यपणाचा बोध होतो. ( सहस्रशीर्षा ) मनुष्यादिकांचीं अनंत मस्तकें ज्याच्यामध्ये आहेत; तसेंच ( सहस्राक्षः ) आमचे हजारों डोळे ज्याच्यामध्यें आहेत; त्याचप्रमाणें ( सहस्रपात् ) सर्वांचे असंख्य पाय ज्यामध्यें आहेत असा जो आहे तोच विश्वव्यापक पुरुष होय. ( स ) तो परमात्मा ( भूमिं ) पृथ्वीपासून प्रकृतीपर्यंत सर्वांना ( सर्वतः ) आंतून, बाहेरून, सर्व प्रकारें ( स्पृत्वा ) व्यापून ( दशांगुलम् ) दश अंगुलांनीं मोजण्यासारखें हें अत्यंत अल्प विश्व आहे, त्यांत पूर्णपणें भरून ( अति अतिष्ठत् ) शिल्लक राहिला आहे "दशांगुलं" हा शब्द ब्रह्माण्डाचें उपलक्षण आहे. अंगुल म्हणजे अवयव. दहा अंगुलें हें अल्पार्थ बोधक विधान आहे. परमेश्वराच्या मानानें हें विश्व अत्यंत अल्प आहे. ( १ ) पांच सूक्ष्म भूतें व पांच स्थूल भूतें मिळून जें होतें तें दशांगुलात्मक जगत होय किंवा ( २ ) पांच प्राण, मन, बुद्धि, चित्त, अहंकार व जीव मिळून विश्वाचे दहा मुख्य अवयव होत. किंवा ( ३ ) जीवाचें हृदयाकाश दहा अंगुलें असतें तें दशांगुलानें दाखवलें जातें. याप्रमाणें "दशांगुलं" चे तीन अर्थ होतात. या तीनहि ठिकाणीं परमात्मा व्यापला आहे व बाहेरहि उरला आहे. अर्थात आंत बाहेर सर्वत्र व्यापला आहे.

**पुरु॑ष ए॒वेद ँ॑ सर्वं॒ यद्भू॒तं यच्च॒ भाव्य॑म् ॥**
**उ॒ता॒मृ॑त॒त्वस्ये॑ शा॒नो॒ यदन्ने॑ना॒तिरो॑ह॑ति॥२॥**

**अर्थ**—( यत् भूतम् ) पूर्वकालीं उत्पन्न झालेलें विश्व (यत् भाव्यम्) जें पुढें उत्पन्न होणारें आहे ( च ) व जें सध्यां उत्पन्न झालें आहे ( इदं सर्वं ) या सर्व विश्वांना ( पुरुष एव कृतवान् ) त्या परमेश्वरानेंच उत्पन्न केलें आहे. हें जग त्याच्याशिवाय दुसऱ्या कोणीहि उत्पन्न केलें नाहीं. ( उत ) आणि तो परमेश्वर ( अमृतत्वस्य ) मोक्षाचा ( ईशानः ) स्वामी अर्थात मोक्ष देणारा आहे; त्याच्याशिवाय मोक्ष देण्याचें सामर्थ्य दुसऱ्या कोणांतहि नाहीं. ( यत् ) कारण कीं, तो ( अन्नेन ) पृथिव्यादि सर्व भोग्य जगताहून ( अतिरोहति ) अगदीं निराळा आहे. तो स्वतः अजन्मा असून स्वसामर्थ्यानें सर्व जग उत्पन्न करतो. हाच सर्वांचें आदिनिमित्त कारण आहे. हा कशाहिपासून उत्पन्न झालेला नाहीं.

**एतावानस्य महिमातो ज्यायांश्च पूरुषः ॥**
**पादोऽस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि ॥ ३ ॥**

**अर्थ**—( अस्य ) या परमेश्वराचा ( महिमा ) मोठेपणा म्हणजे ( एतावान् ) हें सर्व भूतभविष्यवर्तमानकालचें विश्वच होय. हें विश्व हें याचें सामर्थ्य आहे हें खरें पण एवढेंच याचें सामर्थ्य व महिमा आहे असें कोणी समजूं नये. त्याचें वास्तविक सामर्थ्य अपरिमित आहे ( अतः ) याहिपेक्षां ( पुरुषः ज्यायांश्च ) त्या परमेश्वराचें सामर्थ्य फारच मोठें आहे. ( अस्य पादः ) या परमेश्वराच्या एका अंशामध्यें ( विश्वा ) सर्व ( भूतानि ) पृथिव्यादि लोक राहिले आहेत. ( अमृतम् ) मोक्षसुख ( अस्य दिवि ) या परमेश्वराच्या प्रकाशात्मक स्वरूपामध्यें पूर्ण भरलें आहे. त्याचप्रमाणें ( दिवि ) द्योतनात्मक जगत्हि ( त्रिपाद् ) त्रिगुणित आहे. प्रकाशित होणारें जग एकपट व प्रकाशित करणारें जग त्याहून तिप्पट अर्थात फार मोठें आहे. स्वतः परमेश्वर मोक्षस्वरूप, सर्वांचा आश्रय, सर्वांचें उपास्य दैवत, सर्वांहून आनंदमय व सर्वांना प्रकाशित करणारा असा आहे.

**त्रिपादूर्ध्व उदैत्पुरुषः पादोऽस्येहाभवत्पुनः ॥**
**ततो विष्वङ् व्यक्रामत्साशनानशने अभि ४**

**अर्थ**—( पुरुषः ) हा परमात्मा ( त्रिपाद् ऊर्ध्वं ) त्रिपादरूपी जगाच्या पलीकडे ( उदैत् ) प्रकाशित होत आहे. सर्व कार्य व कारण सृष्टीहून हा परमेश्वर अगदीं

अलग आहे. ही सर्व सृष्टि त्याच्या आधारानें राहते, त्याच्या सामर्थ्यानें उत्पन्न होते, व प्रलयकालीं त्याच्यांतच लीन होते. अशा रीतीनें तीनहि कालीं या विकारमय सृष्टींत जरी तो व्यापलेला आहे तथापि अविद्या, अंधकार, अज्ञान, जन्म, मरण, ज्वरादि दुःखें त्याला स्पर्श करूं शकत नाहींत. तो सदैव या दुःखांहून अलिप्त असतो. (अस्य) या परमेश्वराच्या स्वरूपाशीं तुलना केली असतां ( इह पुनः पादः ) हें कार्यरूप विश्व तर केवळ अगदीं अल्प-अगदीं लहान ( अभवत् ) आहे असें ठरतें. ( ततः ) याच्या सामर्थ्यानेंच ( विष्वङ् ) हें विविधप्रकारचें जग उत्पन्न झालें आहे. या जगांत मुख्य दोन प्रकार आहेत. ते हे ( साशनानशने ) एक भोजनादिव्यवहार करणारें जंगम जगत् व दुसरें भोजन न करणारें स्थावर जगत्. या दोनहि प्रकारच्या जगाला त्याणें उत्पन्न करून ( अभि ) त्यांमध्यें सर्व ठिकाणीं ( व्यक्रामत् ) तो व्यापला आहे.

**ततो॑ वि॒राड॑जायत वि॒राजो॒ अधि॒ पूरु॑षः ॥**
**स जा॒तो अत्य॑रिच्यत प॒श्चाद्भूमि॒मथो॑**
**पु॒रः ॥ ५ ॥**

अर्थ—( ततः ) त्या परमात्म्याच्या सामर्थ्यानेंच ( विराड् ) विराट्पुरुष-विश्व हेंच ज्याचें शरीर आहे असा-( अजायत ) उत्पन्न झाला. ब्रह्मांड हें शरीर, सूर्यचंद्र हे डोळे, वायु हा प्राण, पृथ्वी ही पाय असा हा विराट्-पुरुष आहे. "विविधैः पदार्थैः राजमानः स विराट्" ज्यामध्यें अनंत पदार्थ शोभत आहेत तो विराट् होय. हा त्या परमेश्वराच्या सामर्थ्यापासूनच उत्पन्न झाला. ( विराजः अधि) हें विराट्रूपी विश्व बनल्यानंतर त्या त्या प्रत्येक गोळावर ( पुरुषः ) जीव राहण्या-जोगीं भिन्न भिन्न शरीरें उत्पन्न झालीं. ( सः जातः ) तो उत्पन्न झालेला विराट् व जीव राहणारें शरीर हें सर्व ( अत्यरिच्यतः ) त्या परमेश्वराहून अगदीं निराळें आहे. ( पुरः ) प्रथमतः त्या परमेश्वरानें ( भूमिं ) पृथ्वी उत्पन्न केली व ( अथो ) नंतर जीवानें निजवर ( *पुरः ) शरीरें धारण केलीं. अर्थात तो परमेश्वर जीवाहूनहि सर्व प्रकारें पृथक् आहे, व त्याच्याच सामर्थ्यानें हें सर्व विश्व सुरळीत चाललें आहे.

**तस्मा॑द्य॒ज्ञात्स॑र्व॒हुत॒ः संभृ॑तं पृषदा॒ज्यम् ॥**
**प॒शूँ॑स्ताँश्च॑क्रे वाय॒व्या॑नार॒ण्या॑ग्रा॒**
**म्या॒श्च॒ ये ॥ ६ ॥**

* पूर्यन्ते सप्तभिर्धातुभिरिति पुरः शरीराणि ।

**अर्थ**—( तस्मात् ) त्या ( सर्वहुतः ) सर्वांनीं पूजा करण्यास योग्य अशा ( यज्ञात्[1] ) सर्वव्यापक परमेश्वराच्या सामर्थ्यानेंच ( पृषद्[2] आज्यं[3] ) अन्न व घृतादि पदार्थ ( संभृतम् ) उत्पन्न झाले. तात्पर्य जगांतील सर्व पदार्थ त्याच्याच सामर्थ्यानें उत्पन्न झालेले आहेत. या उत्पन्न झालेल्या सर्व पदार्थांचा उपयोग हरएक जीवाला प्रत्यहीं होत आहे म्हणून सर्वांनीं त्या परमात्म्याची अनन्यभावानें उपासना करणें योग्य आहे. ( ये ) जे ( आरण्याः ) अरण्यांत राहणारे व ( ग्राम्याः ) गांवांत राहणारे ( पशून् ) पशू आहेत त्यांनां व ( वायव्यान् ) वायूमध्यें संचार करणाऱ्या पक्ष्यांनांहि त्यानेंच ( चक्रे ) उत्पन्न केलें. अर्थात सर्व प्राण्यांनां त्यानें उत्पन्न केलें आहे.

**तस्माद्यज्ञात्सर्वहुत ऋचः सामानि ज-**
**ज्ञिरे॥ छन्दांꣳसि जज्ञिरे तस्माद्यजुस्त-**
**स्मादजायत ॥ ७ ॥**

**अर्थ**—त्या परमेश्वरापासून ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद हे उत्पन्न झाले. ( वेदोत्पत्ति प्रकरण पृष्ठ ४ मध्यें या मंत्राचा स्पष्ट अर्थ दिला आहे. )

**तस्मादश्वा अजायन्त ये के चोभयादतः॥**
**गावो ह जज्ञिरे तस्मात्तस्माज्जाता अजा-**
**वयः ॥ ८ ॥**

**अर्थ**—( तस्मात् ) त्या परमेश्वराच्या सामर्थ्यापासून ( अश्वाः ) घोडे ( अजायन्त ) उत्पन्न झाले. सहाव्या मंत्रांत ग्राम्य व अरण्यपशू उत्पन्न झाले असें सांगितलें त्याचेंच विशेष स्पष्टीकरण या मंत्रांत आहे. घोडे, गाई वगैरे पशूंमध्यें उपयुक्त गुण विशेष असल्यामुळें त्यांचेंच ग्रहण या मंत्रांत केलें आहे. ( ये केच ) आणखी ज्या कोणत्या प्राण्यांनां ( उभया दतः ) दोनहि बाजूंला दांत आहेत असे उंट व गाढव हेहि उत्पन्न झाले. ( गावः ) गाई ( तस्मात् ) त्यापासूनच ( जज्ञिरे ) उत्पन्न झाल्या. ( अजाः ) बकऱ्या व ( अवयः ) मेंढ्याहि त्या परमेश्वराच्या सामर्थ्यानेंच उत्पन्न झाल्या.

---

( १ ) यज्ञो वै विष्णुः । विष्णुः व्यापकः परमेश्वरः ॥ ( २ ) वर्षन्ति सिञ्चन्ति क्षुन्निवृत्यादि कारकमन्नादि वस्तु यस्मिंस्तत्पृषत् । पृषदिति भक्ष्यान्नोपलक्षणम् । ( ३ ) आज्यमिति व्यंजनोपलक्षणम् ॥

**तं यज्ञं बर्हिषि प्रौक्षन् पुरुषं जातमग्रतः ॥**
**तेन देवा अयजन्त साध्या ऋषयश्च ये ॥ ९ ॥**

**अर्थ**—(तं अग्रतः जातम्) त्या आरंभापासून असलेल्या, जगत्कर्त्या, (यज्ञं पुरुषम्) सर्व पूज्य अशा परमेश्वराची (बर्हिषि) अंतःकरणामध्यें जे (प्रौक्षन्) उपासना करतात किंवा करितील तेच त्याचे खरे भक्त होत. हा ईश्वराचा उपदेश आहे. (तेन) त्या परमेश्वरानें वेदांच्या द्वारानें (साध्याः) ज्ञानी लोकांना (देवाः) विद्वानांना व (ऋषयः) मंत्रद्रष्टयांना उपदेश केला. अशा रीतीनें परमेश्वराचा उपदेश धारण करणारे ते पूर्ण ज्ञानी लोक (अयजन्त) त्या परमेश्वराचीच पूजा करीत असत. अर्थात सर्वांनीं त्या जगन्नियन्त्या परमात्म्याचीच स्तुति प्रार्थना व उपासना करून सर्व कर्मे करावीत.

**यत्पुरुषं व्यदधुः कतिधा व्यकल्पयन् ॥**
**मुखं किमस्यासीत् किं बाहू किमूरू**
**पादा उच्येते ॥ १० ॥**

**अर्थ**—(पुरुषम्) या पूर्वोक्त परमेश्वराच्या (कतिधा) किती प्रकारानें (व्यकल्पयन्) गुणांची कल्पना केलेली आहे? (व्यदधुः) त्याची धारणा अर्थात त्याच्या गुणांचें व्याख्यान किती प्रकारांनीं केलें जातें? (मुखं किम्) याच्या मुख्य उत्तम गुणांपासून काय उत्पन्न झालें? (किं बाहू) त्याच्या बल, वीर्य आदिगुणांपासून काय उत्पन्न झालें? (किं ऊरू) मध्यम गुणांनीं काय उत्पन्न झालें? (पादा उच्येते) मूर्खत्वादि नीच गुणांनीं युक्त असें काय वरें उत्पन्न झालें? याचें उत्तर पुढच्या मंत्रांत दिलें आहे.

**ब्राह्मणोऽस्य मुखमासीद्बाहू राजन्यः कृतः ॥ ऊरू तदस्य यद्वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत ॥ ११ ॥**

**अर्थ**—(अस्य) या पुरुषाच्या आज्ञेनें (मुखम्) विद्यादि मुख्य गुणांनीं, सत्यभाषणांनीं व धर्मोपदेशादिक मुख्य कर्मांनीं युक्त असणारा (ब्राह्मणः) ब्राह्मण उत्पन्न झाला. (बाहू) बल, वीर्यादि गुणांनीं युक्त असणाराला (राजन्यः) त्याणें क्षत्रिय

( कृतः ) केलें, ( अस्य ) याच्या उपदेशानें ( ऊरू ) कृषिकर्म व व्यापारादि मध्यम गुण ज्यामध्यें आहेत असा ( वैश्यः ) वैश्य उत्पन्न झाला. ( पद्भ्याम् ) पायांप्रमाणें जडबुद्धि ज्यांची आहे व ज्यांचा सेवाधर्म आहे असे नीचगुणयुक्त लोक ( शूद्रः ) शूद्र ( अजायत ) झाले.

**चन्द्रमा मनसो जातश्चक्षोःसूर्यो अजायत ॥**
**श्रोत्राद्वायुश्च प्राणश्च मुखादग्निरजायत ॥ १२ ॥**

**अर्थ**—( मनसः ) त्याच्या मननसामर्थ्यापासून ( चन्द्रमा ) चंद्र उत्पन्न झाला. ( चक्षोः ) प्रकाशसामर्थ्यापासून सूर्य उत्पन्न झाला. ( श्रोत्रात् ) अवकाशरूप सामर्थ्यापासून आकाश व इतर त्या त्या सामर्थ्यापासून वायू, प्राण व इतर इंद्रियें उत्पन्न झालीं. ( मुखात् ) मुख्य ज्योतिरूप सामर्थ्यापासून अग्नि उत्पन्न झाला.

**नाभ्या आसीदन्तरिक्षꣳ शीर्ष्णो द्यौः समवर्तत ॥ पद्भ्यां भूमिर्दिशः श्रोत्रात्तथा लोकाꣳ२ अकल्पयन् ॥ १३ ॥**

**अर्थ**—याच्या ( नाभ्या ) अवकाशमय सूक्ष्म सामर्थ्यापासून अंतरिक्ष उत्पन्न झालें. ( शीर्ष्णः ) मस्तकाप्रमाणें उत्तम सामर्थ्यानें ( द्यौः ) प्रकाशात्मक सूर्यादि लोक उत्पन्न झाले. ( पद्भ्याम् ) आधारमय सामर्थ्यापासून पृथ्वी उत्पन्न झाली. ( श्रोत्रात् ) शब्दमय सामर्थ्यापासून दिशा उत्पन्न झाल्या. ( तथा ) त्याचप्रमाणें अन्य सामर्थ्याच्या योगानें ( लोकान् ) अन्य लोक व त्यांवरील सर्व स्थावरजंगमात्मक सृष्टि उत्पन्न झाली. अर्थात स्वसामर्थ्यानें परमेश्वरानें ही सर्व सृष्टि उत्पन्न केली.

**यत्पुरुषेण हविषा देवा यज्ञमतन्वत ॥ वसन्तोऽस्यासीदाज्यं ग्रीष्म इध्मः शरद्धविः ॥ १४ ॥**

**अर्थ**—( देवाः ) विद्वान लोक, ( पुरुषेण हविषा ) परमेश्वरानें दिलेल्या ज्ञानाच्या योगानें ( यज्ञं ) अग्निहोत्रापासून अश्वमेधापर्यंत सर्व यज्ञ व शिल्पविद्यामय सर्व क्रिया ( अतन्वत ) करीत असत, करीत आहेत व पुढेंहि करितील. जग हा एक मोठा

यज्ञच चालला आहे. त्या यज्ञाची सामग्री खालीं दिल्याप्रमाणें आहे. ( वसन्तः ) या ब्रह्माण्डरूपीं यज्ञामध्यें वसन्तऋतु हा तुपाप्रमाणें आहे ( ग्रीष्मः ) ग्रीष्म ऋतु हा ( इध्म ) समिधांप्रमाणें आहे व ( शरत् हविः ) शरद्दतु हा पुरोडाशादि हविर्द्रव्यां-प्रमाणें आहे.

**स॒प्तास्या॑सन्परि॒धय॒स्त्रिःस॒प्त स॒मिधः॑ कृ॒ताः ॥**
**दे॒वा यद्य॒ज्ञं त॑न्वा॒ना अब॑ध्न॒न् पुरु॑षं प॒शुम् १५**

**अर्थ**—( अस्य ) या ब्रह्मांडाचे ( सप्त ) सात ( परिधयः ) प्रकारचे परीघ आहेत, किंवा एकावर दुसरें याप्रमाणें सात आवरणें आहेत. हीं आवरणें जशीं या ब्रह्मांडाला आहेत तशीं तीं प्रत्येक गोलालाहि आहेत. ( १ ) समुद्र, ( २ ) त्रसरेणुसहित वायू ( ३ ) मेघमंडल व तेथील वातावरण ( ४ ) वृष्टिजल व ( ५ ) त्यावरील सूक्ष्म वायू, ( ६ ) त्याहून सूक्ष्म धनंजय नामक वायू व ( ७ ) सर्वव्यापक सूत्रात्मावायू हीं सात आवरणें गोलाकार एकावर दुसरें याप्रमाणें आहेत. ( त्रिसप्त ) एकवीस पदार्थ हे ( समिधः ) या विश्वाची सामग्री ( कृताः ) आहे. ( १ ) श्रोत्र, ( २ ) त्वचा, ( ३ ) चक्षु, ( ४ ) जिव्हा, ( ५ ) नासिका, ( ६ ) वाणि, ( ७ ) पाय, ( ८ ) हात, ( ९ ) गुदद्वार, ( १० ) शिस्न, ( ११ ) शब्द, ( १२ ) स्पर्श, ( १३ ) रूप ( १४ ) रस, ( १५ ) गंध, ( १६ ) आकाश, ( १७ ) वायू, ( १८ ) अग्नि ( १९ ) जल, ( २० ) पृथिवी, ( २१ ) प्रकृति व बुद्ध्यादि अंतःकरणयुक्त जीवात्मा याप्रमाणें जगाच्या सामुग्रीचे हे एकवीस पदार्थ आहेत. प्रकृति व बुद्धि आदिसहित जीवात्मा हे सर्व सूक्ष्म पदार्थ असल्यामुळें एकाच वर्गात येतात असें समजावें. प्रत्येक विभागांतील पोटतत्वें अनेक आहेत. ( यत् ) त्या ( यज्ञम् ) पूजनीय व ( पशुम्[१] ) सर्व द्रष्ट्या ( पुरुषम् ) परमेश्वराचाच ( देवाः ) विद्वान लोक ( तन्वानाः) महिमा वर्णन करीत गुणांचें कीर्तन करीत व त्यालाच ( अबध्नन्[२] ) ध्यानावस्थेंत मनामध्यें स्थिर करीत. अर्थात त्या परमेश्वराशिवाय दुसऱ्या कोणाचीहि उपासना कोणीहि करूं नये.

**य॒ज्ञेन॑ य॒ज्ञम॑यजन्त दे॒वास्तानि॒ धर्मा॑णि**
**प्र॒थ॒मान्या॑सन् ॥ ते ह॒ नाकं॑ महि॒मानः॑**
**सचन्त॒ यत्र॒ पूर्वे॑ सा॒ध्याः सन्ति॑ दे॒वाः ॥ १६ ॥**

---

( १ ) पश्यतीति पशुः ॥ पशु म्हणजे जो सर्व पाहतो तो. सर्वसाक्षी. ( २ ) चित्तबंधन हा एक योगांतील प्रकार आहे. एका वस्तूवर चित्त स्थिर करणें.

**अर्थ**—( देवाः ) विद्वान लोक ( यज्ञम् ) त्या पूजनीय परमेश्वराची ( यज्ञेन ) स्तुति-प्रार्थना-उपासना करूनच ( अयजन्त ) पूजा करतात ( केली-करतील ) ( तानि ) ह्याच ( धर्माणि ) धर्म, ( प्रथमानि ) प्रथमतः सर्व कर्मांच्या आधीं करण्याजोगा असा ( आसन् ) आहे. अर्थात् सर्व मनुष्यांनीं सर्व कर्मांच्या प्रारंभीं त्या जगन्नियन्त्या परमेश्वराची स्तुति-प्रार्थना-उपासना करावी व मग दुसरीं कर्में आरंभावींत. ( ते ) जे अशा तऱ्हेनें परमेश्वराची उपासना करतात ते ( महिमानः ) खरोखरच पूज्य होत. त्यांना ( नाकम्[1] ) सर्व दुःखरहित असें मोक्षस्थान ( सचन्त ) मिळतें. ( यत्र ) या मोक्षावस्थेमध्यें ( पूर्वे ) पूर्वीचे ( साध्याः ) साधनसंपन्न व ( देवाः ) विद्वान लोक ( सन्ति ) आहेत. मोक्षाला गेलेले लोक ब्रह्मदेवाच्या शंभरवर्षांपर्यंत तेथेंच असतात. तोंपर्यंत त्यांना जन्ममृत्यूचीं दुःखें होत नाहींत. या मंत्रावर निरुक्तकार यास्काचार्यांनीं पुढें दिल्याप्रमाणें स्पष्टीकरण लिहिलें आहे—" **यज्ञेन यज्ञमयजन्त देवा अग्निनाग्निमयजन्त देवा अग्निः पशुरासीत्तमालभन्त तेनायजन्तेतिच ब्राह्मणम् । तानि धर्माणि प्रथमान्यासन् । ते ह नाकं महिमानः समसेवन्त यत्र पूर्वे साध्याः सन्ति देवाः साधनाः । द्युस्थानो देवगण इति नैरुक्ताः** ॥ नि० १२।४१ ॥"

**अर्थ**—( अग्निना ) जीवानें ( अग्निम् ) परमेश्वराची ( अयजन्त ) पूजा केली जाते. ( अग्निः ) परमेश्वर हा ( पशुः ) सर्वद्रष्टा आहे. त्याचीच विद्वान लोक ( आलभन्त[2]=अयजन्त ) उपासना करतात; असें ब्राह्मण ग्रंथांत लिहिलें आहे. विद्वान सर्वोपकारक अग्निहोत्रादि अश्वमेधापर्यंत सर्व यज्ञ करून अग्नीचें सेवन करितात; असे पूज्य लोक मोक्षाला जातात. ( द्युस्थानः ) " द्युः " म्हणजे " प्रकाशमय परमेश्वर " आहे स्थान ज्यांचें ते द्युस्थान ( देव-विद्वान ) होत. ज्ञानी लोकांचें आश्रयस्थान परमेश्वरच असतें हें उघड आहे. किंवा सूर्य व प्राण यांपासून अनुक्रमें प्रकाशमय किरण व विज्ञान उत्पन्न होतें, त्यांतच ( देवगण ) विद्वानांचा समुदाय रममाण होतो. असा वरील निरुक्तकारांचा आशय आहे.

---

( १ ) न + अकम्=नाकम् ॥ (न) नाहीं आहे (अकम्) दुःख जेथें तें स्थान "नाक" होय; अर्थात मोक्षस्थान. ( २ ) आ + लभ्=आलभ. (आ) जवळ, आसमंताद्भागीं (लभ्) प्राप्त होणें, जाणें. हा मूळचा " आलभ " धातूचा अर्थ. पण पुढें कालांतरानें " ठार मारणें " असा त्याचा अर्थ होऊं लागला ! ! ! ( उप ) जवळ ( आसना ) बसणें हा " उपासना " शब्दाचा अर्थ व " आलभन्त " शब्दाचा वरील अर्थ हे दोनहि वैदिककाळीं एकच होते. म्हणूनच " आलभन्त " याला वरील ब्राह्मणग्रंथांच्या उताऱ्यांत " अजयन्त " ( पूजा-संगति-दान ) हा पर्याय शब्द दिलेला आहे. तात्पर्य " यज्ञ " व आलभन्त " हे " पूजा " या अर्थाचे शब्द आहेत.

**अ॒द्भ्यः संभृ॑तः पृथि॒व्यै रसा॑च्च वि॒श्वक॑र्मणः॒ सम॑वर्त्त॒ताग्रे॑ ॥ तस्य॒ त्वष्टा॑ वि॒दध॑द्रू॒पमे॑ति॒ तन्मर्त्य॑स्य दे॒व॒त्वमा॒जान॒मग्रे॑ ॥१७॥**

अर्थ—त्या परमेश्वरानें ( पृथिव्यै ) पृथिवी उत्पन्न करण्यासाठीं ( अद्भ्यः ) पाण्यापासून ( रसात् ) सारभूत रस एकत्र केला व त्यापासून ही पृथिवी निर्माण केली. त्याचप्रमाणें अग्नीच्या सारभूत रसापासून जल उत्पन्न केलें. त्याचप्रमाणें वायूपासून अग्नि व आकाशापासून वायू, त्या त्या तत्वांतील सारभूत रस घेऊन उत्पन्न केले. त्याचप्रमाणें प्रकृतीपासून आकाश व स्वसामर्थ्यापासून प्रकृति उत्पन्न केली. (विश्वकर्मणः) विश्व म्हणजे सर्व जगांतील सर्व कर्मे करणाऱ्या परमेश्वराच्या सामर्थ्यामध्यें ( अग्रे ) सृष्टीच्या पूर्वीहि हें जग ( समवर्तत ) होतें. त्यावेळीं हें जग कारणावस्थेमध्यें होतें. सध्यांची ही कार्यदशा आहे. ( तस्य ) सृष्टिकर्तृत्व सामर्थ्याच्या अत्यंत अल्प अंशाला घेऊन (त्वष्टा) जगद्रचना करणाऱ्या परमेश्वरानें ( विदधत् ) हें जग रचलें. ( रूपं एति ) नंतर या जगाला कार्यदशा प्राप्त होऊन दृश्य आकार प्राप्त झाला. ( तत् मर्त्यस्य ) हें रूप मरणधर्मक विश्वाचें किंवा मनुष्यादिकांचें चिन्ह आहे. ( अग्रे ) सृष्टीच्या प्रारंभीं वेदांचा उपदेश केला, त्यावेळीं ( आजानम् ) परमेश्वरानें मनुष्यांनां आज्ञा केली कीं, मनुष्यांनीं धर्मयुक्त सकाम कर्मे करून ( देवत्वम् ) देवत्व गुणयुक्त शरीर धारण करून विषयेंद्रियसंयोगजन्य इष्ट सुखाचा उपभोग घ्यावा व निष्काम कर्मे करून, ज्ञान व विज्ञान मिळवून मोक्षसुख अनुभवावें.

**वेदा॒हमे॒तं पुरु॑षं म॒हान्त॑मादि॒त्यव॑र्णं॒ तम॑सः प॒रस्ता॑त् ॥ तमे॒व वि॑दि॒त्वाति॑मृ॒त्युमे॑ति॒ नान्यः पन्था॑ विद्य॒तेऽय॑नाय ॥ १८ ॥**

अर्थ—या मंत्रांत काय जाणलें असतां मनुष्य ज्ञानी होतो तें सांगितलें आहे. ( एतम् ) हा प्रसिद्ध, ( महान्तम् ) सर्वांहून सर्व प्रकारांनीं मोठा, ( आदित्यवर्णम् ) प्रकाशमय, विज्ञानमय, ( तमसः परस्तात् ) अज्ञान-अविद्यान्धःकाराच्या पलीकडे असणारा असा ( पुरुषम् ) परमेश्वर आहे; त्याला ( अहं वेद ) मी जाणला, त्याविषयीं मला ज्ञान झालें, असें ज्याला वाटेल तो ज्ञानी होय. अर्थात परमेश्वरसंबंधीं

सत्यज्ञान ज्याला होतें तो ज्ञानी समजावा. ( तं एव ) त्या परमेश्वरालाच ( विदित्वा ) जाणल्यानें, मनुष्य ( अतिमृत्युं एति ) जन्ममरण चुकवूं शकतो व मोक्षानंदाचा उपभोग घेऊं शकतो. त्याच्या उपासनेशिवाय दुसऱ्या कोणाचीहि उपासना केली तरी मोक्ष मिळणें नाहीं म्हणून कोणीहि कधींहि सर्वव्यापक परमेश्वराशिवाय दुसऱ्या कशाचीहि मोक्षप्राप्तीकरितां उपासना करूं नये. ( अयनाय ) व्यावहारिक व पारमार्थिक सुखप्राप्तीसाठीं ( न अन्यः पन्थाः विद्यते ) परमेश्वराच्या उपासनेशिवाय दुसरा मार्ग नाहीं. त्याची उपासना हाच सुखप्राप्तीचा मार्ग व अन्यांची उपासना हा दुःखाचा मार्ग होय म्हणून सर्वांनीं नेहमीं त्याचीच उपासना करावी

**प्रजापतिश्चरति गर्भे अन्तरजायमानो बहुधा विजायते ॥ तस्य योनिं परिपश्यन्ति धीरास्तस्मिन्ह तस्थुर्भुवनानि विश्वा ॥ १९ ॥**

**अर्थ**—( प्रजापतिः ) जड व चेतनसृष्टीचा स्वामी जो परमात्मा आहे तो ( अन्तर् गर्भे ) सर्वांच्या अंतर्यामीं असून ( अजायमानः[1] ) कधींहि उत्पन्न न होणारा-गर्भांत न येणारा असा आहे. म्हणून त्याला अज असें म्हणतात. तो ( चरति ) सर्वत्र विराजमान-व्याप्त-आहे. त्याच्या सामर्थ्यानेंच हें सर्व जग ( बहुधा ) पुष्कळ ( विजायते ) विशेष प्रकारांनीं उत्पन्न होतें. ( तस्य ) त्या परब्रह्मप्राप्तीचें ( योनिम् ) आदि-मुख्य-कारण वैदिकज्ञान हेंच एक आहे, असें ( धीराः ) ध्यान करणारे लोक ( परि पश्यन्ति ) सर्व प्रकारें पाहतात. ( तस्मिन् ) ज्या परमेश्वराच्या आश्रयानें ( ह ) ( विश्वा भुवनानि ) सर्व लोक ( तस्थुः ) राहिले आहेत, त्याच्या आश्रयाला त्याचे उपासक ज्ञानी लोक जातात व मोक्षाचा आनंद मिळवितात.

**यो देवेभ्य आतपति यो देवानां पुरोहितः ॥ पूर्वो यो देवेभ्यो जातो नमो रुचाय ब्राह्मये ॥ २० ॥**

**अर्थ**—( यः ) जो पूर्णपुरुष परमात्मा, ( देवेभ्यः ) विद्वानांनां ज्ञान मिळावें म्हणून त्यांच्याच अंतःकरणांत ( आतपति ) प्रकाशित होत असतो आणि जो

---

( १ ) "अजायमानः" या शब्दानें अवतारवाद वेदानुकुल आहे असें म्हणतां येत नाहीं.

( देवानाम् ) विद्वानांनांच मोक्षरूप सुखामध्यें ( पुरः हितः ) आधीं नेऊन ठेवणारा आहे, तसेंच जो ( देवेभ्यः ) विद्वानांनां सनातनत्वामुळें ( पूर्वो जातः ) पूर्वींच प्रसिद्ध झाला आहे ; त्या ( रुचाय ) प्रियकर अशा ब्रह्माला नमस्कार असो. तसें जो वेद-विद्येवर भक्ति ठेवून विद्वानांजवळ विद्या शिकत आहे त्या ब्राह्ममूर्तीला नमस्कार असो.

**रुचं ब्राह्मं जनयन्तो देवा अग्रे तदब्रुवन्॥ यस्त्वैवं ब्राह्मणो विद्यात्तस्य देवा असन्वशे ॥ २१ ॥**

**अर्थ**—( रुचम् ) आनंददायक ( ब्राह्मम् ) ज्ञान ( जनयन्तः ) उत्पन्न करणारे ( देवाः ) विद्वान लोक, ( अग्रे ) दुसऱ्यांच्या–शिष्यांच्यापुढें ( तत् ) तें ज्ञान ( अब्रुवन् ) सांगतात. विद्वानांनीं लोकांनां ज्ञानाचा उपदेश करून त्यांनां विद्वान करावें. जो याप्रमाणें ( ब्राह्मणो विद्यात् ) तें ज्ञान शिकून विद्वान होतो, त्याच्या ( वशे ) ताब्यांत त्याचीं ( देवाः ) इंद्रियें येतात. इतरांचीं इंद्रियें उच्छृंखल होतात.

**श्रीश्चंते लक्ष्मीश्च पत्न्यावहोरात्रे पार्श्वे नक्षत्राणि रूपमश्विनौ व्यात्तम् ॥ इष्णन्निषाणामुं म इषाण सर्वलोकं म इषाण॥२२॥**

**यजु० अ० ३१ ॥**

**अर्थ**—हे परमेश्वर ! ( श्रीः ) तुझी शोभा व ( लक्ष्मीः ) शुभलक्षणयुक्त धनादि सर्व प्रकारच्या संपत्ति या दोन ( पत्न्यौ ) प्रियपत्नीप्रमाणें सेवा करणाऱ्या आहेत. ( अहोरात्रे ) दिवस व रात्र, ( पार्श्वे ) दोन बगलांप्रमाणें आहेत. कालचक्राला कारणीभूत असणारे सूर्य व चंद्र हे डोळ्यांप्रमाणें आहेत व नक्षत्रें हीं तुझ्या सामर्थ्याचे इतर अवयव आहेत. हे सर्व प्रकाशमय पदार्थ रूपाप्रमाणें आहेत. ( अश्विनौ ) द्यावापृथिवी तुझ्या ( व्यात्तम् ) विकसित मुखाप्रमाणें आहे. त्याचप्रमाणें ज्या सौंदर्यगुणयुक्त वस्तु या जगांत आहेत त्यांचें रूप तुझ्याच सामर्थ्यानें झालेलें आहे असें आम्ही समजतों. हे परमेश्वरा ! ( मे ) मला ( अमुम् ) कृपाकटाक्षानें मोक्षपद ( इच्छन् ) देण्याची इच्छा धरून ( इषाण ) त्या आनंदमय स्थानाची प्राप्ति करून दे. तसेंच सुखमय सर्व लोकांचें राज्य आम्हांला दे. त्याचप्रमाणें

हे ईश्वरा! शोभा, संपत्ति, शुभगुण वगैरे सर्व उत्तम गोष्टी तूं आम्हांला दे. हे पूर्ण पुरुषा! आमच्यांतील सर्व दुष्ट गुण नाहींसे कर. [ वरील मंत्रांत आलेल्या कांहीं शब्दांचा अर्थ **श्रीर्हि पशवः** ॥ शत. कां. १।८॥ **श्रीर्वै सोमः** ॥ शत० कां० ४।१॥ **श्रीर्वै राष्ट्रं श्रीर्वैराष्ट्रस्य भारः** ॥ शत० कां० १३।१॥ **लक्ष्मीर्लाभाद्वा-लक्ष्यमानाद्वा लाञ्छनाद्वा लषतेर्वा स्यात्प्रेप्साकर्मणो लग्यतेर्वास्याद्वा श्लेषकर्मणो लज्जतेर्वा स्यादश्लाघाकर्मणः** ॥ निरु० ४।१० ॥ "श्रीः" म्हणजे "पशू, सोम व राष्ट्रांतील सर्व प्रकारच्या संपत्ती" होत. "लक्ष्मी" शब्द "लाभ" या अर्थाचा आहे. इ० ] येथें पुरुषसूक्ताचा अर्थ समाप्त झाला.

**यत्पर॒मम॑व॒मं यच्च॑ म॒ध्य॒मं प्र॒जाप॑तिःसस॒ृजे वि॒श्वरू॑पम् ॥ किय॑ता स्क॒म्भः प्रवि॑-वे॒श तत्र॒ यन्न प्रावि॑श॒त्किय॒त्तद्ब॑भूव ॥ १ ॥**

**अथर्व० १०।४।८ ॥**

**अर्थ**—( यत् परम् ) जें सर्वोत्कृष्ट प्रकृत्यादि सूक्ष्म जगत् आहे ( अवम् ) जें तृणमृत्तिका व क्षुद्रकीटपतंगादि निकृष्ट जग आहे तसेंच (यत् च मध्यमम्) जें मनुष्यादि आकाशापर्यंत मध्यम जग आहे तें सर्व विश्वाचें रूप ( प्रजापतिः ) परमेश्वरानेंच ( ससृजे ) उत्पन्न केलें आहे. या उत्पन्न केलेल्या जगामध्यें ( स्कम्भः ) तो परमेश्वर ( कियता ) कशाप्रकारें ( प्रविवेश ) व्यापला आहे बरें? परमेश्वरानें जगांत प्रवेश केला आहे पण जगानें परमेश्वरांत नाहीं. ( यत् ) जें त्रिविध जग ( न प्राविशत्) परमेश्वराहून अलग आहे ( तत् ) तें ( कियत् बभूव ) किती आहे बरें? तें अगदीं अल्प आहे.

**दे॒वाः पि॒तरो॑ मनु॒ष्या॑ गन्धर्वाप्स॒रस॑श्च॒ ये ॥ उच्छि॒ष्टाज्ज॑ज्ञिरे॒ सर्वे॑ दि॒वि दे॒वा दि॑वि॒श्रिताः॑ ॥ २ ॥ अथर्व० कां० ११।२४।४ मं० २७ ॥**

**अर्थ**—( देवाः ) विद्वान् व सूर्यादिक लोक, ( पितरः ) ज्ञानी लोक, ( मनुष्याः ) मननशील जन, ( गन्धर्वाः ) गानविद्याविशारद लोक व त्यांच्या ( अप्सरसः ) स्त्रिया

वगैरे ज्या मनुष्यादि जाती आहेत त्या सर्व ( उच्छिष्टात् ) परमेश्वराच्या सामर्थ्यापासूनच ( जज्ञिरे ) उत्पन्न झाल्या. ( ये दिवि देवा दिवि श्रिताः ) जे सूर्यादिक लोक आकाशांत दिसत आहेत, तेहि त्या परमेश्वरापासूनच झाले आहेत. याप्रमाणें सृष्टिविद्येविषयीं वेदांमध्यें पुष्कळ मंत्र आहेत, पण येथें सारांशरूपानें दिले आहेत.

---

## पृथिव्यादिक गोलांच्या भ्रमणाविषयीं.

वेदामध्यें पृथिवी, चंद्र इत्यादिक गोल भ्रमण करीत आहेत असें सांगितलें आहे. पहा:—

**आयं गौः पृश्निरक्रमीदसदन्मातरं पुरः ॥**
**पितरं च प्रयन्त्स्वः ॥ १ ॥ यजु० ९।६ ॥**

( आयंगौः ) पृथिवी, सूर्य, चंद्र व अन्य गोल हे ( पृश्निः ) आकाशामधून ( अक्रमीत् ) आक्रमण करतात. त्यांपैकीं पृथिवी ही आपल्या ( मातरम् ) जल परमाणुरूप आकाशस्थ मातेला व ( पितरम् ) अग्निमय अशा ( स्वः ) सूर्य पित्याला ( असदत् ) प्राप्त होऊन ( प्रयन् ) पुनः पुनः जाते. अर्थात् जल परमाणूंचें स्थान जें आकाश, त्यांतून पुनः पुनः सूर्याभोंवतीं फिरते. पृथिवी ही जलापासून झाली असल्यामुळें तिची जल ही माता व अग्निमय सूर्य हा तिचा पिता असें समजावें. त्याचप्रमाणें सूर्य हा आपल्या वायु या पित्याच्या व आकाश या मातेच्या सभोंवतीं फिरतो व चंद्र हा अग्नि या पित्याच्या व आप् रूपी मातेच्या भोंवतीं फिरतो. या प्रमाणें इतर गोल आपआपल्या कक्षांमध्यें फिरतात.

यास्काचार्यकृत निघण्टुमध्यें " गौ " हें नांव पृथिवीला दिलेलें आहे. व " पृश्निः " हें आकाशाचें नांव दिलेलें आहे. तसेंच निरुक्तामध्यें—

**गौरिति पृथिव्या नामधेयं यद्दूरंगता भवति यच्चास्यां भूतानि गच्छन्ति ॥ निरु० अ० २।५ ॥**

( १ ) उत् × शिष्ट=उच्छिष्ट. " उत् " म्ह० सर्वात उच्चभागीं " शिष्ट " म्ह० राहिलेला तो " उच्छिष्ट " होय; अर्थात परमेश्वर कारण, परमेश्वरच सर्वांच्या शिरोभागीं आहे.

गौरादित्यो भवति गमयति रसान् गच्छत्यन्तरिक्षेऽथ द्यौर्यत् पृथिव्या अधिदूरंगता भवति यच्चास्यां ज्योतींषि गच्छन्ति ॥ निरु० अ० २।१४ ॥

सूर्य रश्मिश्चन्द्रमा गंधर्व इत्यपि निगमो भवति सोपि गौरुच्यते ॥ निरु० २।९॥ स्वरादित्यो भवति ॥ निरु० २।१४ ॥

अर्थ—( गच्छति प्रतिक्षणं भ्रमति या सा गौः ) प्रत्येक क्षणाला भ्रमण करीत आहे म्हणून पृथिवीला "गौ" असें म्हणतात ( दूरंगता ) पृथिवी ही आकाशांतून दूर दूर जाते. सूर्यालाहि "गौ" हें नांव आहे कारण, तो स्वतः भ्रमण करतो व त्यामुळें सर्व रसांमध्यें गति उत्पन्न होते. द्यौः म्हणजे द्युलोक; यालाहि "गौः" असें म्हणतात कारण, यामध्यें सर्व चकचकणारे गोल फिरतात. सूर्यरश्मि व चंद्र यांनाहि "गौः" असें म्हणतात कारण, ते फिरतात किंवा ते गतिवान् आहेत.

अद्भ्यः पृथिवी ॥ तैत्तिरीयोपनिषद् ॥

पृथिवी ही आप् तत्त्वापासून झाली म्हणून जल हें पृथिवीला मातेप्रमाणें समजावें. "स्व" शब्दाचा अर्थ "आदित्य" असा आहे. या वरील मंत्राच्या अर्थावरून उघड दिसतें की, पृथिव्यादि लोक, वायू, आत्मा व ईश्वर यांच्या सत्तेनें आपआपल्या स्थानीं राहून आपआपल्या कक्षांमध्यें फिरतात.

या गौर्वर्त्तनिं पर्येति निष्कृतं पयो दुहाना व्रतनीरवारतः ॥ सा प्रब्रुवाणा वरुणाय दाशुषे देवेभ्यो दाशद्धविषा विवस्वते॥२॥

ऋ० ८।२।१० ॥ १ ॥

( या ) ती पूर्वी सांगितलेली ( गौः ) पृथिवी ( वर्त्तनिम् ) स्वकीय मार्गानें (अवारतः) निरंतर, कधींहि न थांबतां, ( विवस्वते ) सूर्याच्या ( परि एति ) सभोंवतीं फिरते.

( निष्कृतम् ) तो पृथिव्यादि गोलांचा मार्ग परमेश्वरानें नियमित केलेला आहे. ( पयः ) सर्व प्रकारचे रस व अनेक फळें ( दुहाना ) ती मनुष्यांनां देते व त्यांनां वारंवार तृप्त करते. ( व्रतनी ) हें भ्रमणाचें तिचें व्रत ती नियमानें पालन करते. ही पृथिवी ( दाशुषे ) दान करणाऱ्याला ( वरुणाय ) श्रेष्ठ कर्म करणाऱ्याला व ( देवेभ्यः ) विद्वानाला ( हविषा ) सर्व पदार्थ देऊन सर्व सुखें ( दाशत् ) देते; इतकेंच नव्हे तर सर्व प्राण्यांच्या, ( सा ) ती पृथिवी ( प्रब्रुवाणा ) वाणीला हेतुभूत आहे.

**त्वं सोम पितृभिः संविदानोऽनु द्यावा पृथिवी आततन्थ॥तस्मै त इन्दो हविषा विधेम वयं स्याम पतयो रयीणाम् ॥ ३ ॥**

ऋ० ६।४।१३।१ ॥

( सोम ) चंद्र हा ( पितृभिः ) पालन करण्यास योग्य अशा गुणांनीं ( संविदानः ) युक्त असून किंवा ज्ञान असून पृथिवी-सभोंवतीं फिरतां फिरतां ( द्यावा पृथिवी अनु ) सूर्य व पृथिवी यांच्या मध्येंहि केव्हां केव्हां ( आततन्थ ) येतो. या मंत्रांत पृथिवीभोंवतीं चंद्र फिरतो व तो पृथिवी व सूर्य यांचे मध्येंहि येतो असें सांगितलें आहे. [ या मंत्रांतील व इतर पुष्कळ मंत्रांतील " पिता-पितृ-" हा शब्द " पालक " असाच अर्थ दाखवतो. " पाति रक्षति इति पिता. " कारण तो " पा-रक्षणें " या धातूवरून झाला आहे. " द्यावा पृथिवी " यांचा अर्थ " सूर्य व पृथिवी " असाच होतो. कारण " द्यावा पृथिवी एजेते " असे प्रयोग पुष्कळ मंत्रांत येतात. याचा अर्थ " द्यावा व पृथिवी प्रकाशतात " असा आहे. या वाक्यावरून उघड ठरतें कीं " द्यावा " हा शब्द " प्रकाशात्मक सूर्याचा " वाचक आहे. या मंत्रांवरून उघड ठरतें कीं, हे आकाशांतील गोल आपआपल्या कक्षेमध्यें फिरत आहेत.

---

## आकर्षण व अनुकर्षण यांविषयीं.

---

सूर्य इतर गोलांचें आकर्षण करतो याविषयीं खालील मंत्र आहे:—

**यदा ते हर्य्यता हरी वावृधाते दिवे दिवे ॥ आदित्ते विश्वा भुवनानि येमिरे ॥ १ ॥**

ऋ० ६।१।६।३ ॥

**अर्थः**—हे ( इन्द्र ) ईश्वरा, सूर्या, ( यदा ) ज्यावेळीं ( ते ) तुझे ( हरी ) आकर्षण–प्रकाशन–हरण करण्यास समर्थ असे बल–पराक्रम–इत्यादि गुण व किरण (हर्यता) प्रकाशमान होऊन ( वृधा ) वृद्धिंगत होतात ( आदित् ) त्यानंतर ( दिवे दिवे ) प्रतिदिवशीं व प्रतिक्षणीं ( ते ) तुझे आकर्षणादिक गुण ( विश्वा ) सर्व ( भुवनानि ) भुवनांचें आकर्षण करून त्यांनां ( येमिरे ) नियमानें आपल्या स्वाधीन ठेवतात. अर्थात् सूर्याच्या आकर्षणानें इतर गोल आकाशांत राहतात; व ते आपआपल्या कक्षेमध्यें नियमानें फिरतात.

## यदा ते मारुतीर्विशस्तुभ्यमिन्द्र नियेमिरे॥
## आदित्ते विश्वा भुवनानि येमिरे ॥ २ ॥

ऋ० ६।१।६।४ ॥

**अर्थ**—हे ( इन्द्र ) सूर्य, ज्यावेळीं तुझ्या ( मारुतीः ) मर्त्य, मरणधर्मयुक्त किंवा वायुप्रधान अशा ( विशः ) प्रजा अर्थात गोल ( तुभ्यम् ) तुझ्या ( नियेमिरे ) आकर्षणाच्या नियमांत येतात त्याचवेळीं सर्व भुवनें ( येमिरे ) आपआपल्या ठिकाणीं स्थिर होतात. सूर्याच्या आकर्षणानेंच सर्व गोल आपआपल्या स्थानीं राहिले आहेत.

## यदा सूर्यममुं दिवि शुक्रं ज्योतिरधारयः॥
## आदित्ते विश्वा भुवनानि येमिरे ॥ ३ ॥

ऋ० ६।१।६।५ ॥

**अर्थ**—हे ( इन्द्र ) परमेश्वरा! (अमुम्) या ( सूर्यम् ) सूर्याला तूंच उत्पन्न केलेंस. ( दिवि ) प्रकाशमयस्वरूप अशा तुझ्यामध्यें जें ( शुक्रम् ) अनंत सामर्थ्य व ( ज्योतिः) तेज आहे, त्याणें या गोलांनां तूं आधार दिला आहेस. ( आदित्ते ) नंतर ( विश्वा भुवनानि ) सर्व लोकहि ( येमिरे ) त्याच नियमानें राहिले आहेत. अर्थात् ज्याप्रमाणें सूर्याच्या आकर्षणानें इतर गोल राहिले आहेत, तद्वतच परमेश्वराच्या आकर्षणानें सर्व सूर्यादिक गोल राहिले आहेत.

---

( १ ) "हृ=हरणें, आकर्षणें" या धातूवरून "हरी" हा शब्द बनला आहे. ( २ ) "मृ=मरणें या धातूवरून "मारुती" हा शब्द सिद्ध होतो.

व्यंस्तभ्नाद्रोदंसी मित्रो अद्भुतोऽन्तर्वावंदकृणोऽज्योतिषा तमः ॥ विचर्मणीव धिषणे अवर्तयद्वैश्वानरो विश्वं मधत्त वृष्ण्यम् ॥ ४ ॥

ऋ० ४।५।१०।३ ॥

अर्थ—हे परमेश्वर! तुझ्या सामर्थ्यानेंच (वैश्वानरः) सूर्य हा (रोदसी) द्यावा पृथिवी अर्थात प्रकाश व भूमी यांनां (व्यस्तभ्नात्) धारण करतो. म्हणून सर्व लोकांनां व्यवस्थित राखणारा असा तूं सर्वांचा (मित्रः) सखा आहेस. (अद्भुतः) आश्चर्यकारक असा तो सूर्य (ज्योतिषा) आपल्या प्रकाशानें (तमः) अंधःकाराला (अन्तः अकृणोत्) समूळ नाहींसें करतो. (वावत्) तसेंच (धिषणे) वस्तुमात्रांचें धारण करणाऱ्या द्यावा व पृथिवी यांनां आकर्षणानें (व्यवर्तयत्) योग्य जागीं ठेवलें आहे. (चर्मणीव) ज्याप्रमाणें चामडीमध्यें केंस राहिले आहेत त्याचप्रमाणें सूर्यादिकांच्या आकर्षणानें एकंदर इतर गोल राहिले आहेत. तात्पर्य इतकेंच कीं, (वृष्ण्यम्) वीर्यवान् असें हें विश्व आहे व त्याला (अधत्त वैश्वानरः) सूर्यादि गोलांनीं आकर्षण करून धरलें आहे व सूर्यादिक गोलांनां परमेश्वरानें धारण केले आहेत.

आकृष्णेन रजसा वर्तमानो निवेशयन्नमृतं मर्त्यं च ॥ हिरण्ययेन सविता रथेना देवो याति भुवनानि पश्यन् ॥ १ ॥

य० अ० ३४ मं० ३१

अर्थ—(सविता) परमात्मा व सूर्य हा (रजसा) सर्व गोलांशीं (आकृष्णेन) आकर्षणानेंच (वर्तमानः) संबंध ठेवणारा आहे. सूर्य व परमात्मा हा (हिरण्ययेन) ज्योतिर्मय व (रथेन) रमण, आनंद इत्यादिक वृत्ति उत्पन्न करणारें ज्ञान व तेज यांनीं युक्त आहे. तो (मर्त्यम्) मनुष्यादि मर्त्य लोक व (अमृतम्) सत्य विज्ञान, किरणसमूह वगैरे (निवेशयन्) व्यवस्थेनें आपआपल्या कक्षेमध्यें ठेवतो. त्याचप्रमाणें (मत्यम्) पृथिव्यादि लोकांवर (अमृतम्) ज्ञान, वृष्टी किंवा रस यांचें (निवेशयन्) सेचन करतो. असा हा (देवः) प्रकाशमान सूर्य (भुवनानि) सर्व लोकांचा आश्रय आहे. त्याचप्रमाणें (पश्यन्) सर्वांनां जगांतील पदार्थमात्रांचें

स्वरूप दाखवीत दाखवीत (याति) जातो; सर्वत्रांस प्राप्त होतो. या मंत्रांत पूर्वीच्या मंत्रांतून "द्युभिः अक्तुभिः" हीं दोन पदें अनुवृत्तिद्वारा येतात. त्याप-दांचा या मंत्रांत अंतर्भाव करून अर्थ केला असतां असा अर्थ होतो. "सूर्य हा (द्युभिः) दिवस व (अक्तुभिः) रात्र यांमध्यें प्रतिक्षणीं इतर गोलांचें आकर्षण करतो" त्याचप्रमाणें "परमेश्वरहि यच्चयावत् पदार्थांना आकर्षणानें धारण करतो." याव-रून उघड होतें कीं, जरी प्रत्येक गोलांत तेवढ्यापुरती आकर्षणशक्ति असली तथापी सर्वांपेक्षां परमेश्वरामध्येंच आकर्षणशक्ति जास्त आहे. या मंत्रांत आलेल्या कांहीं शब्दांचे अर्थः—

**लोका रजांस्युच्यन्ते ॥ निरु० ४।१९ ॥**

**रथो रंहतेर्गतिकर्मणः स्थिरतेर्वा स्याद्विपरीतस्य रम-माणोऽस्मिंस्तिष्ठतीति वा रयतेर्वा रसतेर्वा ॥**

**निरु० ॥ ९।११ ॥**

**विश्वानरस्यादित्यस्य ॥ निरु० १२।२१ ॥**

अर्थ—"रजः" म्हणजे "पृथिव्यादिक लोक होत. "रथ" म्हणजे "गति, अस्थिरता, ज्ञान-गमन-प्राप्ति, रमण-आनंद, लाभ, रुचि इत्यादि गुण ज्यांत आहेत तो" अर्थात "रथ" म्हणजे "आनंदरूपी ज्ञान किंवा तेजमय." "विश्वानर" म्हणजे "सूर्य." याप्रमाणें आकर्षणविद्येविषयीं वेदांमध्यें अनेक मंत्र आहेत.

---

## प्रकाश्यप्रकाशकतेविषयीं.

सूर्याच्या प्रकाशानें चंद्रादिक गोल प्रकाशित होतात. तेव्हां सूर्य हा प्रकाशक व चंद्र हा प्रकाश्य होय. याविषयींचें ज्ञान खालील मंत्रांत आहेः—

**सत्येनोत्तभिता भूमिः सूर्येणोत्तभिता द्यौः ॥ ऋतेनादित्यास्तिष्ठन्ति दिवि सोमो अधि-श्रितः ॥ १ ॥ सोमेनादित्या बलिनः**

सोमे॑न पृथि॒वी म॒ही ॥ अथो॒ नक्ष॑त्राणा॒मे॒षामु॒पस्थे॒ सोम॒ आहि॑तः ॥ २ ॥

अथर्व० १४।१ मं० १।२ ॥

कः स्वि॑देका॒की च॑रति॒ क उ॑ स्विज्जायते॒ पुन॑ः ॥ कि॑ꣳ स्वि॑द्धि॒मस्य॑ भेष॒जं किम्वा॒वप॑नं म॒हत् ॥ ३ ॥ सूर्य॑ एका॒की च॑रति च॒न्द्रमा॑ जायते॒ पुन॑ः ॥ अ॒ग्निर्हि॒मस्य॑ भेष॒जं भूमि॑रा॒वप॑नं म॒हत् ॥ ४ ॥

यजु० २३।९।१० ॥

**अर्थ**--( भूमिः ) ही पृथिवी ( सत्येन ) नित्य स्वरूप ब्रह्मयानें, वायूनें व सूर्यानें ( उत्तभिता ) आकाशांत धारण केली आहे. ( सूर्येण ) सूर्यानें ( द्यौः ) प्रकाश ( उत्तभिता ) धारण केला आहे. ( ऋतेन ) काळ, सूर्य व वायू यांच्या योगानें ( आदित्याः ) बाराहि महिने, किरण किंवा त्रसरेणू हे अनुक्रमें ( तिष्ठन्ति ) राहतात. ( दिवि ) सूर्यप्रकाशामध्यें ( सोमः ) चंद्रानें ( अधिश्रितः ) आश्रय केला आहे. अर्थात चंद्राला स्वतःचा प्रकाश नाहीं. चंद्रादिक गोल सूर्याच्या प्रकाशानेंच प्रकाशित होत आहेत. ॥ १ ॥ ( सोमेन ) चंद्राशीं संयोग होऊन ( आदित्याः ) सूर्यकिरण परत पृथ्वीवर येतात त्यामुळें ते ( बलिनः ) विशिष्ट बलयुक्त होतात. ज्या ठिकाणीं पृथिवीमुळें सूर्यकिरणांला प्रतिबंध होतो तेथें थंडी जास्त होते. सूर्यकिरण साक्षात् पडत नसल्यामुळें थंडी असते व त्यामुळें तेथील जंतूंमध्यें बळ जास्त असतें. ( चंद्राचे किरणहि त्याचप्रमाणें परावृत्त होऊन आले असल्यामुळें थंड व बळ उत्पन्न करणारे आहेत. ) ( सोमेन ) चंद्रप्रकाशानें, किंवा सोमादि औषधींनीं ( पृथिवी ) ही भूमि ( मही ) बलवान्, बलदात्री अशी झाली आहे. ( एषाम् ) या ( नक्षत्राणाम् ) नक्षत्रांच्या ( उपस्थे ) जवळ ( सोमः ) चंद्राला ( आहितः ) स्थापन केलें आहे. ॥२॥ ( कः एकाकी० ) या ब्रह्मांडामध्यें कोण बरें एकटा फिरतो? स्वप्रकाशानेंच कोण बरें प्रकाशित होतो? ( कः पुनः प्रकाशितो जायते ) कोण बरें प्रकाशित होतो? ( हिमस्य

भेषजं० ) थंडीला औषध काय ? ( वपनं० ) बीजारोपणासाठीं क्षेत्र कोणतें आहे बरें ? यांचीं उत्तरें पुढील मंत्रांत आहेत. ॥ ३ ॥ ( सूर्य० ) सूर्य हा एकटाच स्वयंप्रकाशी असल्यामुळें अन्य-गोलांना प्रकाश देत देत फिरतो. ( चन्द्रमा० ) चंद्राला स्वतःचा प्रकाश नसल्यामुळें तो सूर्यप्रकाशानें प्रकाशित होतो. ( अग्निः ) अग्नि हें थंडीवर औषध आहे. ( भूमिः ) जमीन हें बीज पेरण्यास उत्तम क्षेत्र आहे. याप्रमाणें वेदांमध्यें याविषयींचे मंत्र पुष्कळ आहेत.

---

## गणितविद्या.

### ( १ ) अंकगणित.

एकां च मे तिस्रश्चं मे तिस्रश्चं मे पञ्चं च मे पञ्चं च मे सप्त चं मे सप्त चं मे नवं च मे नवं च म एकांदश च म एकांदश च मे त्रयोंदश च मे त्रयोंदश च मे पञ्चंदश च मे पञ्चंदश च मे सप्तदंश च मे सप्तदंश च मे नवंदश च मे नवंदश च म एकंवि॑ꣳशतिश्च म एकंवि॑ꣳशतिश्च मे त्रयोंवि॑ꣳशतिश्च मे त्रयोंवि॑ꣳशतिश्च मे पञ्चंवि॑ꣳशतिश्च मे पञ्चंवि॑ꣳशतिश्च मे सप्तवि॑ꣳशतिश्च मे सप्तवि॑ꣳशतिश्च मे नवंवि॑ꣳशतिश्च मे नवंवि॑ꣳशतिश्च म एकंत्रि॑ꣳशच्च म एकंत्रि

ँशश्च मे त्रयस्त्रिँशश्चमे यज्ञेनं कल्पन्ताम् १
चतस्रश्च मेऽष्टौ चं मेऽष्टौ चं मे द्वादंश
च मे द्वादंश च मे षोडंश च मे षोडंश
च मे विँशतिश्चं मे विँशतिश्चं मे
चतुर्विँशतिश्च मे चतुर्विँशतिश्च मे-
ऽष्टाविँशतिश्च मेऽष्टाविँशतिश्च मे
द्वात्रिँशश्च मे द्वात्रिँशश्च मे षट्त्रिँ
शश्च मे षट्त्रिँशश्च मे चत्वारिँ
शच्चं मे चत्वारिँशश्च मे चतुश्चत्वारि
ँशश्च मे चतुश्चत्वारिँशश्च मेऽष्टाचं-
त्वारिँशश्च मे यज्ञेनं कल्पन्ताम् ॥ २॥

यजु. अ. १८. मं. २४। २५ ॥

या मंत्रांत मूलरूपानें अंकगणितविद्या आहे. एकामध्येंएक मिळविला असतां दोन होतात; त्यांत आणखीं एक मिळविला असतां तीन होतात. ( १+१=२ ) ( २+१=३ ) ( ३+२=५ ) (५+२=७ ) याप्रमाणें जाणावें. हें विषम अंकांविषयीं झालें. सम अंकांविषयींहि तोच नियम आहे. दोन व दोन चार. चार व चार आठ. ( ४+४=८ ) ( ८+४=१२ ) ( १२+४=१६ ) या प्रमाणें अनंत संख्येविषयीं जाणावें. या मंत्रांतील अनेक " च " कार गणितांतील अनेक प्रकार दाखवतात. ते सर्व प्रकार वेदांगग्रंथांतील ज्योतिषशास्त्रांत दिले असल्यामुळें याठिकाणीं त्यांविषयीं जास्त विवेचन नको. त्यावेदांगांतील गणितविद्येला मूलभूत हे वरील मंत्र आहेत हें अंकगणितज्ञानपदार्थांविषयींच्या गणितास बीजगणित असें म्हणतात. तें पुढें दिलें आहे:—

## २ बीजगणित.

अग्न आयाहि वीतये गृणानो हव्यदातये ॥
निहोता सत्सि बर्हिषि ॥ १ ॥ साम० १ । १ ॥

(अ३) हें चिन्ह "अ" परिमाणाचें द्वित्व दाखवितें. [बीजगणितामध्यें अज्ञात संख्या "अ-क-ग" अशा अक्षरांनीं दाखवितात व त्यांची किंमत "अ-क२-ग३" याप्रमाणें दाखवतात.] या मंत्रांत हे अंक जरी स्वर साधण्यासाठीं दिलेले आहेत तथापी ते अंक स्वरांची दुप्पट, तिप्पट अशी पट दाखवित असल्यामुळें हे मंत्र बीजगणिताला मूलभूत होत. याप्रमाणें वेदमंत्रांत पुष्कळ ठिकाणीं एका क्रियेवरून दोन किंवा जास्त उद्देश साधलेले असतात. गणिताचा तिसरा भाग रेखागणित किंवा भूमिती होय. तो पुढच्या मंत्रांत दर्शविला आहे:—

---

## ३ रेखागणित किंवा भूमिती.

इयं वेदिः परो अन्तः पृथिव्या अयं यज्ञो भुवनस्य नाभिः ॥ अयꣳ सोमो वृष्णो अश्वस्य रेतो ब्रह्मायं वाचः परमं व्योम ॥ ३ ॥ यजु० २३।६२ ॥ कासीत्प्रमा प्रतिमा किं निदान माज्यं किमासीत् परिधिः क आसीत् ॥ छन्दः किमासीत् प्रउगं किमुकथं यद्देवा देवमयजन्त विश्वे ॥

ऋ० ८।७।१८।३ ॥

(इयं वेदिः) ही वेदि त्रिकोण, चतुष्कोण, गोल, सेनाकार किंवा इतर आकारानें युक्त आहे. (पृथिव्याः परः अन्तः) पृथिवीचा जो चारहि बाजूंचा अगदीं शेवट

तो तिचा परीघ होय. ( अयं यज्ञः ) ही दोनहि बाजू सांधणारी रेषा आहे हिला व्यास म्हणतात; ही ( भुवनस्य नाभिः ) बरोबर भूमीची मध्यरेषाच होय. (अयं सोमः) चंद्रलोकालाहि याचप्रमाणें परीघ, व्यास वगैरे आहेत. ( वृष्णः ) वृष्टि-कर्त्या सूर्य, वायू व अग्नि या ( अश्वस्य ) वेगाला हेतू असणाऱ्यांनांहि त्याचप्रमाणें परीघ वगैरे आहेच. ( रेतः ) त्यांचें वीर्य व औषधि-रूप सामर्थ्य चहूंकडे पसरलेलें आहे या मंत्रांत वेदीचा आकार, पृथिवीचा परिघ व पृथिवीचा व्यास हे शब्द रेखागणित सुचवितात. ( ब्रह्मायम् ) ब्रह्म हें वाणी-च्याहि परे असून सर्वांच्याहि पलीकडे व्यापून राहिलेलें आहे. ॥ ३ ॥ ( प्रमा का आसित् ) यथार्थ ज्ञान करून देणारी बुद्धि कोणाला आहे? ( प्रतिमा० ) परिमाण ज्याणें समजतें अशी बुद्धि कोणाला आहे? ( निदानम् ) या जगाचें कारण कोणतें आहे? ( आज्यम् ) या जगांत तुपाप्रमाणें सारभूत काय आहे? ( परिधिःक० ) या जगाचा परिघ कोणता? ( छन्दः ) स्वच्छंद असा पदार्थ कोणता? ( प्रउगम् ) स्तुति करण्यास योग्य असें काय आहे? या सर्व प्रश्नांचीं उत्तरें पुढें दिलीं आहेत. ( यत् देवम् ) ज्या सर्व प्रकाशक परमेश्वराची ( विश्वे ) सर्व ( देवाः ) विद्वान ( अयजन्त ) उपासना करतात तोच यथार्थ ज्ञाता वगैरे गुणांनीं युक्त आहे. यामधील "परिधि" शब्द रेखागणिताचा परंपरेनें उपदेश करतो. ज्योतिःशास्त्रांत ही विद्या विस्तारानें आलेली आहे. ती मूलरूपानें, कोठें साक्षात् तर कोठें परंपरेनें, वेदमंत्रांत दिलेली आहे. एत-द्विषयक मंत्र वेदांमध्यें पुष्कळ आहेत.

---

## ईश्वराची स्तुति, प्रार्थना, याचना, समर्पणा व उपासना.

ईशस्तुतिविषयींचे मंत्र "योभूतंच०" इत्यादि पूर्वीं दिलेलेच आहेत व पुढेंहि देण्यांत येतील. याठिकाणीं "प्रार्थने" विषयींचे मंत्र देतों:—

**तेजो॑ऽसि॒ तेजो॒ मयि॑ धेहि वी॒र्य॑मसि वी॒र्यं॑**
**मयि॑ धेहि॒ बल॑मसि॒ बलं॒ मयि॑ धेहि ॥**

---

( १ ) "यज्=देवपूजा-संगतिकरण-दानेषु" या धातूवरून "यज्ञ" हा शब्द झाला आहे. "संगतिकरण" म्हणजे "जोडणें, एक करणें, सांधणें" होय. म्हणून "यज्ञ" शब्दाचा अर्थ "सांधणारा" असाहि होतो.

**ओजो॑ऽस्योजो॒ मयि॑ धेहि म॒न्युर॑सि म॒न्युं मयि॑ धेहि॒ सहो॑ऽसि॒ सहो॒ मयि॑ धेहि ॥१॥**

यजु० १९।९॥

( तेजःअसि ) हे परमेश्वर ! तूं अनंत विद्या व विज्ञानरूपी तेजानें प्रकाशित आहेस, म्हणून ( तेजः ) तें तुझें तेज ( मयि ) माझ्यामध्यें ( धेहि ) उत्पन्न कर. ( वीर्य असि ) हे परमात्मन्! तूं अनंत वीर्यवान् आहेस, करितां माझ्यामध्येंहि शरीर बुद्धि, मन इत्यादिकांमध्यें शौर्य, स्फूर्ति आदिक वीर्य उत्पन्न कर. ( बलं असि ) हे ईश्वरा ! तूं बलिष्ठांहूनहि बलिष्ठ आहेस करितां माझ्यामध्यें बल उत्पन्न कर. ( ओजः असि ) हे ईशा ! तुझ्यामध्यें ज्ञानशक्ति अनंत आहे; माझ्यामध्येंहि विद्या, विज्ञान, वगैरे बुद्धीचें सामर्थ्य तूं उत्पन्न कर ( मन्युःअसि ) तूं दुष्टांवर कोप करणारा आहेस, माझ्यामध्येंहि दुष्टांवर कोप करण्याचें सामर्थ्य दे ( सहः असि ) हे देवाधिदेवा ! तूं सहन करणारा आहेस म्हणून माझ्यामध्येंहि सुखदुःखादि द्वंद्वें सहन करण्याचें सामर्थ्य उत्पन्न कर. याप्रमाणें हे दयाघना ! माझ्यामध्यें सर्व सद्गुण उत्पन्न कर.

**मयी॒दमिन्द्र॑ इन्द्रि॒यं द॑धा त्व॒स्मान् रायो॑ म॒घवा॑नः सचन्ताम् ॥ अ॒स्माकं॑ सन्त्वा॒शिषः॑ स॒त्या नः॑ सन्त्वा॒शिषः॑ ॥ २ ॥**

यजु० अ० २।१० ॥

( इन्द्र ) हे परमैश्वर्यवान् परमेश्वरा ! ( मयि ) माझ्यामध्यें ( इदम् इन्द्रियम् ) अशीं सर्वोत्तम इंद्रियें व उत्तम मन ( दधातु ) ठेव. अर्थात माझीं सर्व इंद्रियें उत्तम असोत. उत्तम पदार्थ आम्हांला मिळून सर्व इंद्रियांचें व सर्व अवयवांचें पोषण उत्तम होवो. ( मघवा ) तूं विद्यादि अनेक धनांनीं युक्त आहेस म्हणून ( अस्मान् ) आम्हांला ( रायः ) परमोत्तम विद्यादिधन व राज्यादिधन तूं दे. ( सचन्ताम् ) सर्व सद्गुणयुक्त आम्हांला कर. ( अस्माकम् ) आमच्या ( आशिषः ) इच्छा सदैव ( सत्याः )

---

( १ ) " इदि=परमैश्वर्ये " या धातूवरून " इन्द्र " शब्द झाला आहे. " ज्याच्याजवळ सर्व प्रकारच्या ऐश्वर्याची परमावधी आहे तो इंद्र होय " अर्थात " परमेश्वर " ( २ ) " मघं विज्ञानं विद्यते यस्मिन्स मघवा." ज्याजवळ पूर्ण ज्ञान आहे तो मघवा होय. अर्थात सर्वज्ञ परमात्मा.

रूप्या होवोत. चक्रवर्ति राज्यादिक मिळविण्याच्या आमच्या इच्छा सदैव फलद्रूप होवोत. ॥ २ ॥

**यां मेधां देवगणाः पितरश्चोपासते ॥ तया मामद्य मेधयाऽग्ने मेधाविनं कुरु स्वाहा ॥३॥**

यजु० ३२ । १४ ॥

( देवगणाः ) सर्व विद्वान लोक व ( पितरः ) ज्ञानी लोक ( यां मेधाम् ) ज्या धारणाबुद्धीनें ( उपासते ) युक्त असतात किंवा विद्वानांना जी धारणात्मक बुद्धि प्राप्त झालेली असते ( तया ) त्या ( मेधया ) धारणाशक्तियुक्त बुद्धीनें ( अद्य ) आज अर्थात सध्यां ( अग्ने ) हे ज्ञानस्वरूप परमेश्वर! ( माम् ) मला ( मेधाविनम् बुद्धिमान ( कुरु ) कर अर्थात धारणाशक्ति माझ्यामध्यें उत्पन्न कर. ( स्वाहा ) [ या शब्दाचा अर्थ निरुक्तांत पुढें दिल्याप्रमाणें केलेला आहे. " **स्वाहाकृतयः स्वाहेत्येतत्सु आहेति वा स्वा वागाहेति वा स्वं प्राहेति वा स्वाहुतं हविर्जुहोतीति वा तासामेषाभवति** ॥ निरु० ८ । २० ॥ ( सु+आह ) स्वाहा म्ह० अत्यंत कोमल, मधुर, प्रिय कल्याणकारक असें भाषण करणें. ( स्वा वाग् आह ) आपल्या अंतःकरणांत जसें ज्ञान असतें तसेंच निष्कपटपणानें उघड भाषण करणें, ( स्वं प्र आह ) स्वकिय पदार्थांवरच स्वत्व सांगणें, ( सु आहुतं हविःजुहोति ) उत्तम संस्कार करून तयार केलेल्या हविर्द्रव्याचाच होम करणें हे " स्वाहा " शब्दाचे अर्थ आहेत. ] हे परमेश्वर! याप्रमाणें करण्याची बुद्धि आम्हांस दे.

**स्थिरा वः सन्त्वायुधा पराणुदे वीळू उत प्रतिष्कभे ॥ युष्माकमस्तु तविषी पनीयसी मा मर्त्यस्य मायिनः ॥ ४ ॥**

ऋ० १।३।१८ मं० २ ॥

परमेश्वर मनुष्यांना आशिर्वाद देतो. ( वः आयुधाः ) तुमचीं अग्नेयादिक अस्त्रें, शतघ्नी, भुशुण्डी आदिक आयुधें व धनुष्यबाण तलवार आदिक शस्त्रें हीं ( स्थिराः )

( १ ) " अग्-ज्ञान-गति-प्राप्तिषु " या धातूवरून " अग्नि " झाला आहे. जो ज्ञानवान्, गतिवान् व मिळविण्यास योग्य तो अग्नि होय. अर्थात परमेश्वर.

माझ्या अनुग्रहानें दृढ असोत. त्यांच्यायोगानें ( पराणुदे ) तुम्ही दुष्ट लोकांचा पराभव करावा. तीं ( वीळू ) अत्यंत मजबूत व सर्व गुणयुक्त असावींत. ( उत प्रतिष्कभे ) त्यांच्या सहाय्यानें तुम्ही शत्रूच्या सैन्याला हांकून द्यावें. ( युष्माकम् ) तुमचें ( तविषी ) सैन्य उत्तम असावें. उत्तम सैन्य जोंपर्यंत तुम्ही ठेवाल तोंपर्यंतच तुमचें चक्रवर्ति राज्य राहील व तुम्ही शत्रूंचा पराजय करूं शकाल. हा आशिर्वाद सद्वर्तन ठेवणाऱ्या माणसांनांच आहे ( मायिनः ) पण जे ठग किंवा दुष्ट आहेत त्या ( मर्त्यस्य ) मनुष्यांनां ( मा ) हा आशिर्वाद नाहीं. अर्थात सदाचरण करणाऱ्यांवरच मी दया करतों व दुष्टाचरण करणाऱ्यांवर करीत नाहीं. ॥ ४ ॥

इषे पिन्वस्वोर्जे पिन्वस्व ब्रह्मणे पिन्वस्व
क्षत्राय पिन्वस्व द्यावापृथिवीभ्यां पिन्वस्व ॥
धर्मासि सुधर्माऽमेन्यस्मे नृम्णानि धारय
ब्रह्म धारय क्षत्रं धारय विशं धारय ॥ ५ ॥

यजु० ३८।१४ ॥

हे परमेश्वरा! ( इषे ) उत्तम इच्छेची सफलता व्हावी म्हणून व अन्नादिक उत्तम भोग्यपदार्थ मिळावे म्हणून ( पिन्वस्व ) आम्हांला स्वतंत्रता, शक्ति व प्रसन्नता दे. ( ऊर्जे ) वेदविद्या शिकण्यासाठीं प्रयत्न करावा म्हणून आमच्यांत ( पिन्वस्व ) दृढ उत्साह उत्पन्न कर. ( क्षत्राय ) आमच्यांत क्षात्र तेज राहून आमचें चक्रवर्तिराज्य कायम राहावें यासाठीं आमच्यांत उत्साह राहूं दे. ( ब्राह्मणे ) ज्ञान मिळविण्यासाठीं दृढ प्रयत्न करण्याची बुद्धि आम्हांला दे. ( द्यावा पृथिवी भ्याम् ) सूर्यापासून पृथिवी-पर्यंत असणाऱ्या सर्व पदार्थांचा कलाकौशल्यांत उपयोग करून सर्वांचें हित साधेल असा प्रयत्न करण्याची बुद्धि दे. ( सुधर्म ) हे परमेश्वरा! तूं ( धर्मा असि ) न्याय-कारी आहेस यासाठीं आम्हांलाहि न्यायधर्मयुक्त कर. ( अमेनिः ) तूं निर्वैर आहेस, यासाठीं आम्हांलाहि निर्वैर सर्वांशीं मैत्री ठेवणारे असे-कर. ( अस्मे ) आम्हांला ( नृम्णानि ) सुराज्य, सुनियम व सुरत्नादिक ( धारय ) दे त्याच-प्रमाणें आम्हांला ( ब्रह्म ) वेदविद्या येऊं दे ( क्षत्री ) राज्य, शौर्य व क्षत्रियवर्ण हीं दे ( विशम् ) वैश्यवर्ण व प्रजा या सुखी असोत. तात्पर्य सर्व उत्तम गुण आम्हांला तूं दे. ॥ ५ ॥

**यज्जाग्रंतो दूरमुदैति दैवं तदुं सुप्तस्य तथैवैति ॥ दूरंगमं ज्योतिंषां ज्योतिरेकं तन्मे मनंः शिवसंकल्पमस्तु ॥ ६ ॥**

यजु० ३४ । १ ॥

( जागृतः ) जागें असलेल्या-ज्ञानी-मनुष्याचें ( यत् ) तें मन ( दूर उदैति ) सर्व इंद्रियांच्याहि वर देखरेख करणारें असें होतें. पण अज्ञानी मनुष्यांचें मन इंद्रियांच्या आधीन होतें. ( दैवम् ) ज्ञानादि दिव्यगुणयुक्त ( सुप्तस्य ) स्वप्नांत असलेल्या ज्ञानी पुरुषाचें ( तत उ ) तें मन ( तथैव ) तसेंच इंद्रियांना स्वाधीन ठेवतें. स्वप्नांतहि उत्तम वस्तु व चांगले विचार त्याला सुचतात व आनंद होतो. हें मन ( दूरंगमम् ) अत्यंत वेगवान आहे. ( ज्योतिषां ज्योतिः ) सर्व इंद्रियांना प्रकाश देणारें किंवा सूर्यादिकांनाहि प्रकाशित करणारें असें ( एकम् ) एकच मन आहे. हे ईश्वरा! ( तत् मे मनः) तें माझें मन मननशील होवो व ( शिवसंकल्पम् ) सद्गुणयुक्त होवो. ॥ ६ ॥

**वाजंश्च मे प्रसवश्चं मे प्रयंतिश्च मे प्रसिंतिश्च मे धीतिश्चं मे क्रतुंश्च मे० ॥**

यजु० अ० १८.

या अठराव्या अध्यायामध्यें "( वाजः ) अन्नादिक सर्व पदार्थ परमेश्वराला समर्पण करावे असें सांगितलें आहे. मनुष्यांनीं मोक्षापासून अन्नापर्यंत सर्व पदार्थ परमेश्वराकडेच भक्तियुक्त अंतःकरणानें मागावें. तो भक्तांची इच्छा पूर्ण करणारा आहे.

**आयुर्यज्ञेनं कल्पतां प्राणो यज्ञेनं कल्पतां चक्षुर्यज्ञेनं कल्पताᳫं श्रोत्रं यज्ञेन कल्पतां वाग्यज्ञेनं कल्पतां मनो यज्ञेनं कल्पतामात्मा यज्ञेनं कल्पतां ब्रह्मा यज्ञेनं कल्पतां ज्योतिर्यज्ञेनं कल्पताᳫं स्वर्यज्ञेनं कल्पतां**

पृष्ठं यज्ञेन कल्पतां यज्ञो यज्ञेन कल्पताम् ॥ स्तोमश्च यजुश्च ऋक्च साम च बृहच्च रथन्तरं च ॥ स्वर्देवा अगन्मामृता अभूम प्रजापतेः प्रजा अभूम वेट् स्वाहा ॥ ७ ॥

यजु० १८।२९ ॥

हे मनुष्यलोक हो, तुम्ही ( आयुः ) आपल्या आयुष्याचा व्यय ( यज्ञेन–यज्ञो वै विष्णुः ) परमेश्वर प्राप्तीकडे किंवा परमेश्वरासाठीं ( कल्पताम् ) करा. त्याचप्रमाणें प्राण, चक्षु, वाचा, कर्णेंद्रिय, मन, आत्मा, ( ब्रह्मा ) ज्ञान, चारवेद जाणणारा ( ज्योतिः ) सूर्यादिकांचा प्रकाश ( स्वः ) सुख ( पृष्ठम् ) आधार ( यज्ञः ) अश्वमेधादिक याग किंवा शिल्पक्रिया वगैरे कर्मे, ( स्तोम ) स्तुति, ( यजुः ) यजुर्वेदाध्ययन, ( ऋक् ) ऋग्वेदाध्ययन, सामवेदाध्ययन, ( च ) अथर्ववेदाध्ययन, ( बृहच्च रथन्तरं च ) क्रियेच्या सिद्धीपासून उत्पन्न होणारें फल व शिल्पविद्येपासून उत्पन्न होणारे अनंत पदार्थ, हे सर्व परमेश्वराला समर्पित करून आम्ही कृतकृत्य होऊं. असें केलें असतां परमकारुणिक परमेश्वर आम्हांला सुख देईल. तसेंच ( स्वर्देवाः ) आम्हीं सुखांत प्रकाशणारे अर्थात सुखी होऊन ( अमृता ) मोक्षसुखाप्रत ( अगन्म ) खात्रीनें जाऊन पोहोंचूं. त्याचप्रमाणें ( प्रजापतेः प्रजा ) आम्ही परमेश्वराचचि प्रजा होऊं; अर्थात, परमेश्वराला सोडून आम्ही इतरांनां कधींहि मानणार नाहीं. ( वेट् स्वाहा ) सदोदित आम्ही खरें बोलूं, उत्साहानें परमेश्वराची आज्ञा पालन करूं व त्याचीच पुत्रवत्सेवा करूं. ॥ ७ ॥

## ईश्वरोपासना.

युञ्जते मन उत युञ्जते धियो विप्रा विप्रस्य बृहतो विपश्चितः ॥ विहोत्रा दधे

---

( १ ) यज्ञ म्हणजे परमेश्वर, उत्तम कृत्य, विद्वानांचा सत्कार, मैत्री, सहाय्य, परमेश्वराची आज्ञा, ज्ञान, सत्कार्य, परोपकार इ० कर्मे करण्यांत मनुष्यांनीं आपल्या आयुष्याचा व्यय करावा. हा मंत्राचा भावार्थ.

वयुनाविदेक इन्मही देवस्य सवितुः परि-
ष्टुतिः ॥ १ ॥ ऋ० ४।४।२४।१ ॥

( विप्राः ) ईश्वराची उपासना करणारे बुद्धिवान् लोक—( होत्रा ) योगी मनुष्य ( विप्रस्य ) परमेश्वराच्या मध्यें ( मनः ) मन ( युञ्जते ) लावतात, स्थिर करतात. ( धिया ) बुद्धिहि त्यामध्येंच लीन करतात. (विदधे) त्या परमेश्वरानेंच हें सर्व जग उत्पन्न केलें आहे. तसेंच तो ( वयुना-वित् ) सर्व लोकांचीं शुभाशुभ कर्में जाणणारा आहे. (एकः ) तो एकच असून ( इत् ) सर्वत्र व्याप्त, ज्ञानस्वरूप व सर्वोत्तम असा आहे. अशा (देवस्य ) सर्व प्रकाशक व ( सवितुः ) सर्व जगदुत्पादक परमेश्वराची ( परिष्टुतिः मही ) अत्यंत स्तुति मनुष्यांनीं सर्व प्रकारें करावी. त्याची स्तुति केल्यानें त्याची प्राप्ति होते. ॥ १ ॥

युञ्जानः प्रथमं मनस्तत्वाय सविता
धियम् ॥ अग्ने ज्योतिर्निचाय्य पृथिव्या
अध्याभरत् ॥ २ ॥ युक्तेन मनसा वयं
देवस्य सवितुः सवे ॥ स्वर्ग्याय शक्त्या ॥३॥
युक्त्वाय सविता देवान् त्स्वर्यतो धिया
दिवम् ॥ बृहज्ज्योतिः करिष्यतः सविता
प्रसुवाति तान् ॥ ४ ॥ युजे वां ब्रह्म पूर्व्यं
नमोभिर्विश्लोक एतु पथ्येव सूरेः ॥
शृण्वन्तु विश्वे अमृतस्य पुत्रा आये
धामानि दिव्यानि तस्थुः ॥ ५ ॥

यजु० अ० ११ मं० १।२।३।४।५ ॥

( युञ्जानः ) योगाभ्यास करणारा ज्यावेळीं ( तत्वाय ) ब्रह्मज्ञानासाठीं ( प्रथमम् ) प्रथमतः किंवा आरंभीं (मनः) मनाच्या वृत्ति (युञ्जानः) रोखतो, त्यावेळीं ( सविता )

परमेश्वर त्याचें मन आपणाकडे कृपाकरून ओढून घेतो. ( पृथिव्याः ) या भूमंडळावर असणाऱ्या योग्यांनीं व उपासकांनीं ( अग्नेः ) परमेश्वराचें ( ज्योतिः ' प्रकाश स्वरूप (निचाय्य )पूर्णपणें ओळखून (अधि आभरत) आपल्या आत्म्यामध्यें परमेश्वराचें ध्यान किंवा त्याची धारणा करावी. असें जो करतो तोच त्याचा उपासक होय. ॥ २ ॥ ( स्वर्ग्याय ) मोक्षप्राप्तीसाठीं ( शक्त्या ) योगबलानें ( देवस्य ) स्वप्रकाश व आनंदप्रद अशा ( सवितुः ) सर्वांतर्यामी परमेश्वराच्या ( सवे ) अनंत ऐश्वर्यामध्यें ( युक्तेन मनसा ) योगयुक्त शुद्ध अंतःकरणानें ( वयम् ) आम्ही सदोदित लीन व्हावें अशी सर्वांनीं मनांत इच्छा धरावी ॥ ३ ॥ ( स्वर्यतः ) शुद्ध भावानें व प्रेमानें योगाभ्यास करणाऱ्या ( देवान् ) विद्वान उपासकयोग्याच्या अंतःकरणांत ( सविता ) परमेश्वर ( युक्त्वाय ) प्रकाश उत्पन्न करून त्यांच्या मनाची तल्लीनता करतो. तसेंच ( धिया ) स्वकृपेच्या आधारानें त्यांच्या बुद्धिमध्यें ( बृहत् ज्योतिः ) अनंत तेज प्रकाश व ( दिवम् ) दिव्य आत्मस्वरूप ( प्रसुवाति ) प्रकाशित करतो. तसेंच ( करिष्यतः ) सत्यभक्ति करणाऱ्या उपासकांनां ( सविता ) परमेश्वर मोक्ष देऊन आनंदित ठेवतो ॥ ४ ॥ उपासनेविषयीं उपदेश करणारे व ऐकणारे या दोघांनां परमेश्वर सांगतो कीं, ब्रह्म पूर्व्यम् ) ज्यावेळीं असे दोघेहि पुराण ब्रह्माची (नमोभिः) सत्कार व नमनपूर्वक उपासना करतात त्यावेळीं त्यांनां ब्रह्म पुढें लिहिल्याप्रमाणें आशिर्वाद देतें ( वाम् ) तुमची (श्लोकः) सत्कीर्ति ( विऐतु ) सर्वत्र पसरो. ज्याप्रमाणें ( सूरेः ) विद्वान मनुष्यांचें ( पथ्येव ) धार्मिक वर्तन असतें त्याप्रमाणें त्यांची कीर्ति दिगंतरीं होवो. ( ये. ) जे याप्रमाणें उपासना करतात व जे ( अमृतस्य ) मोक्षस्वरूप परमेश्वराचे ( पुत्राः ) आज्ञाधारक सेवक बनतात त्यांनांच ( दिव्यानि ) प्रकाशमय अशीं उत्तम कर्में करतां येतात व ( धामानि ) सुखमय जन्म व आनंदमय स्थानें (आतस्थुः ) प्राप्त होतात. ते ( विश्वे ) सर्व ( वाम् ) तुम्हां-उपासकांनां ( शृण्वन्तु ) जाणोत. अर्थात उपदेश करणाऱ्यांनां सर्वांनीं ओळखून त्यांच्या जवळ जावें. याप्रमाणें करणाऱ्यांवर ( युजे ) मी परमेश्वर कृपा करतों ॥ ५ ॥

**सीरा॑ युञ्जन्ति क॒वयो॑ यु॒गा वित॑न्वते॒ पृथ॑क् ॥ धीरा॑ दे॒वेषु॑ सुम्न॒या ॥ ६ ॥ यु॒नक्त॒ सीरा॒ वि यु॒गा त॑नुध्वं कृ॒ते योनौ॑ वपते॒ह बीज॑म् ॥ गि॒रा च॑ श्रु॒ष्टिः सभ॑रा॒ अस॑न्नो॒ नेदी॑य॒ इत्सृ॒ण्यः॑ प॒क्वमेया॑त् ॥ ७ ॥**

यजु० २ मं० १७।१८

( कवयः ) विद्वान लोक, सूक्ष्म दृष्टीचे लोक, योगी लोक, ( धीराः ) ध्यान करणारे योगी ( पृथक् ) अनेक प्रकारांनीं ( सीराः ) शरीरांतील नाड्यांमध्यें ( युञ्जन्ति ) योग करतात अर्थात त्या नाड्यांमध्यें प्राणाला नेऊन परमेश्वराला जाणण्याचा अभ्यास करतात. तसेंच ( युगाः ) योगयुक्त कर्मे ( वितन्वते ) नेहमीं करतात असे महात्मे ( देवेषु ) विद्वानांत गणले जाऊन ( सुम्नया ) आनंदांत सदैव असतात व ते परमानंदमय मोक्ष सहज मिळवितात. ॥ ६ ॥ हे योगीजनहो, तुम्हीं उपासना व योगसाधन करून परमानंद ( युनक्त ) मिळवा व ( वि तनुध्वम् ) उत्तम कर्मे करून मोक्षसुखहि मिळवा. ( युगाः ) उपासनायुक्त कर्मे करून ( सीराः ) प्राण व नाडी यांची योजना परमेश्वराच्या उपासनेंत करा. ( कृते ) याप्रमाणें केलें असतां, ( योनौ ) शुद्ध अंतःकरणामध्यें ( बीजं वपते ) विज्ञानरूपीं बीज रुजत घातलें जातें. त्याच प्रमाणें ( गिरा ) वेदविद्या ( युनक्त ) शिका. असें केलें असतां, परमेश्वराच्या अनुग्रहानें ( श्रुष्टिः ) अत्यंत शीघ्र ( नः ) आम्हां सर्वांच्या ( नेदीयः ) अत्यंत सन्निध योगाचें फल ( असत् ) असेल. ( पक्वम् ) शुद्ध आनंदयुक्त असें तें योगाचें फल ( एयात् ) सर्व तऱ्हेनें प्राप्त होईल. ( इत् सृण्यः ) उपासनापूर्वक योगाच्या वृत्ति सर्व क्लेश दूर करणाऱ्या होतील. त्याचप्रमाणें त्या ( सभराः ) वृत्तींपासून शांति उत्पन्न होईल. याप्रमाणें अनंत फलें देणारा योग तुम्ही करा व परमात्म्यामध्यें लीन व्हा. ॥ ७ ॥ [ या मंत्रांतील शब्दांचे अर्थ—"**श्रुष्टीति क्षिप्रनामाशु अष्टीति** ॥ निरु० ६।१२ ॥" "**द्विविधा सृणिर्भवति भर्ता च हन्ता च** ॥ निरु० १३।५ ॥ श्रुष्टि म्हणजे क्षिप्र, जलद किंवा लवकर. सृणि म्हणजे पोषक किंवा नाशक. ]

**अष्टाविंशानि शिवानि शग्मानि सहयोगं भजन्तु मे ॥ योगं प्रपद्ये क्षेमं च क्षेमं प्रपद्ये योगं च नमोऽहोरात्राभ्यां नमोऽस्तु ॥८॥**

अथर्व० १९।१।८।२ ॥

हे परमेश्वर! तुझ्या कृपेकरून ( अष्टाविंशानि ) दहा इंद्रियें, दहा प्राण, मन, बुद्धि चित्त, अहंकार, विद्या, स्वभाव, शरीर व बल हीं अठ्ठावीस अंगें ( शिवानि ) कल्याणकारक होवोत. हीं ( शग्मानि ) सुखकारक होऊन ( अहोरात्राभ्याम् ) सर्व दिवस व रात्रीमध्यें परमेश्वराची उपासना-हाच व्यवहार ( मे ) माझ्याकडून ( भजन्तु ) करवोत. ( योगं प्राप्य ) हे परमेश्वरा! तुझ्या कृपेनें माझा योग सिद्ध होऊन ( क्षेमं प्रपद्ये )

माझें कल्याण होवो. तसेंच ( क्षेमं प्राप्य ) मला सुख मिळून ( योगं प्रपद्ये ) मजकडून योग साध्य होवो. ज्याअर्थी तूं आमचा सहाय्यकारी आहेस त्या अर्थी तुला आमचा नमस्कार असो. ॥ ८ ॥

**भूयानरात्याः शच्याः पतिस्त्वमिन्द्रासि विभूः प्रभूरिति त्वोपास्महे वयम् ॥ ९ ॥ नमस्ते अस्तु पश्यत पश्यं मा पश्यत ॥ १० ॥ अन्नाद्येन यशसा तेजसा ब्राह्मणवर्चसेन ॥ ११ ॥**

—अथर्व० १३।४ मं० ४७।४८।४९ ॥

( इन्द्र ) हे परमेश्वरा! तूं ( शच्याः ) प्रजा, वाणी व कर्म यांचा ( पतिः ) पति आहेस. त्याचप्रमाणें तूं ( भूयान् ) अत्यंत महान् आहेस. ( अरात्याः ) सर्व शत्रुभूत दुष्ट वाणी व कर्म यांचा नाशक आहेस. तूं ( विभूः ) व्यापक, ( प्रभूः ) स्वामि व समर्थ आहेस. हे तुझे गुण लक्षांत ठेवून ( वयम् ) आम्हीं सदैव ( त्वा ) तुझी ( उपास्महे ) उपासना करतों. ॥ ९ ॥ [ या मंत्रांतील कांहीं शब्दांचे अर्थ—"**शचीति वाचोनामसु** पठितं । निघं० १।११ ॥" तथा "**कर्मणां नामसु शचीति** पठितं ॥ निघं० २।१ ॥" तथा "**प्रजानामसु शचीति** पठितं० ॥ निघं० ३।९ ॥" या निघण्टूच्या आधारानें "शची" शब्दाचे अर्थ "प्रजा, कर्म व वाणी" असे होतात. ] ॥ ९ ॥ ईश्वर उपासकांनां सांगतों कीं, उपासना करण्याच्या पद्धतीनें ( मा ) मला-परमेश्वराला ( पश्यत ) तुम्हीं पहावें. उपासकांनीं मनःपूर्वक खालीं दिल्याप्रमाणें मनोवृत्ति ठेवावी. हे परमेश्वर! हे अनंत विद्यायुक्त! (नमस्ते अस्तु) तुला माझा नमस्कार असो. ॥ १० ॥ हे परमेश्वरा! तूं आमच्यावर ( पश्य ) कृपादृष्टि ठेव. ( अन्नाद्येन ) अन्नादिक राज्यैश्वर्य, (यशसा) यश, (तेजसा) तेज, ( ब्राह्मणवर्चसेन ) पूर्णविद्या यांनीं आम्हांला युक्त कर. आम्ही ( त्वा० ) तुझी उपासना करतों. ॥ ११ ॥

**अम्भो अमो महः सह इति त्वोपास्महे वयम् ॥ १२ ॥ अम्भो अरुणं रजतं रजः सह इति त्वोपास्महे वयम् ॥ १३ ॥ उरुः पृथुः सुभूर्भुव इति त्वोपास्महे वयम् ॥ १४ ॥ प्रथो वरो व्यचो लोक इति त्वोपास्महे वयम् ॥ १५ ॥**

—अथर्व १३।४ मं–१०।११।१२।१३ ॥

हे परब्रह्मन्! तूं (अम्भः) व्यापक, शान्तिस्वरूप, किंवा जलाप्रमाणें प्राणाचाहि प्राण आहेस. तसेंच तूं (अमः) ज्ञानस्वरूप, (महः) पूज्य, सर्वांहून महत्तर (सहः) व सहनस्वभाव आहेस, अशा (त्वा) तुझी (वयम्) आम्ही (इति) या प्रकारानें सतत (उपास्महे) उपासना करितों ॥ १२ ॥ हे परमात्मन्! तूं (अम्भः) सर्वांतर्यामी, (अरुणम्) प्रकाशस्वरूप, (रजतम्) आनंदस्वरूप किंवा प्रीति करण्यास योग्य, (रजः) सर्व लोकांतील ऐश्वर्यानें युक्त, (सहः) सहनशक्तिप्रद आहेस; अशा तुझीच आम्हीं उपासना करितों. तुला सोडून दुसऱ्या कोणाचीहि आम्ही उपासना करणार नाहीं. ॥ १३ ॥ हे परमेश्वर, तूं (उरुः) सर्वशक्तिमान्,(पृथुः) अतिविस्तृत व व्यापक (सुभूर्भुवः) पूर्णपणें सर्व पदार्थांत असणारा, अर्थात् आकाशाप्रमाणें सर्वगत आहेस असें जाणून आम्हीं तुझी उपासना करतों. ॥ १४ ॥ (प्रथः) सर्व जग उत्पन्न करणारा, प्रसिद्ध, (वरः) श्रेष्ठ, (व्यचः) विविध प्रकारचें सर्व जग पूर्णपणें जाणणारा, (लोकः) सर्वांना प्रकाश देणारा किंवा सर्वांनीं ज्ञानानें पाहण्यास योग्य असा तूं परमेश्वर आहेस तुझी आम्हीं अनन्य भावानें उपासना करितों ॥ १५ ॥

**युञ्जन्ति ब्रध्नमरुषं चरन्तं परितस्थुषः ॥ रोचन्ते रोचना दिवि ॥ १६ ॥**

ऋ० १।१।१।१ ॥

---

(१) आप्लृ=व्याप्तौ या धातूचें असुन् प्रत्ययान्त "अम्भः" हें पद आहे. (२) सुष्ठुतया सर्वेषु पदार्थेषु भवतीति सुभूः ॥

**अर्थ**—( १ ) जे विद्वान योगी लोक, (परि तस्थुषः) जगांतील सर्व पदार्थमात्रांनां ( चरन्तम् ) जाणणारा अर्थात् सर्वज्ञ, तसेंच ( अरुषम् ) अहिंसक अर्थात् करुणामय ( ब्रध्नम् ) विद्या, योग इत्यादिकांच्या अभ्यासापासून उत्पन्न होणाऱ्या प्रेमानंदाला वाढविणारा, अशा या महान् परमात्म्याशीं आत्म्याचा ( युञ्जन्ति ) योग करतात, अर्थात समाधि लावतात, ते ( रोचनाः ) आनंदामध्यें प्रकाशित होऊन-अर्थात् आनंदयुक्त होऊन-( दिवि ) प्रकाशात्मक परमेश्वरामध्यें ( रोचन्ते ) आनंदानें प्रकाशित होतात. दुसरा अर्थ-( २ ) ( चरन्तम् ) फिरणारा व ( अरुषम् ) अग्निमय असा हा ( ब्रध्नम् ) आदित्य आहे. त्याच्याशीं ( परि तस्थुषः ) सभोंवती असणारे सर्व गोल ( युञ्जन्ति ) आकर्षणानें युक्त होतात. हे सर्व गोल ( दिवि ) त्याच्याच प्रकाशामध्यें ( रोचनः ) प्रकाशित होऊन( रोचन्ते ) प्रकाशित झालेले दिसतात. तिसरा अर्थ—( ३ ) जे उपासक लोक, ( परितस्थुषः चरन्तम् ) सर्व पदार्थांत दिसणारा, ( अरुषम् ) सर्व मर्मांमध्यें असणारा, ( ब्रध्नम् ) सर्व अवयवांची वाढ करणारा असा जो प्राण आहे त्याची प्राणायामाच्या पद्धतीनें ( दिवि ) द्योतनात्मक परमेश्वरामध्यें स्थापना करून ( रोचनाः ) प्रेमयुक्त होतात व ( युञ्जन्ति ) योगाभ्यास करतात ते, मोक्षस्वरूप परमेश्वरामध्यें सदैव ( रोचन्ते ) प्रकाशित होतात. [ या मंत्रांतील कांहीं शब्दांचा अर्थ—"**मनुष्यनामसु तस्थुषः पञ्चजना** इति पठितम् ॥ निघं० ३।३ ॥" "तस्थुषः व पञ्चजनाः" हीं मनुष्यांचीं नांवें आहेत. तसेंच —"**असौ वा आदित्यो ब्रध्नोऽरुषोऽमुमेवास्मा आदित्यं युनक्ति स्वर्गस्य लोकस्य समृष्ट्यै** ॥ शत० कां० १३।२ ॥" "**आदित्यो ह वै प्राणो रयिरेव चन्द्रमा रयिर्वा एतत्सर्वं यन्मूर्तं चामूर्तं च तस्मान्मूर्तिरेव रयिः** ॥ प्रश्नोपनिषद् १।५ ॥" "ब्रध्न हें आदित्याचें नांव आहे" ' प्राण हाच सूर्य व साकार पदार्थ ती रयि होय." सायणाचार्यांनीं या मंत्राचा अर्थ "आदित्यपर" केला आहे. तो एकांशानें ठीक आहे, पण मोक्षमुल्लरानें या मंत्रांत "घोडा" असा "ब्रध्न" चा अर्थ करून फारच अर्थाचा अनर्थ केला आहे. तो त्याचा भ्रम आहे असें जाणावें. ]

---

## उपासना करण्याची रीति

उपासना करण्यास बसण्याची जागा निर्मळ, शुद्ध व दुर्गंधरहित असावी. अशा स्वच्छ जागीं बसून, मनाची समाधानवृत्ति राखून, सर्व इंद्रियांची व मनाची एकाग्रता करून सच्चिदानंदस्वरूप, सर्वांतर्यामी, न्यायकारी अशा परमात्म्याचें चिंतन करावें. परमात्म्याशीं आत्म्याचा योग करून परमात्म्याची स्तुति व प्रार्थना योग्य रीतीनें करावी

व पुनः पुनः आपल्या आत्म्याचा बाह्यसंबंध सोडून त्याची परमात्म्याशीं संलग्नता होईल तितकी करावी. याविषयीं पतंजलिमुनींनीं केलेल्या योगसूत्रांमध्यें व त्यावरील वेदव्यासाच्या भाष्यामध्यें पुढें लिहिल्याप्रमाणें माहिती आढळते:—

**योगश्चित्तवृत्तिनिरोधः ॥ योगद० १।१।२॥**

उपासना करण्याच्यावेळीं किंवा व्यवहार करावयाच्या वेळीं परमेश्वराशिवाय इतर विषयांपासून व अधर्मव्यवहारांपासून मनाच्या वृत्ति रोंखून धरणें; हा योग समजावा.

**तदा द्रष्टुः स्वरूपे अवस्थानम् ॥१।१।३॥**

अशा रीतीनें इतर विषयांपासून मनाला मागें हटविलें म्हणजे अर्थातच त्या जीवात्म्याच्या मनोवृत्ति ( द्रष्टुः ) सर्वज्ञ परमेश्वराच्या स्वरूपामध्यें स्थिर होतात व

**वृत्तिसारूप्यमितरत्र ॥ ४ ॥**

इतर संसारांतील व्यवहारामध्यें उपासकाची वृत्ति फारच शांत, धर्माला अनुकूल, विद्या व विज्ञान यांनीं प्रकाशित, सत्यतत्वावर निष्ठा ठेवणारी, तीव्र व साधारण माणसांनां अशक्य. अशी अपूर्व वृत्ति होते. अशा तऱ्हेची वृत्ति योग व उपासना न करणाऱ्यांची होत नाहीं.

**वृत्तयः पञ्चतय्यः क्लिष्टाऽक्लिष्टाः ॥ ५ ॥ प्रमाण-विपर्यय विकल्प–निद्रा–स्मृतयः ॥ ६ ॥ तत्र प्रत्यक्षानुमानागमाः प्रमाणानि ॥ ७ ॥ विपर्ययो मिथ्याज्ञानमतद्रूपप्रतिष्ठम् ॥ ८ ॥ शब्दज्ञानानुपाती वस्तुशून्यो विकल्पः ॥ ९ ॥ अभावप्रत्ययालम्बनावृत्तिर्निद्रा ॥ १० ॥ अनुभूत विषयाऽसंप्रमोषः स्मृतिः ॥ ११ ॥ अभ्यासवैराग्याभ्यां तन्निरोधः ॥ १२ ॥ योगद. अ. १ पा. १**

**ईश्वरप्रणिधानाद्वा ॥ अ० १।१।२३॥**

मनाच्या पांच प्रकारच्या वृत्ति आहेत; व त्यांत क्लिष्ट व अक्लिष्ट ( क्लेशसहित व क्लेशरहित ) असे दोन भेद आहेत. (१) प्रमाण, (२) विपर्यय, (३) विकल्प, (४) निद्रा व (५) स्मृति हे ते पांच प्रकार होत. त्यांचे अर्थ पुढें दिल्याप्रमाणें

आहेत. (१) प्रत्यक्ष, अनुमान व शब्द याला **प्रमाण** असें म्हणतात; (२) **विपर्यय** म्हणजे मिथ्या ज्ञान किंवा एकाचे ठिकाणीं दुसऱ्याची कल्पना करणें; (३) **विकल्प** म्हणजे पदार्थमात्राविषयीं शाब्दिक ज्ञान असून तसा पदार्थ जगांत मुळींच नसणें; जसें शिंग असलेला मनुष्य, परीस, आकाशपुष्प इत्यादि; (४) अज्ञान व अविद्यान्धःकार ज्या वृत्तीमध्यें पूर्ण असतात अर्थात् ज्यामध्यें ज्ञानाचा अभाव असतो त्याला **निद्रा** असें म्हणतात. (५) अनुभव मिळालेल्या विषयाची विस्मृति न होतां जो मनामध्यें संस्कार राहतो त्याला **स्मृति** असें म्हणतात. अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें या वृत्ति ताब्यांत आणतां येतात; किंवा ईश्वराची भक्ति करण्यानें ही सिद्धि त्वकर प्राप्त होते. ईश्वराच्या ज्ञानयुक्त भक्तीनें मन शुद्ध होऊन आत्मा आदिकरून सर्व पदार्थांचें समर्पण करीत गेल्यानें मनुष्य समाधीच्या योग्य होतो.

---

## ईश्वराचें लक्षण.

**क्लेशकर्मविपाकाशयैरपरामृष्टः पुरुषविशेष ईश्वरः ॥**

**योगद० १।१।२४ ॥**

योद्धयांपासून उत्पन्न होणारें जय किंवा पराजयरूपी फळ जसें राजाला भोगावें लागतें, त्याप्रमाणें मनुष्यमात्रामध्यें अविद्या, गर्वादिक क्लेश, शुभाशुभकर्में, त्या कर्मांचीं फळें व त्यांच्यापासून उत्पन्न होणाऱ्या वासना हीं सर्व जरी अन्तःकरणांत असतात. तरी तीं पुरुषाच्या ठिकाणीं म्हणजे जीवात्म्याच्या ठिकाणीं आरोपीत होतात; म्हणून मनुष्याला फलभोक्ता असें म्हणतात. जो या क्लेशादिकांपासून पूर्ण निराळा, ज्याचा या भोगाशीं यत्किंचितहि संबंध नाहीं त्याला **ईश्वर** असें म्हणावयाचें. येथें कोणी म्हणतील कीं, (प्रश्न) ज्यांनां कैवल्यप्राप्ति झाली आहे, जे मुक्त झाले आहेत—त्यांमध्यें वरील अविद्यादि क्लेश नसल्यामुळें त्यांनां ईश्वर असें म्हणतां येईल कीं नाहीं? (उत्तर) नाहीं कारण, मुक्त होण्यापूर्वी ते बंधांमध्यें होते व पुढें केव्हांतरी त्यांची पुनरावृत्ति होऊन त्यांनां प्रवृत्तीमध्यें यावें लागणारच. तात्पर्य, तीनहि काळामध्यें ते मुक्त नसल्यामुळें त्यांनां ईश्वर असें म्हणतां येणार नाहीं. ईश्वर सदैव मुक्त आहे. तो कधींहि बद्ध होत नाहीं. ईश्वर सदैव मुक्त व सदैव त्याच्याजवळ पूर्णत्व व पूर्ण ऐश्वर्य असतें. कधींहि तें कमी होत नाहीं. तो सदैव पूर्ण उन्नतीवर आहे. ही गोष्ट शास्त्रावरून उघड होते कारण, शास्त्र व ईश्वरसत्व यांचा अगदीं निकट संबंध आहे ईश्वराहून कोणीहि मोठा नाहीं व कधींहि कोणीहि मोठा होऊं शकणार नाहीं. सर्वांत प्रत्येक संपत्तीची जी परमावधी ती ईश्वराजवळ

---

१. मनस्सत्येन शुद्धति.—मनु.-अर्थ-मन, सत्यज्ञान, कर्म व उपासना यांनीं शुद्ध होतें.

आहे. **अर्थात्** ज्याच्या ऐश्वर्याशीं दुसऱ्या कोणाच्याहि ऐश्वर्याचें साम्य किंवा अतिशयता होऊंच शकत नाहीं तो ईश्वर होय. तसेंच—

**तत्र निरतिशयं सर्वज्ञबीजम्** ॥ १।१।२५ ॥

तीनहि काळांत उत्पन्न होणाऱ्या ज्ञानाची परमेश्वरामध्यें पूर्णता आहे. म्हणूनच त्याला सर्वज्ञ असें म्हणतात. प्रत्येक ज्ञानाची परमेश्वराच्या ठिकाणीं परमावधि झालेली आहे. त्याच्याहून विशेष ज्ञाता किंवा त्याच्याइतका ज्ञाता कोणीहि नाहीं. त्या ज्ञानाचा उपयोग सर्व भूतांनां होत असतो व तेवढ्यासाठींच त्याचें ज्ञान आहे. तो कल्प, प्रलय व महाप्रलयामध्यें संसारी पुरुषांनां धर्मज्ञानाचा उपदेश करून त्यांचा उद्धार करतो. "**आदिविद्वान् निर्माण चित्तमधिष्ठाय कारुण्याद्भगवान् परमर्षिरासुरये जिज्ञासमानाय तन्त्रं प्रोवाच**"—पूर्ण विद्वान परमेश्वरानें जिज्ञासू मुनीला या तंत्राचा उपदेश केला असें पुष्कळ ठिकाणीं म्हटलेलें असतें. त्यावरूनहि उघड होतें कीं, जिज्ञासूला ज्ञान देणारा व त्यामध्यें स्फूर्ति उत्पन्न करणारा ईश्वरच आहे म्हणूनच त्याला सर्वांचा **गुरु** असें म्हणतात :—

**स एष पूर्वेषामपि गुरुः कालेनानवच्छेदात्** ॥१।१।२६॥

मनुष्यांतील गुरु अमूक एका कालीं होते व ते दुसऱ्या कालीं नव्हते असें म्हणतां येतें. पण परमेश्वर हा सर्वदा सर्वांचा गुरु आहे कारण, कालानें तो मर्यादित झालेला नाहीं. तसेंच—

**तस्य वाचकः प्रणवः** ॥ १।१।२७॥

प्रणव ( ओङ्कार ) हा ईश्वराचा वाचक आहे. ज्याप्रमाणें दिवा व प्रकाश यांचा नित्य संबंध आहे त्याचप्रमाणें ईश्वर व ओंकार यांचा वाच्य-वाचक संबंध नित्य आहे. परमेश्वराच्या इतर सर्व नांवांमध्यें "ओम्" हें एकच नांव पूर्ण आहे. इतर नांवें अन्य अर्थहि दाखवूं शकतात पण ओंकार केवळ परमेश्वराचाच वाचक आहे.

**तज्जपस्तदर्थभावनम्** ॥१।१।२८॥

प्रणवाचा जप करणें म्हणजे प्रणवानें दाखविला जाणारा जो ईश्वर त्याची भावना करणें होय. योगी लोक अशा रीतीनें परमेश्वराची भावना करतात म्हणूनच त्यांच्या मनाची एकाग्रता होते. याचें फल खालील श्लोकांत दिलें आहे-"**स्वाध्यायाद्योग-मासीत योगात्स्वाध्यायमामनेत् ॥ स्वाध्याययोगसंपत्त्या परमात्मा प्रकाशते** ॥ १ ॥" वेदाध्ययन व योगाभ्यास यांच्यायोगानें परमेश्वराविषयीं पूर्ण ज्ञान होतें.

## जपाचें फल.

**ततः प्रत्यक्चेतनाधिगमोऽप्यन्तराया भावश्च ॥१।१।२९ ॥**

परमेश्वराच्या चिंतनानें व्याधि, संशय इत्यादि विघ्नें होत नाहींत. स्वरूपाचें दर्शन होतें. ज्याप्रमाणें परमेश्वर हा पुरुष, शुद्ध, प्रसन्न, अनुपसर्ग असा आहे त्याचप्रमाणें तो बुद्धीनें जाणतां येण्यासारखा आहे. असें ध्यान करणाऱ्या पुरुषाला अनुभवानें वाटतें. मनाला त्रास उत्पन्न करणारीं विघ्नें नऊ आहेत. तीं येणें प्रमाणें.

**व्याधिस्त्यान संशय प्रमादालस्याविरतिभ्रान्तिदर्शनाल-ब्धभूमिकत्वानवस्थितत्वानि चित्तविक्षेपास्तेऽन्तरायाः ॥**

**योग १।१।३० ॥**

हीं नऊ विघ्नें चित्ताला चंचलादि विक्षिप्तपणा उत्पन्न करणारीं आहेत. चित्ताच्याच वृत्तींशीं यांचा दृढ संबंध आहे. चित्ताच्या वृत्तींबरोबरच यांची उत्पत्ति होते व यांच्या अभावीं चित्तवृत्तींत पूर्वोक्त चंचलादि विक्षेप रहात नाहींत. (१) शरीरांतील सप्तधातू, रस व इंद्रियें यांमध्यें विषमता उत्पन्न होऊन जे ज्वरादि रोग होतात त्या **व्याधि** होत; (२) **स्त्यान** म्हणजे कर्म करूं नये असें वाटणें; ( ३ ) असें होईल किंवा तसें होईल अशा प्रकारें कशाविषयींच निश्चय नसणें याला **संशय** असें म्हणतात. ( ४ ) समाधीच्या साधनांवर प्रीति नसणें व त्यांविषयीं योग्य विचार न करणें याला **प्रमाद** असें म्हणतात. ( ५ ) शरीर व मन यांत जडत्व उत्पन्न होऊन कांहीं करण्याविषयीं प्रवृत्ति न होणें याला **आलस्य** असें म्हणावें. ( ६ ) विषयोपभोगाची इच्छा असणें याला **अविरति** असें म्हणतात; ( ७ ) विरुद्धज्ञान होणें,—उलट ज्ञान होणें—याला **भ्रांतिदर्शन** असें म्हणावें. जसें जडालाच चेतन समजणें; ( ८ ) समाधिरूप भूमि न मिळणें याला **अलब्धभूमिकत्व** असें म्हणतात; ( ९ ) प्राप्त झालेल्या योगाभ्या-सांतील भूमीवर चित्ताची स्थिरता न होणें याला **अनवस्थितत्व** असें म्हणतात. या नऊ प्रकारांनां योगाचीं विघ्नें, योगाचे शत्रू किंवा योगांतील मळ असें म्हणतात. या नऊ विघ्नांचीं फलें पुढें दिलीं आहेत.:—

**दुःखदौर्मनस्याङ्गमेजयत्व श्वासप्रश्वासा विक्षेप सहभुवः ॥**

**योग० ॥१।१।३१॥**

( १ ) आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक दुःखें कीं, ज्यांच्या प्रतीकारार्थ प्राणिमात्रांची खटपट आहे त्या सर्वांचा दुःखांत अंतर्भाव होतो. ( २ ) इच्छेप्रमाणें न झाल्यामुळें चित्ताचा जो क्षोभ होतो त्याला **दौर्मनस्य** असें म्हणतात. ( ३ ) शरीराच्या कंपाला **अङ्गमेजयत्व**-अशक्तपणा-असें म्हणतात. ( ४ ) बाह्य वायू किंवा जो प्राणवायू आंत घेतला जातो त्याला **श्वास** व ( ५ ) आंतील वायू जो बाहेर सोडला जातो त्याला **प्रश्वास** असें म्हणतात. हे पांच प्रकार चंचल चित्तालाच होतात; ज्याच्या चित्ताची स्थिरता होऊन समाधि झाली आहे त्याला हे विकार होत नाहींत. या विकारांमुळें समाधि लागण्यास अडथळा येतो म्हणून त्यास उपाय—

## तत्प्रतिषेधार्थमेकतत्वाभ्यासः ॥१।१।३२॥

चंचलता हा चित्तांतील दोष नाहींसा व्हावा म्हणून एकतत्वाचें अवलंबन केलें पाहिजे. ज्याचें प्रत्येकक्षणीं चित्त भिन्न भिन्न प्रत्यय आणून देतें त्याचें चित्त एकाग्र झालें असें कधींहि म्हणतां येणार नाहीं. ज्यावेळीं इतर सर्व विषय सोडून एकाच ठिकाणीं तें पुष्कळ वेळ स्थिर होतें त्यावेळीं तें एकाग्र झालें असें म्हणतात. कोणी म्हणेल कीं, मनांमध्यें अनंत विचार सारखे येणें हेंच चित्त एकाग्र झाल्याचें लक्षण आहे, कारण विचारप्रवाह हाच चित्ताचा धर्म आहे. हें म्हणणें चूक आहे कारण, तशा वेळीं चित्ताची वृत्ति क्षणिक असते. क्षणिक चित्तवृत्तीला एकाग्रता असें कधींहि म्हणतां येणार नाहीं. क्षणिक चित्तवृत्ति हीच चंचलता होय. ज्या अर्थी चित्त एक आहे व तें अनेक कार्यें करूं शकतें त्या अर्थी त्या चित्ताला एकाच अर्थामध्यें स्थिर करणें हें एकाग्रता करणें व अनेक अर्थांकडे त्याला लावणें म्हणजे त्याला चंचल करणें; असें म्हणण्यास हरकत नाहीं. चित्त एक आहे कीं, अनेक आहेत हा वाद येथें उपस्थित होण्यासारखा आहे. त्याला उत्तर असें कीं, चित्त एकच आहे, कारण, चित्ताच्या अनेक अवस्थांमध्येंहि "मीपणा" सारखाच असतो. कोणत्याहि अवस्थेमध्यें मीपणाची कल्पना एकच असते. मन कितीहि चंचल झालेलें असो, चित्त शांत असतानां जो "मी" तोच चित्त उचंबळूं लागलें असतां "मी" आहे असेंच वाटतें. ज्या अर्थी हा प्रत्यय सार्वत्रिक आहे त्याअर्थीं "चित्त एकच आहे" हें ठरविण्यास जास्त पुराव्याची गरज नाहीं. म्हणून चित्त एकच आहे व त्याला स्थिर करण्यास एकाच तत्वाचें अवलम्बन आवश्यक आहे. चित्ताची नेहमीं प्रसन्नता राहण्यास काय करावें तें पुढील सूत्रांत सांगितलें आहे :—

**मैत्री करुणा मुदितोपेक्षाणां सुखदुःखपुण्यापुण्यविषयाणां भावनातश्चित्तप्रसादनम् ॥ २१ ॥ १।१।३३ ॥**

सुखी प्राण्याशीं मैत्री, दुःखितांवर कृपादृष्टी, पुण्यात्मे जे असतील त्यांच्याशीं प्रसन्नता व पापी लोकांची उपेक्षा करावी. असें केल्यानें शुद्ध धर्म मनामध्यें येऊन मन स्थिर होतें.

**प्रच्छर्दन विधारणाभ्यां वा प्राणस्य ॥ २२ ॥**

नाकाच्या वाटेनें आंतिल वायूला प्रयत्नानें बाहेर टाकणें याला प्रच्छर्दन असें म्हणतात. प्रच्छर्दन व विधारण केल्यानें प्राणायाम होतो. वमन करून जसें पोटांतील अन्न काढून टाकतात त्याचप्रमाणें जोरानें आंतील वायूचें वमन करणें व तो पूर्णपणें बाहेर गेल्यावर यथाशक्ति त्याला बाहेरच ठेवणें—जितका वेळ ठेवतां येईल तितका वेळ बाहेर ठेवणें—याला प्राणायाम म्हणतात असें केल्यानें चित्त स्थिर होतें.

**योगाङ्गानुष्ठानादशुद्धिक्षये ज्ञानदीप्तिराविवेकख्यातेः २३ यो० १।२।२८ ॥**

उपासना व योगांचीं अंगें यांचें अनुष्ठान यथावत् करण्यानें प्रतिदिवशीं अज्ञानाचा नाश होऊन ज्ञान वाढूं लागतें. ज्ञान वाढतां वाढतां शेवटीं मोक्षाचीहि प्राप्ति होते.

**यमनियमासन प्राणायाम प्रत्याहार धारणाध्यान समाधयोऽष्टावङ्गानि ॥ २४ ॥ तत्राहिंसासत्यास्तेय ब्रह्मचर्यापरिग्रहा यमाः ॥ २५ ॥ योग० १।२।२९–३० ॥**

( १ ) यम, ( २ ) नियम, ( ३ ) आसन, ( ४ ) प्राणायाम, ( ५ ) प्रत्याहार ( ६ ) धारणा, ( ७ ) ध्यान व ( ८ ) समाधि हीं योगाचीं आठ अंगें आहेत. ( १ ) अहिंसा, ( २ ) सत्य, ( ३ ) अस्तेय, ( ४ ) ब्रह्मचर्य व ( ५ ) अपरिग्रह हे पांच यम होत. ( १ ) कोणत्याहि भूतमात्राला–प्राणिमात्राला कोणत्याहि तऱ्हेनें न दुखवणें याचें नांव **अहिंसा**. कोणाहि बरोबर वैर न करतां सर्वांबरोबर मैत्रीनें वागणें हीच अहिंसा. पुढचे जे यम नियमाचे भेद आहेत त्यांमध्यें अहिंसामूल आहे. अहिंसेची सिद्धि झाली तरच पुढच्याची सिद्धि होते. अहिंसेचे स्पष्ट रूपानें प्रतिपादन

व्हावें व न समजतांहि जी हिंसा होते त्या हिंसेचाहि प्रतिकार करतां यावा म्हणून ज्या इतर खटपटी करावयाच्या असतात त्यांविषयीं म्हटलें आहे.:—

**स खल्वयं ब्राह्मणो यथा यथा व्रतानि बहूनि समादित्सते तथा तथा प्रमादकृतेभ्यो हिंसानिदानेभ्यो निवर्तमानस्तामेवावदातरूपामहिंसां करोति ।**

(१) पुष्कळ व्रतें व नियम करून अहिंसा पूर्णपणानें साधतात. (२) जसें ज्याविषयीं आपणांस ज्ञान असेल तसेंच त्याविषयीं मानणें व तसेंच भाषण करणें. फसवण्याच्या किंवा नुकसान करण्याच्या उद्देशानें असत्य भाषण करतात; या असत्य भाषणापासून पुष्कळांचा तोटा होतो म्हणून असत्य भाषण हें महत्पाप मानलेलें आहे. म्हणून सर्वांनीं **सत्यभाषण** करावें. ( ३ ) दुसऱ्याच्या द्रव्याचा अधर्मानें स्वीकार करणें ही चोरी व चोरी न करणें हें **अस्तेय** होय. दुसऱ्याची संपत्ति अधर्मानें मिळवण्याची इच्छा कधींहि कोणीहि धरूं नये. ( ४ ) उपस्थ इंद्रियांचा संयम करणें याला **ब्रह्मचर्य** असें म्हणतात. ( ५ ) विषय मिळविणें, त्यांचें रक्षण करणें, त्यांच्याशीं संग करणें इत्यादिकांमध्यें हिंसादि दोष होतात हें जाणून विषय व अभिमानादिक दोष सोडणें याचें नांव **अपरिग्रह** होय.

**शौचसंतोषतपःस्वाध्यायेश्वर प्रणिधानानि नियमाः ॥ २६ ॥**

( १ ) जलादिक साधनांनीं बाह्यशुद्धि करणें व द्वेष, प्रीति, असत्य इत्यादि मलांचा त्याग करून अंतःशुद्धि करणें याला "**शौच**" असें म्हणतात. ( २ ) योग्य रीतीनें धर्माचें अनुष्ठान करून मनाची प्रसन्नता संपादन करणें याला "**संतोष**" असें म्हणतात, ( ३ ) धर्माचें अनुष्ठान, किंवा प्रणवाचा अर्थ भावनेसह जप करणें याला "**तप**" असें म्हणतात. ( ४ ) वेदाध्ययन व वेदांचें अध्यापन करणें याला "**स्वाध्याय**" असें म्हणतात. ( ५ ) परमेश्वराला आत्मा आदिकरून सर्व पदार्थांचें समर्पण करणें याला **ईश्वरप्रणिधान** असें म्हणतात. हे उपासना करण्याचे पांच नियम आहेत. आतां पांच यम व पांच नियम यांच्या योग्य आचरणानें काय काय फलें मिळतात तें अनुक्रमानें सांगतात.:—

**१ अहिंसाप्रतिष्ठायां तत्सन्निधौ वैरत्यागः ॥ २७ ॥**

**२ सत्यप्रतिष्ठायां क्रियाफलाश्रयत्वम् ॥ २८ ॥**

३ अस्तेयप्रतिष्ठायां सर्वरत्नोपस्थानम् ॥ २९ ॥
४ ब्रह्मचर्यप्रतिष्ठायां वीर्यलाभः ॥ ३० ॥
५ अपरिग्रहस्थैर्ये जन्मकथन्तासंबोधः ॥ ३१ ॥
६ शौचात्स्वांगजुगुप्सा परैरसंसर्गः ॥ ३२ ॥
७ सत्वशुद्धिसौमनस्यैकाग्रेन्द्रियजयात्मदर्शन
योग्यत्वानि च ॥ ३३ ॥
८ सन्तोषादनुत्तमसुखलाभः ॥ ३४ ॥
९ कायेन्द्रियसिद्धिरशुद्धिक्षयात्तपसः ॥ ३५ ॥
१० स्वाध्यायादिष्टदेवतासंप्रयोगः ॥ ३६ ॥
११ समाधिसिद्धिरीश्वरप्रणिधानात् ॥ ३७ ॥

योग० द० १।१ सू० ३५ पासून ४५

( १ ) ज्याच्या अंतःकरणांत सर्व प्रकारची अहिंसा पूर्णपणें बाणली असेल त्याच्या जवळ जर कोणी हिंसाधारण करणारा पुरुष किंवा प्राणी गेला तर त्याचीहि बुद्धि अहिंसामय होते. ( २ ) ज्याच्या मनामध्यें सत्य पूर्णपणें बाणलें असेल त्याणें इच्छिलेलें योग्य कार्य सफल होतें. ( ३ ) ज्याच्या मनांतून चोरी करण्याची वासना पूर्णपणें कायमची गेलेली असते त्याला उत्तम उत्तम पदार्थ पाहिजे तेव्हां प्राप्त होतात. ( ४ ) बाल्यावस्थेंत ब्रह्मचर्य राखणें,ऋतुगामी होऊन तारुण्यांत ब्रह्मचर्य पाळणें व परस्त्रीगमनादिकांचा पूर्णत्याग सदैव करणें याला ब्रह्मचर्यपरिपालन असें म्हणतात. असें जो पूर्णपणें करतो त्याच्यामध्यें बुद्धीची व शरीराची शक्ति वाढत जाते. ( ५ ) विषयावरील आसक्ति सोडली असतां, आपण जन्म घेऊन कां व कसे आलों व आपणास काय करणें आहे याचा बोध होतो. ( ६ ) बाह्य व अंतर्यामींची शुद्धि केल्यापासून शरीरें अत्यंत मलीन असतात अशी खात्री होते, व तो दुसऱ्या शरीरांशीं आपला संबंध ठेवूं इच्छित नाहीं. ( ७ ) तसेंच शौचापासून अंतःकरणशुद्धि, मनाची प्रसन्नता, एकाग्रता, इंद्रियजय व आत्म्याचें ज्ञान हींहि फलें मिळतात. ( ८) धर्मानुष्ठानानें प्राप्त होणारा संतोष हाच सर्वांत उत्तम संतोष होय. तेंच सर्वांत उत्तम सुख होय. ( ९ ) तप करण्यानें सर्व प्रकारच्या मलांचा नाश होतो व शरीर व इंद्रियें शुद्ध होऊन

निरोगी होतात. ( १० ) स्वाध्यायाचें अध्ययन केल्यानें परमेश्वराचें ज्ञान होतें व मुक्ति लवकर मिळते. ( ११ ) सर्व ईश्वरास अर्पण केल्यानें समाधीची सिद्धि लवकर होते. याप्रमाणें यम व नियम यांचीं फलें आहेत. यम व नियम यांचा अगदीं निकट संबंध आहे. शुद्धीसाठीं अहिंसा अवश्यक आहे, संतोषाला सत्याची अपेक्षा आहे इत्यादि विचार करून जाणावें.

**स्थिरसुखमासनम् ॥ ३८ ॥**

**ततो द्वन्द्वानभिघातः ॥ ३९ ॥**

योग. १।२ सू. ४६ । ४८ ॥

पद्मासन, वीरासन, भद्रासन, स्वस्तिक, दण्डासन, पर्यंक, क्रौंचनिषदन, हस्तिनिषदन, उष्ट्रनिषदन, समसंस्थान इत्यादि अनेक आसनें आहेत. ज्याणें शरीरामध्यें स्थिरता येते व सुख होतें त्याला आसन असें म्हणतात. आसनाची योग्य रीतीनें सिद्धि झाली म्हणजे ऊष्ण, शीत इत्यादि द्वंद्वांपासून त्रास होत नाहीं.

**तस्मिन्साति श्वासप्रस्वासयोर्गतिविच्छेदः प्राणायामः ॥ ४० ॥ स तु बाह्याभ्यन्तरस्तम्भवृत्तिर्देशकालसङ्ख्याभिः परिदृष्टो दीर्घसूक्ष्मः ॥ ४१ ॥ बाह्याभ्यन्तरविषयापेक्षी चतुर्थः ॥ ४२ ॥ योग० १।२। सू. ४९।५०।५१ ॥**

आसनाची सिद्धि झाली म्हणजे श्वास व प्रश्वास यांचा विरोध करावा. बाह्यवायू आंत घेतला जातो तो श्वास व आंतील बाहेर जातो तो प्रश्वास होय. यांच्या गतींचा निरोध करणें याला "**प्राणायाम**" असें म्हणतात. प्राणायामाचे चार भेद आहेत. ( १ ) बाह्यवृत्ति, ( २ ) अभ्यंतरवृत्ति, ( ३ ) स्तंभवृत्ति व ( ४ ) बाह्याभ्यंतरापेक्षी हे प्राणायामाचे चार भेद आहेत. कांहीं लोक हाताच्या बोटांनीं नाक दाबून धरतात व प्राणायाम केला असें समजतात पण ती तऱ्हा घातक आहे. त्याप्रमाणें कोणींहि करूं नये. प्राणायाम करण्याच्या पूर्वीं बाह्य व अभ्यंतर अंगांमध्यें शांति व स्थिरता येणें आवश्यक आहे. शारिरीक व मानसिक चंचलता दूर झाली व सर्व अवयव शांत असले म्हणजे प्राणायामास सुरुवात करावी. ( १ ) आंतील वायूला बाहेर घालवून त्याला बाहेरच रोंखून धरणें व यथाशक्ति त्याला आंत येऊं न देणें याला "**बाह्यवृत्ति**" प्राणायाम असें म्हणतात. ( २ ) बाहेरील श्वास आंत घेऊन त्याचा आंतच यथाशक्ति निरोध करणें याला "**अभ्यन्तरवृत्ति**" प्राणायाम असें म्हण-

तात. ( ३ ) आंत व बाहेर असणाऱ्या श्वास व प्रश्वासांनां जेथल्या तेथें रोखून धरणें याला "**स्तम्भवृत्ति**" प्राणायाम असें म्हणतात. ( ४ ) आंतील वायू बाहेर गेला असतां, त्याचा तेथेंच निरोध करणें व नंतर बाहेरच्या वायूला आंत घेऊन त्याचा आंत निरोध करणें, तात्पर्य बाह्यवृत्ति व अभ्यन्तरवृत्ति यांचा अभ्यास करणें याला "**बाह्याभ्यन्तरापेक्षी**" प्राणायाम असें म्हणतात. तिसऱ्या प्रकारच्या प्राणायामामध्यें दोनहि ठिकाणचे वायू जेथल्या तेथें ठेवले जातात. आश्चर्यचकित झालेल्या मनुष्याचे ज्याप्रमाणें बाह्य व अभ्यंतर वायू एकदम स्तंभित होतात त्याप्रमाणें करणें हा तिसरा प्राणायाम होय. तिसऱ्यांत व चवथ्यांत भेद आहे तो हाच होय. ( यांमध्यें देश, काल व संख्या यांनीं प्रत्येकीं दीर्घ व सूक्ष्म असे दोन भेद आहेत. ते योग्य गुरूकडून जाणावे कारण, प्राणायाम योग्य रीतीनें केला असतां अनंत लाभ होतो पण त्याची रीति चुकली असतां फार अपघात होतात. म्हणून योग्य मनुष्याकडूनच प्राणायामाचा अभ्यास करावा. ) प्राणायामाचा योग्य अभ्यास केल्यानें पुढील फल मिळतें.:—

**ततः क्षीयते प्रकाशावरणम् ॥ ४२ ॥**

**धारणासु च योग्यता मनसः ॥ ४३ ॥**

प्राणायामाच्या योगानें परमेश्वराचा प्रकाश आत्म्यावर पडूं लागतो व अज्ञानरूप आवरणाचा नाश होत जातो. प्राणायामाच्या योगानें मनाची धारणाशक्ति वाढते. प्रत्याहाराविषयीं पुढील सूत्रें आहेत:—

**स्वविषयासंप्रयोगे चित्तस्य स्वरूपानुकार इवेन्द्रियाणां प्रत्याहारः ॥ ४४ ॥ ततः परमावश्यतेन्द्रियाणाम् ॥ ४५ ॥**

योग. १।२ सू. ५४।५५ ॥

चित्ताचा जय झाल्यानंतर–मन ताब्यांत आल्यावर–तें परमेश्वरस्मरणाशिवाय अन्य विषयांमध्यें जात नाहीं; व मन असें स्थिर झालें म्हणजे इतर इंद्रियेंहि विषयांपासून दूर राहतात. या स्थितीला "**प्रत्याहार**" असें म्हणतात. प्रत्याहाराच्या योगानें सर्व इंद्रियें आपल्या स्वाधीन होतात. पुढील सूत्रांत धारणेविषयीं सांगितलें आहे:—

**देशबन्धश्चित्तस्य धारणा ॥ ४६ ॥**

नाभिचक्र, हृदयपुण्डरीक, मूर्धा, नासिकाग्र, जिव्हाग्र इत्यादि ठिकाणीं चित्ताची

स्थिरता करणें किंवा बाह्य विषयांमध्यें चित्ताची स्थिरता करणें याला "**धारणा**" असें म्हणतात.

**तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम् ॥ ४७ ॥**
**तदेवार्थमात्रनिर्भासं स्वरूपशून्यमिव समाधिः ॥ ४८ ॥**
**त्रयमेकत्रसंयमः ॥ ४९ ॥ योग. १।३ सू. ३–४ ॥**

धारणा झाल्यानंतर ध्येय जो परमात्मा त्याचाच प्रत्यय प्रवाहरूपानें एकसारखा येणें व दुसरें कांहींहि भान नसणें याला *ध्यान असें म्हणावें. ध्यानाच्या वेळीं ध्येय, ध्यान करणारा व ध्यान या त्रयीचें ज्ञान असतें. पण हेंच पुढें वाढत गेलें म्हणजे परमेश्वर स्वरूपांतील आनंदाशिवाय दुसरा प्रत्ययच येत नाहीं. स्वरूपाचें भान नाहींसें होणें याला "**समाधि**" असें म्हणतात. धारणा, ध्यान व समाधि यांनां **संयम** असें म्हणतात.

---

## उपासनेविषयीं उपनिषदांतील प्रमाणें.

---

**नाविरतो दुश्चरितान्नाशान्तो नासमाहितः नाशान्तमानसो वापि प्रज्ञानेनैनमाप्नुयात् ॥ कठोप. २।२४॥**

जों पर्यंत मनुष्य–दुष्टवासना, दुराचरण, अशांति, चंचलता इत्यादि दुर्गुणांपासून दूर होणार नाहीं, तोंपर्यंत केवळ शाब्दिक अध्ययन जरी त्याणें पुष्कळ केलें, तथापि त्याला परमेश्वरविषयक ज्ञान होणार नाहीं. ( उपासनेनें वरील दुर्गुण दूर होतात. )

**तपःश्रद्धेये ह्युपवसन्त्यरण्ये शान्ता विद्वांसो भैक्ष्यचर्य्यां चरन्तः ॥ सूर्य्यद्वारेण ते विरजः प्रयान्ति यत्रामृतः स पुरुषो ह्यव्ययात्मा ॥ २ ॥**

जे धर्माचरणरूप तप श्रद्धापूर्वक करून हृदयरूपी शुद्ध वनामध्यें स्थिर होतात, तसेंच वेदादिकांचें अध्ययन करून भैक्ष्यचर्यरूप कर्म करतात व जे सर्व दोषांपासून

* ध्यानंनिर्विषयमन. सांख्य. परमात्म्यावांचन दुसरें कशाचेंहि भान न होणें.

दूर राहतात; ते ( सूर्यद्वारेण ) प्राणाच्याद्वारानें परमात्म्यापर्यंत जातात व त्या परम-पुरुषाच्या ठिकाणीं असणाऱ्या मोक्षसुखाचा पूर्णपणें अनुभव घेतात.

अथ यदिदमस्मिन् ब्रह्मपुरे दहरं पुण्डरीकं वेश्म दहरोऽस्मिन्नन्तराकाशस्तस्मिन् यदन्तस्तदन्वेष्टव्यं तद्वाव विजिज्ञासितव्यमिति ॥ ३ ॥ तं चेद्ब्रूयुर्यदिदमस्मिन् ब्रह्मपुरे दहरं पुण्डरीकं वेश्म दहरोऽस्मिन्नन्तराकाशः किंतदत्र विद्यते यदन्वेष्टव्यं यद्वावविजिज्ञासितव्यमिति ॥ ४ ॥ सब्रूयाद्यावान्वा अयमाकाशस्तावानेषोऽन्तर्हृदय आकाश उभे अस्मिन्द्यावापृथिवी अन्तरेव समाहिते उभावग्निश्च वायुश्च सूर्याचन्द्रमसावुभौ विद्युन्नक्षत्राणि यच्चास्येहास्ति यच्च नास्ति सर्वं तदस्मिन् समाहितमिति ॥ ५ ॥ तं चेद्ब्रूयुरस्मिꣳश्चेदिदं ब्रह्मपुरे सर्वꣳसमाहितꣳसर्वाणि च भूतानि सर्वे च कामा यदैनज्जरामाप्नोति प्रध्वꣳसते वा किं ततोऽतिशिष्यत इति ॥ ६ ॥ स ब्रूयान्नास्य जरयैतज्जीर्यति न वधेनास्य हन्यत एतत्सत्यं ब्रह्मपुरमस्मिन्कामाः समाहिता एष आत्मा ऽपहतपाप्मा विजरो विमृत्युर्विशोको विजिघित्सोऽपिपासः सत्यकामः सत्यसङ्कल्पो यथाह्येवेह प्रजा अन्वाविशन्ति यथानुशासनं यं यमन्तमभिकामा भवन्ति यं जनपदं यं क्षेत्रभागं तं तमेवोपजीवन्ति ॥ ७ ॥

छान्दोग्य. ८ मं. १–५ ॥

हृदयाकाशामध्यें आनंदस्वरूप परमेश्वर भरलेला आहे त्याला तेथेंच शोधावा व शोधून त्याची प्राप्ति करून घ्यावी. ॥ ३ ॥ या ठिकाणीं कोणी असें म्हणेल कीं, या हृदयाकाशामध्यें आणखी काय काय वस्तू भरल्या आहेत कीं, ज्यांमुळें परमेश्वर शोधून

पहावा लागतो. जर तो एकटाच तेथें असेल तर त्याला शोधण्याची गरज नाहीं. ॥४॥ याला उत्तर असें कीं, तेथें सूर्य, चंद्र, पृथिवी, अग्नि, वायू, विद्युत्, नक्षत्रें इत्यादि अनंत पदार्थ परमात्म्याच्या आधारनें राहिले आहेत. त्या सर्वांमधून त्याला शोधला पाहिजे. ॥ ५ ॥ याठिकाणीं कोणी अशी शंका काढतील कीं, हें हृदयाकाश ज्यावेळीं वार्धक्यानें ग्रस्त होतें व नाश पावतें त्यावेळीं बाकी काय राहतें? जर शिल्लक कांहींएक राहत नाहीं तर शोधावयाचें तरी काय? ॥६॥ याला उत्तर असें कीं, या ब्रह्मपुरामध्यें असणारा परमेश्वर कधींहि वृद्ध होत नाहीं व नाशहि पावत नाहीं. तो पापरहित, वार्धक्यरहित, शोकरहित, खाण्यापिण्याची इच्छा नसलेला, सत्यकाम व सत्यसंकल्प असा आहे. प्रलयकालीं त्याच्यामध्येंच इतर पदार्थ लीन होतात व उत्पत्तिसमयीं त्याच्यांतून ते पुनः बाहेर येतात. उपासक लोक जिची इच्छा करितात ती ती अवस्था त्यांस त्याच्या कृपेनें प्राप्त होते. तात्पर्य, या ब्रह्मपुरामध्यें सर्वांच्या इच्छा तृप्त होतात. हें सर्व परमेश्वराच्या उपासनेनें होतें.

उपासनेचे दोन प्रकार आहेत, ( १ ) सगुणोपासना व ( २ ) दुसरी निर्गुणोपासना.

**स पर्य॑गाच्छु॒क्रम॑का॒यम॑व्र॒णम॑स्नावि॒रꣳ शु॒द्धमपा॑पविद्धम् । क॒विर्म॑नी॒षी प॑रि॒भूः स्व॑यं॒भूर्या॑थातथ्य॒तोऽर्था॒न्व्यदधाच्छाश्व॒तीभ्यः॒ समा॑भ्यः ॥ यजु० ४०।८ ॥**

परमेश्वराचे गुण ज्यांत सांगितलेले असतात ती **सगुण उपासना** समजावी व ज्या गुणांचा निषेध केलेला असतो ती **निर्गुण उपासना** असें समजावें. जसें वरील मंत्रांतील "शुक्रं, कविः मनीषी, परिभूः स्वयंभूः" हे परमेश्वराचे गुण दाखविणारे शब्द सगुणोपासना दाखवितात व "अकायं, अव्रणं, अस्नावीरं" हे निषेधात्मक शब्द निर्गुणोपासना दाखवितात. "ऐको देवः" "देव एक आहे" ही सगुणोपासना व "परमेश्वर अविद्यादि क्लेशविरहित, अपरिमेय, द्वित्वादिसंख्यांनीं बोध होण्यास अशक्य, शब्दस्पर्शादि गुणांनीं विरहित असा आहे" असें म्हणणें ही निर्गुणोपासना होय. "परमेश्वर सर्वज्ञ, सर्वव्यापी, सर्वाध्यक्ष, सर्वस्वामी इत्यादि गुणांनीं युक्त आहे." असें म्हणणें ही सगुणोपासना व "तो निराकार, अजन्मा, अनंत, शरीर-

रहित आहे." असें म्हणणें ही निर्गुणोपासना आहे असें समजावें. कोणी समजतात कीं, शरीराची उपासना ती सगुणोपासना व निराकाराची उपासना ती निर्गुणोपासना." ही समजूत चुकीची आहे. परमेश्वरामध्यें असलेल्या गुणांनीं त्याची स्तुति करणें याचें नांव सगुणोपासना. जसें-"हे परमेश्वरा, तूं सर्वज्ञ आहेस, सर्व शक्तिमान आहेस." इ०; व परमेश्वराच्या ठिकाणीं जे विकार नाहींत ते नाहींत असें म्हणून परमेश्वराची भक्ति करणें ही निर्गुणोपासना होय. जसें:—"हे परमेश्वरा! तूं अज्ञान, अविद्यादिक्लेश, भीति, इत्यादिक दुर्गुणांच्या पलीकडे आहेस." या प्रमाणें या उपासनांचे अर्थ व प्रकार आहेत हे जाणून त्याप्रमाणें सर्वांनीं उपासना करावी.

---

## मुक्ति.

परमेश्वराची पूर्वी सांगितल्याप्रमाणें उपासना केली म्हणजे अविद्या व अधर्म यांचा नाश होतो. शुद्ध विज्ञान व धर्म यांची प्राप्ति होते. अशा रीतीनें जीव शुद्ध ज्ञानी व पूर्ण धार्मिक बनला म्हणजे त्याला मुक्ति प्राप्त होते. या विषयीं पतंजली महामुनीनीं आपल्या योगदर्शनांत लिहिलें आहे:—

**अविद्यास्मितारागद्वेषाभिनिवेशाः पञ्च क्लेशाः ॥ १ ॥ अविद्याक्षेत्रमुत्तरेषां प्रसुप्ततनुविच्छिन्नोदाराणाम् ॥ २ ॥ अनित्याशुचिदुःखानात्मसु नित्यशुचिसुखात्मख्यातिरविद्या ॥ ३ ॥ दृग्दर्शनशक्त्योरेकात्मतेवास्मिता ॥४॥ सुखानुशायी रागः ॥ ५ ॥ दुःखानुशायी द्वेषः ॥ ६ ॥ स्वरसवाही विदुषोपि तथारूढोऽभिनिवेशः ॥ ७ ॥**

**योगद. १।२ सू. ३–९**

( १ ) अविद्या, ( २ ) अस्मिता–गर्व, ( ३ ) राग–प्रीति, ( ४ ) द्वेष, व ( ५ ) अभिनिवेश; हे पांच क्लेश होत. यांच्याच योगानें जीवाला बंधन झालेलें असतें ॥१॥ अस्मिता, राग, द्वेष व अभिनिवेश हे चार क्लेश, अविद्येपासूनच उत्पन्न होतात, अर्थात् सर्व दुःखांचें मूलस्थान अविद्या–अज्ञान–आहे. ॥ २ ॥ अनित्य, ( अशुचि ) अशुद्ध, दुःखकारक व अनात्मा या चार प्रकारच्या पदार्थाला अनुक्रमें, नित्य, शुद्ध, सुखकारक व आत्मा असें मानणें याला "अविद्या" असें म्हणतातः नाशवंत पदार्थाला चिर-

स्थायी मानणें; मलीन व अशुद्ध पदार्थाला शुद्ध व स्वच्छ समजणें; दुःखदायकाला सुखदायक समजणें; व आत्मा नसलेल्या वस्तूलाच आत्मा असें समजणें याचें नांव अविद्या होय. ॥ ३ ॥ जीव ( द्रष्टा ) व बुद्धि ( साधन ) यांना एकच समजणें याला "**अस्मिता**"-गर्व-असें म्हणतात. ॥ ४ ॥ सुखाच्या स्मरणापासून जी मनोवृत्ति होते तिला "**राग**"-अर्थात प्रीति-असें म्हणतात. पदार्थमात्राविषयीं प्रीति उत्पन्न होण्यास त्या पदार्थापासून पूर्वी सुख झालेलें असलें पाहिजे ॥ ५ ॥ त्याचप्रमाणें ज्या पदार्थमात्राविषयीं दुःखाचें स्मरण होतें त्याविषयीं मनांत द्वेष उत्पन्न होतो ॥ ६ ॥ शरीरावर प्रेम व जगण्याची आशा ही विद्वानाला सुद्धां असते, इतकेंच नव्हे तर सर्व प्राणिमात्राला असते. या मरणाच्या भीतिला "**अभिनिवेश**" असें म्हणतात. ॥ ७ ॥ हे पांच प्रकारचे क्लेश जीवाच्या बंधनाला कारण आहेत; म्हणून यथार्थ ज्ञान मिळवून अविद्यादि क्लेशांचे निराकरण करण्याचा प्रयत्न करावा.

**तदभावात्संयोगाभावो हानन्तद्दशेः कैवल्यम् ॥ ८ ॥**
( १-२-२५ )

**तद्वैराग्यादपि दोषबीजक्षये कैवल्यम् ॥ ९ ॥**
( १।३।४८ )

**सत्त्वपुरुषयोः शुद्धिसाम्ये कैवल्यमिति ॥ १० ॥**
( १।३।५५ )

**तदा विवेकनिम्नं कैवल्यप्राग्भारं चित्तम् ॥ ११ ॥**
( १।४।२६ )

**पुरुषार्थशून्यानां गुणानां प्रतिप्रसवः कैवल्यम् स्वरूपप्रतिष्ठा वा चितिशक्तिरिति ॥ १२ ॥ योगद० १।४।३४**

ज्यावेळीं अविद्यादिक सर्व क्लेश दूर होऊन ज्ञान मिळतें तेव्हां जीवाचीं सर्व दुःखें नाहिंशीं होऊन त्याला मोक्ष मिळतो. ॥ ८ ॥ ऐहिक सुखांविषयीं जीव विरक्त झाला असतांहि सर्व दोषांच्या मूळांचा नाश होतो व त्याला मुक्ति मिळते. ॥ ९ ॥ बुद्धि व जीव यांची पूर्ण शुद्धि झाली म्हणजेहि मोक्ष प्राप्त होतो. ॥ १० ॥ ज्यावेळीं

आत्मा विवेकानें सर्व दोषांपासून दूर राहून ज्ञानाच्या बाजूला जातो व मोक्ष प्राप्त करून घेतो तेव्हां त्याचें चित्त मोक्षांतील आनंदाच्या संस्कारांनीं पूर्ण होऊन जातें. ॥ ११ ॥ मोक्षाचें लक्षण=पुरुषार्थाच्या योगानें सत्व-रज-तम हे गुण व त्यांचीं कार्यें यांचा नाश करून, आत्म्यामध्यें ज्ञानाचा विकास करणें व त्याला त्याच्या शुद्ध स्वरूपामध्येंच ठेवणें. अशा स्थितींत आत्मा गेल्यानंतर तो परमेश्वरस्वरूपांतील पूर्ण आनंदाचा उपभोग घेऊं लागतो या स्थितीला मोक्ष-मुक्ति-कैवल्य-अपवर्ग असें म्हणतात. ॥ १२ ॥ तसेंच न्यायशास्त्रांतील प्रमाणें—

**दुःखजन्मप्रवृत्तिदोष मिथ्याज्ञानानामुत्तरोत्तरापाये तदनन्तरापायादपवर्गः ॥ १ ॥ बाधनालक्षणं दुःखमिति ॥ २ ॥ तदत्यन्तविमोक्षोऽपवर्गः ॥ ३ ॥**

**न्यायद० १।१ सू० २।२१।२२॥**

मिथ्या ज्ञानाचा नाश झाला असतां दोष नाहिंसे होतात. दोषांचा नाश झाला म्हणजे ( प्रवृत्ति ) अधर्म, अन्याय, विषयासक्ति इत्यादिकांचा नाश होतो. प्रवृत्तिमूलक वासना नाश पावल्या म्हणजे जन्म घ्यावा लागत नाहीं व जन्म न झाला व त्याचें कारण समूळ नाहिंसें झालें म्हणजे सर्व दुःखांचा पूर्ण नाश होतो. सर्व दुःखांचा पूर्ण अभाव झाला म्हणजे परमात्म्याजवळ असणाऱ्या आनंदाचा उपभोग घेतां येतो. यालाच मोक्ष असें म्हणतात. ॥ १ ॥ सर्व प्रकारचीं दुःखें, इच्छाविघात किंवा पारतंत्र्य यालाच बंध किंवा दुःख असें म्हणतात. ॥ २॥ या सर्व दुःखांचा अत्यंत अभाव होऊन परमात्मप्राप्ति झाली म्हणजे तोच मोक्ष होय. ॥ ३ ॥ उत्तरमीमांसा किंवा वेदांतशास्त्र यांतील मुक्तिविषयक प्रमाणें :—

**अभावं बादरिराह ह्येवम् ॥ १ ॥ भावं जैमिनिर्विकल्पामननात् ॥ २ ॥ द्वादशाहवदुभयविधं बादरायणोऽतः ॥ ३ ॥ उ० मीमांसा० ४।४ सू० १०—१२ ॥**

बादरि नामक आचार्याचें असें मत आहे कीं, मुक्तावस्थेमध्यें जीवाबरोबर इंद्रियें राहत नाहींत. फक्त जीव परमात्म्याशीं संलग्न होऊन शुद्ध मनानें परमानंदाचा उपभोग घेत असतो. ॥ १ ॥ याविषयीं जैमिनी मुनीचें मत असें आहे कीं, मुक्तावस्थेंत जसें

शुद्ध मन राहतें तद्वत् शुद्धसंकल्पमय शरीर, प्राण व इंद्रियें यांच्या सूक्ष्म शक्तीहि जीवाबरोबर राहतात. "**स एकधा भवति द्विधा भवति त्रिधा भवति**" इत्यादि उपनिषद्वचनप्रामाण्यावरूनहि हें उघड दिसतें कीं, तो जीव मुक्तावस्थेंत असतां संकल्पमात्रेंकरून शुद्धसंकल्पमय किंवा दिव्य शरीर धारण करतो, व इच्छामात्रेंकरून त्याचा त्यागहि करतो कारण, तो त्यावेळीं शुद्ध ज्ञानमय असतो. ॥ २ ॥ मुक्तीविषयीं बादरायण व्यासाचें असें मत आहे कीं, ज्याप्रमाणें वानप्रस्थाश्रमांतील लोक द्वादश दिवसांचे प्राजापत्यव्रत करतात, त्यांमध्यें थोडें जेवावयाचें असतें, त्यामुळें जसा क्षुधेचा अभाव व भाव यांच्यामध्यें असतो, थोडें जेवल्यामुळें जशी भूक नाहिंशी झालेली असते त्याचप्रमाणें पोट न भरल्यामुळें भूक असते ही जशी स्थिति त्याचप्रमाणें मुक्तावस्थेंतील जीवाची इंद्रियांदिकांविषयीं जाणावी क्लेश, अज्ञान, अशुद्धि इत्यादि उत्पन्न करणारा पदार्थांचा पूर्ण अभाव व आनंद, शुद्धतादिक सद्गुण उत्पन्न करणाऱ्या पदार्थांचा भाव मुक्तीमध्यें असतो. याप्रमाणें वेदान्तशास्त्रांतील मुक्तिविषयक सिद्धांत आहेत. ॥ ३ ॥ आतां उपनिषदांतील प्रमाणें.—

**यदा पञ्चावतिष्ठन्ते ज्ञानानि मनसा सह ॥ बुद्धिश्च न विचेष्टते तामाहुः परमां गतिम् ॥ १ ॥ तां योगमिति मन्यन्ते स्थिरामिन्द्रियधारणाम् ॥ अप्रमत्तस्तदा भवति योगो हि प्रभवाप्ययौ ॥ २ ॥ यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः ॥ अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ॥ ३ ॥ यदा सर्वे प्रभिद्यन्ते हृदयस्येह ग्रन्थयः ॥ अथ मर्त्योऽमृतो भवत्येतावदनुशासनम् ॥ ४ ॥**

कठोप० व० ६ मं. १०।११।१४।१५॥

ज्यावेळीं मनासह पञ्च ज्ञानेंद्रियें परमात्म्याचे ठिकाणीं स्थिर होतात व तेथेंच रममाण होतात व जेव्हां बुद्धीहि इतर चेष्टा करीत नाहीं त्या स्थितीला परमगति अर्थात् मोक्ष असें म्हणतात ॥ १ ॥ या इंद्रियांच्या स्थिरतेला योग असें विद्वान लोक म्हणतात. या स्थितींत प्रमाद होत नाहींत कारण, योगापासून शुद्ध उत्तम गुणाची उत्पत्ति व अशुद्ध दोषांचा नाश होतो ॥ २ ॥ ज्यावेळीं हृदयांतील सर्व वाईट वासना नाहिंशा होतात त्यावेळींच मनुष्य मोक्षाला मिळवतो. मोक्षासाठीं देशान्तरीं जाण्याची गरज

नाहीं. ( अत्र ब्रह्म० ) परमेश्वर सर्वत्र व्याप्त झालेला व तोच मोक्षस्वरूप आहे. अर्थात् सर्वत्र मोक्षपद भरलेलें आहे. ( तें मिळवण्याचा प्रयत्न मात्र झाला पाहिजे. ) ॥ ३ ॥ ज्यावेळीं हृदयांतील अविद्यादिबंधनाच्या सर्व गांठी तुटून नाहींशा होतात तेव्हांच मोक्ष मिळतो ॥ ४ ॥

**दैवेन चक्षुषा मनसैतान्कामान् पश्यन्रमते ॥ ५ ॥ य एते ब्रह्मलोके तं वा एतं देवा आत्मानमुपासते तस्मात्तेषा ँ सर्वे च लोका आत्ताः सर्वे च कामाः स सर्वा ँश्च लोकानाप्नोति सर्वा ँश्च कामान् यस्तमात्मानमनुविद्यविजानातीति ह प्रजापतिरुवाच प्रजापतिरुवाच ॥ ६ ॥ यदन्तरापस्तद्ब्रह्म तदमृत ँ स आत्मा प्रजापतेः सभां वेश्म प्रपद्ये यशोऽहं भवामि ब्राह्मणानां यशो राज्ञां यशो विशां यशोऽहमनुप्रापत्सि सहाहं यशसां यशः ॥ ७ ॥**

**—छांदोग्य० प्र. ८ ॥**

( प्रश्न ) जर मोक्षावस्थेमध्यें आत्म्याजवळ मनादि कांहींच साधन राहत नाहीं तर तो मोक्षसुखाचा तरी कसा उपभोग घेतो बरें? कारण, भोग घेण्याला शरीरासारख्या[1] साधनाची आवश्यकता असते. ( उत्तर ) ( दैवेन० ) शुद्ध, दिव्य चक्षुरादिक इंद्रियें व दिव्य मन यांच्या योगानें मोक्षावस्थेंतील आनंदाचा तो उपभोग घेतो, पाहतो व त्यामध्येंच रममाण होतो. यावेळचीं त्याचीं इंद्रियें प्रकाशमय व अत्यंत सूक्ष्म असतात. ॥ ५ ॥ ( प्रश्न ) मुक्त झालेल्या आत्म्याला पाहिजे त्या स्थळीं जातां येतें कीं नाहीं.? ( उत्तर ) ( य एते० ) परमात्म्याची अनन्यभावानें उपासना करणारे लोक मोक्षाला जातात व तेथें त्याच्याच आश्रयानें राहतात. सर्वव्यापक परमेश्वराचा त्यांस आधार असल्यामुळें त्यांचें सर्वत्र जाणें येणें सहज होतें. कोणीहि त्यांनां प्रतिबंध करूं शकत नाहीं. त्यांच्या सर्व इच्छा सफळ होतात. परमेश्वर ( वेदद्वारा ) असें सांगत आहे कीं, जो अनन्य भावानें परमात्म्याची उपासना करील त्याच्या सर्व इच्छा तृप्त होतील ॥ ६ ॥ जें सर्वांच्या अंतर्यामी आहे तेंच ब्रह्म आहे, तोच मोक्ष ( अमृत ) व तोच आत्मा होय. या सर्वांतर्यामि प्रजानाथ परमेश्वराच्या सभेंत मी जाऊन पोंचेन. मला या पृथिवीवरील विद्वानांमध्यें नांव लौकिक किंवा यश मिळावें, त्याचप्रमाणें क्षत्रिय व

---

१ भोगायतनम् शरीरम् ॥

वैश्य यांमध्येंहि यश मिळावें. हे परमेश्वरा! मला यशस्वीलोकांमध्यें यशस्वी कर व आपल्या आश्रयाला मला ठेव. ॥ ७ ॥

**अणुः पन्था वितरः पुराणो मा ऽऽस्पृष्टोनुवित्तो मयैव ॥ तेन धीरा अपियन्ति ब्रह्मविद उत्क्रम्य स्वर्गं लोकमितो विमुक्ताः ॥८ ॥ तस्मिञ्छुक्लमुत नीलमाहुः पिङ्गलं हरितं लोहितं च ॥ एषपन्था ब्रह्मणा ह्यानुवित्तस्तेनैति ब्रह्मवित्तैजसः पुण्यकृच्च ॥९॥ प्राणस्य प्राणमुत चक्षुषश्चक्षुरुत श्रोत्रस्य श्रोत्रमन्नस्यान्नं मनसो ये मनो विदुः ॥ ते निचिक्युर्ब्रह्म पुराणमग्र्यं मनसैवाप्तव्यं नेह नानास्ति किंचन ॥ १० ॥ मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति ॥ मनसैवानुद्रष्टव्यमेतदप्रमेयं ध्रुवम् ॥११॥ विरजः पर आकाशात् अज आत्मा महाध्रुवः ॥ तमेव धीरो विज्ञाय प्रज्ञां कुर्वीत ब्राह्मणः ॥ १२ ॥ शतपथ० ब्रा० कां० १४।७॥**

मोक्षाचा मार्ग फारच (अणुः) सूक्ष्म आहे. (वितरः) ज्याप्रमाणें मजबूत नौकेंतून समुद्राच्या दुसऱ्या तीरास जातां येतें त्याचप्रमाणें या मार्गाच्या आश्रयानें दुःखसमुद्रांतून सहज तरून जातां येतें. (पुराणः) हाच मार्ग प्राचीन आहे व तो (स्पष्टः) परमात्मकृपेनें मला प्राप्त झाला आहे. या मार्गानें (धीराः) धैर्यवान्, विद्वान् व विचारी लोक दुःखांच्या पार निघून जातात व (स्वर्गं लोकम्) सुखात्मक ब्रह्मलोकाला जाऊन मिळतात. ॥ ८ ॥ त्या मोक्षपदामध्यें त्याच्या आश्रयानें श्वेत, निळे, पिंवळे, हिरवे व लाल रंगाचे लोकगोल प्रकाशित होत आहेत परमेश्वराच्या भक्तीनेंच हा मोक्षाचा मार्ग प्राप्त होतो. ब्रह्मज्ञानी लोक, (तेजसः) शुद्ध व तेजस्वी महात्मे व पुण्य करणारे या मार्गानें जातात व तोच मिळवितात. ॥ ९ ॥ परमेश्वर हा प्राणांचा प्राण, चक्षूंचाहि चक्षु, श्रोत्रांचा श्रोत्र, अन्नांतील अन्न व मनाचेंहि मन असा आहे. जे दृढनिश्चयानें या पुराण ब्रह्माला मनानें जाणतात, त्यांनांच मोक्ष मिळतो. (नेह नाना०) या मोक्षामध्यें भेद किंवा दुःख कांहीं नाहीं. ॥ १० ॥ ब्रह्म अनेक प्रकारचें आहे असें जो समजतो त्याला जन्ममरण भोगावें लागतें कारण,

तें एकच आहे. तें मनानेंच जाणावयाचें आहे. तें चैतन्यमात्र, अप्रमेय, प्रमाद-रहित व व्यापक आहे ॥ ११ ॥ परमात्मा विक्षेपरहित, आकाशाहून सूक्ष्म, अजन्मा, महाध्रुव अर्थात् निश्चल असा आहे. ज्ञानी लोकांनीं त्याला ओळखून आपली बुद्धि विशाल करावी. जो असा ज्ञानी होईल तोच ब्राह्मण होय ॥ १२ ॥

**सहोवाच ॥ एतद्वै तदक्षरं गार्गि ब्राह्मणा अभिदन्त्यस्थूल-मनण्वऽह्रस्वमदीर्घमलोहितमस्नेहमच्छायमतमोऽवाय्वना-काशमसङ्गमस्पर्शमगन्धमरसमचक्षुष्कमश्रोत्रमवागमनोऽते-जस्कमप्राणममुखमनामागोत्रमजरममरमभयममृतमरजो-ऽशब्दमविवृतमसंवृतपूर्वमनपरमनन्तरमबाह्यं न तदश्नोति कश्चन न तदश्नोति कश्च न ॥ १३ ॥ शतपथ ब्रा० कां० १४।६।८॥**

याज्ञवल्क्य म्हणतोः—"हे गार्गि! परब्रह्म; नाश, स्थूल, सूक्ष्म, लघु, लाल, चिक्कण, छाया, अन्धःकार, वायू, आकाश, संग, शब्द, स्पर्श, गंध, रस, नेत्र, कर्ण, मन, तेज, प्राण, मुख, नाम, गोत्र, वृद्धावस्था, मरण, भय, आकार, विकाश, संकोच, पूर्व, अपर, आंत, बाहेर इत्यादि दोष व गुण यांहून भिन्न आहे. तें कोणाला साकार वस्तूप्रमाणें प्राप्त होऊं शकत नाहीं किंवा कोणाला तें तसें मिळणारहि नाहीं कारण, तें इंद्रियांना अविषय आहे.

**ये यज्ञेन दक्षिणया समक्ता इन्द्रस्य सख्य-ममृतत्वमानश ॥ तेभ्यो भद्रमङ्गिरसो वो अस्तु प्रति गृभ्णीत मानवं सुमेधसः ॥१॥**

ऋग्वेद. ८ । २ । १ । १ ॥

जे ( यज्ञेन ) ज्ञानयज्ञ करून ( दक्षिणया ) सर्वस्व परमेश्वराला अर्पण करतात ते मुक्त झालेले लोक आनंदामध्यें मग्न असतात. ज्यांचें ( इन्द्रस्य ) परमेश्वराशीं सख्य होऊन जे मोक्षाला गेलेले असतात त्यांनांहि ( भद्रम् ) अत्यंत सुख मिळतें. ( अङ्गिरसः ) मुक्त झालेल्यांचे प्राण ( सुमेधसः ) बुद्धीची शक्ति वाढविणारे होतात.

असे पूर्वी मुक्त झालेले पुरुष ( मानवम् ) आतां मुक्त होणाऱ्या पुरुषाला ( प्रतिगृभ्णीत ) आपल्या जवळ घेतात. ॥ १ ॥

स नो बन्धुर्जनिता स विधाता धामानि
वेद भुवनानि विश्वा ॥ यत्र देवा अमृत-
मानशानास्तृतीये धामन्नध्यैरयन्त ॥ २ ॥

यजु. ३२ । १० ॥

तो परमेश्वर आमचा हितकर्ता, सुखांचा उत्पादक, जगत्कर्ता, व आमचा पालक आहे. तोच सर्वांची उत्पत्ति करणारा व सर्वांना यथायोग्य रीतीनें जाणणारा असा आहे. त्याच ( तृतीये ) अत्यंत सुखदायी परमेश्वराच्या आश्रयानें विद्वान् लोक मोक्षसुखाचा उपभोग घेतात. ॥ २ ॥

या प्रमाणें मोक्षाची महती व तो प्राप्त होण्याचीं साधनें यांविषयीं वेदांमध्यें व इतर ग्रंथांत सांगितलें आहे. त्यांविषयीं विचार करून सर्वांनीं पुरुषार्थ करून मोक्ष मिळवावा.

## नौका व विमानें यांविषयीं.

वेदांमध्यें नौका व विमानें यांविषयींची विद्या मूलरूपानें आहे. त्यांविषयीं कांहीं मंत्र पुढें दिले आहेत.:—

तुग्रो ह भुज्युमश्विनोदमेघे रयिं न क-
श्चिन् ममृवाँ अवाहाः ॥ तमूहथुर्नौभिरा-
त्मन्वतीभिरन्तरिक्षप्रुद्भिरपोदकाभिः ॥ १ ॥
तिस्रः क्षपस्त्रिरहातिव्रजद्भिर्नासत्या भुज्यु-
मूहथुः पतङ्गैः ॥ समुद्रस्य धन्वन्नार्द्रस्य
पारे त्रिभीरथैः शतपद्भिः षळश्वैः ॥ २ ॥

ऋ० अ० १।८।८। मं० ३।४ ॥

( तुग्रः—"तुजि=हिंसाबलादाननिकेतनेषु" या धातूवरून औणादिक रक् प्रत्यय करून तुग्र हा शब्द सिद्ध होतो.– ) हिंसा करणारा, बलवान्, धनादिक मिळविण्याची इच्छा करणारा, घरदार व जमीनजुमला करून राहणारा तो "तुग्रः" होय. अशाप्रकाऱ्च्या (रयिम्) धनाची व ( भुज्युम् ) भोगांची इच्छा करणाऱ्यानें पदार्थविद्येच्या सहाय्यानें आपली इच्छा तृप्त करून घ्यावी. ती अशी. त्याणें( अश्विना ) पार्थिवतत्वाच्या काष्ठलोष्ठादिपदार्थांनीं नौका रचून अग्नि व जलादि प्रयोगानें त्यांत गति आणून ( उदमेघे ) समुद्रांतून ( अवाहाः ) जावें यावें व द्रव्य मिळवावें. याप्रमाणें करणारा ( कश्चित् ) कोणींहि ( न ममृवान् ) योगक्षेमविरहित होत नाहीं, मरत नाहीं; तो पुरुषार्थ करीत असल्यामुळें त्याची स्थिति उत्तम होत जाते. म्हणूनच द्रव्य इच्छिणाऱ्यानें नौका-गमन अवश्य करून द्रव्य संपादन करावें. ( अश्विना )-द्यावापृथिवी-प्रकाशात्मक अग्नि, विद्युत् आदिपदार्थ यांच्या योगानें, ( लोखंड, तांबें, रजत् इत्यादि धातु किंवा लांकूड वगैरे पार्थिव द्रव्यांची केलेली ) नौका ( ऊहथुः ) एका देशाहून दुसऱ्या देशाला न्यावी. ( नौभिः ) जाण्यायेण्याला सुखकारक व ( आत्मन्वतीभिः ) आपण-धनी, नोकर व इतर लोक—वसण्यास योग्य, अशा नौका उपयोगांत आणाव्या व ( अन्तरिक्षप्रुद्भिः ) आकाशांतून चालणारीं विमानेंहि उपयोगांत आणावीं, (अपोदकाभिः)—नौका; पाण्याला तोडणाऱ्या, पाण्याला बाजूला करणाऱ्या, पाण्याला आंत न घेणाऱ्या अशा असाव्यात. चिक्कण पदार्थांनें मढविलेल्या त्या असाव्यात. पाण्यांतील, जमिनीवरील व आकाशांतील अशीं तीन प्रकारचीं वाहनें नौका, रथ, व विमानें हीं अनुक्रमें आहेत. त्यांचा उपयोग मनुष्यांनीं करावा व आपल्या इच्छा तृप्त कराव्यात. [ या मंत्रांत आलेल्या कांहीं शब्दांचे अर्थ–"**अथातो द्युस्थाना देवतास्तासामश्विनौ प्रथमगामिनौ भवतोऽश्विनौ यत् व्यश्नुवाते सर्वं रसेनान्यो ज्योतिषाऽन्योऽश्वैरश्विनावित्यौर्णवाभस्तत्कावश्विनौ द्यावापृथिव्यावित्येकेऽहोरात्रावित्येके सूर्याचन्द्रमसावित्येके** ॥ निरु. अ. १२ ।१॥ **तथाश्विनौ चापिभर्तारौ जर्भरीभर्त्तारावित्यर्थस्तुर्फरी तू हन्तारौ** ॥ निरु. १३ ।५॥ सर्व दिव्यगुणयुक्त पदार्थांमध्यें अश्विन् हे मुख्य आहेत. ते ( प्रथमगामी ) अर्थात् महावेगवान् आहेत. ( व्यश्नुवाते सर्वम् ) ते सर्वभक्षक व सर्वांत व्यापक आहेत. ते ( रसेन ) जलमय, ( ज्योतिषा ) अग्निमय व ( अश्वैः ) वेगमय असे आहेत. ( द्यावापृथिव्यौ ) द्यावा व पृथिवी, अहो-रात्र, सूर्य व चंद्र, जर्फरी व तुर्फरी ( प्राण व रवि, ) पुरुषशक्ति व स्त्रीशक्ति, ( निगेटिव्ह Nigative, पॉझिटिव्ह Pasitive ) यांनांच अश्विन् असें म्हणावयाचें. [ जर्फरी" हा शब्द पोषक शक्तीचा वाचक असून "तुर्फरी" हा विघातक शक्तीचा वाचक आहे. या आधारावरून "अश्विनौ" चे

अर्थ—पृथिवीतत्वाचे धातू लांकडादिक पदार्थ, द्यौः अर्थात् प्रकाशक तत्वाचे अग्नि, विद्युत् आदिपदार्थ, रसतत्वाचे पाणी व इतर प्रवाही पदार्थ असे होतात. ] वरील मंत्राचा भावार्थ—( रयिम् ) धन व ( भुज्युम् ) इतर भोग इच्छिणाऱ्या (तुग्रः) बलवान् माणसानें (आत्मन्वतीभिः) सर्वांस बसण्यास योग्य व (अपोदकाभिः) पाणी तोडणाऱ्या अशा ( नौभिः ) उत्तम नौकांतून किंवा ( अन्तरिक्षप्रुद्भिः ) विमानांनीं ( अश्विना ) वेगानें चालणाऱ्या किंवा पूर्वोक्त लांकूड, धातू, जल, अग्नि, वीज इत्यादि पदार्थांनीं केलेल्या वाहनांतून ( उदमेघे ) समुद्रांतून ( अवाहाः ऊहथुः ) देशांतरीं जावें व तेथें जाऊन पुरुषार्थ करून द्रव्यादिपदार्थ संपादावे. ॥ १ ॥ ( तिस्रः क्षपः ) तीन रात्रीं व ( त्रिः अहा ) तीन दिवस एवढ्या कालांत ( आर्द्रस्य ) चिखलासहित असलेल्या जलाशयाच्या ( समुद्राच्या ) ( समुद्रस्य धन्वनः ) अंतरिक्षाच्या व जमिनीच्या ( अंति व्रजद्भिः ) पलीकडे जाऊन पोंचणाऱ्या अर्थात् अत्यंत वेगवान् नौका, रथ किंवा विमानें असावींत. ( त्रिभीरथैः ) पूर्वोक्त पाणी, जमीन व आकाश यांतून चालणारीं, नौका, रथ व विमानें हीं तीन प्रकारचीं वाहनें ( पतंङ्गैः ) वेगवान् किंवा ( शतपद्भिः० ) मनुष्याच्या शंभरपट चालणारीं असावींत. तीं वाहनें ( नासत्या) विद्युत्, अग्नि किंवा जल यांच्या योगानें ( ऊहथुः ) ओढलीं जावींत. अर्थात् त्या वाहनांनां या साधनांनीं गति द्यावी. [ नासत्यौ व अश्विनौ हे एकाच अर्थाचे शब्द आहेत. " **नासत्यावश्विनौ दस्रौ** " इति अमरः ]

**अनारम्भणे तदवीरयेथामनास्थाने अग्र- भणे समुद्रे ॥ यदश्विना ऊहथुर्भुज्युमस्तं शतारित्रां नावमातस्थिवांसम् ॥ ३ ॥ यमश्विना ददथुः श्वेतमश्वमघाश्वाय शश्व- दित्स्वस्ति ॥ तद्वां दात्रं महि कीर्तेन्यं भूत्पैद्वो वाजी सदमिद्धव्यो अर्यः ॥ ४ ॥**

ऋ० १।८।८ मं० ५ व व० ९ मं. १॥

---

१ अपगतं दूरीकृतम् उदकं यासांताः २ आर्द्रस्य=सपङ्कस्य सागरस्य. ३ समुद्रस्य—सम्पद्द्रवन्त्यापोयस्मिन्तस्यान्तरिक्षस्य. ४ धन्वन्—धन्वनो बहुसिकतस्य स्थलस्य.

( अनारम्भणे ) ज्यामध्यें कशाचाहि अवलंब करतां येत नाहीं ( अनास्थाने ) ज्यामधून चालण्यास किंवा ज्यांत उभें राहण्यास स्थान—जागा–नाहीं किंवा ( अग्रभणे) ज्यांत आश्रयालाहि कांहीं मिळणार नाहीं अर्थात् चारहि बाजूंनीं पाणीच असल्यामुळें अफाट दिसणाऱ्या ( समुद्रे ) समुद्रांतून किंवा आकाशांतून ( अश्विना ) वेगानें किंवा विद्युत्, अग्नि इत्यादि पूर्वोक्त साधनांच्या योगानें ( अस्तम् ) चालविलेलें किंवा गति दिलेलें ( शतारित्राम् ) ज्याला शेंकडों कळा आहेत, शेंकडों नांगर आहेत, ज्याला थांबविण्याची व खोली मोजण्याचीं लोखंडीं साधनें शेंकडों आहेत असें वाहन ( तस्थिवांसं भुज्युम् ) चिरस्थायी भोग ( ऊहथुः ) प्राप्त करून देतें. अशा यानाच्या योगानें अनेक लाभ होतात ॥ ३ ॥ अशा साधनांपासून अनंत सुखें मिळतात, म्हणून मनुष्यांनीं हीं साधनें उपयोगांत आणावीं ( अश्विना ) अग्नि व जल यांच्या योगानें ( श्वेतम् ) शुभ्ररंगाचा बाष्प नामक, ( अश्वम् ) अत्यंत वेगवान् पदार्थ ( अघाश्वाय ) शीघ्रगति उत्पन्न होण्याकारितां शिल्पविद्या जाणणारे लोक, उत्पन्न करतात. याच्या योगानें चालणारीं वाहनें ( शश्वत् स्वस्ति ) नेहमीं सुखकारक असतात. ( अश्विनौ ) विद्युत्, अग्नि आदिपदार्थ ( वाम् ) तुम्हां सर्वांनां पुढील गुण (ददथुः) देतात. (दात्रम्) दान, सुख, पोषण,(महि)महत्व,(कीर्तेन्यम्)प्रशंसनीयता, इत्यादि गुण देणारें हें यान ( भूत् ) झालें आहे. तसेंच ( पैद्वः ) यानाला अत्यंत वेगानें चालविणारें तें विद्युतरूपी साधन आहे. असें ( सदम् इत् ) वेगाला प्राप्त झालेलें यान किंवा विमान ( अर्यः ) वैश्यानें ( हव्यः ) स्वीकारावें. व्यापाऱ्यानें वेगवान् विमानें व बाष्परथ आपल्याजवळ ठेवावे व देशदेशांतरीं व्यापार करून "अर्थ"[1] हा दुसरा परम पुरुषार्थ साध्य करावा. [ **अर्यः स्वामि वैश्ययोः** ॥ अर्य म्ह॰ स्वामि किंवा वैश्य. **पैद्वपतङ्गावश्वनाम्नी** निघं. १।१४ ॥ पैद्व व पतंग हे दोन शब्द "अतिवेग" या अर्थाचे आहेत. **हु=दानादानयोः** या धातूवरून **हव्य** हा शब्द झाला आहे. म्हणून त्याचा अर्थ–"देण्यास व घेण्यास योग्य" असा होतो. ]

**त्रयः॑ प॒वयो॑ मधु॒वाह॑ने॒ रथे॒ सोम॑स्य वे॒ना-**
**मनु॒ विश्व॒ इद्वि॑दुः ॥ त्रयः॑ स्क॒म्भासः॑ स्क**
**भि॒तास॑ आ॒रभे॒ त्रिर्नक्तं॒ या॒थस्त्रिर्व॑श्विना॒**
**दिवा॑ ॥ ५ ॥** ऋ. १।३४ मं. २ ॥

---

१. धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ.

( मधुवाहने ) आनंददायक ज्याची गति आहे अशा ( रथे ) वाहनाला ( त्रयः ) तीन ( पवयः ) वज्रतुल्य, अत्यंत कठीण अशीं चक्रें किंवा कलायंत्रें करावींत, तसेंच ( त्रयः स्कम्भासः स्कभितासः ) वेगवान् रथाला थांबण्यासाठीं तीन स्तंभांची योजना करावी; ( विश्वे ) सर्व विद्वान् लोक ( सोमस्य ) ऐश्वर्ययुक्त सुखाची ( वेनाम् ) इच्छासिद्धि, कामनासिद्धि ( विदुः ) जाणतात. अर्थात् या शीघ्र गतियुक्त वाहनापासून विद्वान लोक अनेक सुखें मिळवितात. ( अश्विना ) पूर्वोक्त पृथिवी, जल, अग्नि, विद्युत् आदिपदार्थांपासून यानाची शीघ्रगति ( आरभेत् ) साध्य करावी. ज्याच्या योगानें ( त्रिः नक्तं त्रिः दिवा ) तीन अहोरात्रींमध्यें ( याथः ) फार दूर जातां येईल.

**त्रिर्नो॑ अश्विना यज॒ता दि॒वे दि॑वे॒ परि॑ त्रि॒धातु॑ पृ॒थि॒वीम॑शायतम् ॥ ति॒स्रो ना॑सत्या रथ्या परा॒वत॑ आ॒त्मेव॒ वात॒: स्वस॑राणि गच्छ-तम् ॥ ६ ॥** ऋ. १।३।९ मं. ७ ॥

( नः ) आमचीं ( त्रयः ) नौका, रथ व विमान हीं तीन वाहनें ( यजता ) योजना केलेल्या ( अश्विना ) विद्युत् आदिपदार्थांनीं ( दिवे दिवे ) प्रतिदिवशीं ( पृथिवीम् अशायतम् ) पाणी, पृथिवी व आकाश यांतून आनंदानें संचार करोत. ( परि ) त्या वाहनांच्या सभोंवतीं ( त्रिधातु ) तीन प्रकारच्या धातू-लोखंड, तांबें आदिक असाव्यात. अर्थात् तीं वाहनें या धातूंनीं मढविलेलीं असावींत ( तिस्रः ) हीं तीनहि वाहनें ( नासत्या ) विद्युत्, अग्नि आदि पदार्थांच्या योगानें ( रथ्या ) त्यांच्या रस्त्यांवरून, ( आत्मेव वातः ) आत्मा, वारा व मन यांप्रमाणें शीघ्रगतीनें ( स्वसराणि गच्छतम् ) सुखानें जावींत.

**अ॒रित्रं॑ वां दि॒वस्पृ॒थु ती॒र्थे सिन्धू॑ना॒ं रथ॑: ॥ धि॒या यु॑युज्र॒ इन्द॑वः ॥ ७ ॥**

ऋ० १।३।३४।८ ॥

( सिंधूनाम् ) समुद्रांतून, तसेंच ( दिवः ) आकाशांतून ( तीर्थे ) तरण्यासाठीं ( वाम् ) तुमचीं ( रथः ) वाहनें (पृथु) अतिविस्तृत व (अरित्रम्) कलायंत्रांनीं युक्त असावींत व त्यांमध्यें गति उत्पन्न करण्यासाठीं ( धिया ) बुद्धि कौशल्यानें ( इन्दवः ) पाण्याचा ( युयुज्रे ) उपयोग करावा. [ निघण्टु अखंड १२ मध्यें जलनामामध्यें "इंदु" शब्द घातला आहे. ] या मंत्रावरून वाहनें मोठीं असावींत व त्यांत पाण्याचा, गतीच्या कामीं उपयोग करावा हें सिद्ध होतें.

वि ये भ्राजन्ते सुमखास ऋष्टिभिः प्रच्या-
वयन्तो अच्युता चिदोजसा ॥ मनो जुवो
यन्मरुतो रथेष्वा वृषव्रातासः पृषतीरयु-
ग्ध्वम् ॥ ८ ॥ ऋ. १।६।९।४॥

( रथेषु ) पूर्वोक्त तीन प्रकारच्या वाहनांमध्यें ( मनोजुवो ) मनाप्रमाणें शीघ्र गति उत्पन्न करण्यासाठीं ( मरुतः ) वायूची व ( वृषव्रातासः पृषतीः ) पाण्याच्या सिंचनाची ( अयुग्ध्वम्) योजना करावी. अशा प्रकारच्या ( ऋष्टिभिः ) कलांनीं ( ये वि भ्राजन्ते ) जे युक्त असतात, ज्यांनां या कला अवगत असतात व जे ( सुमखासः ) उत्तम कृत्यें करतात ( ओजसा अच्युता चित् ) त्यांनां नेहेमीं सुखप्राप्तिच होते कारण, ते मनोवेगानें ( प्रच्यावयन्तः) एका स्थानापासून दुसऱ्या स्थानाला जाऊन पोंचतात.

आ नो नावा मतीनां यातं पाराय गन्तवे ॥
युञ्जाथामश्विना रथम् ॥९॥ ऋ. १।३।३४।७॥

( पाराय गन्तवे ) समुद्र, जमीन किंवा आकाश यांतून पार-पलीकडे-जाण्यासाठीं ( मतीनाम् ) बुद्धिवान् लोकांच्या ( नावा ) नौकांप्रमाणें ( नः ) आमच्या नौका असाव्या. ( रथम् ) त्या रथांनां ( अश्विना ) विद्युत्, अग्नि वगैरेंचा-( आ युञ्जाथाम् ) संयोग किंवा उपयोग करावा व पलीकडे ( यातम् ) जावें.!!

**कृष्णं नियानं हरयः सुपर्णा अपो वसाना दिवमुत्पतन्ति ॥ त आववृत्रन्त्सदनादृतस्यादिद् घृतेन पृथिवी व्युद्यते ॥ १० ॥**

॥ १० ॥ ऋ. २।३।२३।४७ ॥

( सुपर्णाः ) उत्तम गतियुक्त ( हरयः ) अग्नि, किरण, विद्युत् आदिआशुगामी पदार्थांचा ( अपो वसाना ) पाण्याशीं संबंध केला असतां, कलाकौशल्यानें पाणी व अग्न्यादिपदार्थ यांचा योग केला असतां, ( कृष्णम् ) आकर्षित झालेलें किंवा पार्थिवतत्वापासून केलेलें ( नि यानम् ) उत्तम वाहन ( दिवम् ) आकाशामध्यें ( उत्पतन्ति ) उडलें जातें; अर्थात् ते पदार्थ, वाहनाला आकाशांत उडवितात ज्या ठिकाणाहून (घृतेन) पाण्यानें ( पृथिवी ) भूमि ( वि उद्यते ) भरली जाते त्या ( ऋतस्य सदनात् ) उदकाच्या घरापासून अर्थात् मेघमंडळापासून ( त आववृ• ) तीं वाहनें आकाश व्यापतात. अर्थात् गतिवान् विमानें मेघमंडळाच्याहि वर जातात व आकाशांतून इकडे तिकडे फिरतात.

**द्वादश प्रधयश्चक्रमेकं त्रीणि नभ्यानि क उत च्चिकेत ॥ तस्मिन्त्साकं त्रिशता न शङ्कवोऽर्पिताः षष्टिर्न चलाचलासः ॥११॥**

ऋ. २।३।२४।४८॥

( द्वादश प्रधयः ) यानाला आरे बसविण्यासाठीं बारा खांब असावेत, (चक्रम् एकम् ) एक चक्र-इतर कलांनां फिरविणारें-असावें, ( त्रीणि नभ्यानि ) तीन संधीवर असलेलीं मध्यचक्रें असावींत, ( त्रिशता शङ्कवः ) तीनशें शंकू -कोन-( साकम् अर्पिताः ) एकाशीं एक संबंध ठेवलेले असे असावेत. ( चलाचलासः ) कांहीं (चल)-फिरणारे व कांहीं न फिरणारे असे ( षष्टिः ) साठ असावेत. यानामध्यें अशी सर्व व्यवस्था करावी. ( कः ) कोण ( उतच्चिकेत ) बरें हें सर्व जाणतो? ( न ) सर्व जाणत नाहींत. थोड्याच लोकांनां या विद्येविषयीं ज्ञान असतें. याप्रमाणें नौका व विमानें करण्याच्या विद्येविषयीं पुष्कळ मंत्र वेदांमध्यें आहेत. ते ते जिज्ञासूंनीं व शोधकांनीं पहावे.

# तार-विद्या.

युवं पेदवे पुरुवारमश्विना स्पृधां श्वेतं तरुतारं दुवस्यथः ॥ शर्यैरभिद्युं पृतनासु दुष्टरं चर्कृत्य मिन्द्रमिव चर्षणीसहम् ॥८॥

ऋ० १।८।२१।१० ॥

( अश्विना ) विद्युत्, अग्नि यांणीं चालविलेलें, किंवा विद्युत् गुणांनीं युक्त, ( पुरुवारम् ) उत्तम गुणयुक्त, किंवा विद्वानांनीं स्वीकारण्यास योग्य, ( श्वेतम् ) शुद्ध, शुद्ध धातूपासून केलेलें अथवा विद्युन्मय, ( अभिद्युम् ) ज्यामध्यें विद्युत् प्रकाश सुरू झाला आहे, ( पृतनासु ) राजसैन्यांमध्यें ( दुष्टरम् ) अति दुस्तर, ( चर्कृत्यम् ) सर्व क्रियांमध्यें वारंवार वापरण्यास योग्य असें, ( तरुतारम् ) ताराख्य नामक यंत्र आहे, तें सर्वांनीं करावें. ( शर्यैः ) पुनः पुन्हां हनन व प्रेरणा त्यांत होते, ( पेदवे ) त्यायोगें मोठी सिद्धि प्राप्त होते, हें ( स्पृधाम् ) सैन्यांतील स्पर्धेच्या वेळीं शत्रूंचा नाश व स्वपक्षाचा विजय होण्यासाठीं उपयोगी म्हणून ( चर्षणीसहम् ) सैन्याच्या उपयोगी, ( इन्द्रम् इव ) सूर्याप्रमाणें दुरूनहि काम करणारें असें आहे. ( युवम् ) अश्विनौ अर्थात् विद्युत् आदिपदार्थ ( दुवस्यथः ) उत्तम तऱ्हेनें सिद्ध करून हें ताराख्ययंत्र सर्वांनीं सिद्ध करावें.

याप्रमाणें अग्नि, विद्युत व आदित्य (आकर्षण) ह्यांच्या यथावत् ज्ञानानें, त्या शक्ति अगणित लोकोपयोगी शिल्प कार्यांमध्यें उपयोगांत आणतां येतात हें दाखविणारे पुष्कळ मंत्र वेदांमध्यें आहेत शोध करणारांनां त्याचा पत्ता लागतो. पूर्वींचे आचार्य ह्या ज्ञान-कोषामधून ब्रह्मविद्या, देवविद्या, भूतविद्या, क्षत्रविद्या, नक्षत्रविद्या, सर्पदेवजनविद्या वगैरे अनेक विद्यांचा प्रकाश करीत आलेले आहेत, त्याचा शोध करून पुनश्च अध्ययन करण्याकडे लोकांची प्रवृत्ति व्हावी म्हणून येथें एक दोन विद्यांचें दिग्दर्शन करून दाखविलें आहे.

# वैद्यशास्त्र किंवा भिषग्विद्या.

सुमित्रिया न आप ओषधयः सन्तु ॥ दुर्मित्रियास्तस्मै सन्तु योऽस्मान् द्वेष्टि यंच वयं द्विष्मः ॥१॥ यजु०६।२२॥

हा मंत्र वैद्यशास्त्राचें उगमस्थान आहे. हे परमवैद्य! हे परमेश्वर! तुझ्या कृपेनें (नः) आम्हांला (ओषधयः) दोषांचा नाश करणाऱ्या सोमादिक वनस्पति (सुमित्रिया) सुखदायक, अर्थात् आरोग्यकारक होवोत व त्यांचें ज्ञानहि आम्हांला पूर्ण असो. त्याच प्रमाणें (आपः) प्राण व जल हे पदार्थ आम्हांला हितकारी असोत. (यः अस्मान्द्वेष्टि) तसेंच जे अधर्मात्मे, कामक्रोधादिक शत्रू किंवा रोग जे आमच्याशीं विरोध करतात (यंच वयं द्विष्मः) त्या अधर्मात्म्यांचा, रोगांचा किंवा कामादिक शत्रूंचा आम्ही द्वेष करतों, (तस्मै) त्यांनां या औषधी (दुर्मित्रियाः) अहितकारक होवोत. जे सर्व प्रकारच्या पथ्यानें वागणारे असतील त्यांनां या औषधी मित्रवत् सुखदायक व दुःखविनाशक होतात व जे पथ्यानें वागत नाहींत त्यांनां या दुःख देणाऱ्या होतात. [औषधी शब्दाचा निरुक्तांत "**दोषं धयन्तीति ओषधयः**" दोषांचा नाश करतात, दोषांनां धुऊन टाकतात म्हणून ("**दोषधी**" वनस्पतीला) "**ओषधी**" असें म्हणतात.] याप्रमाणें वैद्यशास्त्राला मूलभूत असणारे मंत्र वेदांमध्यें अनेक आहेत.

---

## पुनर्जन्म.

असुनीते पुनरस्मासु चक्षुः पुनः प्राणमिह नो धेहि भोगम् ॥ ज्योक् पश्येम सूर्यमुच्चरन्तमनुमते मृळया नः स्वस्ति ॥ १ ॥ पुनर्नो असुं पृथिवी ददातु पुनर्द्यौर्देवी पुन-

रन्तरिक्षम् ॥ पुनर्नः सोमस्तन्वं ददातु पुनः पूषा पथ्यां३ या स्वस्तिः ॥ २ ॥

ऋ. ८।१।२३। मं०६।७॥

या मंत्रांमध्यें पूर्वजन्म व पुनर्जन्म यांविषयीं सांगितलें आहे. (असुनीते!) हे प्राण नेणाऱ्या परमेश्वरा! मरणानंतर दुसरें शरीर धारण करण्याच्या वेळीं तुझ्या कृपेनें आम्ही सुखरूप राहूं असें कर. (पुनः अस्मासु) पूर्व शरीराला टाकून जेव्हां आम्हीं दुसरें शरीर धारण करूं तेव्हां पुनः आम्हांला (चक्षुः) चक्षुरादिक सर्व इंद्रियें, (पुनः प्राणम्) प्राण व अंतःकरण हीं दे. तसेंच पुढच्या जन्मामध्यें (नः) आम्हांला (भोगम्) भोग्य पदार्थ (ज्योक्) निरंतर (धेहि) दे. ज्याच्या योगानें आम्ही सर्व जन्मांमध्यें (उच्चरन्तम्) ऊर्ध्वभागीं असणाऱ्या (सूर्यम्) सूर्य, किंवा श्वासोच्छ्वासरूपी प्राण यांनां निरन्तर (पश्येम) पाहूं असें कर. (अनुमते) हे मान्यवर! परमेश्वर! (नः) आम्हांला सर्व जन्मांमध्यें (मृळया) सुख दे तुझ्या कृपेनें आमचें सदैव (स्वस्ति) कल्याण होवो अशी तुझी आम्हीं प्रार्थना करतों. ॥ १ ॥ हे भगवन्! (नः) आम्हांला (पुनः) पुनर्जन्मामध्यें (असुम्) प्राण व अन्नमय बल, ही (पृथिवी) भूमि (ददातु) देवो. (द्यौः) प्रकाशात्मक सूर्यज्योतिहि आम्हांला पुढच्या जन्मांत प्राणदान करो; त्याचप्रमाणें अंतरिक्षहि आम्हांला जीवन देवो. त्याच प्रमाणें पुनर्जन्मामध्यें (सोमः) सोमवल्ली आदिकरून वनस्पतिसमूह आम्हांला (तन्वम्) उत्तम शरीर (ददातु) देवो. (पूषा) हे पोषक! हे परमेश्वर! आम्हांला पुढच्या जन्मांत तूं (पथ्याम्) धर्ममार्ग दाखिव, (या स्वस्तिः) त्या धर्ममार्गानें आम्हीं जाऊं व तुझ्या कृपेनें आमचें सदैव कल्याण होवो, हीच आमची तुझ्या जवळ प्रार्थना आहे ॥ ३ ॥

पुनर्मनः पुनरायुर्म आगन् पुनः प्राणः पुनरात्मा म आगन् पुनश्चक्षुः पुनः श्रोत्रं म आगन् ॥ वैश्वानरो अदब्धस्तनूपा अग्निर्नःपातु दुरितादवद्यात् ॥३॥ यजु०४।१५॥

हे परमात्मन्! तुझ्या कृपेनें पुढच्या जन्मीं मला विद्येच्या संस्कारांनीं सुसंस्कृत झालेलें मन, उत्तम दीर्घ आयुष्य, शुद्ध आत्मा, उत्तम प्राण, चक्षु, श्रोत्र व इतर इंद्रियें हीं प्राप्त होवोत. ( वैश्वानरः ) विश्वांत व्यापून असणारा, ( अदब्धः ) दम्भादि दोष-रहित, ( तनूपा ) शरीरादिकांचा रक्षक असा ( अग्निः ) विज्ञान-आनंद-स्वरूप परमेश्वर ( अवद्यात् दुरितात् ) जन्म जन्मांतरीं होणाऱ्या दुष्कर्मांपासून ( पातु ) आमचें रक्षण करो, अधर्मापासून आम्हांला दूर ठेवो. त्याच्या योगानें आम्ही, सदाचरणीं होऊन सर्व जन्मांमध्यें सुखी होऊं ॥ ३ ॥

**पुनर्मैत्विन्द्रियं पुनरात्मा द्रविणं ब्राह्मणं च ॥ पुनरग्नयो धिष्ण्या यथास्थाम कल्पन्तामिहैव ॥ ४ ॥** अथर्व० ७।६।६७ मं० १॥

हे भगवन्! ( पुनः इन्द्रियम् ) पुढच्या जन्मामध्यें सर्व उत्तम इंद्रियें, शुद्ध आत्मा (द्रविणम्) विद्या आदिकरून सर्व श्रेष्ठ धनें, (ब्राह्मणम्) ब्रह्मामध्यें निष्ठा, (अग्नयः) मनुष्य-शरीर धारण केल्यानंतर करतां येण्याजोगे आहवनीय गार्हपत्यादिक अग्नि; हे सर्व पदार्थ (मा एतु ) मला प्राप्त होवोत. ( यथा० ) ज्याप्रमाणें पूर्व जन्मामध्यें आम्हांला मनादि सर्व पदार्थ उत्तम होते त्याचप्रमाणें (धिष्ण्या) धारणावती बुद्धि आदीकरून सर्व पदार्थ या व पुढच्या सर्व जन्मांमध्यें मिळोत. कोणत्याहि प्रकारानें आम्ही विकल होऊं नये. ४

**आ यो धर्माणि प्रथमः ससाद ततो वपूंषि कृणुषे पुरूणि ॥ धास्युर्योनिं प्रथम आविवेशा यो वाचमनुदितां चिकेत ॥ ५ ॥**

अथर्व. ९।१।१।२॥

( यः ) जो जीव ( प्रथमः ) पूर्व जन्मीं ( धर्माणि ) जसें धर्माचरण ( आससाद ) करतो ( ततः ) त्या धर्माचरणाप्रमाणेंच तो पुढच्या अनेक जन्मांत ( पुरूणि वपूंषि ) अनेक शरीरें ( कृणुषे ) धारण करतो. सदाचरणानें मनुष्याला शरीरादिक साधनें उत्तम मिळतात व अधर्माचरणानें वाईट मिळतात इतकेंच नव्हे तर

अधर्माचरणानें पश्वादिक योनींमध्येंहि त्याला जावें लागतें व तो तेथें दुःख भोगतो. ह्याच भावार्थ पुढील मंत्रार्थाचा आहे. ( धास्युः ) पूर्वजन्मांमध्यें केलेल्या पापपुण्यांचीं फलें भोगणार जीवात्मा ( प्रथमः ) पहिला देह टाकल्यानंतर वायु-जल-औषधी इत्यादि पदार्थांमध्यें ( आविवेश ) प्रवेश करून ( योनिम् ) कृतकर्मानुसार त्या त्या योनींमध्यें जातो. मनुष्य देहामध्यें येऊन जो ( अनुदितां वाचम् ) वेदविद्येचा ( चिकेत ) अभ्यास करतो व पूर्ण ज्ञान मिळवितो त्याला उत्तम शरीर मिळून सर्वदा सुख मिळतें. इतरांस दुःख प्राप्त होतें. ॥ ५ ॥

**द्वे सृती अंशृणवं पितॄणामहं देवानामुत मर्त्यानाम् ॥ ताभ्यामिदं विश्वमेजत्समेति यदन्तरा पितरं मातरं च ॥६॥**

यजु० १९।४७॥

( द्वे सृती ) या संसारामध्यें पापपुण्यांचें फळ भोगण्याचे दोन मार्ग आहेत. त्यांपैकीं एक ( पितॄणां देवानाम् ) ज्ञानी विद्वान् लोकांचा व दुसरा ( मर्त्यानाम् ) ज्ञानरहित मनुष्यांचा. या दोहोंपैकीं पहिल्याला **देवयान** व दुसऱ्याला **पितृयान** असें म्हणतात. ज्या मार्गानें जाणाऱ्या जीवाला मातापित्यांपासून पुनः पुनः शरीर धारण करून पापपुण्याचें फळ जें दुःख सुख, तें भोगावें लागतें अर्थात् पुनः पुनः जन्म धारण करावा लागतो त्या मार्गाला **पितृयान** असें म्हणतात व ज्या मार्गानें मनुष्य गेला असतां, मोक्ष प्राप्त होऊन, त्याची पुनर्जन्माची यातायात सुटते त्याला **देवयान** असें म्हणतात. पितृयानामध्यें पुनर्जन्म आहे व देवयानामध्यें पुनर्जन्म नाहीं, याप्रमाणें मी ( अशृणवम् ) ऐकलें आहे. ( ताभ्याम् इदं विश्वम् ) या दोन मार्गांच्या योगानें हें विश्व ( एजत् ) कंपायमान होत आहे, ( समेति ) त्यामुळें पूर्वजन्मानुसार जीवाला भोग प्राप्त होतात. ( यद् अन्तरा पितरं मातरं च ) ज्या वेळीं जीव पूर्वशरीर वायु-जल-औषधीमधून माता व पिता यांच्या शरीरांत प्रवेश करतो तेव्हांच त्याला दुसरें शरीर प्राप्त होतें ॥६॥

**मृतश्चाहं पुनर्जातो जातश्चाहं पुनर्मृतः ॥ नानायोनिसहस्राणि मयोषितानि यानि वै ॥ १ ॥ आहारा विविधा भुक्ताः पीता नानाविधाः स्तनाः ॥ मातरो विविधा दृष्टाः पितरः सुहृदस्तथा ॥ २ ॥ अवाङ्मुखः पीड्यमानो जन्तुश्चैव समन्वितः ॥३॥** निरुक्त० १४।६॥

मरून मी पुनः जन्म घेतला व जन्मल्यानंतर पुनः मरण पावलों. याप्रमाणें हजारों योनींमध्यें मीं गेलों ॥ १ ॥ अनेक आहार मीं खाल्ले व अनेक स्तनांचें दूध मीं प्यालों. अनेक आया, बाप, इष्ट व मित्र हे माझ्या दृष्टीस पडले ॥ २ ॥ गर्भाशयांत खालीं तोंड करून अत्यंत दुःख भोगलें इ० ॥ ३ ॥ पुनर्जन्म विषयक योगशास्त्रांतील प्रमाण—

**स्वरसवाही विदुषोऽपि तथाऽभिरूढोऽभिनिवेशः ॥ ८ ॥**

**—पातं० योगद० १।२।९ ॥**

या सूत्रामध्यें महामुनि पतंजलीनें व त्यावरील भाष्यकार व्यास मुनीनें पुनर्जन्माचें अस्तित्व प्रतिपादिलें आहे. सर्व प्राण्यांमध्यें जी मरणाची भीति दिसते तीवरून पूर्वजन्म आहे असें ठरतें. उत्पन्न झालेल्या जन्तूला मरणाची भीति आहे हा अनुभव सार्वत्रिक आहे. विद्वानांनांहि मरणाविषयीं हाच अनुभव आहे. जर या जीवाला पूर्वी कधींहि मरण आलें नसेल, तर त्याला मरणाच्या दुःखांची स्मृति कधींहि उत्पन्न होणार नाहीं, व जर तसें भयाचें स्मरण न राहिलें तर प्रत्येक जन्मास आलेल्या प्राण्यास मरणाचें भय वाटतें तें वाटण्याचें कांहीं कारण नाहीं कारण, कोणत्याहि पदार्थाविषयीं भीति किंवा आनंद होणें हें पूर्व अनुभवावरच सर्वस्वी अवलंबून आहे. यावरून उघड ठरतें कीं, सर्व प्राण्यांनां वाटणारी मरणाची भीति ही पूर्वीच्या मरणाच्या अनुभवानें उत्पन्न झालेली आहे. अर्थात् पूर्वजन्म व पुनर्जन्म आहे. तसेंच न्यायदर्शनांत—

**पुनरुत्पत्तिः प्रेत्यभावः ॥ ९ ॥**

**न्यायद. १।१।१९ ॥**

( प्रेत्य ) मरणानंतर ( भावः ) उत्पत्ति, पुनः जन्म घेणें यालाच पुनरुत्पत्ति किंवा पुनर्जन्म असें म्हणतात. याप्रमाणें गौतमऋषीनें न्यायदर्शनांत व त्यावरील भाष्यकार वात्स्यायनमुनीनेंहि पुनर्जन्माच्या अस्तित्वाविषयीं स्पष्ट सांगितलें आहे. येथवर दिलेल्या आधारांवरून पुनर्जन्म आहे असें ठरतें.

( प्रश्न ) जर पूर्वजन्म आहे तर त्यांत घडलेल्या गोष्टींचें स्मरण आम्हांस कसें नाहीं? ( उत्तर ) या जन्मांतील लहानपणच्या पांच वर्षांच्या वयांत घडलेल्या गोष्टींचेंहि स्मरण पुढील वयांत नसतें. मग पूर्व जन्माची गोष्ट लांबच. यावरून पूर्वजन्म नाहीं असें ठरत नाहीं.

(प्रश्न) जर परमेश्वर पूर्व शुभाशुभ कर्माचीं फलें बरीं वाईट देतो असें मानावयाचें असेल तर अमूक कर्माबद्दल हें अमूक फळ आहे असें आम्हांला पूर्वकर्माचें स्मरण पाहिजे तरच पुढें आमच्यांत सुधारणा होईल. नाहींतर सुधारणा तरी होईल कशी व ज्या अर्थी पूर्वजन्माचें स्मरण नसतां, तो आम्हांला हवीतशी शिक्षा देतो त्याअर्थी त्याला अन्याय करणारा असें कां म्हणूं नये? (उत्तर) पहा. ज्ञान दोन प्रकारचें आहे. एक प्रत्यक्ष व दुसरें अनुमानानें मिळणारें. शरीरामध्यें ज्वरादिक रोग उत्पन्न झाले असतां, वैद्याला विद्येच्या ज्ञानानें आपण अमूक कुपथ्य केलें; त्याचा हा परिणाम असें समजेल व जो वैद्य नसेल, तो अनुमानानें एवढें जाणील कीं आपल्याकडून कांहीं तरी कुपथ्य पूर्वीं झालेंच असलें पाहिजे कारण, कांहीं **कारण** नसतां **कार्य** होतच नाहीं. कार्याला कारणाची आवश्यकता आहे. याचप्रमाणें न्यायकारी ईश्वर पापपुण्यावांचून कोणालाहि उगीच सुख दुःख देणार नाहीं. शिवाय संसारामध्यें, नीच, उच्च, सुखी, दुःखी असे अनेक स्थितींत असलेले लोक दिसतात; त्या त्यांच्या स्थितीची उपपत्ती पूर्वजन्म मानल्यावांचून लागणार नाहीं. यावरून पुनर्जन्म व पूर्वजन्म आहेत हें ठरतें. एकजन्म मानणाऱ्या लोकांचे आणखी पुष्कळ प्रश्न आहेत त्या सर्वांचीं उत्तरें विचार करून जाणतां येण्यासारखीं आहेत. विस्तारभयास्तव येथें इतकेंच पुरे.

---

## विवाहविषय.

---

**गृ॒भ्णामि॑ ते सौभग॒त्वाय॒ हस्तं॒ मया॒ पत्या॑ ज॒रद॑ष्टि॒र्यथास॑ः ॥ भगो॑ अर्य॒मा स॑वि॒ता पुर॑न्धि॒र्मह्यं॑ त्वादु॒र्गार्ह॑पत्याय दे॒वाः ॥ १ ॥**

ऋ० ८।३।२७।१॥

हे कुमारि! (सौभागत्वाय) सन्तानोत्पत्ति इत्यादि कार्यांची सिद्धि व्हावी म्हणून मी (ते) तुझा (हस्तम्) हात (गृभ्णामि) धरतों, तुझें पाणिग्रहण करतों, तुझ्या बरोबर मी विवाह करितों. हे स्त्रिये! (यथा) ज्याप्रमाणें (मया पत्या) माझ्या बरोबर तूं (जरदष्टिः) वृद्धावस्था येईपर्यंत (आसः) राहिलें पाहिजेस त्याचप्रमाणें मीहि तुझ्या बरोबर राहिलें पाहिजे. [ स्त्रीनें एकपतिव्रत व पुरुषानें एकपत्निव्रत आच-

रलें पाहिजे. ] याप्रमाणें आम्ही दोघांनीं प्रीतीनें राहून धर्माचरण करावें व एकमेकांस आनंद होईल असें करावें. ( भगः ) भगवान्, ऐश्वर्यवान्, ( अर्यमा ) न्यायकर्ता, ( सविता ) जगदुत्पादक, ( पुरन्धिः ) जगदुद्धारक अशा परमेश्वरानें ( मह्यम् ) माझ्याशीं ( गार्हपत्याय ) गृहकार्यासाठीं ( त्वाम् ) तुझा विवाह केला आहे. ( देवः ) त्याला हे विद्वान् लोक साक्षी आहेत. जर आम्हीं या प्रतिज्ञेचें उल्लंघन केलें तर परमेश्वराच्या शासनांनां पात्र होऊं. ॥ १ ॥

इहैव स्तं मा वि यौष्टं विश्वमायुर्व्यश्नुतम् ॥
क्रीळन्तौ पुत्रैर्नप्तृभिर्मोदमानौ स्वे गृहे २ ॥

ऋ. ८।३।२८।२॥

विवाह केल्यावर स्त्रीपुरुषांनीं कसें रहावें याविषयीं या मंत्रांत सांगितलें आहे. ईश्वर म्हणतोः–( इह एव ) हे स्त्रीपुरुषहो! तुम्हीं दोघांनीं या गृहस्थाश्रमामध्यें सदोदित सुखानें ( वस्तम् ) रहावें; ( मा वि यौष्टम् ) कोणत्याहि कारणानें तुम्हां दोघांमध्यें विरोध किंवा विरह उत्पन्न होऊं नये. याप्रमाणें माझ्या आशीर्वादानें धर्माचरण करून, परोपकार करून, माझी भक्ति करा व ( विश्वम् आयुः ) सर्व आयुष्यामध्यें ( व्यश्नुतम् ) सुखी रहा. तसेंच ( स्वेगृहे ) आपल्या घरीं ( पुत्रैः नप्तृभिः ) मुलगे व नातू यांसह ( मोदमानौ ) राहून आनंद करा. तसेंच ( क्रीळन्तौ ) सर्वदा सदाचरण, धर्माचरणरूपीं क्रिया करीत असा. या मंत्रावरून उघड दिसतें कीं, एका स्त्रीला जसा एकच पति त्याचप्रमाणें एका पुरुषाला एकच स्त्री करण्याचा अधिकार आहे. विवाहविषयक जेवढे मंत्र वेदांमध्यें आहेत त्या सर्वांत एकवचनीच प्रयोग असल्यामुळें हेंहि उघड ठरतें कीं, पुरुषानें अनेक स्त्रिया करणें, व स्त्रीनें अनेक पति करणें हें वेदविरुद्ध आहे. अर्थात् पुरुषानें एक पत्निव्रत व स्त्रीनें एकपतिव्रत पाळलें पाहिजे. याप्रमाणें विवाह विषयक मंत्र वेदांमध्यें पुष्कळ आहेत.

## नियोगप्रकरण.

**कुहंस्विद्दोषा कुहवस्तोरश्विना कुहाभिपित्वं करतः कुहोषतुः ॥ को वां शयुत्रा विधवेव देवरं मर्यं न योषा कृणुते सधस्थ आ ॥ १ ॥** ऋ० ७।८।१८।७॥

विवाहित स्त्री व पुरुष ह्यांस सन्तान न होतां, वैधव्य व विधुरदशा प्राप्त झाली तर त्यांनां त्या आपत्कालीं सन्तानोत्पत्तीची आवश्यकता असल्यास कसें आचरण करावें त्याचें या नियोग प्रकरणामध्यें विधान आहे. हे विवाहित स्त्रीपुरुष हो! (कुह स्वित्) कोणत्या ठिकाणीं (दोषा) रात्रीचे वेळीं (वस्तोः) तुम्हीं होतां? (अश्विना) दिवसाला (कुह०) कोठें राहतां? (कुह अभिपित्वम्) कोठें तुम्हीं एकमेकांनां मिळतां? (कुह ऊषतुः) तुमचें निवासस्थान कोठें आहे? (को वां शयुत्रा) तुमचें शयनस्थान कोठें आहे? या मंत्रांतील द्विवचनान्त शब्दांनीं एका पुरुषाला एकच स्त्री व एका स्त्रीला एकच पुरुष करणें इष्ट आहे हें उघड होतें. स्त्रीपुरुषांमध्यें प्रेम असावें. कधींहि परस्परांमध्यें वियोग होऊं नये किंवा कोणींहि व्यभिचारी होऊं नये. (विधवा देवरम् इव) ज्याप्रमाणें विधवा संतानोत्पत्तीसाठीं द्वितीय वराजवळ जाते त्याप्रमाणें तुम्हीं दोघांनीं संतानोत्पत्तीसाठीं एकत्र व्हावें. [**देवरः कस्माद्द्वितीयो वर उच्यते॥** निरु० ३।१५॥ दुसऱ्या वराला देवर असें म्हणतात. विधवास्त्रीनें विधुर पुरुषाशींच, संतानासाठींच नियोग करण्यास वेदाची आज्ञा आहे. विधवास्त्रीनें अविवाहित पुरुषाशीं किंवा अविवाहितानें विधवेशीं नियोग करूं नये. **ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या द्विजांमध्यें स्त्रीपुरुषांचा एकदांच विवाह करण्याची वेदांमध्यें आज्ञा आहे. द्विजांनीं पुनर्विवाह करूं नये हाच त्यांचा वैदिक धर्म होय.** पण आपत्कालीं संतानोत्पत्तीसाठीं पाहिजे तर नियोग करावा. शूद्रांमध्येंच, (तो विचाहीन असल्यामुळें,) स्त्रीचा किंवा पुरुषाचा पुनर्विवाह केला जातो. पण स्त्रीपुरुषांचा एकदां विवाह झाल्यानंतर त्यांपैकीं कोणींहि पुनः विवाह करणें हें वेदविरुद्ध आहे. ज्या स्त्रीपुरुषांनीं नियोग केला असेल त्याणीं पुढें दिल्याप्रमाणें राहावें:—(मर्यं न योषा) ज्याप्रमाणें विवाहित पुरुषाच्या जवळ विवाहित स्त्री (सधस्ते) एका ठिकाणीं संतानोत्पत्तीच्या वेळीं (कृणुते) राहते त्याचप्रमाणें नियोग केलेल्या स्त्रीपुरुषांनींहि रहावें.॥१॥

---

१ हा आपत्कालचा विषय आहे. या नियोगाविषयीं पूर्ण खुलासा पुढें करण्यांत येईल.

**इयं नारी पतिलोकं वृणाना निपद्यत उपत्वा मर्त्य प्रेतम् ॥ धर्मं पुराणमनुपालयन्ती तस्यै प्रजां द्रविणं चेह धेहि ॥ २ ॥**

अथर्व० १८।३।१।१ ॥

( इयं नारी ) ही निपुत्रिक विधवा स्त्री ( प्रेतम् ) मृतपतीला सोडून ( पतिलोकम् ) सन्तानसुख ( वृणाना ) मिळविण्याची इच्छा करणारी, ( मर्त्य ) हे मनुष्या! ( त्वा ) तुझ्याजवळ ( उप निपद्यते ) येत आहे. तुझ्याजवळ नियोग करण्याच्या इच्छेनें येत आहे, तर तूं तिचा स्वीकार कर व तिच्या ठिकाणीं संतानोत्पत्ति कर कारण, ( पुराणं धर्मम् ) सनातन धर्माचें ( अनुपालयन्ती ) परिपालन करणारी अशी ती आहे; ती निपुत्रिक असल्यामुळें आपत्कालच्या धर्माप्रमाणें वागूं इच्छित आहे, म्हणून ( तस्यै ) त्या विधवेसाठीं ( इह ) या लोकामध्यें किंवा सध्यां ( प्रजां धेहि ) संतानोत्पत्ति कर. ( द्रविणं च ) द्रव्य किंवा वीर्य तिला दे. ॥ २ ॥

**उदीर्ष्व नार्यभि जीवलोकं गतासुमेतमुपशेष एहि ॥ हस्तग्राभस्य दिधिषोस्तवेदं पत्युर्जनित्वमभि सं बभूथ ॥ ३ ॥**

ऋ. अ० ७ अ० ६ व० २७

( नारि ) हे विधवा स्त्रिये! तुला सन्तान उत्पन्न करण्याची इच्छा असेल तर ( गतासुम् एतम् ) या मृतपतीची आशा सोडून ( जीवलोकम् ) जिवन्त असणाऱ्या देवर-द्वितीयवराजवळ ( अभि एहि ) जा. ( उपशेषे ) त्याच्याशीं स्त्रीधर्माप्रमाणें वाग. त्यापासून उत्पन्न होणारें संतान ( हस्तग्राभस्य ) तुझें पाणिग्रहण करणाराचें होईल. जर नियुक्त पतीसाठीं नियोग असेल तर मात्र ( दिधिषोः ) तें संतान त्याचें होईल. नाहींतर ( तव इदं जनित्वम् ) हें सन्तान तुझें होईल. हे विधवे! ( उदीर्ष्व ) **धार्मिक तत्वाप्रमाणेंच नियोगाची इच्छा कर कामाची इच्छा धरून नियोग करणें हें पाप आहे.** म्हणून ( अभिसंबभूथ. ) धर्माप्रमाणें तुम्ही दोघेहि संतानोत्पत्ति करून सुखानें रहा. ॥ ३ ॥

**इमां त्वमिन्द्र मीढ्वः सुपुत्रां सुभगां कृणु ॥ दशास्यां पुत्रानाधेहि पतिमेकादशं कृधि ॥ ४ ॥** ऋ० ८।३।२८।१ ॥

(इन्द्र) हे विवाहित पति ! ( मीढ्वः) हे वीर्यदान करण्यास समर्थ! (त्वम् इमाम्) तूं या विवाहित स्त्रीला (सुपुत्राम्) उत्तम पुत्रांनीं युक्त व (सुभगाम्)उत्तम सुखानें युक्त (कृणु) कर. (अस्याम्) हिच्या ठिकाणीं (दश पुत्रान्)दहा मुलांनां (आधेहि) उत्पन्न कर. त्यापेक्षां अधिक करूं नको. हे स्त्रिये, विवाहित किंवा नियोजित पतीपासून तुला दहा सन्तानें झाल्यानंतर ( पतिमेकादशंकृधि ) त्या दहा सन्तानाप्रमाणेंच पतीला अकरावा समज. दहा सन्तानें प्राप्त झाल्यानंतर स्त्रीनें पतीला पुत्रवत् व पतीनें स्त्रीला पुत्रीवत् मानावें. विवाहित पतीपासून मुळींच सन्तान झालें नाहीं व तो गतप्राण झाला तर सन्तानोत्पत्तीसाठीं, आपत्कालीं आचरण करण्याच्या धर्माप्रमाणें नियोग करावा. संतानोत्पत्ति नियुक्त पुरुषापासून न होतां, तोहि मरण पावला व पुत्रावांचून फारच आपात्ति प्राप्त होण्याचा संभव असला तर जरूरी वाटल्यास पुनः नियोग करावा. त्याचप्रमाणें पुरुषाची स्त्री सन्तान न होतां मरण पावली तर त्यानें विधवा स्त्रीशीं नियोग करावा व तिच्यापासूनहि सन्तान उत्पन्न झालें नाहीं व ती मरण पावली तर त्यानेंहि वर लिहिलेल्या स्थितींत पुनः नियोग करावा. सन्तानोत्पतीसाठीं नियुक्त स्त्रीपुरुषांचा संबंध गर्भस्थापना होईपर्यंत ऋतुकालीं म्हणजे महिन्यांतून एकदांच विहित आहे. प्रबल मनोविकारांच्या तृप्तीसाठीं नियोग नव्हे. आपत्कालीं नियोग करावा अशी जरी आज्ञा आहे तरी **विधवेनें किंवा विधुरानें पति किंवा पत्नि मेल्यानंतर मनोनिग्रह करून नियोग न करतां आमरण ब्रह्मचर्यांत राहून दुसऱ्यांवर पकार करणें हें फारच श्रेष्ट होय.**

उत्तरोत्तर पतीचीं नांवें:—

**सोमः प्रथमो विविदे गन्धर्वो विविद उत्तरः ॥ तृतीयोअग्निष्टे पतिस्तुरीयस्ते मनुष्यजाः ॥ ५ ॥** ऋ. ८।३।२७।१॥

हे स्त्रिये! ( प्रथमः विविदे ) जो तुझा पहिला पति झाला त्याला ( सोमः ) सौकुमार्यविशिष्टतेमुळें सोम असें म्हणतात. ( उत्तरः विविदे ) दुसऱ्या सन्तानोत्पत्तीच्या वेळीं किंवा दुसरा जो तुला नियोगामध्यें प्राप्त झाला त्याला ( गन्धर्वः ) भोगाभिज्ञत्वामुळें गन्धर्व असें म्हणतात. ( ते तृतीयः अग्निः ) तिसऱ्याला अग्नि असें म्हणतात कारण, तो भुक्तभोग असल्यामुळें त्याच्या शरीरांतील वीर्यादिक धातू जळालेले असतात. ( तुरीयः ते ) तुझा चवथा व त्याच्या पुढचे ( मनुष्यजाः ) सामान्य मनुष्य संज्ञक होतात. त्याचप्रमाणें प्रथम स्त्री सोम्या, दुसरी गंधर्वी, तिसरी आग्नायी व चवथी व पुढची मनुष्यजा असें समजावें. [ या मंत्रांत सोम, गन्धर्व, अग्नि व मनुष्य हीं चार क्रमाक्रमानें योग्यता कमी दाखविणारीं नांवें आहेत. यावरून नियोग करणें किंवा जास्त नियोग करणें हें चांगलें नाहीं असें स्पष्ट होतें. ]

**अदेवृघ्न्यपतिघ्नीहैधि शिवा पशुभ्यः सुयमा सुवर्चाः ॥ प्रजावती वीरसूर्देवृकामा स्योनेममग्निं गार्हपत्यं सपर्य ॥ ६ ॥**

अथर्व० १४।२।१८ ॥

( अपतिघ्नि ) हे स्त्रिये! तूं विवाहित पतीची उत्तम सेवा कर! ( अदेवृघ्नि ) तूं दीराची सेवा कर. **पतीला व दीराला दुःख देऊं नको.** ( पशुभ्यः )

---

१ विवाहित किंवा नियोजित पतीपासून दहा सन्तानें प्राप्त करून घेण्याची वेदमन्त्रांत आज्ञा आहे. ती सन्तानोत्पत्तीची यत्ता दाखविणारी आहे. कितीहि आपत्काल प्राप्त झाला तरी विवाहित किंवा नियोजित स्त्रीपुरुषांनीं दहापेक्षां अधिक सन्तानोत्पत्ति करूं नये. तीन सन्तानें उत्पन्न करणें श्रेष्ठ होय. त्या नंतर अधिक पुत्रोत्पाति करणें सामान्य बुद्धीच्या मनुष्यांचें अर्थात् कनिष्ट आचरण होय.

महाभारतांत एकाठिकाणीं वर्णन आलें आहे कीं, वेदव्यासानें पंडु, धृतराष्ट्र व संजय असे तीन नियोजित पुत्र उत्पन्न केले. ते क्षेत्रदोषामुळें हवे होते तसे झाले नाहींत म्हणून चवथा पुत्र उत्पन्न करण्यास सांगितलें असतां, वेदव्यासानें स्वतःची ऋषियोग्यता जाणून तिहींपेक्षां अधिक सन्तानोत्पत्ति करण्यास अनुकूलता दर्शविली नाहीं. ह्यावरून विवाहित किंवा नियोजित श्रेष्ठ पुरुषांतील सन्तानोत्पत्तीचें प्रमाण चांगलें लक्षांत येण्यासारखें आहे.

जे विवाहित किंवा नियोजित स्त्रीपुरुष सर्व आयुष्यक्रमांत तीन वेळा सन्तानोत्पत्तिकरितां एकत्र होतील ते सर्वांत श्रेष्ठ व्यवहार करणारे जाणावे. दहापर्यंत यत्ता पाळणारे मनुष्य व त्यापुढें पशुव्यवहार समजावा. हें वेदाज्ञेचें तात्पर्य सर्व सौख्यप्राप्तीची इच्छा करणाऱ्या स्त्रीपुरुषांनीं विचार करण्यासारखें आहे.

पशूंची–घरांतील गाई, बैल वगैरेंची चांगली काळजी घे. ( शिवा ) कल्याण करणारी तूं हो, ( सुयमा ) तूं चांगल्या नियमांनीं वाग, ( सुवर्चाः ) शरीराची कांति चांगली ठेव, ( प्रजावती ) संतानांचें उत्तम पोषण कर व ( वीर सूः ) आपले पुत्र शूर निपजतील असें त्यांनां वळण लाव. ( देवृकामा ) देवर–दीर–द्वितीय–नियुक्त पति यांच्या इच्छेप्रमाणें वाग. ( स्योना ) सर्वांनां सुख दे. ( इमं गार्हपत्यम् अग्निम् ) या गार्हपत्य अग्नीला व गृहसंबंधीं सर्व कामाला ( सपर्य ) संभाळ. यामंत्रामध्यें स्त्रीपुरुषांच्या नियोगाची व्यवस्था दिलेली आहे. [ या मंत्रांतील " **अपतिघ्नी** " हा शब्द फार महत्वाचा आहे. त्याचा अर्थ "पुरुषाला न मारणारी–न दुःख देणारी स्त्री " असा आहे. अर्थात् जी स्त्री, स्त्रीधर्माप्रमाणें वागते व विवाहित पुरुष जिवंत असेपर्यंत त्याला सुख देते, तिला जर संतान झालें नाहीं व पति मरण पावला व संतानाची आवश्यकता भासली तर तिनें आपद्धर्माप्रमाणें नियोग करून संतानोत्पत्ति करावी. त्याचप्रमाणें उलटपक्षीं पुरुषानेंहि करावें. पण पुरुषाला त्रास देणाऱ्या किंवा मारणाऱ्या स्त्रीला व तसेंच स्त्रीला दुःख देणाऱ्या किंवा मारणाऱ्या पुरुषाला नियोग करण्याचा अधिकार नाहीं. हें अपतिघ्नी वगैरे शब्दांवरून उघड दिसणार आहे. ] नियोगाविषयीं जास्त खुलासा व ऐतिहासिक पुरावे पुढें देण्यांत येतील.

---

## राजाचा व प्रजेचा धर्म.

**त्रीणि राजाना विदथे पुरूणि परि विश्वानि भूषथः सदांसि ॥ अपश्यमत्र मनसा जगन्वान्व्रते गन्धर्वाँ अपि वायुकेशान् ॥ १ ॥** ऋ० ३।२।२४।२६ ॥

ज्याप्रमाणें सूर्य व चंद्र सर्व पदार्थांनां प्रकाश देतात, त्याचप्रमाणें सूर्य व चंद्र यांतील विशिष्ट गुण–तेज व शांति–धारण करणाऱ्या ( राजाना ) राजे लोकांनीं ( त्रीणि ) तीन प्रकारच्या ( सदांसि ) सभांमध्यें ( भूषथः ) जाऊन सभास्थान सुशोभित करावें. या सभांच्यायोगानें राज्यव्यवहार चालविला असतां, ( विदथे ) युद्धांमध्यें देखील ( पुरूणि ) पुष्कळ सुखें व विजय प्राप्त होतात. तसेंचः—( परिविश्वानि ) या सभांच्या योग्य व्यवस्थेनें सर्व प्राणिमात्रांला सुख होतें. ( १ ) **राजकार्यसभा,**

( २ ) **आर्यविद्यासभा** व ( ३ ) **आर्यधर्मसभा** या त्या तीन सभा होत. **राजकार्यसभे**मध्यें राजकीय व्यवहार चालवावे, **आर्यविद्यासभा** या संस्थेनें विद्याप्रचार करावा व **आर्यधर्मसभे**नें सर्व प्रजेमध्यें धर्मजागृति करून अधर्माचा नाश करावा. या सभांमध्यें येणारे सभासद धर्मात्मे, विद्वान्, सारासार विचारें करणारे, कर्तव्यदक्ष, व्यवहारचतुर असे असावेत. त्यांणीं परिस्थितीचा नीट विचार करून कर्तव्यें व अकर्तव्यें यांचा प्रचार किंवा निरोध यथायोग्य करावा. अशा सभांच्या हातून चालविलेला राज्यकारभार लोकांनां सुखावह होतो; पण जेथें एकाच राजाच्या हातामध्यें अनियंत्रित राजसत्ता असते तेथें लोकांनां फार त्रास भोगावा लागतो. हा नियम ( अत्र अपश्यम् ) या पृथिवीवर नजरेस पडतो. जो मनुष्य ( व्रते ) सत्याचरणरूपी व्रतामध्यें रत असतो व ( मनसा ) मनानें ज्ञानाच्या सहाय्यानें खरें व न्याय्य कोणतें हें (जगन्वान्) जाणतो तोच वरील सभांचा सभासद होण्यास योग्य आहे असें जाणावें. तसेंच ते सभासद ( गन्धर्वान् ) राजपालनादिव्यवहारांमध्यें कुशल व ( वायुः ) वायूप्रमाणें दूरवर, दूतद्वारा ज्यांची गति होत आहे असे व ( केशान् अपि ) सूर्यकिरणांप्रमाणें अंधःकार व प्रकाश—अन्याय व न्याय यांचा विचार करणारे असावेत. अशा तऱ्हेचे सभासद सभेमध्यें नेमावे व त्यांच्या द्वारानें सर्व राज्यव्यवहार चालवावा ही वेदद्वारा परमेश्वराची आज्ञा आहे. ॥ १ ॥

**यत्र ब्रह्मं च क्षत्रं च सम्यञ्चौ चरतः सह ॥**
**तं लोकं पुण्यं प्रज्ञेषं यत्र देवाः सहाग्निना ॥ ३ ॥**

यजु० २०।२५ ॥

( यत्र ) ज्या देशांत ( ब्रह्म ) ब्राह्मण व ( क्षत्रम् ) क्षत्रिय हे ( सम्यञ्चौ ) एक विचारानें राहतात व ( सह चरतः ) एक विचारानें काम करतात तोच देश पुण्यकारक समजावा व तोच ( यज्ञेषम् ) सर्व प्रकारचे यज्ञ व उत्तम व्यवहार करण्यास योग्य समजावा. ( यत्र ) अशा देशांतील ( देवाः ) विद्वान् लोक ( अग्निना सह ) अग्निहोत्रादि व शिल्पादि सर्व कृत्यें योग्य रीतीनें करतात म्हणून तो देश सर्व प्रजाजनांला सुखकारक होतो. ॥ ३ ॥

**देवस्य त्वा सवितुः प्रसवेऽश्विनोर्बाहुभ्यां पूष्णो हस्ताभ्याम् ॥ अश्विनोर्भैषज्येन तेजसे ब्रह्मवर्चसायाभिषिञ्चामि ॥ इन्द्रस्ये-**

**न्द्रियेण बलाय श्रियै यशसेऽभिषिंञ्चामि ॥ ४ ॥ कोऽसि कतमोऽसि कस्मै त्वा काय त्वा ॥ सुश्लोक सुमङ्गल सत्यराजन् ॥५॥ शिरो मे श्रीर्यशो मुखं त्विषिः केशाश्च श्मश्रूणि ॥ राजा मे प्राणो अमृतं सम्राट् चक्षुर्विराट् श्रोत्रम् ॥ ६ ॥** यजु० मं० ३।४।५॥

हे सभाध्यक्षा! तुला (देवस्य सवितुः) ज्ञानानें प्रकाशमान होणाऱ्या व सर्व उत्पन्न करणाऱ्या परमेश्वराच्या (प्रसवे) या प्रजेमध्यें आम्ही राजाचे ठिकाणीं नेमतों कारण, तुझ्यामध्यें पुढील गुण आहेत. (अश्विनोः बाहुभ्याम्) तुझ्या बाहूंमध्यें सूर्य व चंद्र यांप्रमाणें बल व वीर्य आहे. तसेंच (पूष्णः हस्ताभ्याम्) पुष्टि उत्पन्न करणाऱ्याच्या दातृत्वशक्तीनें युक्त असणाऱ्या हातांप्रमाणें तुझे हात दान करण्यास समर्थ आहेत. (अश्विनोः भैषज्येन) व तुला पृथिवी, अंतरिक्ष, विद्युत्, औषधीसमूह यांची उत्तम माहिती आहे व सर्व प्रकारचे आमचे रोग-आधि व व्याधि-दूर करण्यास तूं समर्थ आहेस; या गुणांमुळें आम्ही तुला राजाचे स्थानीं नेमलें आहे म्हणून तूं (तेजसे) न्यायादि सद्गुणांचा प्रकाश व (ब्रह्मवर्चसे) विद्येचा प्रचार करावास. तसेंच (इन्द्रस्य इन्द्रियेण) परमेश्वराच्या विज्ञानरूपी बलानें (बलाय) बल, (श्रियै) चक्रवर्ति राज्यलक्ष्मी, इतर संपत्ति (यशसे) व कीर्ति सर्व लोकांत वाढवावी यासाठीं (अभिषिञ्चामि) तुला राज्यावर अभिषिक्त करतों. [ राजाचे ठिकाणीं वीर्य, शौर्य, बल, दातृत्व, आरोग्य-रक्षण करण्याचें ज्ञान, न्याय, विद्याभिरुची, संपत्ति, यश इत्यादि गुण पाहिजेत. ] ॥ ४ ॥ हे परमेश्वरा! तूं (कः) सुखस्वरूप (असि) आहेस, यासाठीं आम्हांलाहि सुखदायक राज्याची प्राप्ती होवो. तसेंच तूं (कतमः) अत्यंत आनंददायक आहेस म्हणून आम्हांलाहि लोकनियुक्त पूर्वोक्त सभांच्या द्वारानें सुख होईल असें कर. (कस्मै) सुखमय, अशा (त्वा) तुझा आम्ही सदैव आश्रय करितों. त्याचप्रमाणें (काय) आनंदमय अशा परमेश्वराची-तुझी-उपासना आम्हीं राज्यप्राप्तीसाठीं करतों. (सुश्लोक) हे देवा! तूं सत्कीर्तीनें युक्त आहेस, (सुमङ्गल) तूं कल्याण करणारा आहेस व तूं (सत्यराजन्) खरा राजा आहेस. तूं सत्याचा प्रकाशक, राज्य देणारा व न्यायी असा तूंच आहेस. [ प्रजांनां सुख देणें हाच राजाचा मुख्य धर्म आहे ]

॥ ५ ॥ परमेश्वर म्हणतो-हे सभाध्यक्षा! हे राजा! तूं असें समज कीं, (श्रीः मे शिरः) संपत्ती हें माझें मस्तक आहे, (यशः मुखम्) उत्तम कीर्ति हें माझें तोंड, (त्विषिः केशाः श्मश्रूणि) सत्याचा न्याय करणें हें मला केश व श्मश्रूंप्रमाणें भूषण आहे, (प्राणः मे राजा) परमेश्वर हाच खरा राजा आहे, शरीरांतील प्राणवायू हाच जीवनाला हेतू आहे व प्रजांचें रंजन करणें हाच माझा प्राण आहे. (अमृतं सम्राट्) मोक्षसुख हेंच चक्रवर्ति राज्य; (चक्षुः विराट् श्रोत्रम्) सत्यविद्येचा, माझ्या व प्रजेच्या ठिकाणीं प्रकाश उत्पन्न करणें हेंच श्रोत्रेंद्रिय व नेत्र यांप्रमाणें आहे. [संपत्तीचें रक्षण, यश, न्यायपालन, आरोग्यरक्षण, विद्याप्रसार करणें हें जसें राजाचें तसेंच सभाध्यक्षाचें व सभासदाचें मुख्य कर्त्तव्य आहे.] ॥ ६ ॥

**बाहू मे बलमिन्द्रियꣳहस्तौ मे कर्म वीर्यम्॥ आत्मा क्षत्रमुरो मम ॥ ७॥ पृष्ठीर्मे राष्ट्रमुदरमꣳसौ ग्रीवाश्च श्रोणी॥ ऊरू अरत्नी जानुनी विशो मेऽङ्गानि सर्वतः ॥ ८ ॥**

यजु. २० मं. ७।८॥

(बलं मे बाहू) राजानें असें समजावें कीं, चतुरंग[1] सैन्य व इतर शक्ति हेच आपले बाहू आहेत; (इन्द्रियं मे हस्तौ) विद्यायुक्त शुद्ध मन व इतर इंद्रियें हींच ग्रहण करण्याचीं साधनें आहेत; (वीर्यं कर्म) पराक्रम करणें हेंच माझें कर्तव्य; (मम आत्मा उरः क्षत्रम्) माझ्या आत्म्याचें अधिकरण जें हृदय-अंतःकरण-तोच क्षत्रिय होय ॥ ७ (राष्ट्रं मे पृष्ठीः) राज्य हाच माझा पृष्ठभाग आहे; (अंसौ उदरम्) सेना व कोश हे माझे खांदे व पोट होय, (ग्रीवा च श्रोणी) प्रजेला सुख देणें हेंच माझें कंठभूषण व पुरुषार्थ करणें हाच माझा नितंब भाग आहे. (अरत्नी ऊरू) माझी प्रजा व्यापारांमध्यें व गणितादि विद्यांमध्यें उन्नतिप्रत जाईल असें करणें याच माझ्या मांड्या होत, (जानुनी विशः मे अङ्गानि सर्वतः) राजसभा व प्रजासभा यांचा मेळ राखणें हेंच माझें मुख्य अंग आहे. तात्पर्य, माझ्या प्रजांनां सर्व प्रकारचीं सुखें मिळतील असें करणें हेच माझे सर्व अवयव होत. [ज्याप्रमाणें स्वतःचे अवयव पुष्ट करण्यांत प्रत्येकास आनंद होतो, त्याच प्रमाणें प्रजेचें कल्याण करण्यांत राजाला आनंद झाला पाहिजे. आपलें सर्व शरीर प्रजेसाठीं आहे असें राजानें समजावें.] ॥ ८ ॥

---

१. हत्ती, घोडे, रथ व पायदळ.

प्रतिक्षत्रे प्रतितिष्ठामि राष्ट्रे प्रत्यश्वेषु प्रतितिष्ठामि गोषु ॥ प्रत्यङ्गेषु प्रतितिष्ठाम्यात्मन् प्रतिप्राणेषु प्रतितिष्ठामि पुष्टे प्रति द्यावापृथिव्योः प्रतितिष्ठामि यज्ञे ॥ १० ॥ त्रातारमिन्द्रमवितारमिन्द्र ँ हवे हवे सुहव ँ शूरमिन्द्रम् ॥ ह्वयामि शक्रं पुरुहूतमिन्द्र ँ स्वस्तिनो मघवा धात्विन्द्रः ॥ ११ ॥

यजु. २० मं. १०।५०॥

( प्रतिक्षत्रे राष्ट्रे ) धर्मानें पालन केलेल्या राष्ट्रामध्यें मी ( प्रतितिष्ठामि ) राहतों. परमेश्वर म्हणतो कीं, धर्मानें व नीतीनें चालविलेल्या राज्यामध्यें मी सर्व प्रकारें प्रकाशित होतों किंवा त्या राजाला व प्रजेला सर्व प्रकारें सहाय्य करतों. ( प्रत्यश्वेषु गोषु ) घोडे व गाई यांचाहि सांभाळ मी करतों. ( प्रत्यङ्गेषु ) सर्व जगाच्या प्रत्येक अवयवांत व ( आत्मन् ) प्रत्येक आत्म्यामध्येंहि मी राहतों. ( प्रतिप्राणेषु ) प्रत्येक प्राणाच्या ठिकाणीं मी असतों व ( पुष्टे ) प्रत्येक उन्नत पदार्थांत माझें व्यक्त वास्तव्य आहे. ( प्रतिद्यावापृथिव्योः ) आकाश व पृथिवी यांमध्यें व ( यज्ञे ) यज्ञामध्यें मी वास्तव्य करतों. तात्पर्य, मी सर्वव्यापक आहें. जे राजे व ज्या प्रजा माझी उपासना करतात व माझ्या आज्ञेप्रमाणें चालतात त्यांचा अभ्युदय व विजय सदैव होतात. याप्रमाणें सर्व राजांनीं उत्तम प्रकारें राज्याचें परिपालन करावें व सर्वत्र विद्या व न्याय यांचा प्रसार करावा ( राजानेंहि दूतांचा आश्रय करून सर्वगामी, सर्वज्ञ व्हावें ) ॥ १० ॥ ( त्रातारम् ) विश्वाचें रक्षण करणारा, ( इन्द्रम् ) ऐश्वर्यवान्, ( सुहवम् ) युद्धकौशल्य जाणणारा, ( शूरम् ) शूर, अत्यंत बलयुक्त, ( शक्रम् ) शक्तिमान् व शक्तिदायक, ( पुरुहूतम् ) शूरांनीं सेवा करण्यास योग्य, ( इन्द्रम् ) न्यायानें राज्याचें पालन करणारा असा परमेश्वर आहे; त्याला ( हवे हवे ) प्रत्येक युद्धामध्यें आमचा विजय व्हावा म्हणून ( ह्वयामि ) प्रार्थितों किंवा त्याचा आश्रय करतों. तो ( मघवा ) धनदाता परमेश्वर ( नः ) आम्हांला ( स्वस्ति ) सुख देवो. आमच्या सर्व राज्य-कार्यांमध्यें आमचाच विजय करो. ॥ ११ ॥

रक्षण करण्यास समर्थ, संपत्तिमान्, कुशल, बलिष्ठ असा मनुष्य पुढारी होण्यास योग्य असतो हें तात्पर्य.

इमं देवा असपत्न ँ सुवध्वं महते क्षत्राय महते ज्यैष्ठ्याय महते जानराज्यायेन्द्रस्येन्द्रियाय ॥ इममुमुष्य पुत्रममुष्यै पुत्रमस्यै विश एष वोऽमी राजा सोमोऽस्माकं ब्राह्मणाना ँ राजा ॥ १२ ॥ यजु० ॥ ९ ॥ ॥ ४० ॥ इन्द्रो जयाति न पराजयाता अधिराजो राजसु राजयातै ॥ चर्कृत्य ईड्यो वन्द्यश्चोपसद्यो नमस्यो भवेह ॥१३॥ त्वमिन्द्राधिराजः श्रवस्युस्त्वं भूरभि भूतिर्जनानाम् ॥ त्वं दैवीर्विश इमा विराजा युष्मत् क्षत्रमजरं ते अस्तु ॥ १४ ॥

अथर्व० ६ । १० । ९८ मं० १।२ ॥

( देवाः ) हे विद्वान् सभासद हो! ( महते क्षत्राय ) मोठ्या क्षात्रकर्मासाठीं, ( महते ज्यैष्ठ्याय ) अनंत विद्याज्ञान यांच्या वृद्धीसाठीं, ( महते जानराज्याय ) उत्तम रीतीनें विस्तृत राज्याचें पालन व्हावें म्हणून, ( इन्द्रस्य इन्द्रियाय ) सूर्याच्या प्रकाशानें जसा अन्धःकाराचा नाश होतो तद्वत् न्याय्यपद्धतीनें सर्व व्यवहार चालवून अनिष्ट पद्धतीचें निर्मूलन करण्यासाठीं, ( अस्यै विशे ) या प्रजांनां सुख मिळावें म्हणून ( इमम् असपत्नम् ) हें निष्कंटक राज्य ( असुवध्वम् ) ऐश्वर्ययुक्त करा. राजव्यवहार करणाऱ्या सभेनें लोकांनां सुख होईल व त्यांच्यांत विद्या व कलाकौशल्य वाढेल असें राज्य चालवावें. ( अस्माकं ब्राह्मणानाम् ) आम्हां विद्वान् लोकांचा राजा किंवा अध्यक्ष ( सोमः ) सौम्यगुणांनीं युक्त असणाराच असावा. क्रूर

किंवा अगदींच पंगू असा नसावा चंद्राप्रमाणें दुसऱ्यांस आनंद देणाऱ्या गुणांनीं तो युक्त असावा. राजाविषयीं लोकांनां पुढें लिहिल्याप्रमाणें सांगावें. ( एषः ) हा ( वः ) तुमचा ( राजा ) राजा आहे तुमचा व आम्हां सर्वांचा राज्यव्यवहार उत्तम रीतीनें चालावा म्हणून ( इमम् अमुष्य पुत्रम् अमुष्यै पुत्रम् ) हा या प्रख्यात पित्याचा व या विदुषी मातेचा पुत्र पूर्वोक्त उत्तम गुणांनीं युक्त आहे, म्हणून त्याला आज राज्याभिषेक केला आहे. याचा तुम्ही स्वीकार करा. हे राजा, ( अमी ) या प्रजा तुझ्या आहेत, त्यांचें तूं योग्य प्रतिपालन कर. [ लोकनियुक्त राजाचे अंगीं किंवा अन्य राजाचे अंगीं कोणकोणते गुण पाहिजेत हें या मंत्रांचा विचार करून जाणावें. ] ॥ १२ ॥ (इन्द्रः जयाति ) परमेश्वराचा विजय असो किंवा ऐश्वर्ययुक्त व सद्गुणयुक्त राजाचा विजय होवो. ( न परा॰ ) त्याचा कधींहि पराजय होणार नाहीं. ( अधिराजः ) परमेश्वर किंवा चक्रवर्तिराजा ( राजसु ) इतर मांडलिक राजांमध्यें ( राजयातै ) प्रकाशित होवो. चक्रवर्ति व मांडलिक राजे यांचा व्यवहार नीट चालून सर्व प्रजांनां सुख होवो. ( चर्कृत्य ) त्या ईश्वराची सर्व मनुष्यांनीं पुनः पुन्हां (ईड्यः) उपासना करावी. (वन्द्यः) हा वन्दनीय, ( उपसद्यः ) आश्रय करण्यास योग्य, (नमस्यः) नमन करण्यास योग्य (इह भव ) असा या ठिकाणीं झाला आहे. त्याचा जे सत्कार करतील तेच सत्कार करून घेण्यास योग्य होतील. ॥ १३ ॥ ( इन्द्र ) हे परमेश्वरा! तूं सर्वांचा अधिराजा आहेस व ( श्रवस्युः ) सर्वांचें हृद्गत ऐकणारा असा आहेस, म्हणून मलाहि तसेंच कर. ( त्वम् ) हे ईश्वरा! तूं ( जनानाम् अभिभूतिः ) लोकांनां इष्ट ऐश्वर्य देणारा असा आहेस, म्हणून माझ्यावरहि अनुग्रह कर. हे देवा! ( त्वम् ) ज्याप्रमाणें तूं ( दैवीः विशः ) दिव्यगुणसंपन्न प्रजांचें पालन करतोस व ( विराजाः ) त्यांचें तेज वाढवितोस त्या रीतीनें प्रजापालन करण्याचें सामर्थ्य माझ्यामध्यें उत्पन्न कर. हे राजाधिराज! ईश्वरा! हें तुझें ( क्षत्रम् ) विश्वरूपी महत् राज्य आहे व तें तूं न्यायानें चालवीत आहेस. हे परमेश्वरा! आम्हांलाहि तसें विस्तृत राज्य दे. अशी याचना केल्यावर कृपाळू परमेश्वर म्हणतो कीं, ( ते अस्तु ) तसें राज्य तुम्हांला मिळेल. हें भूगोलावरील राज्य तुमच्या स्वाधीन आहे. तुम्हीं सद्गुणांनीं युक्त व्हावें व राज्य मिळवावें. ॥ १४ ॥

**स्थि॒रा वः॑ स॒न्त्वायु॑धा परा॒णुदे॑ वी॒ळू उ॒त प्र॑ति॒ष्कभे॑ ॥ यु॒ष्माक॑मस्तु॒ तवि॑षी॒ पनी॑यसी॒ मा मर्त्य॑स्य मा॒यिनः॑ ॥ १५ ॥** ऋ. १।३।१८।२॥

**तं सभाच समितिश्च सेनाच ॥ १६ ॥**

अथर्व. १५।२।९।२॥

**इमं वीरमनुहर्षध्वमुग्रमिन्द्रं सखायो अनु-
संरभध्वम् ॥ ग्रामजितं गोजितं वज्रबाहुं
जयंन्तमज्मं प्रमृणन्तमोजसा ॥ १७ ॥**

अथर्व० ६।१०।९७।३॥

**सभ्यं सभां मे पाहि ये च सभ्याः सभा-
सदः ॥ त्वयेद्गाः पुरुहूत विश्व मायुर्व्य-
श्नवम् ॥ १८ ॥**

अथ० १९।७।५५।६॥

( स्थिरा वः० ) या मंत्राचा अर्थ प्रार्थनाविषयामध्यें ( पृष्ट १०५ ) सांगितला आहे. ॥ १५ ॥ ( सभा तं च ) सभेनें व प्रजेनें परमेश्वराला व त्या पूर्वोक्त अभिषिक्त राजाला किंवा सभाध्यक्षाला मानावें, ( समितिः च ) त्याच्या विचारानेंच युद्धादिक कृत्यें करावीं, ( सेना ) वीरपुरुषांच्या सेनेनेंहि परमेश्वर, राजा, सभेचा अध्यक्ष व सभा यांच्या अनुमतानें युद्धादि व्यवहार करावे. ॥ १६ ॥ ईश्वर सर्व मनुष्यांनां उपदेश करतो. ( सखायः ) हे मित्र हो! ( इमं वीरम् उग्रम् इन्द्रम् ) या शत्रुनाशक, युद्ध-निष्णात, निर्भय, तेजस्वी, ऐश्वर्ययुक्त अशा राजपुरुषाच्या किंवा परमेश्वराच्या ( अनु-हर्षध्वम् ) अनुसंधानानें वागा. असें करून शत्रूंचा पराजय करण्यासाठीं, ( अनुसंर-भध्वम् ) युद्धाला सुरुवात करावी. राजा कसा असावा किंवा पुढारी कसा असावा याविषयीं:—( ग्रामजितम् ) ज्याणें शत्रूंचीं गांवें पूर्वी शत्रूंकडून जिंकून घेतलीं असतील, ( गोजितम् ) ज्याणें इंद्रियें आपल्या स्वाधीन ठेविलीं आहेत किंवा ज्याणें पुष्कळ जमीन जिंकली आहे, ( वज्रबाहुम् ) ज्याचे बाहू वज्राप्रमाणें सुदृढ आहेत, (जयन्तम्) युद्धकौशल्यामुळें ज्याला नेहेमीं जय मिळतात, ( ओजसा प्रमृणन्तम् ) बलानें व पराक्रमानें शत्रूंवर तुटून पडणारा व त्यांचा संहार करणारा, अशा वीराचा आश्रय करून ( अज्म ) सदैव विजय मिळवूं—मिळवावा. ॥ १७ ॥ ( सभ्य ) हे परमेश्वर! ( मे सभां पाहि ) माझ्या या सभेचें रक्षण कर. तसेंच ( येच ) जे ( सभ्याः सभासदः ) चतुर व सभेचें काम चालविण्यांत कुशल सभासद आहेत त्याणींहि

पूर्वोक्त तीन प्रकारच्या सभांचें योग्य रीतीनें पालन करावें. ( पुरुहूत ) हे परमपूजित परमेश्वर! जे सभासद ( त्वया ) तूं प्रतिपादलेला राजधर्म ( इद्राः ) पूर्णपणें जाणतात तेच सुख मिळवितात. अशा सभ्य सभासदांच्या सभेनें नियंत्रित झालेल्या राज्यांत सुख मिळत असल्यामुळें (विश्वम् आयुः ) शंभर वर्षांचें पूर्णायुष्य ( व्यश्नवम् ) मला व सर्वांनां मिळतें. प्रजा सुखी असते हें तात्पर्य. ॥ १८ ॥

**जनिष्ठा उग्रः सहसे तुरायेति सूक्तमुग्रवत्सहस्वत्तत्क्षत्रस्य रूपं मन्द्र ओजिष्ठ इत्योजस्वत् क्षत्रस्यरूपम् ॥ १ ॥ बृहत्पृष्ठं भवति क्षत्रं वै बृहत् क्षत्रेणैव तत्क्षत्रं समर्धयत्यथो क्षत्रं वै बृहदात्मा यजमानस्य निष्केवल्यं तद्यद्बृहत् पृष्ठं भवति ॥ २ ॥ ब्रह्म वै रथन्तरं क्षत्रं बृहत् ब्रह्मणि खलु वै क्षत्रं प्रतिष्ठितम् क्षत्रे ब्रह्म ॥ ३ ॥ ओजो वा इन्द्रियं वीर्यं पञ्चदश ओजः क्षत्रं वीर्यं राजन्यस्तदेनमोजसा क्षत्रेण वीर्येण समर्धयति तद्भारद्वाजं भवति भारद्वाजं वै बृहत् ॥ ४ ॥ ऐतरेय ब्रा० दं. ८ कं० २।३॥**

**तानहमनु राज्याय साम्राज्याय भौज्याय स्वाराज्याय वैराज्याय पारमेष्ठ्याय राज्याय माहाराज्यायाधिपत्याय स्वावश्यायातिष्ठायां रोहामीति ॥ ५ ॥ नमो ब्रह्मणे नमो ब्रह्मणे नमो ब्रह्मण इति त्रिष्कृत्वो ब्रह्मणे नमस्करोति ॥ ब्रह्मण एव तत् क्षत्रं वशमेति तद्यत्र वै ब्रह्मणः क्षत्रं वशमेति तद्राष्ट्रं समृद्धं तद्वी रवदाहास्मिन् वीरो जायते ॥६॥**

**ऐत० ब्रा० ८।६।९॥**

( जनिष्ठा उग्रः० ) राज्यव्यवस्था करण्यासाठीं नेमलेल्या सभेंतील लोकांनीं धर्मात्मे व सज्जन अशा लोकांशीं सौम्य वर्तन ठेवावें व दुष्ट, नीच लोकांशीं त्यांणीं उग्र तऱ्हेनें वागावें कारण, ( १ ) सहस्वत् व ( २ ) उग्रस्वत् असे राजनीतीचे दोन भेद आहेत त्या भेदांअन्वयें देश–काल–वस्तु यांच्या अनुरोधानें सहनशीलता किंवा ऊग्र स्वरूप धारण करावें. दुष्टांनां योग्य शासन करणें हा ( क्षत्रस्यरूपम् ) क्षात्रियांचा धर्मच

आहे. ( मन्द्र ओजिष्ठ: ) उत्तम कर्में करणाऱ्यांनां इनामें देणें व दुष्ट कृत्यें करणारांनां शासन देणें–सुष्टांचा प्रतिपाळ व दुष्टांचा संहार करणें–हा जसा राजधर्म आहे त्याचप्रमाणें वीर पुरुषांची सेना तयार करणें व इतर व्यवस्था योग्य करणें हाहि ( क्षत्रस्य रूपम् ) क्षत्रियांचा धर्मच आहे. ॥ १ ॥ ( बृहत्पृष्ठम् ) क्षत्रियांचें काम हें सर्वांत मोठें आहे कारण, ( पृष्ठम् ) त्या योगानें निर्बलांनां आश्रय मिळतो व सर्वांनां सुख मिळतें. या पूर्वोक्त राजधर्माच्या परिपालनानेंच ( समर्धयति ) सर्व तऱ्हेच्या संपत्तींची वृद्धि होते व क्षात्रतेजाचीहि त्यायोगानेंच वृद्धि होते; म्हणून क्षात्रकर्म सर्व इतर उद्योगांहून श्रेष्ठ आहे. क्षात्रतेजाच्या योगानें ( यजमानस्य० ) राजा व प्रजा यांनां आनंद होतो. क्षात्रतेज हाच राष्ट्राचा आत्मा आहे कारण, सर्व लोकांनां ( निष्केवल्यम् ) त्या योगानेंच स्वातंत्र्य व तद्द्वारा आनंद प्राप्त होतो [ "निष्केवल्य" म्हणजे "बंधापासून सुटून स्वतंत्र होणें." हें क्षात्रतेजानेंच होतें. ] म्हणून क्षात्रकर्म सर्वांत मुख्य आहे. ॥ २ ॥ ( ब्रह्म वै० ) सर्व विद्येनें युक्त असणाऱ्या ब्राह्मण वर्णामध्येंहि क्षात्रधर्म अवश्य असतोच. विद्वत्तेशिवाय क्षात्रकर्माची प्रगति होणारच नाहीं. तात्पर्य, खऱ्या ब्राह्मणाच्या आश्रयानेंच क्षात्रतेजाचा प्रकाश पडूं लागतो. त्याचप्रमाणें ( क्षत्रे ब्रह्म ) क्षत्रियाच्या आश्रयानें ब्राह्मण शोभतो. शौर्याच्या आश्रयानें विद्या व विद्येच्या आश्रयानें शौर्य पूर्णत्वास पोंचतें. अर्थात् शौर्य व विद्या या दोहोंच्याहि वाढीमध्यें राष्ट्राची उन्नति अवलंबून आहे. ॥ ३ ॥ ( ओजो वा० ) राजपुरुषांनीं आपलीं सर्व इंद्रियें सुदृढ ठेवावीं कीं, ज्याच्या योगानें त्यांनां योग्य वेळीं बल व पराक्रम दाखवितां येईल. इंद्रियें आपल्या ताब्यांत ठेवल्यानें तें सर्व होतें. ( ओज: क्षत्रम् ) बल व वीर्य हेंच क्षत्रियांचें क्षत्रियत्व आहे. वीर्य व बलयुक्त नसणारा पुरुष क्षत्रिय होऊं शकतच नाहीं. ( वीर्येण ) मनुष्य; वीर्य, बल, पराक्रम, शौर्य यांच्या योगानें क्षात्रकर्तव्याची वृद्धि करून सर्वांनां व आपल्याला सुखी करतो. म्हणून क्षात्रकर्म हें ( भारद्वाजं–भरणीयम् ) उन्नतिकारक व श्रेष्ठकर्म आहे ॥ ४ ॥ मनुष्यांनीं पुढें लिहिल्याप्रमाणें इच्छा करावी:–परमेश्वराच्या अनुग्रहानें ( अनुराज्याय ) सभासद व सभाध्यक्ष होण्याचा अधिकार व मांडलिक राजांवर राजसत्ता चालविण्याचा अधिकार, ( साम्राज्याय ) सार्वभौम राज्य, ( भौज्याय ) उत्तम भोग व धर्मानें राज्याचें पारिपालन, ( स्वाराज्याय ) स्वतांचें राज्य, ( वैराज्याय ) विविध राजांच्या मध्यें उच्चत्व, ( पारमेष्ठ्याय ) सुस्थितींत असलेलें विस्तृत राज्य, ( माहाराज्याय ) मोठ्या राज्यांतलि सुखाचे उपभोग, ( आधिपत्याय ) आधिपतित्व, ( स्वावश्याय ) प्रजा स्वत:ला वश असणें, प्रजा राजनिष्ठ असणें इत्यादि गोष्टींची प्राप्ती व्हावी म्हणून मी ( अतिष्ठायाम् ) विद्वानांच्या सभेमध्यें ( रोहामि ) प्रवेश करतों किंवा बसतों.

मनुष्यांनीं अशा मोठ्या इच्छा धरून कामास आरंभ करावा. ॥ ५ ॥ ( ब्रह्मणेनमः३ ) परमेश्वराला त्रिवार नमस्कार करून राज्यांतील कर्माला आरंभ करावा. ज्या देशांतील ( क्षत्रम् ) क्षत्रिय लोक, शूर व पराक्रमी, ( ब्रह्मण: ) ब्राह्मणांच्या, विद्वानांच्या किंवा परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें चालतात ( तद्राष्ट्रं समृद्धम् ) त्या राष्ट्राची समृद्धि होते व त्याच राष्ट्रामध्यें ( वीरो जायते ) वीर पुरुषांची उत्पत्ति होते. त्याच देशांत वीररत्नें निपजतात व क्षात्रतेजानें चमकतात. ॥ ६ ॥

स प्रजापतिका अयं वै देवामोजिष्ठो बलिष्ठः सहिष्ठः सत्तमः पारयिष्णुतम इममेवाभिषिञ्चामहा इति तथेति तद्वैतदिन्द्रमेव ॥ ७ ॥ सम्राजं साम्राज्यं भोजं भोजपितरं स्वराजं स्वाराज्यं विराजं वैराज्यं राजानं राजपितरं परमेष्ठिनं पारमेष्ठ्यं क्षत्रमजनि क्षत्रियोऽजनि विश्वस्य भूतस्याधिपतिरजनि विशामत्ताजनि पुरां भेत्ताजन्यसुराणां हन्ताजनि ब्रह्मणो गोप्ताजनि धर्मस्य गोप्ताजनीति ॥ ऐत० पं० ८ । १२ ॥ स परमेष्ठी प्राजापत्योऽभवत् ॥ ऐत० ८ । १४ ॥

स एतेनैन्द्रेण महाभिषेकेणाभिषिक्तः क्षत्रियः सर्वा जितिर्जयति सर्वान्लोकान् विन्दति सर्वेषां राज्ञां श्रैष्ठ्यमतिष्ठां परमतां गच्छति साम्राज्यं भौज्यं स्वाराज्यं वैराज्यं पारमेष्ठ्यं राज्यं महाराज्यमाधिपत्यं जित्वास्मिल्लोके स्वयंभूः स्वराडमृतोऽमुष्मिन्त्स्वर्गे लोके सर्वान् कामानाप्त्वामृतः सम्भवति यमेतेनैन्द्रेण महाभिषेकेण क्षत्रियं शापयित्वाऽभिषिञ्चति ॥ ९ ॥ ऐत०पं० ८।१९॥

( प्रजापतिका: ) सर्व सभ्य लोकांनीं परमेश्वराचे उपासक बनावें व सर्वांनीं मिळून एकविचारानें वागावें, असें केलें असतां कधींहि पराजय व दुःखप्राप्ती होणार नाहीं. विद्वानांमध्यें ( ओजिष्ठः ) पराक्रमी, बलवान् ( बलिष्ठः ) शक्तिमान् ( सहिष्ठः )

सहनशील, ( सत्तमः ) सर्व सद्गुणांनीं युक्त, ( पारयिष्णुतमः ) युद्धादि सर्व कृत्यें निर्विघ्नपणानें पार पाडणारा, दुःखाच्या पार नेणारा; असा श्रेष्ठ पुरुष जो असेल त्यालाच आम्ही ( अभिषिञ्चामहे ) राज्यावर बसवूं-राज्याभिषेक करूं. अशा सर्वोत्तमगुणांनीं युक्त असणाऱ्या पुरुषाला राज्याधिकार दिल्यापासून राष्ट्राची उन्नति होते म्हणून अशा सद्गुणी राजाला "इन्द्र" असें म्हणतात ॥ ७ ॥ ( सम्राजम् ) सार्वभौम राजाच्या गुणांनीं युक्त ( साम्राज्यम् ) चक्रवर्ति होण्यास योग्य, ( भोजम् ) उत्तम भोग वस्तूंला राखणारा, ( स्वराजम् ) प्रजापालनांमध्यें निपूण, विद्येनें प्रकाशणारा, ( स्वाराज्यम् ) राज्य उत्तम रीतीनें चालविणारा, ( विराजम् ) विविध राजांनां प्रकाशित करणारा, ( वैराज्यम् ) अनेक राज्यें मिळविणारा ( राजानम् ) ऐश्वर्यानें युक्त असणारा, ( राजपितरम् ) राजांचा रक्षक, ( परमेष्ठिनम् ) मोठ्या राज्याचा अधिकारी होण्यास योग्य, ( पारमेष्ठ्यम् ) परम गुणवान्; अशा पुरुषाला आम्ही राज्याभिषेक करतों. अशा अभिषिक्त पुरुषाचे ठिकाणीं ( क्षत्रम् अजनि ) क्षात्रतेज उत्पन्न होतें, ( क्षत्रियो अजनि ) तो उत्तम क्षत्रिय होतो ( विश्वस्य० ) सर्व प्राणिमात्रांचा आधिपति, सभाध्यक्ष, ( विशाम् अत्ता ) दुष्टलोकांचा नाश करणारा, ( पुरां भेत्ता ) शत्रूंच्या नगरांचा विध्वंस करणारा, ( असुराणां हन्ता ) अधमलोकांचा नाश करणारा, ( ब्रह्मणो गोप्ता ) वेदांचें रक्षण करणारा, ( धर्मस्य गोप्ता ) धर्माचा रक्षक; असा तो होतो. ( सः परमेष्ठी ) तो राजधर्मांनीं युक्त असतो व ( प्राजापत्यः ) परमेश्वराचा निःसीम भक्त असतो; म्हणून सर्वांनीं परमेश्वराची उपासना करणें योग्य आहे ॥ ८ ॥ ज्यावेळीं प्रजापालन तत्पर अशा राजाला प्रजा ( ऐन्द्रेण ) धनादिकांनीं ( महाभिषेकेण ) राज्यावर अभिषेक करतात व त्याला प्रेमानें राजा असें मानतात, त्याच वेळीं ( क्षत्रियः ) त्याच्यांतील क्षात्रतेजाचा प्रभाव पाडण्यास तो योग्य होतो व ( सर्वा जितिः जयति ) तो सर्व युद्धांमध्यें जय मिळवितो, त्याचा सर्वत्र जयजयकार होतो, त्याला उत्तम लोक प्राप्त होतात, सर्व राजांमध्यें श्रेष्ठपद त्याला मिळतें, ( परमताम् ) शत्रूंवर राज्य करण्याच्या सभेमध्यें तो जातो, या सभेच्या द्वारानें साम्राज्यादि राज्यांचा उपभोग घेऊन सर्व महाराजांचाहि आधिराजा स्वपराक्रमानें तो होतो. असा पराक्रमी व न्यायी राजा या ठिकाणीं तर सुख भोगतोच पण शरीर सोडल्यानंतर ( स्वर्गे ) सुखात्मक ब्रह्मामध्यें ( स्वयम्भूः ) स्वतंत्रतेनें लीन होउन, ( स्वराट् ) स्वयंप्रकाशी ( अमृतः ) अमर होतो व सर्व मनकामना तेथें त्याच्या पूर्ण होतात. ज्या राष्ट्रामध्यें ( एतेनेन्द्रेण ) पूर्वोक्त ऐश्वर्यानें सद्गुणी पुरुषाला राज्यपद मिळतें व जो ( शापयित्वा० ) प्रजापालनाविषयीं प्रतिज्ञा करून त्याप्रमाणें आचरण करतो त्याच्या राज्यांतील प्रजा कधींहि दुःखी असत नाहींत. त्या सर्वदा आनंदांत असतात. ॥ ९ ॥

---

( १ ) "इदि–परमैश्वर्ये" यः परमैश्वर्यवान् भवति सः इन्द्रः।

**क्षत्रं वै स्विष्टकृत् ॥ क्षत्रं वै साम ॥ साम्राज्यं वै साम ॥ शतपथ ब्रा० १२।८।२॥ ब्रह्म वै ब्राह्मणः क्षत्र ँ राजन्य-स्तदस्य ब्रह्मणा च क्षत्रेण चोभयतः श्रीः परिगृहीता भवति ॥ युद्धं वै राजन्यस्य वीर्यम् ॥ शत० १३।१।५ ॥ राष्ट्रं वा अश्वमेधः ॥ शत० १३।१।६॥ राजन्य एव शौर्यं महिमानं दधाति तस्मात्पुरा राजन्यः शूर इष-व्योऽतिव्याधी महारथो जज्ञे ॥ शत० १३।१।९ ॥**

( क्षत्रम् ) राजसभेच्या द्वारानें उत्तम रीतीनें राज्य चालविणें हेंच सर्वांत (स्विष्टकृत्) सुखकारक आहे. ( क्षत्रम् ) ज्यामध्यें दुष्ट लोकांनां योग्य शासन मिळतें व सज्जनांनां आनंद होतो ( साम साम्राज्यम् ) तेंच सर्वांनां आनंद देणारें साम्राज्य होय. तेंच श्रेष्ठ व सुधारलेलें राज्य होय. ( ब्रह्म ) वेद, परमेश्वर यांनां जाणणारा जो असतो तोच ( ब्राह्मण: ) ब्राह्मण होय. ( क्षत्रम् ) जो विद्वान्, शूर, वीर्यवान् व क्षात्रधर्माप्रमाणें चालणारा असतो तोच क्षत्रिय होय. ( ब्रह्मणा क्षत्रेण ) ब्राह्मण व क्षत्रिय यांच्या पराक्रमानें व कर्तव्यें करण्यानें ( अस्य श्रीः ) या राष्ट्राची संपत्ति वाढते. सर्व प्रकारें तें राष्ट्र सुखी असतें. ( युद्धं वै० ) युद्ध हेंच क्षत्रियाचें मुख्य कर्तव्य व पराक्रम करण्याचें स्थान होय. युद्धाशिवाय पुष्कळ संपत्ति व सुख मिळणें नाहीं. [ निघण्टु अ० २ खं० १७ मध्यें **"संग्राम"** हा शब्द **"महाधन"** वाचक दिला आहे. **"महान्ति धनानि प्राप्तानि भवन्ति यत्र स महाधनः संग्रामोयुद्धम्!"** युद्धाला महाधन असें म्हणतात कारण, लढाईपासून पुष्कळ द्रव्य मिळतें.] ( राष्ट्रम् ) राज्याचें उत्तम रीतीनें परिपालन करणें हाच मोठा (अश्वमेध:)अश्वमेधयज्ञ होय. घोडा कापून त्याच्या अवयवांचें हवन करणें हा अश्वमेध नव्हे. ( राजन्य एव० ) पूर्वोक्त उत्तम गुणांनीं युक्त असणारा राजा जेव्हां शौर्य गाजवितो व आपली कीर्ति दिगंतरीं गाजवितो त्यावेळींच तो सार्वभौम राज्य करण्यास योग्य होतो. म्हणून जो क्षत्रिय निर्भय असून युद्धाला उत्सुक असतो तोच राज्याला योग्य असें समजावें. ( इषव्यः ) तो शस्त्रास्त्र प्रेरण करण्यांत कुशल, ( अतिव्याधी ) व्याधींप्रमाणें शत्रूंनां पीडा देणारे शूर लोक ज्याच्या पदरीं आहेत असा, ( महारथः ) आकाश-पृथिवी व पाणी यांवरून जाण्यास ज्याच्या जवळ वाहनें आहेत असा राजा ज्या प्रजेला मिळेल त्याप्रजेला नेहेमीं सुखप्राप्तीच होत राहील यांत शंका नाही. ॥ १३ ॥

**श्रीर्वैराष्ट्रम् ॥ श्रीर्वै राष्ट्रस्य भारः॥ श्रीर्वै राष्ट्रस्य मध्यम् ॥ क्षेमो वै राष्ट्रस्य शीतम् ॥ विड्वै गभो राष्ट्रं पसो राष्ट्रमेव विश्याहन्ति तस्माद्राष्ट्री विशं घातुकः ॥ विशमेव राष्ट्रायाद्यां करोति तस्माद्राष्ट्री विशमत्ति न पुष्टं पशुमन्यत इति ॥ शत० ब्रा० १३।२।३॥**

( श्रीः वैराष्ट्रम्) विद्यादि संपत्ति व नीति हेंच खरें राष्ट्र होय. (श्रीः० ) विद्या, संपत्ति व नीति हाच राष्ट्राचा संभार किंवा भूषण होय. राष्ट्राचा मध्यभाग ही संपत्तीच होय. ( क्षेमः० ) उत्तम तऱ्हेनें रक्षण करणें हेंच राष्ट्राला सुखी होण्याला साधन आहे.— ( विड् ) प्रजेला (गभः ) गभ असें म्हणतात. ( राष्ट्रं पसः ) राष्ट्राला पस असें म्हणतात. ( राष्ट्रम् एव ) राजाचा जोर ( विशि ) प्रजेमध्यें येऊन ( आहन्ति ) आघात करतो व प्रजेकडून कररूपानें उत्तम पदार्थ घेऊन जातो ( तस्मात् ) म्हणून ( राष्ट्री ; एकटा राजा -राज्यनियंत्रणसभेशिवाय राज्य करणारा राजा—अनियंत्रित राजसभा–( विशम् ) प्रजेला ( घातुकः ) घातक आहे. एकटा राजा असल्यानें प्रजेला फार त्रास होतो म्हणून विद्वानांची सभा करून तिच्या द्वारानें सर्व कारभार चालवावा. ज्या ठिकाणीं एकटाच राजा असतो व सभा नसते, तेथें ( राष्ट्राय ) राज्याला ( विशम् ) प्रजा ही ( आद्याम् ) भक्ष्यरूपी होते. ज्याप्रमाणें खाण्याचे पदार्थ मनुष्य खाऊन टाकतो त्याच प्रमाणें ( राष्ट्री ) अनियंत्रित राजा ( विशम् अति ) प्रजेला खाऊन टाकतो ज्याप्रमाणें हिंसा करणारा, मांस खाणारा मनुष्य ( न पुष्टं पशुं मन्यते ) पुष्ट पशूला पाहून त्याला मारण्याची इच्छा करतो त्याचप्रमाणें अनियंत्रित राजा मत्त होऊन आपणाहून प्रबळ कोणीहि होऊं नये म्हणून आपल्या प्रजेपैकीं कोणाचाहि उत्कर्ष झाला असतां, त्याची अवनति करण्याचा यत्न करतो. म्हणून राजा व विद्वत्सभा यांच्या सल्यानें राज्यकारभार करणें श्रेयस्कर आहे. अशा अर्थाचे वेदमंत्र पुष्कळ आहेत पण विस्तारभयास्तव येथें इतकेच पुरेत.

---

## वर्णाश्रमधर्म

### ( १ ) वर्णधर्म

" ब्राह्मणोऽस्य मुखं० " हा वर्णव्यवस्थाविषयक मंत्र पूर्वी ( पृष्ठ ८५ मध्यें ) दिला आहे व त्याचा अर्थहि तेथेंच सांगितला आहे. येथें आतां त्याशिवाय दुसरे आधार देणें आहेत:—

**वर्णो वृणोतेः ॥ १ ॥ निरुक्तः ५ । ३ ॥**

" वर्णीया वरितुमर्हा गुणकर्माणिच दृष्ट्वा यथायोग्यं व्रियन्ते ये ते वर्णाः ॥ " मनुष्याचे ठिकाणीं स्वभावतः गुणकर्म कसे आहेत हें पाहून त्या गुणकर्मावरून जे ठरविले जातात ते वर्ण होत. हे वर्ण चार आहेत. ( १ ) ब्राह्मण, ( २ ) क्षत्रिय, ( ३ ) वैश्य व ( ४ ) शूद्र.

**ब्रह्म हि ब्राह्मणः ॥ क्षत्र ऽहीन्द्र क्षत्र ऽराजन्यः॥ शत० ५।१।१॥**

**बाहू वै मित्रावरुणौ पुरुषो गर्तः ॥ वीर्यं वा एतद्राजन्यस्य यद्बाहू वीर्यं वा एतदपा ऽरसः ॥ शत० ५।४।३॥**

**इषवो वै दिद्यवः ॥ ३ ॥ शत० ५।४।४॥**

( ब्रह्म ) वेदज्ञान व परमेश्वरोपासना करण्याची इच्छा इत्यादि उत्तम गुणांनीं युक्त असणारा पुरुष ब्राह्मण होय. ( इन्द्र ) परम ऐश्वर्यवान्, रणामध्यें शत्रूंचा नाश करणारा, युद्धकुशल, प्रजापालन-तत्पर अशा पुरुषाला ( राजन्यः ) क्षत्रिय असें म्हणतात. ( मित्रः ) सर्वांनां सुख देणारा ( वरुणः ) उत्तम गुणकर्मांनीं युक्त असल्यामुळें श्रेष्ठ असणारा हे दोघेहि क्षत्रियाचे ( बाहू ) बाहू आहेत. किंवा ( वीर्यम् ) पराक्रम व बल हे या क्षत्रियाचे बाहू होत. जो राजा प्रजाजनांमध्यें ( अपाम् ) सर्वांच्या प्राणांनां ( रसः ) आनंद उत्पन्न करतो त्या राजाचें वीर्य वाढतें-तो राजा लोकांनां आनंद देणारा असल्यामुळें बलवान् होतो. त्याची ( इषवः ) शस्त्रें व अस्त्रें हीं नेहेमीं ( दिद्यवः ) तेजस्वी असतात. यावरून ज्ञानादिगुण प्रधान तो ब्राह्मण व शौर्य तेजादिगुणप्रधान तो क्षत्रिय असें ठरतें. वैश्याचे वाणिज्य, कृषिकर्म, गोरक्षण हे धर्म असून शूद्राचा परिचर्या, चाकरी हा स्वाभाविक धर्म आहे.

## ( २ ) आश्रमधर्म.

आश्रम चार आहेत; ( १ ) ब्रह्मचर्य, ( २ ) गृहस्थ, ( ३ ) वानप्रस्थ व ( ४ ) सन्यास. ब्रह्मचर्यामध्यें सद्विद्या व सुशिक्षण या दोन गोष्टी मिळवाव्या ; गृहस्थाश्रमामध्यें अनेक उत्तम सदाचरणांचें आचरण करून उत्तम उत्तम वस्तूंचा संग्रह करावा ; वानप्रस्थाश्रमामध्यें एकांतवास, परमेश्वरोपासन, विद्याफलविचारणा, विद्यादान इत्यादि गोष्टी कराव्या व सन्यासाश्रम धारण करून परब्रह्मप्राप्ती साधणें व इतरांनां सदुपदेश करून त्यांनां आनंद होईल असें करणें हे चार आश्रमांतील मुख्यधर्म आहेत. चारहि आश्रमांच्या योग्य परिपालनानें धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारहि पुरुषार्थ उत्तम रीतीनें साधतां येतात. या चारहि आश्रमामध्यें ब्रह्मचर्याश्रम हा सर्व सुखांचा आश्रय आहे कारण, याच आश्रमांत शिक्षण, शिस्त, सद्विद्या, शारिरिक व मानसिक बल इत्यादिकांचें साधन करावयाचें असतें. जर या आश्र-

मांत हे गुण आंगीं आले तरच पुढचे आश्रम उत्तम रीतीनें साधतां येणार. म्हणून ब्रह्मचर्यश्रमाचें परिपालन सर्वांनीं योग्य व कडक रीतीनें करावें.

## ( १ ) ब्रह्मचर्याश्रम

**आचार्य उपनयमानो ब्रह्मचारिणं कृणुते गर्भमन्तः ॥ तं रात्रीस्तिस्र उदरे बिभर्ति तं जातं द्रष्टुमभिसंयन्ति देवाः ॥ १ ॥**

अथर्व० ११।३।५।३॥

( आचार्यः ) गुरु—अध्यापक; ( ब्रह्मचारिणम् ) विद्याध्ययनासाठीं आलेल्या विद्यार्थ्याला ( उपनयमानः )आपल्या जवळ ठेऊन घेऊन आश्रमाला अनुकूल अशा दृढव्रताचा उपदेश करतो. ( अन्तः गर्भं कृणुते ) द्विजत्व—दोन जन्म—सिद्ध करण्यासाठीं जणूं काय तो त्याला गर्भामध्येंच ठेवतो. [ जसें गर्भामध्यें बाळाचें रक्षण होतें तद्वत् विद्यार्थ्याचें दुर्वर्तनापासून रक्षण करणें हा गुरूचा धर्म आहे. ] ( तम् ) त्या विद्यार्थ्याला ( तिस्रः रात्रीः ) तीन अहोरात्री— तीन तपें—( उदरे बिभर्ति ) आपल्या संनिध ठेवून सर्व विद्या शिकवतो. ज्यावेळीं विद्यार्थी ( जातम् ) गुरू व विद्या यांच्या उदरांतून बाहेर येतो—अर्थात् विद्या शिकून तयार होतो—तेव्हां ( तम् ) त्याला ( द्रष्टुम् ) पहाण्याच्या इच्छेनें ( देवाः ) विद्वान् लोक ( अभिसंयन्ति ) सामोरे जातात. त्याची विद्वानांमध्यें मानमान्यता होते. हा पुरुष आमच्या सुदैवानें व परमेश्वराच्या अनुग्रहानें सर्व मनुष्यांवर उपकार करण्यासाठीं विद्वान् झाला आहे अशी ते त्याची प्रशंसा करतात. ॥ १ ॥ [ " रात्री " शब्दाचा मुळचा अर्थ ( या रमयति ) रममाण करणारी-आनंद देणारी असा आहे. रात्रीला विश्रांति मिळालेला पुरूष जसा दुसऱ्या दिवशीं उत्साहानें काम करतो तसा रात्रीं जागरण केलेला पुरूष करूं शकत नाहीं. याचप्रमाणें ब्रह्मचर्याश्रमांतील नियमांचें पालन करणारा पुरुष पुढचा कार्य—क्रम करण्यास जसा तयार होतो, तसा ब्रह्मचर्यभ्रष्ट-वीर्यहीन—पुरुष होत नाहीं. ब्रह्मचर्याची मुदत वयाच्या चोवीस, छत्तीस, व अठ्ठेचाळीस वर्षांपर्यंत-अर्थात् तीन तपें होईपर्यंत—आहे. विद्या ही आई व गुरु हा बाप असें विद्यार्थ्यानें मानलें पाहिजे. गुरू हा विद्यार्थ्याला विद्येच्या उदरांत घालतो. त्याचा विद्येच्या उदरांत प्रवेश झाल्यावर तेथून तो एक, दोन, किंवा तीन तपांनीं ( बारा, चोवीस, किंवा छत्तीस वर्षांनीं ) बाहेर येतो. हा त्याचा दुसरा जन्म होय. या मंत्रांतील आलंकारिक भाषेचा अर्थ विचारानें जाणावा]

इयं समित्पृथिवी द्यौर्द्वितीयोतान्तरिक्षं समिधा पृणाति ॥ ब्रह्मचारी समिधा मेखलया श्रमेण लोकांस्तपसा पिपर्ति ॥ २ ॥
पूर्वो जातो ब्रह्मणो ब्रह्मचारी घर्मं वसानस्तपसोदतिष्ठत् ॥ तस्माज्जातं ब्राह्मणं ब्रह्म ज्येष्ठं देवाश्च सर्वे अमृतेन साकम् ॥३॥

अथर्व० ११।३।९। मं० ४।५॥

( इयम् ) ही ( पृथिवी ) पृथिवी, हा ( द्यौः ) प्रकाश व अंतरिक्षांतील प्रदेश यामधील सर्व प्राण्यांनां व जीवजंतूंनां ब्रह्मचारी; ( समिधा ) होम व विद्या यांच्या योगानें ( पृणाति ) आनंदित करतो. तो; ( समिधा ) अग्निहोत्रादिकांच्या योगानें, ( मेखलया ) ब्रह्मचाऱ्याच्या मौंजि आदिक चिन्हांच्या योगानें, ( श्रमेण ) विद्याभ्यासरूपी परिश्रमानें, ( तपसा ) धर्मानुष्ठान, अध्यापन व उपदेश यांच्या योगानें, ( लोकान् ) सर्व प्राण्यांनां ( पिपर्ति ) सुख देतो, आनंदित करतो, पुष्ट करतो, प्रसन्न करतो. ॥ २ ॥ ( ब्रह्मचारी ) वेदज्ञान शिकण्याची दृढ इच्छा धरणारा, ( घर्मं वसानः ) धर्म, विद्याभ्यास इत्यादि तपें करून ज्याला घाम आला आहे, विद्याभ्यासार्थ फार मेहेनत करणारा-( ब्राह्मणः ) वेद व परमेश्वर यांनां जाणणारा, विद्वान्, सर्व वर्णांतील लोकांनां भूषणभूत ( जातः ) झालेला, ( तपसा ) धर्म व विद्या यांच्या योगानें ( उत्-अतिष्ठत् ) उच्च स्थितीला-मोठ्या योग्यतेला पोंचतो. उत्तम व्यवहार करतो. ( ब्रह्मज्येष्ठम् ) ज्याणें जास्त विद्या मिळविली आहे, जो श्रेष्ठ परमेश्वराला जाणतो, ( अमृतेन साकम् ) परमेश्वर, विद्या व मोक्ष यांचें ज्ञान झाल्यामुळें ज्याला परमानंद प्राप्त झाला आहे, अशा (जातं ब्राह्मणम्) प्रसिद्ध ब्रह्मज्ञानी माणसाची ( देवाः ) विद्वान् लोक स्तुति करतात. ॥ ३ ॥

ब्रह्मचार्येति समिधा समिद्धः कार्ष्णं वसानो दीक्षितो दीर्घश्मश्रुः ॥ स सद्य एति

---

( १ ) ब्रह्मणि वेदे चरितुं शीलं यस्य सः ब्रह्मचारी।

**पूर्वस्मादुत्तरं समुद्रं लोकान्त्संगृभ्य मुहुराचरिक्रत् ॥ ४ ॥ ब्रह्मचारी जनयन् ब्रह्मापो लोकं प्रजापतिं परमेष्ठिनं विराजम् ॥ गर्भो भूत्वाऽमृतस्य योनाविन्द्रोह भूत्वाऽसुरांस्ततर्ह ॥५॥** अथर्व० ११।१ मं० ३।७॥

(समिधा) विद्येनें (समिद्धः) प्रकाशित झालेला, (कार्ष्णम्) मृगचर्मादिक (वसानः) धारण केलला, (दीर्घश्मश्रुः) ज्याणें केश व श्मश्रू दीर्घकालपर्यंत धारण केलेले आहेत (दीक्षितः) ज्याणें दीक्षा घेतलेली आहे असा (ब्रह्मचारी) हा ब्रह्मचारी (एति) सुखाप्रत जातो, आनंद मिळवितो. (सः) असा विद्वान् ब्रह्मचारी; (पूर्वस्मात्) ब्रह्मचर्याश्रमरूपी पूर्वसमुद्रापासून (उत्तरं समुद्रम्) पुढच्या गृहस्थाश्रमरूपी समुद्राजवळ (सद्यः) लवकरच (एति) जातो. तो (लोकान् सङ्गृभ्य) लोकांनां जमवून (मुहुः) वारंवार (आचरिकत्) धर्मोपदेश करतो. ॥ ४ ॥ (ब्रह्मचारी) हा विद्वान् ब्रह्मचारी (ब्रह्म) विद्या शिकून (आपः) प्राणांनां प्राणायामानें स्वाधीन करून (लोकम्) दर्शनास योग्य व (प्रजापतिम्) विश्वाचें पालन करणाऱ्या, (परमेष्ठिनम्) सर्वोत्तम (विराजम्) अशा प्रकाशमान् परमेश्वराविषयींचें ज्ञान (जनयन्) लोकांच्या हृदयांमध्यें उत्पन्न करतो. (अमृतस्य) मोक्षाच्या (योनौ) उगमस्थानांत-विद्येमध्यें-(गर्भः भूत्वा) गर्भाप्रमाणें राहून-अर्थात् सर्व विद्यांचें सांगोपांग अध्ययन करून -(इन्द्रः भूत्वा) सूर्याप्रमाणें प्रकाशणारा होऊन (असुरान्) दुष्कर्मकारी, मूर्ख, पाखंडी, दैत्यस्वभावयुक्त मनुष्यांनां (ततर्ह) बाजूला करतो, तिरस्कार करतो. जसा सूर्य अंधःकाराला नाहींसा करतो तद्वत् असा विद्वान् अज्ञानी लोकांनां नाहींसें करतो ॥ ५ ॥

---

(१) "ब्रह्मचार्येति समिधा" या मंत्रांतील दुसऱ्या अर्धाचा पुढें दिल्याप्रमाणेंहि सरळ अर्थ दिसतो. "(सः) तो ब्रह्मचारी (पूर्वस्मात्) पूर्वेपासून (उत्तरं समुद्रम्) उत्तरेकडील समुद्रापर्यंत (सद्यः एति) विश्रांति न घेतां जातो व तेथें (मुहुः) अनेक वेळां (लोकान् संगृभ्य) लोकांनां जमवून त्यांनां (आचरिक्रत्) धर्माच्या आचाराचा उपदेश करतो." यावरून धर्मज्ञानी व विद्वान् माणसांचें कर्तव्य, देशदेशांतरीं जाऊन तेथील लोकांस धर्मोपदेश करणें हें आहे असें ठरतें.

**ब्रह्मचर्येण तपसा राजा राष्ट्रं विरक्षति ॥ आचार्यो ब्रह्मचर्येण ब्रह्मचारिणमिच्छते ॥ ६ ॥ ब्रह्मचर्येण कन्या३ युवानं विन्दते पतिम् ॥ अनड्वान् ब्रह्मचर्येणाश्वो घासं जिगीर्षति ॥ ७ ॥ ब्रह्मचर्येण तपसा देवा मृत्युमुपाघ्नत ॥ इन्द्रो ह ब्रह्मचर्येण देवेभ्यः स्व१राभरत् ॥८॥** अथर्व० ११।३ मं. १७।१८।१९॥

( ब्रह्मचर्येण ) विद्याध्ययन, वीर्यरक्षण वगैरे व ( तपसा ) धर्मपालन इत्यादि ज्याणें केलें आहे असा राजाच ( वि-रक्षति ) विशेष रीतीनें रक्षण करूं शकतो. [ विद्याहीन, वीर्यक्षीण, अधार्मिक राजा प्रजेला दुःख देतो. ] ( ब्रह्मचर्येण ) ब्रह्मचर्य उत्तम रीतीनें पालन करून ज्याणें विद्या संपादन केली आहे अशा ( आचार्यः ) गुरूनेंच—( ब्रह्मचारिणम् ) ब्रह्मचारी जवळ बाळगण्याची ( इच्छते ) इच्छा धरावी. [ याविषयीं निरुक्तांतील आधारः—" **आचार्यः कस्मात् आचारं ग्राहयति आचिनोति अर्थान् आचिनोति बुद्धिमिति** ॥ निरु. १ । ४ ॥" "जे आचार-सदाचार-शिकवितो, विद्या शिकवितो व बुद्धि सुसंस्कृत करतो तोच आचार्य होय. ] ॥ ६ ॥ ब्रह्मचर्याचें पालन करूनच ( कन्या ) युवती, नारी स्वसदृश पति मिळविते. [ यावरून उघड ठरतें कीं, कन्यांनांहि ब्रह्मचर्य परिपालन हें विहित आहे. ] ( अनड्वान् ) बैल, घोडे वगैरे पशूंहि ( ब्रह्मचर्येण ) ब्रह्मचर्य-वीर्यरक्षण करून दुसऱ्या पशूंचा पाडाव करूं शकतात. म्हणून सर्व मनुष्यांनीं शास्त्रप्रमाणें ब्रह्मचर्याचें परिपालन करून शूर, वीर व पराक्रमी बनावें. ॥ ७ ॥ ( देवाः ) विद्वान् लोक; ( ब्रह्मचर्येण ) वेदाध्ययन करून (तपसा) धर्माच्या अनुष्ठानानें ( मृत्युम् ) जन्म-मृत्यू आदिक दुःखें ( उपाघ्नत ) नाहिशीं करतात. तसेंच ( ब्रह्मचर्येण ) नियमानें ( इन्द्रः ) सूर्य ( देवेभ्यः ) इंद्रियांना ( स्वः ) प्रकाश व सुख ( आभरत् ) देतो—ब्रह्मचर्याशिवाय सुखप्राप्ती होणें अशक्य आहे. ब्रह्मचर्याश्रमाच्या परिपालनानें पुढचे तीनहि आश्रम सुखदायी होतात. ब्रह्मचर्य हें सर्व सुखांचें मूळ आहे. या मुळावांचून पुढील सुंदर शाखा, फुलें व फळें येणार नाहींत. जर

पुढील आयुष्यांत खरें सुख पाहिजे तर प्राथमिक आयुष्यांत कडक ब्रह्मचर्य पाळलेंच पाहिजे.

[ येथवर दिलेल्या आधारांवरून ब्रह्मचर्याचे नियम, त्यापासून फायदे, ब्रह्मचर्य भ्रष्ट झाल्यापासून तोटे, ब्रह्मचर्याचा पुढील आश्रमांशीं संबंध इतक्या गोष्टी विचारी वाचकांच्या ध्यानांत येतीलच. ]

## २ गृहस्थाश्रम

**यद्ग्रामे यदरण्ये यत्सभायां यदिन्द्रिये ॥ यदेनश्चकृमा वयमिदं तदवयजामहे स्वाहा ॥९॥ देहि मे ददामि ते नि मे धेहि नि ते दधे ॥ निहारं च हरासि मे निहारं निहराणि ते स्वाहा ॥ १० ॥** यजु० ३ मं ४९।५०॥

हे मंत्र गृहस्थाश्रमविषयक आहेत. ( यत् ) जें कांहीं ( ग्रामे ) नगरामध्यें असणाऱ्या गृहस्थाश्रमांत केलें जातें-अर्थात् विद्याप्रचार, संतानोत्पत्ति, सामाजिक-नियमपरिपालन, परोपकारक-कृत्यें इत्यादि, तसेंच ( अरण्ये ) वानप्रस्थाश्रमांमध्येंहि ब्रह्मविचार, विद्याध्ययन, व अध्यापन, तप इत्यादि केलें जातें, ( सभायाम् ) सभेमध्यें सत्यासत्यविचार केला जातो व ( इन्द्रिये ) मन आदि सर्व इंद्रियांनीं जीं जीं उत्तम कामें केलीं जातात तीं सर्व मोक्षप्राप्तीसाठीं परमेश्वरार्पण करावींत. ( वयम् ) आम्हीं भ्रमानें जें कांहीं ( एनः ) पातक ( चकृम ) करतों त्याचा पूर्ण नाश व्हावा म्हणून ( अवयजामहे ) आश्रमानुकूल सर्व कर्मे यथासांग करीत आहों. ॥ ९ ॥ परमेश्वर मनुष्याला आज्ञा करतो कीं, " हे मनुष्या ! तूं व्यवहारामध्यें असें बोल कीं,- ( मे देहि ) मला सुख व्हावें म्हणून विद्या व धनादिक पदार्थ मला तूं दे. ( ददामि ते ) तुला मींहि असेंच देतों. ( मे धेहि ) उत्तम स्वभाव, दातृत्व, सुशीलता, औदार्य इत्यादि गुण माझ्यासाठीं तूं धारण कर. ( ते दधे ) तुझ्याकरितां मींहि तसाच वागेन. त्याचप्रमाणें क्रय-विक्रय-देणें-घेणें वगैरे सर्व व्यवहार धार्मिकपणानेंच (हरासि) तूं करावेस. त्यांचप्रमाणें मींहि तुझ्याशीं तसेच व्यवहार ( निहराणि) करीन. (स्वाहा) सत्यभाषण, खरें माप, खरें वजन, एक दर, व्यापारामध्यें व इतर सर्व व्यवहा-

त्यांमध्यें खरेपणा आम्हीं सर्वांनीं मिळून ठेवावा. सत्यानेंच आम्हीं सर्वांनीं मिळून सर्व व्यवहार करावा. ॥ १० ॥

गृहा मा बिभीत मा वेपध्वमूर्जं बिभ्रत एमसि ॥ ऊर्जं बिभ्रद्वः ॥ सुमनाः सुमेधा गृहानैमि मनसा मोदमानः ॥११॥ येषामध्येति प्रवसन्येषु सौमनसो बहुः ॥ गृहानुपह्वयामहे ते नो जानन्तु जानतः ॥१२॥ उपहूता इह गाव उपहूता अजावयः ॥ अथो अन्नस्य कीलाल उपहूतो गृहेषु नः ॥ क्षेमाय वः शान्त्यै प्रपद्ये शिवꣳ शग्मꣳ शंयोः शंयोः ॥ १३ ॥ यजु० ३। मं० ४१ ते ४३॥

( हे गृहाः ) हे गृहस्थाश्रमवासी जनहो! ( मा बिभीत ) तुम्ही भिऊं नका. ( मा वेपध्वम् ) कंपित होऊं नका. ( ऊर्जं बिभ्रत ) बलवान् व पराक्रमी व्हा. ( एमसि ) आम्ही सर्व पदार्थ मिळवूं अशी इच्छा धरा. निराश होऊं नका. ( वः ) तुमच्याशीं संबंध ठेवणारा, ( ऊर्जं बिभ्रत् ) पराक्रम करणारा व बलवान् असा मी आहे. ( सुमनाः ) माझें मन निर्मळ व माझी उत्तम बुद्धि आहे ( मनसा ) म्हणून माझें मन मला ( मोदमानः ) आनंद देतें. अशा तऱ्हेचा मी ( गृहान् ऐमि ) गृहस्थाश्रमाचा स्वीकार करतों. पूर्वोक्त गुणांनीं युक्त असणाऱ्या पुरुषांनीं गृहस्थाश्रम स्वीकारावा. ॥ ११ ॥ ( येषु ) ज्या घरांमध्यें ( प्रवसन् ) राहिल्यानें मनुष्याला ( बहुः सौमनसः ) पुष्कळ आनंद होतो, त्याठिकाणीं ( प्रवसन् ) राहून ( येषाम् ) ज्या ज्या सुखकारक पदार्थांची तो इच्छा करतो, ते ते त्याला (अधि-एति) मिळतात. घरांतील विवाहादिक मंगलकार्यांमध्यें सत्कारादिक कृत्यें करण्यासाठीं ( गृहान् ) गृहसंबंधीं-इष्ट-मित्र-बंधू-आचार्य-इत्यादिकांना ( उपह्वयामहे ) आम्ही आमंत्रण देतों. ( ते ) ते आलेले सद्गृहस्थ ( नः ) आम्हांला ( जानतः ) जाणतात. आम्ही विवाहादिक कृत्यें करण्याच्या हेतूनें त्यांस बोलाविलें आहे हें ते जाणत आहेत.

( जानन्तु ) ते विद्वान् लोक आमच्या या मंगलकार्यामध्यें साक्षिभूत होवोत. आम्हीं इच्छापूर्वक विवाहादिक कृत्यें करीत आहोंत हें ते जाणोत. ॥ १२ ॥ हे परमेश्वरा! तुझ्या कृपेनें ( इह ) या आश्रमामध्यें ( गावः ) गाय, भूमि, इंद्रियें, विद्या, प्रकाश, आल्हाद वगैरे ( उपहूताः ) आम्हांला प्राप्त होवोत; ( अजावयः ) बकऱ्या व मेंढ्या या मिळोत. ( अथो ) नंतर ( नः ) आम्हांला ( अन्नस्य ) भोग्य पदार्थांचा ( कीलालः ) उत्तम रस प्राप्त होवो. अर्थात् सर्व उत्तम भोग्य पदार्थ प्राप्त होवोत. ( वः ) हे पदार्थ, ( क्षेमाय ) माझें रक्षण व्हावें व ( शान्त्यै ) मला शान्ति मिळावी म्हणून मी मिळवितों. ( शिवम् ) या पदार्थांपासून मला कल्याण-कारक मोक्षसुख व ( शग्मम् ) संसारांतील सुख-ऐहिक उन्नति हीं प्राप्त होवोत. ( शंयोः ) अर्थात् सर्व प्रकारें आमचें कल्याण होवो. तात्पर्य, गृहस्थाश्रमामध्यें राहून परोपकार करावा व पूर्वोक्त पदार्थ धार्मिक व्यवहारानें मिळवून ऐहिक व पारमार्थिक उन्नति मिळवावी. ॥ १३ ॥

## ३. वानप्रस्थाश्रम.

**त्रयो धर्मस्कन्धा यज्ञोऽध्ययनं दानमिति प्रथमस्तप एव द्वितीयो ब्रह्मचार्य्याचार्यकुलवासी तृतीयोऽत्यन्त-मात्मानमाचार्यकुलेऽवसादयन् सर्व एते पुण्यलोका भवन्ति ॥ छान्दोग्य उ० २।२३ ॥**

सर्व—चारहि आश्रमांमध्यें ( धर्मस्कन्धाः ) धर्माचे मुख्य अवयव ( त्रयः ) तीनच आहेत. ( १ ) अध्ययन ( २ ) यज्ञ व ( ३ ) दान हे ते तीन अवयव होत. (१) पहिला अवयव -ब्रह्मचर्याश्रम. या आश्रमांमध्यें विद्यार्थी गुरुकुलीं वास्तव्य करून अध्ययन करतो, तप आचरतो, सुशिक्षण मिळवितो व धर्मज्ञान संपादन करतो. (२) दुसरा अवयव-यज्ञ-कर्मकांड-गृहस्थाश्रम हा होय. यांतील धर्म सारांशरूपानें पूर्वी सांगितलेच आहेत. ( ३ ) तिसरा अवयव-दान हा-होय. हा वानप्रस्था-श्रमामध्यें साध्य होतो. यामध्यें आत्मानात्मविचार, परमेश्वरगुणचिन्तन, सत्या-सत्यनिर्णय करावयाचा असतो. ( एते सर्वे ) हे ब्रह्मचर्यादिक सर्व तीनहि आश्रम सर्व मनुष्यांनां ( पुण्यलोकाः ) पुण्यकारक, सुखकारक असे आहेत.

ब्रह्मचर्यामध्यें सर्व विद्यांचें पूर्ण अध्ययन करून, धर्म व ईश्वर यांसंबंधीं ज्ञान मिळ-वून नंतर गृहस्थाश्रमी बनावें. या आश्रमाला योग्य, अशीं कृत्यें करून द्रव्यार्जन, संतानोत्पत्ति, विज्ञान, वृद्धि व परोपकार हीं करावींत. नंतर वनामध्यें जाऊन एकांताचा

आश्रय करून वानप्रस्थाश्रमानियमांप्रमाणें सत्यासत्यवस्तुविवेक व परमात्मविचार करावा. अर्थात् ब्रह्मचर्याश्रम पूर्णपणें संपवून गृहस्थाश्रम करावा नंतर वानप्रस्थी बनून शेवटीं सन्यास घ्यावा. हा एक पक्ष आहे. दुसरा पक्षः—

**यदहरेव विरजेत तदहरेव प्रव्रजेत् वनाद्वा गृहाद्वा ॥**

"ज्या दिवशीं विरक्तता उत्पन्न होईल त्याच दिवशीं सन्यास घ्यावा. मग तो गृहस्थाश्रमामध्यें असो किंवा वानप्रस्थाश्रमामध्यें असो." या दुसऱ्या पक्षामध्यें वानप्रस्थाश्रम न करितां गृहस्थाश्रमामधूनच सन्यास घ्यावयास हरकत नाहीं. तिसरा पक्षः-

**ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेत् ॥**

'गृहस्थ-वानप्रस्थ हे दोन आश्रम सोडून ब्रह्मचर्याश्रम पूर्णपणें संपवून सन्यास घ्यावा." हा तिसरा पक्ष होय. जरी अन्य आश्रम स्वीकारावे किंवा न स्वीकारावे याविषयीं विकल्प सांगितला असला तथापी "**ब्रह्मचर्य पाळलेंच पाहिजे**" हा नियम सार्वत्रिक आहे. तेथें विकल्प नाहीं. इतकी ब्रह्मचर्याच्या परिपालनाची अवश्यकता आहे. जर ब्रह्मचर्यपालन झालें नाहीं तर पुढच्या कोणत्याहि गोष्टी होणार नाहींत. यासाठीं सर्वांनीं नियमानें व दृढनिश्चयानें ब्रह्मचर्य पालन करावें व इच्छेप्रमाणें इतर आश्रम स्वीकारावे.

### ४ सन्यासाश्रम

**ब्रह्मसꣳस्थोऽमृतत्वमेति ॥ छान्दोग्य० २ । २३ ॥**

**तमेतं वेदानुवचनेन विविदिषन्ति । ब्रह्मचर्येण तपसा श्रद्धया यज्ञेनानाशकेन चैतमेव विदित्वा मुनिर्भवत्येतमेव प्रव्राजिनो लोकमीप्सन्तः प्रव्रजन्ति । एतद्धस्मवै तत्पूर्वे ब्राह्मणाः । अनूचानः विद्वाꣳसः प्रजां न कामयन्ते किं प्रजया करिष्यामो येषांनोऽयमात्मायं लोक इति ते हस्म पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति याह्येव पुत्रैषणा सा वित्तैषणा या वित्तैषणासा लोकैषणोभे ह्येते एषणे एव भवतः । श० कां० १४। अ० ७। बा० २॥**

(ब्रह्मस० ) ब्रह्मचारी ( अमृतत्वम् ) मोक्षाला ( एति ) प्राप्त होतो.

सारांश चतुर्थ—सन्यासाश्रम-धारण करून त्या आश्रमाचे नियम योग्य रीतीनें पाळणारा मोक्षाला जातो.

सर्व आश्रमांतील लोक ( वेदानुवचनेन ) वेदाचें श्रवण, मनन, निदिध्यास व अनुष्ठान यांच्या योगानें ( तमूएतम् ) त्या सर्वोत्तम परमेश्वराला ( विविदिषन्ति ) जाणण्याची इच्छा करतात. ( ब्रह्मचर्येण ) ब्रह्मचर्य पालन करून, ( तपसा ) धर्मानुष्ठान करून, ( श्रद्धया ) अत्यंत प्रेमळ अंतःकरणानें, ( यज्ञेन ) सत्कार, मैत्री व उपकार करून, यज्ञ करून, ( अनाशकेन ) विज्ञानाच्या योगानें कर्मकाण्डाप्रमाणें आचरून, ( एतं विदित्वा ) या परमेश्वराला जाणून ( मुनिः भवति ) मनुष्य मुनि होतो. ( प्रव्राजिनः ) विरक्तलोक ( लोकम् ) दर्शनास योग्य अशा परमेश्वराची ( ईप्सन्तः ) इच्छा करून ( प्रव्रजन्ति ) सन्यासाश्रम घेतात. ( एतत् ) या ब्रह्मप्राप्तीची इच्छा करणारे ( पूर्वे ब्राह्मणाः ) उत्तम ब्राह्मण ( अनूचानाः ) निःशंक झालेले, पूर्णज्ञानी, ( विद्वांसः ) विद्वान् लोक, ( प्रजां न कामयन्ते ) संतानोत्पत्तीची इच्छा धरीत नाहींत. ( ते ह स्म ) ते आनंदित होऊन असें बोलतात कीं, ( प्रजया ) संतानाच्या योगानें ( किं वा करिष्यामः ) आम्ही काय करावें? संतानाचा आम्हांला कांहीं उपयोग नाहीं. ( येषां नः ) आम्हांला ( अयम् आत्मा ) या परमेश्वराचें दर्शन घेणें आहे; ( अयं लोकः ) आम्ही या मोक्षस्थानाप्रत जाऊं इच्छितों. असें इच्छिणारे ते ( पुत्रैषणायाः ) संतानोत्पत्तीची इच्छा, ( वित्तैषणायाः ) धनप्राप्तीची इच्छा, ( लोकैषणायाः ) लोकांमध्यें प्रतिष्ठा होण्याची इच्छा या तीनहि इच्छा सोडून ( व्युत्थाय ) विरक्त होऊन ( भिक्षाचर्यं चरन्ति ) सन्यासाश्रम स्वीकारतात. ( या पुत्रैषणा ) ज्याला मुलें व्हावीं असें वाटत असतें; त्याला अवश्य ( सा वित्तैषणा ) धन मिळविण्याची इच्छा असते; तशीच त्याला ( लोकैषणा ) लोकांमध्यें आपली प्रतिष्ठा व्हावी अशी इच्छा होणें अगदीं स्वाभाविक आहे. तसेंच ज्याला लोकप्रतिष्ठेची इच्छा असते त्याला ( उभे ) संतति व धन या दोहोंची इच्छा असतेच. ज्याला परमेश्वर प्राप्तीची इच्छा होते त्या पुरुषापासून वरील तीनहि इच्छा दूर पळतात. ब्रह्मानंदाच्या जोडीला लौकिक धनादिकांपासून होणारा आनंद कधींहि येऊं शकणार नाहीं. ज्याची प्रतिष्ठा परमेश्वराचे ठिकाणीं झाली, त्याला इतर प्रतिष्ठांची काय किंमत आहे? असा पुरुष सर्वांवर अनुग्रह करतो व सर्वांनां खऱ्या मार्गाचा उपदेश करतो. परोपकारापुरतेंच कर्म त्याला करावयाचें असतें.

**प्राजापत्यामिष्टिं निरूप्य तस्यां सर्ववेदसं हुत्वा ब्राह्मणः प्रव्रजेदिति शतपथे श्रुत्यक्षराणि ॥ यं यं लोकं मनसा**

**संविभाति विशुद्धसत्वः कामयते यांश्च कामान् ॥ तं तं लोकं जायते तांश्च कमांस्तस्मादात्मज्ञं ह्यर्चयेद्भूति-कामः ॥ १ ॥ मुण्डकोपनिषद् ३।१ मं० १०॥**

त्या विरक्त मनुष्यानें, ( प्राजापत्याम् ) परमेश्वर हीच देवता ज्यामध्यें आहे अशा प्रकारचा ( इष्टिम् ) यज्ञ ( निरूप्य ) करावा. अर्थात् अंतःकरणांत या सर्वांचा पूर्ण निश्चय करून ( तस्याम् ) त्या यज्ञांत ( सर्ववेदसम् ) शिखा सूत्रादिक सर्वां च ( हुत्वा ) होम करून ( ब्राह्मणः ) विरक्त ब्राह्मणानें ( प्रव्रजेत् ) सन्यास घ्यावा सन्यास धारण करण्याचा अधिकार सर्वांनां नाहीं. पूर्ण विद्वान्, रागद्वेषरहित, परोपकारशील, समता ठेवणारे अशा पुरुषांनांच सन्यास घेण्याचा अधिकार आहे. विद्याहीन, रागीट, मत्सरी, स्वार्थी, कलहप्रिय अशांनां सन्यासाश्रमांत जाण्याचा मुळींच अधिकार नाहीं. सन्याशी लोकांनीं करावयाचा होम "प्राण व अपान" अर्थात् प्राणायाम हाच होय. सत्यधर्मानुष्ठान, मन व इंद्रियें यांचा निग्रह करणें हेंच त्यांचें अग्निहोत्र होय. पूर्वींच्या तीनहि आश्रमांतील नियम व निर्बंध सन्याशांनां लागू नाहींत. सत्योपदेश हा त्यांचा ब्रह्मयज्ञ; ब्रह्मोपासना हा देवयज्ञ; ज्ञानी माणसांचा सत्कार करणें हा पितृयज्ञ; अज्ञ माणसांनां ज्ञान शिकविणें व सर्वभूतांवर उपकार व अनुग्रह करणें आणि त्यांनां पीडा न देणें हा त्यांचा भूतयज्ञ; सर्व मनुष्यांवर उपकार करण्यासाठीं देशांतून फिरणें, निरभिमानीपणानें सत्याचा उपदेश करणें व सर्वांनां धर्माच्या मार्गावर आणणें हा त्यांचा अतिथियज्ञ होय अशा प्रकारचे ज्ञानमय पंचमहायज्ञ सन्याशांनीं करावयाचे असतात. सर्व शक्तिमान् परमेश्वराची उपासना केवळ सन्याशानेंच करावयाची असें नसून चारहि आश्रमांमध्यें असणाऱ्या लोकांनीं त्या जगन्नियंत्या परमेश्वराचीच उपासना केली पाहिजे. ( विशुद्धसत्वः ) शुद्ध अंतःकरणाचा मनुष्य, ( यं यं लोकम् ) ज्या ज्या स्थितीची ( मनसा ) मनानें ( संविभाति ) इच्छा करतो ( यान् कामान् च ) आणि ज्या ज्या मनोरथांची तो ( कामयते ) इच्छा करतो ती ती स्थिति व ते ते मनोरथ ( जायते ) त्याला मिळतात. ( तस्मात् ) म्हणून ( भूतिकामः ) भरभराटीची इच्छा करणाऱ्या पुरुषानें ( आत्मज्ञम् ) परमात्म्याचें ज्ञान ज्याला झालें आहे अशा सन्याशाचा ( अर्चयेत् ) सत्कार करावा. ॥ १ ॥ ढोंगी, स्वार्थी, सन्याशाचा पोशाख करणारे, पाखंडी, खोटा उपदेश करणारे अशांचा, त्यांच्या वेषाला फसून, कधींहि सत्कार करूं नये. त्यांचा सत्कार केल्यानें सुख तर मिळणार नाहींच पण उलट दुःख व अधोगति मात्र होईल.

येथवर दिलेल्या आधारांवरून चार वर्ण व चार आश्रम, यांचीं कर्में काय आहेत हें वाचकांच्या लक्षांत येईल.

## पञ्चमहायज्ञ.

गृहस्थाश्रमामध्यें असणाऱ्या पुरुषांकडून पुष्कळ पातकें नेहेमीं होणारीं असतात, त्यांचा नाश व्हावा म्हणून पांच महायज्ञ प्रतिदिवशीं करावे असें सांगितलेलें आहे. ( १ ) ब्रह्मयज्ञ, ( २ ) देवयज्ञ, ( ३ ) पितृयज्ञ, ( ४ ) भूतयज्ञ व ( ५ ) नरयज्ञ हे ते पांच यज्ञ होत.

**अध्यापनं ब्रह्मयज्ञः पितृयज्ञस्तु तर्पणम् ॥ होमो दैवो बलिर्भौतो नृयज्ञोऽतिथिपूजनम् ॥** मनुस्मृति—३।७०

" वेदादिशास्त्राचें पठण, पाठण, संध्योपासन व योगाभ्यास करणें हा ब्रह्मयज्ञ; वडिलांची तृप्ति करणें हा पितृयज्ञ ; हवनीय द्रव्यांचें हवन करणें, विद्वानांचा संग, सेवा, पवित्रता, दिव्यगुणांचें धारण, दातृत्व, व विद्येची उन्नति करणें हा देवयज्ञ; प्राणिमात्राला अन्न देणें हा भूतयज्ञ व अतिथींचा सत्कार करून त्यांची तृप्ति करणें हा नरयज्ञ होय." असें मनुस्मृतींत सांगितलें आहे. यावरून जरी ( १ ) अध्यापन व संध्योपासन, ( २ ) पितृभक्ति, ( ३ ) हवन व विद्येची उन्नति करणें, ( ४ ) अन्नदान व ( ५ ) विद्वान् सन्यासस्थ अतिथ्यांचा सत्कार हीं कामें पांच यज्ञांत मुख्य आहेत असें ठरतें तरी त्या यज्ञांचे विधि पुढें दिल्याप्रमाणें आहेत. या प्रत्येक यज्ञांतील विधि शास्त्राप्रमाणें केले पाहिजेत. हे यज्ञ नित्य केल्यापासून आपणांस व दुसऱ्यांस सुख होतें:—

### ( १ ) सन्ध्या-ब्रह्मयज्ञ.

ब्रह्मयज्ञामध्यें संध्येचा अंतर्भाव होतो. ( **सन्ध्यायन्ति सन्ध्यायते वा परंब्रह्म यस्यां सा सन्ध्या ॥** ) ज्यामध्यें परमात्मचिंतन केलें जातें ( तो ब्रह्मयज्ञ किंवा ) तीच संध्या होय. सर्व मनुष्यांनीं प्रातःकाळीं व सायंकाळीं संध्या-ईश्वराची स्तुति, प्रार्थना व उपासना-करावी संध्या करण्यापूर्वी शरीराची शुद्धता करावी ही दोन प्रकारची आहे. ( १ ) बाह्यशुद्धि व ( २ ) अभ्यंतर शुद्धि.

**अद्भिर्गात्राणि शुद्ध्यन्ति मनःसत्येन शुद्ध्यति ॥ विद्यातपोभ्यां भूतात्मा बुद्धिर्ज्ञानेन शुद्ध्यति ॥१॥ मनु० अ० ५।१०९॥**

" पाण्यानें बाहेरचें शरीर स्वच्छ होतें, सत्यानें मन शुद्ध होतें, विद्या व तप यांच्या योगानें आत्मा निर्मळ होतो व ज्ञानानें बुद्धीचा मळ धुतला जातो " या मनुस्मृतींतील श्लोकावरून उघड होतें कीं, बाह्य शरीराची स्वच्छता पाण्याच्या योगानें करावी व आंतील मनाची स्वच्छता राग-द्वेष-मत्सर-लोभ-अहंकार इत्यादि विकार सोडून देऊन सत्याचरणानें करावी. मनाला राग आला असतां चित्तैकाग्रता होणार नाहीं. म्हणून मानसिक शुद्धीचीहि अत्यंत अवश्यकता आहे. बाहेरून शरीर स्वच्छ करणें

सोपें आहे पण मन निर्मळ करणें फार कठीण आहे. विद्येपासून आत्म्याला जरी कांहीं प्रमाणानें उच्च स्थिति प्राप्त होते तरी विद्येच्या बरोबर तपाचरण म्हणजे सर्व प्रकारचेहि कष्ट सहन करून धर्माचें आचरण, केल्याशिवाय आत्म्याची शुद्धि होत नाहीं. अंतःकरण शुद्धीकरितां बुद्धीच्या शुद्धतेची आवश्यकता आहे. ती ज्ञानानें म्हणजे पृथिवीपासून परमात्म्यापर्यंत एकंदर पदार्थांच्या विवेकानेंच दृढनिश्चयी व शुद्ध अशी होते. ज्याला संध्या नटि करावयाची असेल त्याणें वर लिहिल्याप्रमाणें द्वेषादिक विकार सोडून मन आनंदित ठेवावें व वर लिहिल्याप्रमाणें आत्म्याची व बुद्धीची शुद्धता ठेवण्याचा प्रयत्न करीत असावें. ध्यान करतेवेळीं आळस येऊं नये म्हणून शिर–नेत्र इत्यादि अवयवांनां जलस्पर्श करावा.

## मानसिक एकाग्रता.

ध्यानाच्या पूर्वीं कमींत कमी तीन वेळ प्राणायाम करावे. छातींतील ( फुप्फुसांतील ) वायू नाकावाटें एकदम बाहेर घालवून तो तसा बाहेरच राहूं द्यावा. आपल्याला शक्य तितकें वायूचें स्तंभन बाहेर करून नंतर हलके हलके वायु आंत घेण्यास सुरुवात करावी. आंत वायु घेतल्यावर त्याचा यथाशक्ति आंतच अवरोध करावा. याप्रमाणें कमींत कमी तीन वेळ करावें. [ वायूचा बाहेर किंवा आंत निरोध करणें, तो आपल्या शक्तीपेक्षां जास्त करूं नये. ] प्राणायामाच्या योगानें प्राण आपल्या स्वाधीन होतो, मन व इंद्रियें हीं स्वाधीन रहातात, पुरुषार्थ वाढतो व बुद्धि तीव्र होऊन सूक्ष्म विचार करण्यास योग्य होते आणि आत्म्याला एकप्रकारचें स्थैर्य प्राप्त होतें.

## शिखाबंधन.

केश इकडे तिकडे पडूं नयेत–म्हणून ते चांगले घट्ट बांधावें. शिखाबंधनाच्या वेळीं गायत्रीमंत्र म्हणावा. तो बुद्धीला उत्तम कामाची शिक्षा देणारा व परमात्म्याच्या गुणांचा बोध करणारा आहे ह्याकरितां त्याच्या अर्थाचा विचार करावा. प्रत्येक कार्याचीं अंतरंग व बहिरंग अशीं दोन स्वरूपें असतात बहिरंग कार्य गौण असतें व अंतरंग प्रधान असतें. संध्योपासनेच्या वेळचीं शिखाबंधन आचमनादि बहिरंग कार्यें व बाह्य विषयांतून सर्व इंद्रियांच्या वृत्ति एकत्र करून परमात्मस्वरूपाचा विचार करण्याकडे वळविणें हीं प्रधान अंतरंग कार्यें आहेत.

## आचमन.

**ओम् शन्नो देवीरभिष्टय आपो भवन्तु पीतये ॥ शंयोरभिस्रवन्तु नः ॥** यजु० ३६।१२॥

( देवीः ) सर्वप्रकाशक व ( आपः ) सर्वव्यापक अशा परमेश्वरानें, ( अभिष्टये ) अभिष्ट सुख आम्हांस मिळावें व ( पीतये ) पूर्ण आनंदाच्या उपभोगानें आमची तृप्ति व्हावी म्हणून ( नः ) आम्हांला ( शम् ) सुख व कल्याण ( भवन्तु ) द्यावें. [ किंवा परमेश्वर आम्हांला कल्याणकारक होवो. ] तसेंच तो परमेश्वर ( नः ) आम्हांवर ( शंयोः ) सुखाचा ( अभिस्रवन्तु ) वर्षाव करणारा होवो. [ "**दिवु=क्रीडा-विजिगीषा-व्यवहार-द्युति-स्तुति-मोद-मद-स्वप्न-कान्ति-गतिषु** " या धातूंवरून "देव" किंवा "देवी" हा शब्द सिद्ध होतो. म्हणून "देव" शब्दाचे अर्थ "प्रकाशक, व्यवहार साधक," इत्यादि समजावें. "**देवो दानाद्वा द्योतनाद्वा**" या निरुक्तांतील वचनाप्रमाणेंहि देव शब्दाचा अर्थ ' परोपकारशील व सर्वप्रकाशक" असाच होतो. "**आप्लृ=व्याप्तौ**" या धातूवरून "आपः" हा शब्द झाला आहे. ( हा नेहमीं बहुवचनान्त असतो. ) या धातूच्या अर्थाप्रमाणें "आप्" चा अर्थ "व्यापणारा-व्यापून असणारा-सर्वव्यापक" होतो. "आपः" या शब्दानें परमेश्वराचा बोध होतो या विषयीं प्रमाणः—

"यत्र॒ लो॒कांश्च॒ कोशां॒श्चापो॒ ब्रह्म॒ज॒ना॒ वि॒दुः ॥ अस॑च्च॒ यत्र॒ सच्चा॒न्तः स्क॒म्भं तं ब्रू॑हि कत॒मः स्वि॑दे॒व सः ॥ अथर्व का० १० अनु० ४ व० २२ मं० १०॥

अर्थ—" ( यत्र ) ज्यामध्यें ( लोकान् ) सर्व लोक, लोकान्तर आहेत ( कोशान् ) जगत् रचण्याच्या सामुग्रीचा खजिना ज्यामध्यें आहे, तसेंच ज्याच्या आश्रयानें ( सत् ) मूळप्रकृत्यादि कारण जगत् व ( असत् ) स्थूल भूतादिक कार्य जगत् राहिलेलें आहे तें आश्रयस्थान "**आपः**" हेंच होय; त्याला "**ब्रह्म**" असें म्हणतात. अर्थात् "**सर्वव्यापक परमात्मा**"च या जगाला आश्रयभूत आहे. ( सः ) तो ( कतमः स्वित् एव ) कोण व कोठें आहे बरें? ( तम् ) तो ( स्कम्भम् ) स्थिर व ( अन्तः ) सर्वांच्या अंतर्यामीं आहे असें समज." या मंत्रामध्यें "आपः" हा शब्द "ब्रह्म-परमेश्वर" याचा वाचक दिला आहे. याप्रमाणें परमेश्वराची प्रार्थना करून तीन वेळ आचमन करावें. आचमनानें आळस नाहिंसा होऊन कण्ठांतील कफ नाहींसा होतो व तरतरी येते. आचमनाला अपरिहार्य कारणामुळें पाणी नसल्यास आचमन न करतां संध्या करावी; पण आचमनाला पाणी नाहीं म्हणून संध्या न करणें चांगलें नाहीं.

### इन्द्रियस्पर्श.

**ओम् वाक् वाक् । ओम् प्राणः प्राणः। ओम् चक्षुः चक्षुः। ओम् श्रोत्रं श्रोत्रम् । ओम् नाभिः । ओ हृदयम् । ओम् कण्ठः । ओम् शिरः । ओम् बाहुभ्यां यशोबलम् । ओम् करतलकरपृष्ठे ।**

या मंत्रांनीं ईश्वरप्रार्थनापूर्वक त्या त्या इंद्रियांनां जलस्पर्श करावा. परमेश्वराच्या कृपेनें सर्व इन्द्रियें बलयुक्त होवोत, असें मनामध्यें म्हणावें.

### ईश्वरप्रार्थनापूर्वक मार्जन.

**ओम्भूः पुनातु शिरसि । ओम्भुवः पुनातु नेत्रयोः । ओम् स्वःपुनातु कण्ठे । ओम् महःपुनातु हृदये । ओम् जनः पुनातु नाभ्याम् । ओम् तपः पुनातु पादयोः । ओम् सत्यं पुनातु पुनश्शिरसि । ओम् खं ब्रह्म पुनातु सर्वत्र ॥**

या ईश्वरप्रार्थनेच्या नाममंत्रानें आपल्या शरीरावर पाण्यानें मार्जन करावें. मार्जन करतेवेळीं ( पुढें दिलेले ) प्रत्येक शब्दाचा अर्थ लक्षांत आणून परमेश्वराच्या गुणांचें चिंतन करावें.

### प्राणायाम मंत्र.

**ओम् भूः ओम् भुवः । ओम् स्वः । ओम् महः । ओम् जनः । ओम् तपः । ओम् सत्यम् ॥ तैत्ति० प्रपा० १०।२७॥**

प्राणायाम करतेवेळीं यांचा उच्चार व अर्थ विचार करावा. ( ओम् ) सर्वरक्षक, ( भूः=प्राणः ) सर्वांच्या जीवनाला आधार, ( भुवः-अपानः ) धर्मात्म्यांच्या दुःखाचा नाश करणारा, ( स्वः ) सर्वाधिष्ठाता, ( महः ) सर्वांहून मोठा, ( जनः ) सर्वांनां उत्पन्न करणारा, ( तपः ) दुष्टांनां संताप उत्पन्न करणारा व स्वतः ज्ञानमय असणारा, ( सत्यम् ) अविनाशी. [ हीं सर्व ईश्वराचीं नांवें आहेत. प्रत्येक नांवामध्यें त्याचे निरनिराळे गुण सांगितले आहेत. म्हणून तो मंत्र म्हटला असतां त्याचा भावार्थ त्यावेळीं मनांत आणला पाहिजे. ]

### अघमर्षणमंत्र.

**ओ३म् ऋतञ्च सत्यञ्चाभीद्धात्तपसोऽध्यजायत ॥ ततो रात्र्यजायत ततः समुद्रो अर्णवः ॥ १ ॥**

**समुद्रादर्णवादधि संवत्सरो अजायत ॥ अहोरात्राणि विदधद् विश्वस्य मिषतो वशी ॥ २ ॥ सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत् ॥ दिवंच पृथिवीं चान्तरिक्ष मथो स्वः ॥ ३ ॥** ऋग्वेद ८।८।४८॥

विधात्या परमेश्वरानें (अभि-इद्धात्) सर्व प्रकारें ज्ञानानें प्रदीप्त झालेल्या अशा (तपस:) आपल्या अनंत सामर्थ्यानें (ऋतम्) सर्व विद्यांमध्यें मुख्य असें वेदशास्त्र -ज्ञान-व (सत्यम्) सत्व-रज-तम या तीनहि गुणांनीं युक्त, स्थूल व सूक्ष्म या दोनहि सृष्टीचें आदिकारण-मूलप्रकृति हीं (अभ्यजायत) उत्पन्न केलीं. (ततः) त्या परमेश्वराच्या पूर्वोक्त सामर्थ्यापासूनच (रात्री) प्रलयानंतर होणारी-हजार चतुर्युगांची-रात्र उत्पन्न झाली. [ याविषयीं प्रमाण:—

**"तम आसीत्तमसा गूढमग्रे॥"** ऋ. ८।७।१७।३॥

(अग्रे) सृष्टीच्या पूर्वी (तम:) अंधःकारच (आसीत्) होता व हें सर्व जग (तमसा) अंधःकारानें (गूढम्) व्याप्त झालेलें होतें. अर्थात् जगदुत्पत्तीपूर्वी एक महान् कालरात्र होती. ] (ततः) त्याच्या प्रकृतिरूपी सामर्थ्यापासून (समुद्रः अर्णवः) पृथिवीवरील जलमय समुद्र व आकाशांतील मेघमय समुद्र उत्पन्न झाला. ॥ १ ॥ (समुद्रात् अर्णवात्) आकाशरूपी समुद्र उत्पन्न झाल्यानंतर (संवत्सरः) क्षण--निमेषापासून तों वर्षापर्यंत मोजला जाणारा काल उत्पन्न झाला. (वशी) सर्वांला आपल्या स्वाधीन ठेवणाऱ्या त्या परमेश्वरानें (विश्वस्य मिषतः) आपल्या स्वाभाविक सामर्थ्यानें (अहोरात्राणि) रात्र व दिवस होण्याची व्यवस्था (वि-दधत्) विशेष प्रकारानें उत्पन्न केली ॥ २ ॥ (धाता) सर्व जगाचें धारण व पोषण करणाऱ्या परमात्म्यानें (यथापूर्वम्) ज्या प्रमाणें त्याच्या सर्वज्ञ ज्ञानशक्तीमध्यें जगद्रचनेविषयीं ज्ञान होतें व पूर्वीच्या कल्पामध्यें जशी त्याणें सृष्टीची रचना केली होती त्याचप्रमाणें या सृष्टीमध्येंहि जीवांच्या पापपुण्याप्रमाणें देहाची रचना व इतर सृष्टीची घटना (अकल्पयत्) केली. (सूर्याचन्द्रमसौ) सूर्य व चन्द्र (दिवम्) प्रकाशमय अग्नि-विद्युत्, (पृथिवीम्) ही पृथिवी (अन्तरिक्षम्) पृथ्वी व द्युलोक यांच्या मधील आकाश व तेथील अनंत गोल व (स्वः) मध्य लोक या सर्वांची

( अकल्पयत् ) पूर्वींप्रमाणेंच रचना केली. परमेश्वराचें ज्ञान अपरिमित, पूर्ण, अनंत, व सर्वदा सारखें असल्यामुळें "तें काल कमी होतें व आज वाढलें" असें कधींच होत नाहीं; म्हणूनच त्याची रचना अव्याहत सारखीच असते. ॥ ३ ॥ तात्पर्य, कालाच्या उत्पत्तीपासून तों प्रत्येक वस्तुमात्रापर्यंत दिसणारे व न दिसणारे सर्व पदार्थ, परमेश्वराच्या सामर्थ्यानें उत्पन्न झाले आहेत. अशा प्रकारच्या सर्व शक्तिमान् व सर्व काळीं सर्व ठिकाणीं असणाऱ्या परमेश्वराचें स्मरण करून, आपलीं पातकें—मग तीं कितीहि गुप्त ठिकाणीं केलेलीं असोत तीं—त्याला समजतात असें समजून सर्व मनुष्यांनीं पापापासून दूर रहावें ; व कोणींहि पापाचरण करूं नये हीच परमेश्वराची आज्ञा आहे. या मन्त्रांनीं परमेश्वराचें चिंतन करून पाप न करण्याचा निश्चय करावा. याला **अघमर्षण** म्हणतात.

" शन्नो देवी." या मंत्राचा उच्चार करून पुनः आचमन करावें. नंतर गायत्री-मंत्राच्या अर्थावर विचार करावा व मग हें सूर्यचंद्रादिक जग परमेश्वरानेंच रचलें आहे हें मनांत ठेवून भक्तिपूर्ण अंतःकरणानें—सर्वांतर्यामी ब्रह्माचें चिंतन करावें.

मनसा परिक्राम मन्त्राः ।

**प्राची दिगग्निरधिपतिरसितो रक्षितादित्या इषवः ॥ तेभ्यो नमोऽधिपतिभ्यो नमो-रक्षितृभ्यो नमइषुभ्यो नम एभ्यो अस्तु ॥ यो३ऽस्मान्द्वेष्टि यं वयं द्विष्मस्तं वो जम्भे दध्मः ॥१॥ दक्षिणादिगिन्द्रोऽधिपतिस्तिरश्चिराजीरक्षिता पितर इषवः ॥ तेभ्यो नमोऽधिपतिभ्यो नमोरक्षितृभ्यो नम इषु-भ्यो नम एभ्यो अस्तु ॥ यो३स्मान् द्वेष्टि यं वयं द्विष्म स्तं वो जम्भे दध्मः ॥ २ ॥ प्रतीचीदिग्वरुणोऽधिपतिः पृदाकू रक्षिता-**

न्नमिषवः । तेभ्यो नमोधिपतिभ्यो नमो रक्षितृभ्यो नम इषुभ्यो नम एभ्यो अस्तु ॥ योऽस्मान् द्वेष्टि यं वयं द्विष्मस्तं वो जम्भे दध्मः ॥ ३ ॥ उदीची दिक्सोमोधिपतिः स्वजो रक्षिताशनिरिषवः ॥ तेभ्यो नमोऽधिपतिभ्यो नमो रक्षितृभ्यो नम इषुभ्यो नम एभ्यो अस्तु ॥ योऽस्मान्द्वेष्टि यं वयं द्विष्मस्तं वो जम्भे दध्मः ॥ ४ ॥ ध्रुवादिग्विष्णुरधिपतिः कल्माषग्रीवो रक्षिता वीरुध इषवः ॥ तेभ्यो नमोधिपतिभ्यो नमोरक्षितृभ्यो नम इषुभ्यो नम एभ्यो अस्तु ॥ यो ऽस्मान्द्वेष्टि यं वयं द्विष्मस्तं वो जम्भे दध्मः ॥ ५ ॥ ऊर्ध्वादिग् बृहस्पति रधिपतिः श्वित्रो रक्षितावर्षमिषवः ॥ तेभ्यो नमोऽधिपतिभ्यो नमोरक्षितृभ्यो नम इषुभ्यो नम एभ्यो अस्तु ॥ यो ऽस्मान्द्वेष्टि यं वयं द्विष्मस्तं वो जम्भे दध्मः ॥६॥ अथर्ववेद कां. ३ अ० ६ व० २७ मं० १–६॥

( प्राची दिक् ) सूर्य उगवतो ती पूर्व दिशा. ( अधिपतिः ) या दिशेचा अधिपति (अग्निः ) ज्ञानस्वरूप परमेश्वर आहे. ( असितः ; तो बन्धनाहून पलीकडे- बंधन

रहित असा ईश्वर ( रक्षिता ) आमचा रक्षक होवो. ज्याच्यापासून उत्पन्न होणारे ( आदित्याः ) प्राण व किरण ( इषवः ) सर्व जगाचें रक्षण करणारे जीवनरूप आहेत, ( तेभ्यः ) त्या ( अधिपतिभ्यः रक्षितृभ्यः ) इंद्रियांचे स्वामी व सर्वरक्षक अशा ( इषुभ्यः ) जीवनरूप प्राणांनां ( नमः ) वारंवार आमचा नमस्कार असो ही प्राणशक्ति आपल्यावर प्रसन्न असली तर ( यः अस्मान् द्वेष्टि ) जो आमचा द्वेष करतो व ( यं वयं द्विष्मः ) ज्याचा आम्ही द्वेष करतों, ( तम् ) त्याला आम्ही ( जम्भे ) आमच्या स्वाधीन ( दध्मः ) ठेवूं शकूं. प्राणशक्तीच्या सहाय्यानें आमचे शत्रूहि आमच्याशीं मित्रत्वानें वागतील. ॥ १ ॥ ( दक्षिणा० ) दक्षिण दिशेचाहि अधिपति ( इन्द्रः परमऐश्वर्यानें युक्त असणारा असा परमेश्वर आहे. तो आमचें व सर्व ( तिरश्चिराजी० ) कीटपतंगादिकांचें रक्षण करणारा आहे. ( पितरः ) ज्ञानसंपन्न लोक हे त्याच्या सृष्टीमध्यें ( इषवः ) रक्षक आहेत त्या सर्वांनां आमचा नमस्कार असो. त्यांच्या कृपेनें आम्ही परस्पर मित्रभावानें वागत जाऊं ॥ २ ॥ ( प्रतीची० ) पश्चिम दिशेचा अधिपती तोच ( वरुणः ) सर्वोत्तम-सर्वांनीं प्रसन्न करून घेण्यास योग्य असा परमात्मा आहे. तो ( पृदाकूरक्षिता ) मोठमोठ्या प्राण्यांचेंहि रक्षण करतो. ( अन्नम् इषवः ) या त्याच्या जगतामध्यें भक्ष्य पदार्थ हेच रक्षक आहेत. ( तेभ्योनमो० ) त्या सर्वांचा आम्ही सत्कार करतों आमच्यांमध्यें कोणीहि परस्पर विरोध न करतां सर्वांनीं आनंदांत राहावें ॥ ३ ॥ ( उदीची० ) उत्तर दिशेचा अधिपति; ( सोमः ) शांति, आनंद इत्यादि सौम्य गुणांनीं युक्त असणारा परमेश्वरच आहे. ( सु+अजः ) तो अजन्मा-कधींहि जन्माला न येणारा-असा आहे. तो ( रक्षिता ) आमचें रक्षण करो. ( अशनिः ) सर्वव्यापक विद्युच्छक्ति हीच ( इषवः ) जीवनाला हेतु असून सर्व प्रकारें रक्षण करणारी आहे. त्या सर्वांचा आम्हीं सत्कार करतों. त्या योगानें शत्रूहि मित्र होवोत. ॥ ४ ॥ ( ध्रुवा० ) ही आमच्या खालीं असणारी दिशा ध्रुवा होय. हिचाहि अधिपति तोच ( विष्णुः ) सर्वव्यापक परमेश्वर आहे. याच्या सृष्टींत ( कल्माषग्रीवो० वीरुधः ) हिरव्या रंगाच्या वनस्पति व वृक्ष हे रक्षक व ( इषवः ) दुष्ट रोगादिकांचा नाश करणारे आहेत. त्या सर्वांचा आम्ही सत्कारपूर्वक स्वीकार करतों. त्याच्या योगानें आमचे शत्रु तर मित्र होतीलच पण आम्हांला रोगादिकांपासूनहि पीडा होणार नाहीं व आम्हीं सुखी होऊं ॥ ५ ॥ ( ऊर्ध्वा० ) ऊर्ध्व दिशेचा अधिपतीहि तोच ( बृहस्पतिः ) विद्या, वाणी, ज्ञान, वेद व आकाश यांचा पति अर्थात परमात्मा आहे. तो आमचा रक्षक होवो. त्याची वाणी-वेद विद्या, ( वर्षम् ) वर्षाकालांतील जलबिंदूंप्रमाणें ( इषवः ) आमचें रक्षण करो. विद्येचा आम्हांवर वर्षाव होवो म्हणजे आम्ही सर्व ज्ञानवंत होऊं. ( तेभ्यः ) त्या सर्वांनां आमचें नमन असो. त्या विद्येच्या योगानें आमचे शत्रु मित्र होवोत. ॥ ६ ॥ तात्पर्य,

सर्व मनुष्यांनीं तो सर्वशक्तिमान्, सर्वांचा गुरु न्यायकर्ता, दयाळू, पालक, सर्वज्ञ असा परमेश्वर सर्व दिशांमध्यें पूर्णपणें व्यापक आहे असें समजावें व गुणांचें चिंतन करावें " अग्नि–सोम "–वगैरे एकएका शब्दांत त्याचे निरनिराळे गुण सांगितले आहेत.

[ दयाळू परमेश्वरानें हें उत्तम शरीर दिलें असतांहि आपणाकडून कांहीं परोपकार घडत नाहीं याबद्दल विषाद मानावा व निश्चय करून दुसऱ्यांचीं दुःखें नाहींशीं करण्यास तयार व्हावें. असा निश्चय करून कामें सुरू केल्यावर परमेश्वर सर्व प्रकारें सहाय्य करतोच करतो. परमेश्वराची उपासना–गुण चिंतन रूपी-करावी ती दोन प्रकारची आहे. ( १ ) सगुण व ( २ ) निर्गुण. सर्वशक्तिमान्, दयाळू, न्यायकारी, चेतन, व्यापक, अंतर्यामी, सर्वांचा उत्पन्नकर्ता, पोषक, मंगलमय, शुद्ध, सनातन, ज्ञानस्वरूप, आनंदमय, धर्म-अर्थ-काम-मोक्ष यांनां देणारा, सर्वांचा पिता, माता, बंधु, मित्र, राजा, न्यायाधीश इत्यादिगुणांनीं युक्त असणाऱ्या ईश्वराचे ते ते गुण मनांत आणून त्याचें चिंतन करणें ही **सगुण–उपासना** होय. तसेंच तो अनादि, अनंत जरामरणरहित, अविकारी, शब्दस्पर्शादिकांहूनभिन्न, अन्यायादि दोषांहून दूर असणारा, अज्ञान व मलिनता इत्यादि ज्याचे ठिकाणीं नाहींत, परिमाण-छेदन-बंधन इत्यादि करण्यास अशक्य, ऱ्हस्व दीर्घ या भेदांनीं रहित, ज्याला शोक, मोहादिक मनोविकार होत नाहींत, भूक–तहान–शीत–ऊष्ण इत्यादिकांच्या बाधा ज्याला होत नाहींत, हर्षशोकांहून सदैव अलिप्त, इत्यादि प्रकारांनीं त्याच्यामध्यें जे विकार नाहींत ते नाहींत असें समजून तसें त्याचें चिंतन करणें या प्रकाराला **निर्गुण–उपासना** असें म्हणतात. अशा तऱ्हेनें उपासना करून मन व आत्मा दिवसांतून दोन वेळ शुद्ध करावा ]

## उपस्थानमन्त्र.

**ओम् उद्वयं तमसस्परि स्वः पश्यन्त उत्तरम् । देवं देवत्रा सूर्य्यमगन्म ज्योतिरुत्तमम्**

यजु० ३५ । १४ ॥

हे परमात्मन् ! तूं ( सूर्यम् ) चराचरांचा आत्मा आहेस, ( ज्योतिः ) स्वयंप्रकाशी, ( उत्तमम् ) सर्वोत्कृष्ट, ( देवत्रा ) दिव्यगुणयुक्त पदार्थांहून श्रेष्ठ, प्रकाशकांहून प्रकाशक, ( देवम् ) धर्मात्मे व मुमुक्षू यांनां आनंदकारक असा मोक्ष देणारा, ( उत्-तरम् ) जगत्प्रलयानंतरहि–तूं नित्य असल्यामुळें–राहणारा, ( स्वः ) आनंदस्वरूप, ( तमसस्परि ) अंधःकाराच्या पलीकडे असणारा असा तूं आहेस. त्या तुला (पश्यन्तः)

पाहणारे आम्ही ( उत्-अगन्म ) उत्तम स्थितीला पोहोंचूं; उत्तम श्रद्धेनें युक्त होऊन तुला प्राप्त करून घेऊं. म्हणून हे ईश्वरा! आम्हांवर कृपा कर व आम्हांला प्राप्त हो.

**उदु॒त्यं जा॒तवे॑दसं दे॒वं व॑हन्ति के॒तव॑ः॥ दृ॒शे विश्वा॑य॒ सूर्य॑म् ॥ २ ॥** यजु० ३३ । ३१ ॥

( केतवः ) ज्ञानकिरण, सृष्टींतील रचनेंचे नियम, अर्थात् सृष्टीच्या रचनेवरून प्रकट होणारे परमेश्वराचे गुण, जे ( विश्वाय दृशे ) सर्व विश्वांतलि चमत्काराकडे पाहिलें असतां व्यक्त होतात ते गुण, ( देवम् ) प्रकाशमय व सुखदाता, ( सूर्यम् ) चराचरांचा आत्मा व ( जात-वेदसम् ) ज्याच्या पासून चारहि वेद उत्पन्न झाले आहेत अशा ( त्यम् ) त्या प्रसिद्ध परमेश्वराला ( उत्-वहन्ति ) उत्कृष्ट प्रकारानें प्रकाशित करतात, प्राप्त करून देतात. [ **जाता वेदाः यस्मात् । यः जातानि भूतानि विन्दति सः । यः जातं जगत् वेत्ति सः जातवेदाः परमेश्वरः** ॥ ज्यापासून चारहि वेद झाले, जो उत्पन्न झालेल्या सर्व भूतांनां यथार्थपणानें जाणतो, जो सर्व सृष्टीला जाणतो तो जातवेदा अर्थात् सर्वज्ञ परमेश्वर होय. त्याच्या प्राप्तीची सर्वांनीं इच्छा धरावी. ] ॥ २ ॥

**चि॒त्रं दे॒वाना॒मुद॑गा॒दनी॑कं॒ चक्षु॑र्मि॒त्रस्य॒ वरु॑ण स्या॒ग्नेः॥ आप्रा॒द्यावा॑पृथि॒वी अ॒न्तरि॑क्ष॒ सूर्य॑ आ॒त्मा जग॑तस्त॒स्थुष॑श्च॒ स्वाहा॑ ॥३॥**

यजु . ७।४२॥

( सूर्यः ) सकलजगदुत्पादक परमेश्वर हा ( जगतः ) सर्व जंगम सृष्टीमध्यें व ( तस्थुषः ) स्थावर सृष्टीमध्यें ( आत्मा-अतति सर्वत्र व्याप्नोति इति आत्मा ) निरन्तर व्यापून राहणारा आहे. ( आप्रा द्यावा० ) द्यौः व पृथिवी इत्यादि सर्व जगाची रचना झाल्यावर तो सर्व प्रकारें ( आ० ) त्यांचें धारण, पोषण व रक्षण करतो. तो ( मित्रस्य ) द्रोहरहित मनुष्य तसेंच सूर्य व प्राण ( वरुणस्य ) श्रेष्ठ कर्मे करणारे व सद्गुणांनीं युक्त असणारे ( अग्नेः ) अग्नि, विद्युत् वगैरे शिल्पविद्येला हेतुभूत पदार्थ या सर्वांचा ( चक्षुः ) प्रकाशक, यांचें ज्ञान करून देणारा आसा आहे. ( देवानाम् ) तो विद्वान् लोकांच्या हृदयांमध्यें ( उत्-अगात् ) उत्तम रीतीनें असतो, ज्ञान करून देतो. ( चित्रम् ) हें सर्व आश्चर्यकारक आहे. [ **आश्चर्यो वक्ता कुशलोऽस्य लब्धाऽऽश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः** ॥ कठोपनि० व० २॥ परमे-

श्वराचे गुण सांगणें किंवा जाणणें हें सर्वच आश्चर्यकारक आहे. ] परमेश्वर किंवा परब्रह्म हेंच आम्हां सर्वांचें ( अनीकम् ) सर्व दुःखविनाशक, कामक्रोधादि रिपुविनाशक बल आहे. त्याच्याशिवाय सर्व सुखांचें माहेरघर असें कोणतेंहि स्थान नाहीं ; हें ( सु+आह ) सर्व खरें आहे. [स्वाहाकृतयः स्वाहेत्येतत्सु आहेति वा स्वा वागाहेति वा स्वं प्राहेति वा स्वाहुतं हविर्जुहोतीति वा तासामेषा भवति ॥ निरु० दै० ८।२०॥ सत्यभाषण, अंतःकरणांत असलेल्या ज्ञानाप्रमाणें बोलणें, आत्मविषयक अधिकार व यथाशास्त्र हवन हे स्वाहा शब्दाचे अर्थ आहेत. ) ॥ ३ ॥

**तच्चक्षुर्देवहितं पुरस्ताच्छुक्रमुच्चरत् ॥ पश्येम शरदः शतं जीवेम शरदः शत ँ शृणुयाम शरदः शतं प्रब्रवाम शरदः शतमदीनाः स्याम शरदः शतं भूयश्च शरदः शतात् ॥ ४ ॥** यजु० ३६।२४॥

( तत् ) तें ( चक्षुः ) सर्व साक्षी ( देवहितम् ) दिव्यगुणयुक्त, विद्वान् , भक्त यांनां सुख देणारें व ( पुरस्तात् ) सृष्टीच्या पूर्वींहि ( शुक्रम् ) शुद्ध स्वरूपांत असणारें ब्रह्म व ज्ञान ( उत्-चरत् ) सर्वप्रकारें सर्वत्र व्याप्त झालें आहे. प्रलयानंतरहि त्याचें सामर्थ्य स्पष्ट दिसून येतें. ( तत् ) त्याला ( शरदःशतं पश्येम ) शंभर वर्षें पाहूं या त्याच्या कृपेनें ( शरदः शतं जीवेम ) शंभर वर्षेंपर्यंत जगूं या. ( शृणुयाम० ) त्याच्या गुणांचें वर्णन शंभर वर्षेंपर्यंत ऐकावें. ( प्रब्रवाम० ) त्याच्या गुणांचा उपदेश आम्ही दुसऱ्यांनां शंभर वर्षेंपर्यंत करावा. ( अदीनाः स्याम० ) त्याच्या कृपेनें शंभर वर्षें पर्यंत कोणाच्याहि पुढें आम्ही दीन होणार नाहीं. दारिद्र्यानें किंवा पारतंत्र्यरूपी बंधनानें कधींहि आम्हीं हीन होणार नाहीं किंवा आम्हीं दीन होऊं नये. (शरदः शतात् भूयः ) त्याच्या कृपेनें शंभरापेक्षां ज्यास्त वर्षें जगून विद्याग्रहण, उपदेश, उन्नति इत्यादि करीत असावें. [ अर्थात् त्याच्या शिवाय कोणत्याहि अन्य पदार्थांची उपासना मनुष्यांनीं करूं नये. कारण " **योऽन्यां देवतामुपास्ते पशुरेव ँ स देवानाम्** ॥ शत० कां. १४।४।२।२२॥ " " परमेश्वराला सोडून जो दुसऱ्याची उपासना करतो तो विद्वानांमध्यें पशुच होय." असें शतपथ ब्राह्मणांत म्हटलें आहे. असो. या मंत्रांचा अर्थ लक्ष्यांत आणून, हात जोडून मनोभावानें परमेश्वराची एकाग्र अंतःकरणानें प्रार्थना करावी. ]

## गुरुमंत्र.

**ओम्।** यजु० ४० । १७ ॥ **भूर्भुवः स्वः। तत्सवितुर्वरेण्यम् भर्गो देवस्य धीमहि ॥ धियो यो नः प्रचोदयात् ॥ १ ॥** यजु० ३६।३॥ ऋग्वे मं० ३।५।६२।१०॥ यजु० ३।३॥ यजु० २२।९॥ यजु० ३०।२॥ साम० उत्तर० ६।३।१०॥

हा गायत्री मंत्र वेदांमध्यें ज्या ज्या ठिकाणीं आला आहे तेथें तो वरील प्रमाणेंच आहे. यांत पाठभेद मुळींच नाहीं. (ओम्) अ+उ+म् हीं तीन अक्षरें मिळून "ओम्" शब्द सिद्ध होतो. "**अकारं चाप्युकारं च मकारं च प्रजापतिः ॥ वेदत्रयान्निरदुहत् भूर्भुवःस्वरितीति च ॥** मनु- २।७६॥" "प्रजापतीनें तीनहि वेदांतून "भूः-भुवः-स्वः" हें व "अ-उ-म्" हें सार काढलें." तात्पर्य "ओम्" हें वेदांचें सार आहे. हें परमेश्वराचें पूर्ण नांव आहे. या एका नांवामध्यें परमेश्वराच्या इतर पुष्कळ नांवांचा अर्थ अंतर्भूत होतो. "अ" कारानें विराट्, अग्नि व विश्व इत्यादिकांचा बोध होतो. (**विराट्-विविधं चराचरं जगत् राजयते प्रकाशयते सः।**) विविध चराचरवस्तुमात्रांनां प्रकाशित करणारा तो विराट् होय-अर्थात् सर्वात्मा ईश्वर. (**अग्निः-अच्यते प्राप्यते सत्क्रियते वा वेदादिभिः शास्त्रैः विद्वद्भिश्च**) वेदादिक शास्त्रें व विद्वान् हे ज्याची प्राप्त व ज्याचा सत्कार करतात तो परमेश्वर अग्नि शब्दानें बोधित होतो. (**विश्वः-विष्टानि आकाशादि भूतानि यस्मिन्**) ज्यामध्यें सर्व आकाशादि भूतें राहिलीं आहेत, तो विश्व अर्थात् सर्वाधार परमेश्वर होय. किंवा (**प्रकृत्यादिषु यः विष्टः**) प्रकृतीमध्यें जो व्याप्त झाला आहे तो विश्व-परमेश्वर-होय. इत्यादि "अ" काराचे अर्थ होतात. "उ" कारानें "हिरण्यगर्भ-वायु-तैजस" इत्यादिकांचा बोध होतो. (**हिरण्यगर्भः-हिरण्यानि सूर्यादीनि तेजांसि गर्भे यस्य**) सूर्यादिक तेजस्वी पदार्थ ज्याच्या आधारानें राहत आहेत तो, किंवा (**सूर्यादीनां हिरण्यांनां यः गर्भः**) जो सूर्यादिकांनां उत्पन्न करतो तो हिरण्यगर्भ-परमात्मा-होय. [**ज्योतिर्वै हिरण्यं ज्योतिरेषोऽमृत ॱ हिरण्यम् ॥** शत० ६।७।१।२॥ **यशो वै हिरण्यम् ॥** ऐतरे० पं. ७।३॥ गा० १८॥ ज्योति, तेज, अमृत, यश, कीर्ति या सर्वांनां हिरण्य असें म्हणतात.] (**वायुः—यो वाति जानाति धारयति अनन्तबलत्वात् सर्वं जगत**) जो सर्वशक्तिमान् असल्यामुळें सर्व जगाला आधार देतो व सर्वज्ञ

असल्यामुळें सर्व जगाला पूर्णपणें जाणतो तो वायु-परमेश्वर-होय. [ **तद्वायुः** या वैदिक आधारावरूनहि परब्रह्माला वायु म्हणतात असें सिद्ध होतें ] ( **तैजसः—सूर्यादीनां प्रकाशकत्वात् स्वयंप्रकाशकत्वात् तैजसः ईश्वरः**) सूर्यादिकांनां प्रकाशित करतो व स्वतः प्रकाशित होतो म्हणून त्या परमेश्वराला तैजस असें म्हणतात. इत्यादि अर्थ "**उ**" कारापासून समजले जातात. "**म**" करानें "ईश्वर-आदित्य-प्राज्ञ" इत्यादिकांचा बोध होतो. ( **ईश्वरः—ईष्टे असौ सर्वशक्तिमान् न्यायकारी** ) परमेश्वर सर्वशक्तिमान्, न्यायकारी व स्वामी आहे म्हणून त्याला ईश्वर असें म्हणतात. ( **आदित्यः—अविनाशित्वात्** ) परमेश्वर अविनाशी असल्यामुळें त्याला आदित्य असें म्हणतात. ( **प्राज्ञः—प्रकृष्टतया जानाति सकलं जगदिति प्रज्ञः प्रज्ञ एव प्राज्ञः** ) संपूर्णतेनें सर्व जगाला जाणतो म्हणून ईश्वरालाच प्राज्ञ असें म्हणतात. इत्यादि अर्थ "**म**" कारापासून ध्वनित होतात. **हे** ओंकाराचे अर्थ ध्यानाच्या वेळीं मनांत आणावे.

## महाव्याहृती.

**भूः । भुवः । स्वः ॥**

**भूरिति वै प्राणः । भुवरित्यपानः । स्वरिति व्यानः ॥**

**—तैत्तिरीयोपनिषद्. प्रपा० ७ अनु० ५॥**

( **भूः=प्राणः= प्राणयति जीवयति सर्वान् प्राणिनः** ) परमेश्वर सर्व प्राणिमात्रांच्या जीवनाला हेतु आहे म्हणून त्याला "प्राण किंवा भूः" असें म्हणतात. ( प्राणादपि प्रियस्वरूपोवा ) किंवा तो प्राणाहूनहि प्रिय असल्यामुळें त्याला तें नांव आहे. ( **भुवः=अपानः=यः मुक्तानां मुमुक्षूणां धर्मात्मनां च सर्वं दुःखमपानयति** ) जो भक्त, मुक्त, मुमुक्षु व धर्मात्मे यांचीं सर्व दुःखें नाहींशी करतो तो "अपान किंवा भुवः"-अर्थात् परमेश्वर होय, ( **स्वः= व्यानः= अभिव्याप्य व्यानयति चेष्टयति प्राणादि सकलं जगत्** ) परमेश्वर सर्व ठिकाणीं व्याप्त होऊन सर्वांच्या हालचालीला कारणीभूत आहे म्हणूनच त्याला "स्वः किंवा व्यानः" असें म्हणतात. या प्रमाणें हे महाव्याहृतींचे अर्थ आहेत, त्यांचें मनन त्यांच्या जपाचे वेळीं करावें.

### गुरुमंत्राचा अर्थ

( **देवस्य** ) ( दीव्यति प्रकाशयति इति देवः ) सर्वांनां प्रकाश व आनंद देणाऱ्या

---

( १ ) खालीं गायत्रीमंत्राचा ओंवीबद्ध अर्थ दिला आहेः—

**त्या जगत्कर्त्या परमेश्वराचें । तें सर्वोत्कृष्ट ज्ञानतेज साचें ॥**

**मन व्हावें सुसंस्कृत आमुचें । म्हणून आम्ही चिंतितों ॥ १ ॥**

( तत् ) त्या ( सवितु–सुनोति उत्पादयति सकलं जगत् ) सर्व जग उत्पन्न करणाऱ्या परमेश्वराच्या ( वरेण्यम् ) श्रेष्ठ, सर्वोत्तम, स्वीकार करण्यास योग्य अशा ( भर्गः ) निरुपद्रव, निष्पाप, निर्गुण, शुद्ध, दोषरहित, परमार्थविज्ञानरूपी तेजाचें आम्ही (धीमहि) ध्यान करतों. त्या सर्वांतर्यामी परमेश्वराची आम्ही नित्य उपासना करतों. त्याचें ध्यान केलें असतां विज्ञानादिक बुद्धीचें बल व शारिरीक बल आमच्यांत येईल यांत शंका नाहीं. ( यः ) जो परमेश्वर ( नः ) आमच्या ( धियः ) धारणाशक्तियुक्त बुद्धीला ( प्रचोदयात् ) प्रेरणा करतो, दुष्ट मार्गापासून दूर ठेवून सन्मार्गानें जाण्यास प्रोत्साहन देतो असा तो ईश्वर दयाळू आहे. त्या सर्व श्रेष्ठ परमात्म्याचें ध्यान केलें असतां तो आपल्या शक्तीनें व कृपाकटाक्षानें आम्हांला ब्रह्मचर्य–विद्या–विज्ञान–सद्धर्म–जितेंद्रियत्व–परब्रह्मानंद इत्यादिकांची प्राप्ति करून देईल व आमच्या बुद्धीवर सुसंस्कार उत्पन्न करील. [ या साठीं सकाळीं एकाग्रस्थळीं बसून, मन, व इंद्रियें शांत व स्थिर करून, प्रतिदिवशीं याप्रमाणें परमेश्वराचें ध्यान करावें. आपली व सर्वांची उन्नति करण्याविषयीं त्याची प्रार्थना करावी कारण, तो सर्वांस मदत देण्यास तयार आहे. फक्त शुद्ध मनानें व उदार बुद्धीनें त्याची भक्ति करणारेच त्याच्यापासून लाभ करून घेतात. ]

---

" **सविता** " तो जगदुत्पादक । तैसा ऐश्वर्याचा संपादक ॥
संपूर्ण तेजांचा गोलक । वसतसे सर्वांठायीं ॥ २ ॥
" **तत्** " नाम तें परमेश्वराचें । प्रसिद्धीचें दर्शक साचें ॥
मूळ बीज तें सर्वांतर्यामीचें । संशय तेथें नसेचि ॥ ३ ॥
" **वरेण्य** " म्हणजे सर्वश्रेष्ठ । तो ईश कैसा होईल कनिष्ठ ॥
मानवापरी प्रपंचीं स्थित । किमर्थ होईल सांगपां ॥ ४ ॥
" **भर्ग** " तें ज्ञानतेज देवाचें । जें करी पापनाशन साचें ॥
त्याच्या उपासनेनें आमुचें । दुरित जळोनी जाईल ॥५ ॥
" **देव** " तो ज्ञानप्रकाशक । सर्व सुखांचा दायक ॥
सर्वव्यवहारसाधक । मोक्षदाता जो ॥ ६ ॥
" **धीमहि** " हा आरंभ ध्यानाचा । शेवट अष्टांगयोगाचा ॥
एकच समाधि शेवटींचा । साधतो तेथें ॥ ७ ॥
म्हणून पाहिजे पूर्वीं योग । यमनियमादि अष्टांग ॥
तरीच होईल ध्यान सांग । गुरुमंत्राचें ॥ ८ ॥
जो आमुच्या बुद्धीला । प्रेरून करतो सत्कर्माला ॥
त्याच्या आम्ही ध्यानाला । नित्य केलें पाहिजे ॥ ९ ॥

## समर्पण.

हे दयानिधे! तुझ्या कृपेनें जप व उपासना इत्यादि कृत्यें यथाशास्त्र पार पडून आम्हांला धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांची सिद्धि त्वरित होवो. अशी प्रार्थना केल्यावर पुढें लिहिल्याप्रमाणें नमस्कार व समर्पण हे विधि करावे.

**नमः शम्भवाय च मयोभवाय च नमः शङ्कराय च मयस्कराय च नमः शिवाय च शिवतराय च ॥ १ ॥ यजु० १६।४१॥**

( शम्भवाय नमः ) सुख हेंच ज्याचें स्वरूप आहे अशा परमेश्वराला आमचा नमस्कार असो ( मयो भवाय० ) संसारामध्येंहि उत्तम सौख्य देणाऱ्या त्या ईश्वराला नमस्कार असो. ( शङ्कराय० ) कल्याण करणाऱ्या व धर्मयुक्त कृत्यें करणाऱ्या त्या परमेश्वराला आमचा नमस्कार असो. ( मयस्कराय० ) स्वकीय भक्तांनां धर्मकृत्यें करण्याची बुद्धि देणाऱ्या परमेश्वराला माझा नमस्कार असो. ( शिवाय० ) अत्यंत मंगलस्वरूप व ( शिवतराय० ) धार्मिक मनुष्यांनां मोक्षसुख देणाऱ्या परमेश्वराला आमचा नमस्कार असो. हें आमचें कृत्य परमेश्वराला अर्पण होवो.

### संध्या ( ब्रह्मयज्ञ ) व अग्निहोत्र सायंप्रातः करण्याविषयीं प्रमाणें.

**समिधाऽग्निं दुवस्यत घृतैर्बोधयतातिथिम् ॥ आस्मिन् हव्या जुहोतन ॥ १ ॥ यजु० ३।१॥**

**अग्निं दूतं पुरो दधे हव्यवाहमुपब्रुवे । देवाँ२॥ आसादयादिह ॥ २ ॥ यजु० २२॥१७॥**

हे मनुष्यहो! वायु-औषधी-वृष्टिजल यांच्या शुद्धीसाठीं ( घृतैः ) तुपानें शुद्ध केलेल्या द्रव्यांनीं व ( समिधा ) समिधानीं ( अतिथिम् अग्निम् ) या आणलेल्या अग्नीला ( बोधयत ) प्रदीप्त करा. ( अस्मिन् ) या अग्निमध्यें ( हव्या ) हवन करण्यास योग्य अशीं ( रोगनाशक-पुष्टिकारक-सुगंधियुक्त-मिष्ट हीं चार प्रकारचीं ) द्रव्यें शुद्ध करून ( आजुहोतन ) सर्व प्रकारें हवन करा. याप्रमाणें नित्य अग्निहोत्राचें ( दुवस्यत ) आचरण करा. या कर्मापासून वायु आदिकांची शुद्धि होत असल्यामुळें परोपकारहि साधतो ॥ १ ॥ अग्निहोत्र करणारानें अशी इच्छा करावी कीं, हवन

केलेली द्रव्यें वायु, मेघमंडळ व इतर ठिकाणीं पोंचून तेथील शुद्धि व्हावी म्हणून-( अग्निम् ) या अग्नीला ( दूतम् ) भृत्य, दूत, पोंचविणारा मानून ( पुरः दधे ) मीं आपल्या संमुख ठेवतों. हा अग्नि ( हव्यवाहम् ) हवन केलेल्या द्रव्यांनां देशदेशान्तरीं नेणारा आहे, म्हणून त्याविषयींचें ज्ञान मीं दुसऱ्या जिज्ञासूंनां ( उपब्रुवे ) सांगतों.- हा अग्नि; वायु, वृष्टिजल इत्यादिकांची शुद्धि करून सर्व ठिकाणीं औषधीवनस्पतींमध्यें ( देवान् ) उत्तम दिव्य गुण ( आसादयात् ) उत्पन्न करतो. या मंत्राचा दुसरा अर्थ-हे परमेश्वरा! ( अग्निम् ) ज्ञानस्वरूप व ( दूतम् ) सत्याचा उपदेश करणाऱ्या तुला ( पुरो-दधे ) उपास्य मानून सर्वांत श्रेष्ठ समजतों. तसेंच ( हव्यवाहम् ) शुभगुणयुक्त विज्ञानरूपी हव्य-अर्थात् ज्ञान-देणारा तूं आहेस हें मी सर्वांनां ( उपब्रुवे ) सांगतों. हे परमेश्वरा! मजवर कृपा कर व ( इह ) या संसारामध्यें मला ( देवान् ) दिव्यगुण ( आसादयात् ) प्राप्त होतील असें कर. ॥ २ ॥

**सायंसायं गृहपतिर्नो अग्निः प्रातःप्रातः सौमनस्यंदाता ॥ वसोर्वसोर्वसुदान एधि वयं तेन्धानास्तन्वंपुषेम ॥ ३ ॥ प्रातः प्रातर्गृहपतिर्नो अग्निः सायं सायं सौमनस्यं दाता ॥ वसोर्वसोर्वसुदान एधीन्धानास्त्वा शतंहिमा ऋधेम ॥ २ ॥** अथर्व० १९।७ मं० ३।४॥

( नः ) आमचें ( गृहपतिः ) घर व आत्मा यांचा रक्षक असा हा ( अग्निः ) अग्नि व परमेश्वर आहे, याची ( प्रातः २ सायम् २ ) सकाळीं व सायंकाळीं जे उपासना करतात त्यांनां तो ( सौमनस्य दाता ) आरोग्य व आनंद देतो. तसेंच ( वसोः ) उत्तम उत्तम पदार्थ देतो कारण, तो ( वसुदानः ) उत्तम पदार्थ भक्तांनां देणारा आहे. हे परमेश्वरा! या प्रकारचा तूं उदार आहेस म्हणून आमच्या राज्यादिव्यवहारांमध्यें व अंतःकरणांमध्यें ( एधि ) प्राप्त हो, सहाय्य कर. भौतिक अग्नीचेंहि आमच्या व्यवहारांमध्यें आम्हांला सहाय्य प्राप्त होवो. ( वयं त्वा इन्धानाः ) हे ईश्वरा, आम्ही तुझी स्तुति करणारे आहोंत ( तन्वं पुषेम ) आमचें शरीर बलयुक्त होवो. तसेंच ( वयं त्वा इन्धानाः ) आम्ही अग्निहोत्रामध्यें अग्नीला प्रदीप्त करणारे आहोंत, म्हणून त्या अग्निहोत्राच्या योगानें वृष्टिजलादिक शुद्ध होऊन ( तन्वं पुषेम ) आमचें शरीर बलयुक्त होईल. ॥ ३ ॥ या मंत्राचाहि वरील प्रमाणेंच अर्थ आहे पण विशेष आहे तो पुढें दिला आहे:—आम्ही अग्निहोत्र व ईश्वरोपासना कर-

णारे, ( शतंहिमाः ) शंभर हेमन्तऋतु होईपर्यंत-शंभर वर्षेंपर्यंत ( ऋधेम ) उत्तम स्थितींत राहूं. शंभर वर्षेंपर्यंत आम्हांस समृद्धि प्राप्त होवो. आरंभलेल्या सर्व कार्यांत आम्हांस यश मिळो ॥ ४ ॥

**तस्माद्ब्राह्मणोऽहोरात्रस्य संयोगे सन्ध्यामुपास्ते ॥ स ज्योतिष्या ज्योतिषो दर्शनात्सोऽस्याः कालः सा सन्ध्या तत्सन्ध्यायाः सन्ध्यात्वम् ॥ षड्विंशब्रा० प्र. ४।५॥ उद्यन्तमस्तं यान्तमादित्यमभिध्यायन् कुर्वन् ब्राह्मणो विद्वान् सकलं भद्रमश्नुते ॥ तैत्तिरीय आर० प्र० २।२ ॥**

ब्रह्माची उपासना करणारानें रात्र व दिवस यांच्या संधीच्या वेळीं उपासना करावी. हाच संध्या करण्याचा काळ आहे. ॥ सूर्याचा उदय व अस्त होण्याच्या वेळीं परमेश्वराचें ध्यान करणाऱ्याला संपूर्ण सुख प्राप्त होतें.

**नतिष्ठति तु यः पूर्वां नोपास्ते यश्च पश्चिमाम् ॥ स शूद्रवद् बहिष्कार्यः सर्वस्माद्द्विजकर्मणः ॥१॥ -मनु २।१०३ ॥**

जो सकाळीं व संध्याकाळीं संध्या करीत नाहीं त्याला शूद्रवत समजावें. ब्राह्मणाचीं चिन्हें धारण करण्याचा त्याला अधिकार नाहीं. शूद्राप्रमाणें त्याणें परिचर्या करावी. यासाठीं आपली अधोगति होऊं नये म्हणून प्रत्येक द्विजानें— ब्राह्मण, क्षत्रिय वैश्य यांनीं-प्रातःकाळीं व सायंकाळीं संध्या करावी. या वर दिलेल्या वेद-ब्राह्मणें-स्मृति यांतील आधारावरुन संध्या व अग्निकार्य करणें हें प्रत्येक द्विजाचें कर्तव्य आहे असें ठरतें

## २ अग्निहोत्र.

संध्योपासन केल्यावर अग्निहोत्र करावें. अग्निहोत्रासाठीं कुंड; सोनें, चांदी, तांबें लोखंड किंवा माती यांपैकीं कोणत्याहि पदार्थाचें यथाशक्ति तयार करावें. त्याचे वरचें तोंड सोळा अंगुळें चौरस असून खालचा भाग चार अंगुळें चौरस असावा. या प्रमाणांतच कुंड तयार केलेलें असलें म्हणजे हवन सामुग्री योग्य रीतीनें जळते. तूप घालण्यासाठीं चमचा असावा. त्याची दांडी सोळा अंगुळें लांब असावी व त्याला सोयीवार तोंड असावें. तोहि सोनें, चांदी, तांबें यांचा किंवा पळसाच्या लांकडाचा असावा. एक आज्यस्थालि-तूप ठेवण्यासाठीं सोयीचें भांडें असावें पाण्याचें भांडें व चिमटा, समिधा -चंदन, पळस, आम्र, खैर, उदुंबर, रुई, इत्यादि झाडांच्या





-असाव्या. तूप ऊन्ह करून स्वच्छ गाळावें व एक शेर तुपामध्यें

एक रति कस्तूरी, एक मासा केशर खलून मिळवावें. अग्निहोत्र करण्यास शुद्ध जागेंत बसून पूर्वोक्त सामुग्री जवळ व्यवस्थेनें ठेवावी. वेदी-हवनकुंड-यामध्यें समिधा रचून अग्नि प्रदीप्त करावा, अग्नि सिद्ध करण्यास नळी किंवा पंखा उपयोगांत आणावा. खालीं दिलेल्या मंत्रांनीं एक एक आहुति घालावी. अग्निहोत्र सकाळीं व संध्याकाळीं किंवा सकाळींच एक वेळ करावें.

### हवन करण्याचे मंत्र.

सूर्यो ज्योतिर्ज्योतिः सूर्यः स्वाहा ॥ सूर्यो वर्चो ज्योतिर्वर्चः स्वाहा ॥ ज्योतिः सूर्यः सूर्यो ज्योतिः स्वाहा ॥ सजूर्देवेन सवित्रा सजूरुषसेन्द्रवत्या ॥ जुषाणः सूर्यो वेतु स्वाहा ॥ —

( ज्योतिर्ज्योतिः ) प्रकाशकांनांहि प्रकाश देणारा व ( सूर्य्यः ) चराचरांचा आत्मा व सर्वांच्या जीवनाला आधारभूत असा जो परमेश्वर-आहे, त्याची ( स्वाहा ) आज्ञा पालन करून सर्व जगतावर उपकार-करण्यासाठीं ही आहुति देतों. ॥ १ ॥ ( वर्चो ज्योतिः ) विद्या व ज्ञान यांनां देणारा, विद्वान् व ज्ञानी यांनां उपदेश करणारा असा जो सर्वांचा आत्मा सर्वांच्या अंतर्यामीं आहे त्याला ही आहुति देतों या आहुतीच्या योगानें सर्वांनां लाभ होवो. ॥ २ ॥ ( सूर्यो ज्योतिः ) जो-स्वयंप्रकाशी आहे व इतरांनां प्रकाशित करणारा आहे त्या जगताच्या ईश्वराची आज्ञा पालन व्हावी म्हणून ही आहुति देतों ॥ ३ ॥ ( देवेन ) प्रकाशमान् अशा ( सवित्रा ) सूर्य किंवा जीव यांच्या ( सजूः ) सह व ( इन्द्रवत्या ) सूर्य किंवा जीव यांच्या तेजानें युक्त असणाऱ्या ( उषसा ) मनोवृत्तींनीं ( सजूः ) युक्त असणारा व ( जुषाणः ) दयाळू असा तो ( सूर्य्यः ) सर्वात्मा परमेश्वर स्वकृपाकटाक्षानें आम्हांला ( वेतु ) विद्यादि सद्गुणांनीं युक्त करो. अशा त्या परमेश्वराच्या आज्ञेप्रमाणें ( स्वाहा ) हें हवन करीत आहें. ॥ ४ ॥ हे मंत्र प्रातःकाळीं हवन करतेवेळीं म्हणावयाचे आहेत.

अग्निर्ज्योतिर्ज्योतिरग्निः स्वाहा ॥ अग्निर्वर्चो ज्योतिर्वर्चः स्वाहा ॥ अग्निर्ज्योति-

**ज्योतिरग्निः स्वाहा ॥ सजूर्देवेन सवित्रा सजू रात्र्येन्द्रवत्या ॥ जुषाणो अग्निर्वेतु स्वाहा ॥** यजु० ३।९।१०॥

(अग्निर्ज्यो० ) जो परमेश्वर ज्ञानमय, ज्ञानदाता व प्रकाशयुक्तांनांहि-प्रकाश देणारा आहे त्याच्या आज्ञेप्रमाणें ( स्वाहा ) ही आहुति देतों. या हवनापासून सर्व भूतमात्रांवर उपकार होवो. ॥ १ ॥ ( अग्निर्व० ) त्या ज्ञानस्वरूप, अनंत विद्यांनीं युक्त, आत्मप्रकाशक व सूर्यादि गोलांनां प्रकाश देणाऱ्या परमेश्वराच्या आहुति मी समर्पण करतों. ॥ २ ॥ ३ ॥ दिव्य गुणांनीं युक्त असणाऱ्या सूर्य व जीवात्मा यांसह नेहेमीं असणारा व वायु, चंद्र व विद्युत् यांनीं युक्त असणाऱ्या रात्रीमध्येंहि नेहेमीं असणारा परमेश्वर ( जुषाणः ) आमच्यावर संतुष्ट होऊन ( वेतु ) आम्हांला विद्यायुक्त करो. ३० ॥ ४ ॥ या चार मंत्रांनीं सायंकाळीं हवन करावें.

### हवनाच्या वेळीं दोनहि वेळीं म्हणावयाचे मंत्र.

**ओम् भूरग्नये प्राणाय स्वाहा ॥ ओम्भुवर्वायवेऽपानाय स्वाहा ॥ ओम्स्वरादित्याय व्यानाय स्वाहा ॥ ओम्भूर्भुवः स्वरग्निवाय्वादित्येभ्यः प्राणापानव्यानेभ्यः स्वाहा ॥ आपोज्योतिरसोमृतं ब्रह्म भूर्भुवः स्वरों स्वाहा ॥ ओम् सर्वं वै पूर्णꣳ स्वाहा ॥**

[ या मंत्रांत आलेलीं ( भूः प्राणः ) इत्यादि नांवें परमेश्वराचीं आहेत. त्यांचा अर्थ पूर्वीं दिलेलाच आहे ] हे जगदीश! आम्हीं हें (सर्वम् ) सर्व हवनकृत्य परोपकारासाठीं करीत आहों तर तें तुझ्या कृपेनें ( पूर्णम् ) पूर्ण होवो. ( स्वाहा ) हें सर्व कर्म परमेश्वरार्पण होवो.

या प्रमाणें सकाळीं व सायंकाळीं संध्योपासन झाल्यावर हवन, वरील एकेक मंत्र म्हणून, एकेक आहुति देऊन करावें व पुढें गायत्रीमंत्राचा उच्चार करून आपल्या इच्छेप्रमाणें जास्त आहुति देणें असल्यास द्याव्या. गायत्रीमंत्राच्या शेवटीं "स्वाहा" हा शब्द घालून हवन करावें. (भू० धियोयोनः प्रचोदयात् स्वाहा. ) या प्रमाणें म्हणावें.

### अग्निहोत्रशब्दाचा अर्थ.

**अग्नये परमेश्वराय जलवायुशुद्धिकरणाय च होत्रं हवनं यस्मिन्कर्मणि क्रियते तदग्निहोत्रम् ॥**

परमेश्वरप्रीतीसाठीं व जल वायु-ओषधी-वनस्पति इत्यादिकांच्या शुद्धीसाठीं केल्या जाणाऱ्या हवनाला अग्निहोत्र असें म्हणतात. हवनीय पदार्थ सुगंधित, पुष्टि-कारक, मिष्ट, रोगनाशक, बुद्धिवर्धक, शौर्य, धैर्य, बल यांनां वाढवणारे असे असतात. त्यांच्या हवनानें जसा हवन करणाराला लाभ होतो त्याचप्रमाणें-वायु, वृष्टिजल यांची शुद्धि होऊन, अशा शुद्ध वायूमध्यें वाढलेल्या औषधी, वनस्पति, धान्यें व फळें हीं जास्त गुणांनीं युक्त होतात-यामुळें इतरांनांहि लाभ होतो. एवंच आपला व दुसऱ्यांचा नफा अग्निहोत्र केल्यानें साधतो; परोपकारबुद्धि धरल्यानें परमात्मप्रीति साधली जाते. मनुष्यमात्राला व तसेंच इतर प्राण्यांला शुद्ध वायु, स्वच्छ पाणी व पौष्टिक अन्न इतकें पाहिजे हें अग्निहोत्र केल्यानें मिळूं शकतें हें विचाराअंतीं कळण्यासारखें आहे. म्हणून अग्निहोत्र सर्वांनीं करावें.

## ( ३ ) पितृयज्ञ.

पितृयज्ञाचे दोन भेद आहेत. ( १ ) तर्पण व ( २ ) श्राद्ध. "**येन-कर्मणा विदुषो देवान् ऋषीन् पितृंश्च तर्पयन्ति सुखयन्ति तत्तर्पणम्। तथाच यत्तेषां श्रद्धया सेवनं क्रियते तच्छ्राद्धम्॥**" विद्वान्, ऋषि व पितर यांनां सुख देणें, त्यांची तृप्ति करणें हें तर्पण होय व जी त्यांची श्रद्धेनें सेवा केली जाते तें श्राद्ध होय. **पितरादिकांची सेवा व त्यांची तृप्ति ते जीवंत असतांनाच स्वतःच्या आचरणानें केली पाहिजे.** ते जीवंत असेपर्यंत त्यांनां संतुष्ट ठेवून, त्यांच्या मर्जीनुरूप आचरण करून त्यांनां समाधान होईल असें करणें हाच खरा पितृयज्ञ आहे. पितृयज्ञामध्यें सेव्यसेवकसंबंध असल्यामुळें मातापिता व इतर जीवंत असे पर्यंतच खरा पितृयज्ञ करणें शक्य आहे, म्हणून ज्यांनां शक्य असेल त्यांणीं त्यांच्या जीवंतपणीं पितृयज्ञ करण्यास विसरूं नये. मेलेल्या पितरांची खरी तृप्ति करणें शक्य नाहीं. आईबाप जिवंत असेपर्यंत त्यांस वाईट शब्दांनीं, दुराचर-णानें, मदांधपणानें, व्यसनाधीनतेनें व इतर अशाच कारणांनीं त्रास देऊन-असह्य दुःखाचे डाग त्यांच्या मनावर देऊन-ते मेल्यावर ब्राह्मणभोजनानें त्यांची तृप्ति करूं इच्छिणें हें कोणत्या प्रकारचें कृत्य आहे हें विचारी वाचकांस सांगण्याची गरज नाहीं.

### देवतर्पण.

**पुनन्तु मा देवजनाः पुनन्तु मनसा धियः॥**
**पुनन्तु विश्वा भूतानि जातवेदः पुनीहि मा॥**

यजु० १९।३९॥

( हे जातवेदः ) हे परमेश्वरा। ( मा ) मला ( पुनीहि ) पवित्र कर. तसेंच तुझ्यावर निष्ठा ठेवणारे व तुझ्या आज्ञेप्रमाणें चालणारे ( देवजनाः ) श्रेष्ठ, विद्वान् किंवा ज्ञानी लोक विद्यादानाच्या योगानें ( मा ) मला ( पुनन्तु ) पवित्र करोत. ( मनसा ) तुझ्या ठिकाणीं एकाग्र केलेल्या मनाच्या योगानें, तुझ्या ध्यानानें किंवा मननानें व तुझ्या ज्ञानाच्या योगानें ( धियः ) बुद्धि व उद्योग ( पुनन्तु ) पवित्र होवोत. (विश्वा) ( भूतानि ) या संसारांतील सर्व पदार्थमात्र तुझ्या कृपेनें ( पुनन्तु ) पवित्र होऊन सुखदायक होवोत.

**द्वयं वा इदं न तृतीयमस्ति । सत्यं चैवानृतं च सत्यमेव देवा अनृतं मनुष्या इदमहमनृतात् सत्यमुपैमि इति तन्मनुष्येभ्यो देवानुपैति ॥ सवै सत्यमेव वदेत् । एतद्ध वै देवा व्रतं चरन्ति यत्सत्यं तस्माते यशो ह भवन्ति य एवं विद्वान् सत्यं वदति ॥ शत. ब्रा० कां. १।१।१।४।५॥ विद्वाꣳसो हि देवाः ॥ शत. ब्रा० ३।७।६।१० ॥**

सत्य व असत्य या दोन कारणांमुळें मनुष्यांचे ( द्वयम् ) दोन भेद होतात. देव व मनुष्य हे ते दोन भेद होत. ( सत्यमेव० ) सत्यवचन, सत्यकर्म, सत्यविचार करणारे ते देव; त्याचप्रमाणें असत्यवचन, असत्यकर्म व असत्यविचार करणारे ते मनुष्य होत. जो ( अनृतात् ) असत्य कर्मापासून दूर होऊन (सत्यम्) सत्याजवळ जातो, सत्याचरण करतो, तो ( मनुष्येभ्यः ) असत्याचरण करणाऱ्या मनुष्यवर्गाचा त्याग करून ( देवान् उपैति ) देववर्गामध्यें गणला जातो. तसेंच जो सत्याचरण सोडून असत्याचरण करूं लागतो तो आधीं देव असला तरी मनुष्य होतो. ( सत्यं वदेत् ) म्हणून सर्वांनीं खरें बोलावें, सत्याचरण करावें व खरें असेल तेंच मानावें. जें व्रत—जो उद्योग—सत्याचा आहे तोच (देवाः चरन्ति) विद्वान्-देव-आचरतात त्याच्या योगानें ते यशस्वी लोकांमध्येंहि पूर्ण यशस्वी समजले जातात. असत्याचरणी मनुष्याची निंदा होते. ( विद्वांसो हि ) ज्ञानी मनुष्यांनांच ( देवाः ) देव असें म्हणतात.

या शतपथ ब्राह्मणांतील आधारावरून व वरील यजुर्वेदांतील मंत्रावरून सत्यनिष्ठ अशा विद्वानांची तृप्ति करणें हेंच देवतर्पण असें उघड दिसतें.

## ऋषितर्पण.

**तं यज्ञं बर्हिषि प्रौक्षन् पुरुषं जातमग्रतः ॥**

तेन॑ दे॒वा अ॑यजन्त सा॒ध्या ऋष॑यश्च॒ ये ॥ १ ॥

यजु० ३१।९

अथ यदेवानुब्रुवीत । तेन ऋषिभ्य ऋणं जायते तद्धयेभ्य एतत्करोत्यृषीणां निधिगोप इति ह्यनूचानमाहुः ॥ शत० ब्रा० १।७।२॥ अथार्षेयं प्रवृणीते ॥ ऋषिभ्यश्चैवैनमेतद्देवेभ्यश्च निवेदयत्ययं महावीर्यो यो यज्ञं प्रापदिति तस्मादार्षेयं प्रवृणीते ॥ शत० ब्रा० १।३।४।३॥

( तं यज्ञम् ) या मंत्राचा अर्थ पूर्वी ( सृष्टिविद्याविषय पृ० ८५ अं० ४ ) दिलाच आहे. ( अथ ) सर्व विद्या पूर्णपणें शिकल्यानंतर जो ( अनुब्रुवीत ) अध्यापन करतो तो ऋषि होय. ( तेन ) या अध्ययन अध्यापनरूपी कृत्याच्या योगानें ( ऋषिभ्यः ) ऋषीचें ( ऋणम् ) ऋण ( जायते ) होतें. म्हणून जो त्यांची सेवा करतो तो त्यांनां सुख देणारा समजला जातो. ( निधिगोपः ) जो सर्व विद्या शिकून अध्यापकाचें काम करतो ( तम् अनूचानम् आहुः) त्याला ऋषि असें म्हणतात. ( अथ ) विद्या शिकल्यानंतर ( आर्षेयम् ) अध्यापनकर्माचा ( प्रवृणीते ) जो स्वीकार करतो तें त्याचें ऋषिसंबंधीं कर्तव्य आहे असें समजावें. जे हें कर्म करतात त्या ऋषींनां व पूर्वोक्त देवांनां जो हितकारक पदार्थ देतो व जो त्यांची सेवा ( निवेदयति ) करतो तो ज्ञानबलानें युक्त होऊन ( महावीर्यः ) महावीर्यवान् होऊन, ( यज्ञम् ) विज्ञानरूपी यज्ञाला ( प्रापत् ) साधतो व ते अध्यापक या विद्यार्थ्याला विद्वान् करतात. जो पूर्ण ज्ञानी व जो पूर्णविद्येचें ग्रहण करतो तो ऋषि समजावा. म्हणून हें विद्याग्रहण व विद्यादानरूपी ऋषिसंबंधींचें काम सर्व मनुष्यांनीं करावें.

### ऋषयो मन्त्रद्रष्टारः ।

"वेद-मंत्रांचा साक्षात् अर्थ ज्यांनां समजला आहे, ध्यानस्थ स्थितींत ज्यांनां मंत्रांचा साक्षात्कार झाला आहे व ज्यांनीं वेदमंत्रांवर पूर्ण विचार केला आहे ते ऋषि होत." इत्यादि आधारांवरून ऋषि कोणांस म्हणावें व त्यांचें तर्पण, त्यांचें समाधान कसें करावें हें समजणार आहे.

### पितृतर्पण.

ऊर्जं॒ वह॑न्तीर॒मृतं॑ घृ॒तं पयः॑ की॒लालं॑ परि॒-

**स्रुतम् ॥ स्वधा स्थ तर्पयंत मे पितॄन् ॥**

**यजु. २।३४॥**

ईश्वर सर्वांनां आज्ञा देतो कीं, "सर्व मनुष्यांनीं पुढें लिहिल्याप्रमाणें जाणावें, बोलावें व आज्ञा करावी." ( मे ) आपले ( पितॄन् ) आईबाप, वाडवडील, आचार्य इत्यादिकांनां आपण ( तर्पयत ) तृप्त करावें, संतुष्ट करावें. ( स्वधा० ) सत्यविद्या, अढळभक्ति व आपल्या पदार्थांचेंच सेवन करणारे व्हा. कोणकोणत्या पदार्थांनीं त्यांची सेवा करावी तें पुढें लिहिलें आहे. ( ऊर्जम्० ) पराक्रम उत्पन्न करणारें, बल वाढविणारें स्वच्छ पाणी, ( घृतम् ) तूप, ( पयः ) दूध, ( कीलालम् ) सुसंस्कृत अन्न, मध वगैरे, ( परिस्रुतम् ) उत्तम पक्व झालेलीं फळें इत्यादि देऊन आपल्या पितरांची तृप्ति करावी. सर्व प्रकारें सत्यनिष्ठ होऊन मातापितरांची तृप्ति करावी. पितरांची गणना—

**सोमसदः । अग्निष्वात्ताः । बर्हिषदः । सोमपाः । हविर्भुजः । आज्यपाः । सुकालिनः । यमराजाश्चेति ।**

या पितरांच्या निरनिराळ्या संज्ञा आहेत. ( सोमसदः ) जे ( सोमे ) परमेश्वरामध्यें ( सदः ) लीन झालेले, सोमयज्ञ करणारे व जे शान्ति वगैरे सौम्य गुणांनीं युक्त असतात ते "**सोम-सद्**" समजावे. ( अग्निष्वात्ताः ) ज्यांनीं ( अग्निः ) ज्ञानवान् परमेश्वराची ( सु ) उत्तम प्रकारानें ( आत्ताः ) प्राप्ति करून घेतली आहे ते किंवा ज्यांनीं ( अग्निः ) विद्युत्, अग्नि इत्यादिकांपासून सिद्ध होणारे पदार्थ, विद्या, कला, यंत्ररचना वगैरे ( सु+आत्ताः) उत्तम प्रकारानें शिकून मिळविल्या आहेत ते "**अग्निष्वात्त**" जाणावे. ( बर्हिषदः ) जे ( बर्हिषि ) परब्रह्मामध्यें किंवा शमदमादि तपामध्यें ( सीदन्ति ) असतात किंवा रममाण होतात ते "**बर्हिषद्**" म्हणावे. ( सोमपाः ) यज्ञ करून उत्तम उत्तम सोमवल्लि वगैरे वनस्पतींचा बुद्धिवर्धक रस पिणारे व दुसऱ्यांस पिण्यास देणारे ते "**सोमप**" होत. ( हविर्भुजः ) हवननीय पवित्र पदार्थ किंवा यज्ञानें शुद्ध केलेले पदार्थच जे भक्षण करितात ते "**हविर्भुज**" जाणावे. (आज्य-पाः) जे ( आज्यम् ) तूप अथवा सारभूत ज्ञान स्वीकारून त्याच्या दानानें दुसऱ्यांचें पालन किंवा रक्षण करतात ते "**आज्यप**" पितर होत. [ "आज्य" या शब्दामध्यें "अज" हा धातू="गति-प्रेरणा-ज्ञान" या अर्थी आहे. ] ( सुकालिनः ) ईश्वराच्या सामर्थ्याचा व विद्येचा स्वीकार किंवा उपदेश करण्याला ज्यांनां उत्तम वेळ नेहेमीं असते ते, किंवा पूर्णज्ञानी असल्यामुळें ज्यांनां नेहेमीं काळ अनुकूल करतां येतो ते "**सुकालिन**" होत. ( यमराजाः ) जे ( यम० ) राज्यनियमादि व्यवस्थेनें न्याय वगैरे करण्यांत तरबेज असतात ते "**यमराज**" जाणावे. तसेंच—

**पितृपितामहप्रपितामहाः । मातृपितामहीप्रपितामह्यः । सगोत्राः सम्बन्धिनः ॥**

( पिता) उत्तम प्रकारें विद्वत्तादिक गुण धारण करणारे व दुसऱ्यांस विद्वान् करणारे, विद्या-विज्ञान हेंच ज्यांचें धन आहे असे, स्वजनांचें पालन करणारे, चोवीस वर्षेंपर्यंत ब्रह्मचर्य धारण करून ज्यांनीं विद्याभ्यास केला आहे, जे वसु या संज्ञेस धारण करीत आहेत ते व आपल्याला ज्यानें जन्म दिला आहे तो, हे सर्व पितृस्थानीं समजावे. ( पितामहः ) स्वतःचे आजोबा, किंवा ज्यांनीं चवेचाळीस वर्षें ब्रह्मचर्य धारण करून विद्याभ्यास केला आहे व "रुद्र" ही विद्येची पदवी मिळविली आहे, अर्थात् जे पाखंडी व दुष्ट लोकांनां त्यांचा पराभव करून रडवितात ते, जे पक्षपात न करणारे ते व ईश्वर यांनां पितामह ही संज्ञा आहे. ( प्रपितामहः ) अठ्ठेचाळीस वर्षांचें कडकडीत ब्रह्मचर्य पाळून विद्याध्ययन केलेले, सूर्याप्रमाणें विद्येनें प्रकाशणारे, पूर्णज्ञानी, "आदित्य ' ही विद्येची पदवी धारण करणारे तसेंच परमेश्वर व स्वतःचा पणजा यांनां प्रपितामह असें म्हणतात. याच प्रमाणें ( १ ) माता ( २ ) पितामही व ( ३ ) प्रपितामही यांविषयीं जाणावें. ( सगोत्राः ) आपल्या जवळचे नातेवाइक व ( गुर्वादि–सख्यन्ताः सम्बन्धिनः ) गुरु व श्वशुरादिसंबंधी या सर्वांची सेवा करणें योग्य आहे.

या सर्व विद्यमान पितरांनां सुख देण्यासाठीं प्रीतियुक्तअंतःकरणानें त्यांच्या इच्छेनुरूप आचरण करून जो त्यांनां संतोष दिला जातो तें "तर्पण" होय व श्रद्धेनें जी त्यांची सेवा केली जाते तें "श्राद्ध" समजावें.

"**सत्यविद्यादि ज्ञानदानेन जनान् पान्ति रक्षन्ति ते पितरः**" जे लोकांनां विद्या शिकवून त्यांनां ज्ञानी करतात व दुःखद स्थितीपासून रक्षण करतात ते पितर होत. यांविषयीं पुढील मंत्र आहेतः—

**आयन्तु नः पितरः सोम्यासोऽग्निष्वात्ताः पथिभिर्देवयानैः ॥ अस्मिन्यज्ञे स्वधया मदन्तोऽधिब्रुवन्तु तेऽवन्त्वस्मान् ॥ २ ॥**

यजु० १९।५८ ॥

जे ( सोम्यासः ) शांतस्वभावाचे, सोमवल्लीचा रस काढण्यांत कुशल, (अग्निष्वात्ताः) ऐहिक व पारमार्थिक उन्नतीसाठीं ज्यांनीं (अग्नि) ज्ञानस्वरूप परमेश्वराची ( सु– ) उत्तम प्रकारें ( आत्ताः ) प्राप्ति करून घेतली आहे असे, किंवा ऋतुपरत्वें योग्य हवन करण्यासाठीं व कलायंत्रादिकांची सिद्धि होण्यासाठीं ( अग्निःसु आत्ताः ) ज्यांनीं विद्युत्–अग्नि

–वगैरे पदार्थांची उत्तम प्रकारें सिद्धता केली आहे असे ( पितरः ) वडील, पालक किंवा ज्ञानी लोक ( नः ) आमच्या समीप ( आयन्तु ) येवोत. किंवा आम्हीही त्यांच्या जवळ नित्य जाऊं. ( देवैयानैः पथिभिः ) विद्वानांच्या मार्गानें येणाऱ्या पितरांनां पाहून अभ्युत्थान द्यावें " हे पितरः भवन्त आयन्तु " " हे ज्ञानी-पालक व पितर लोकहो! आपण यावें " असें म्हणून त्यांनां आसनादिक द्यावें. हे पितरहो, ( अस्मिन् ) या ( यज्ञे ) सत्काररूपी यज्ञामध्यें ( स्वधया ) अमृततुल्य सेवेच्या योगानें ( मदन्तः ) हर्षित झालेले ( ते ) तुम्ही ( अस्मान् अवन्तु ) आमचें रक्षण करा व ( अधिब्रुवन्तु ) आम्हांला सद्विद्येचा उपदेश करा.

**अत्रं पितरो मादयध्वं यथाभागमावृषायध्वम् ॥ अमीमदन्त पितरो यथाभागमावृषायिषत ॥ ३ ॥ नमो वः पितरो रसाय नमो वः पितरः शोषाय नमो वः पितरो जीवाय नमो वः पितरः स्वधायै नमो वः पितरो घोराय नमो वः पितरो मन्यवे नमो वः पितरः पितरो नमो वो गृहान्नः पितरो दत्त सतो वः पितरो देष्मैतद्वः पितरो वासः ॥ ४ ॥ आधत्त पितरो गर्भं कुमारं पुष्करस्रजम् । यथेह पुरुषोऽसत् ॥ ५ ॥ यजु० २ मं० ३१।३२।३३ ॥**

( पितरः ) हे पितरलोकहो! ( अत्र ) या सभेंत, घरांत किंवा पाठशालेंत, विद्येचा उपदेश करून आम्हांला ( मादयध्वम् ) आनंदयुक्त करा. ( यथाभागम् ) आपआपल्या योग्यतेप्रमाणें आम्हांकडून यथायोग्य सत्काराचा ( आवृषायध्वम् ) स्वीकार करा व या आपण आरंभलेल्या उपदेशरूपी कर्मामध्यें ( अमीमदन्त ) आनंद माना, अर्थात् उत्साहानें

( १ ) " देवांचीं यानें, विद्वानांचीं वाहनें किंवा दिव्य वाहनें " असाहि याचा अर्थ होतो.

सर्वांनां सत्याचा उपदेश करा (पितरः) हे ज्ञानी लोकहो! (यथाभागम्) यथायोग्य सत्काराला तुम्ही (आवृषायिषत) मिळवा. श्रेष्ठ आचरण करीत करीत प्रसन्न चित्तानें चहूंकडे फिरत रहा. ॥ ३ ॥ (पितरः) हे पालकलोकहो! (रसाय) सोमवल्लि इत्यादिकांचा रस काढण्याच्या विद्येसाठीं, किंवा विद्येच्या साररूप रसाचें ग्रहण तुमच्यापासून करावें म्हणून आम्ही (वः नमः) तुम्हांला नमस्कार करतों. (शोषाय) अग्नि, वायु, विद्युत् इत्यादिकांमध्यें जी शोषणरूपी शक्ति आहे तिचें तुम्हांकडून ज्ञान व्हावें म्हणून, (जीवाय) योग्य वर्तन कसें करावें, आत्मज्ञान, जीवाविषयींचें ज्ञान इत्यादि प्राप्त करून घेण्यासाठीं, (स्वधायै) मोक्ष प्राप्त करून देणारी विद्या शिकण्यासाठीं, (घोराय) आपत्कालचीं दुःखें नाश करण्याचे उपाय समजावेत म्हणून, (मन्यवे) दुष्टांवर योग्य क्रोध कसा करावा, त्यांच्या दुष्टतेचा नाश कसा करावा व दुसऱ्यांच्या क्रोधाची शांति कशी करावी हें जाणण्याकरतां, (नमो वः २) या सर्व विद्या प्राप्त होण्यासाठीं आम्ही तुम्हांला वारंवार नमन करतों; आम्हांला हें सर्व ज्ञान तुम्ही शिकवा. (हे पितरः) हे पितृलोकहो, (नः) आम्हांला (गृहान्) गृहसंबंधीं व्यवहार करण्याचें ज्ञान (दत्त) द्या. (हे पितरः) जे आमच्या अधिकारामध्यें पदार्थ (सतः) आहेत ते आम्ही (वः) तुम्हांला देऊन तुमची तृप्ति करतों व तुम्ही, ज्याच्या योगानें आम्ही कधींहि (देष्म) विद्याहीन, वीर्यक्षीण होणार नाहीं. असे आम्हांला ज्ञानी करा, (हे पितरः) (एतत् वासः) जें कांहीं आम्ही वस्त्रादिक तुम्हांस प्रीतीनें देत आहों त्याचा तुम्ही आनंदानें स्वीकार करा व संतुष्ट व्हा. ॥ ४ ॥ (हे पितरः) तुम्ही आम्हां मनुष्यांमध्यें विद्यारूपी (गर्भम्) गर्भ (आधत्त) ठेवा. अर्थात् आम्हांला विद्वान् करा. त्याचप्रमाणें (पुष्करस्रजम्) फुलांची माला धारण केल्यामुळें शोभणाऱ्या (कुमारम्) ब्रह्मचाऱ्याला (आधत्त) आश्रय द्या. (यथा) ज्याप्रमाणें (इह) या संसारामध्यें (पुरुषः) मनुष्यानें (असत्) व्हावें, ज्या प्रमाणें या संसारांत मनुष्यानें वागावें असें तुम्हांस वाटत असेल त्याप्रमाणें (फुलांच्या माळा धारण केलेल्या ब्रह्मचाऱ्यांनां) विद्यार्थ्यांनां शिक्षण द्या. ज्या योगानें मनुष्यांची विद्येमध्यें प्रगति होईल त्या रीतीचा प्रयत्न केला पाहिजे ॥ ५ ॥

**ये स॑मा॒नाः सम॑नसो जी॒वा जी॒वेषु॑ माम॒काः ॥ तेषा॒ं श्रीर्मयि॑ कल्पताम॒स्मिँ॑ल्लो॒के श॒तꣳ समाः॑ ॥ ६ ॥** यजु० १९।४६ ॥

( ये ) जे ( मामकाः ) माझे आचार्य, गुरु वगैरे ( जीवाः ) जीव धारण करणारे–जीवंत –आहेत व जे ( समनसः ) धर्म–ईश्वर–सर्व मनुष्यें यांचें हित करण्यांत तत्पर असणारे ( समानाः ) पक्षपात न करणारे, धर्म–ईश्वर–सत्यविद्या यांविषयींचा उपदेश निःपक्षपातीपणानें करणारे, ( जीवेषु ) सर्व जीवंत असणाऱ्या मनुष्य मात्रांला किंवा शिष्यांनां विद्यादानाच्या वेळीं ( समानाः ) समबुद्धीनें वागविणारे किंवा त्यांचा छळ वगैरे न करणारे असे जे विद्वान् लोक आहेत; ( तेषाम् ) त्यांच्या ( श्रीः ) सद्विद्यारूपी शोभा, ज्ञान, संपत्ति ( अस्मिन् लोके ) या भूमंडळावर ( शतं समाः ) शंभर वर्षेंपर्यंत ( मयि कल्पताम् ) माझ्यामध्यें येवोत. या पृथ्वीवर मी विद्यादिसद्गुणयुक्त होऊन शंभरवर्षें पर्यंत रहावें ॥

## उदीरतामवर उत्परास उन्मध्यमाः पितरः सोम्यासः ॥ असुं य ईयुरवृका ऋतज्ञास्तेनोऽवन्तु पितरो हवेषु ॥ ७ ॥ अङ्गिरसो नः पितरो नवग्वाअथर्वाणो भृगवः सोम्यासः ॥ तेषां वय ँसुमतौ यज्ञियानामपिभद्रे सौमनसे स्याम ॥ ८ ॥

यजु० १९ मं० ४९।५०

जे ( पितरः ) माता, पिता, गुरु, आचार्य व विद्वान् वगैरे लोक; ( उत्परासः ) उत्कृष्ट गुणयुक्त, (उन्मध्यमाः ) मध्यम गुणांनीं युक्त (सोम्यासः) सौम्य गुणांनीं युक्त (अवृकाः) ज्यांनां शत्रू नाहींत असे, ( अवर–अवन्तीति ) रक्षणकरण्यास समर्थ किंवा अत्यंत श्रेष्ठ गुण ज्यांनां नाहींत अर्थात् जे ( अ-वरः ) सामान्य गुणांनीं युक्त आहेत व ( ऋतज्ञाः ) वेदजाणणारे, ब्रह्मज्ञानी आहेत ते सर्व ( हवेषु ) युद्धादि कृत्यामध्यें, सर्वप्रकारच्या देय-ग्राह्य उद्योगांमध्यें-सर्वव्यवहारांमध्यें–( अवन्तु ) आम्हांला व्यवहार करण्याचें ज्ञान देऊन, आमचें रक्षण करोत. तसेंच ( ये ) जे दोन जन्म झाल्यामुळें ( असुम् ) श्रेष्ठ जीवनाला- आत्मोन्नतीला ( ईयुः) पोंचले आहेत किंवा ( ये असुम् ईयुः) जे जीवंत आहेत ( उदीरताम् ) त्या सर्वांनीं आम्हांला सहाय्य द्यावें व आम्ही या जीवंत असणाऱ्यांचीं यथायोग्य प्रकारानें सेवा करावी ॥ ७ ॥ जे ( अङ्गिरसः ) सर्वांगांमध्यें व्याप्त असणारा प्राण व परमेश्वर यांचा बोध करून देण्यास समर्थ आहेत ( नव–ग्वाः )

सर्व विद्यांमध्यें व कृत्यांमध्यें नवीन नवीन युक्त्या काढणारे, किंवा नवीन विद्यांना तात्काल ग्रहण करणारे (अथर्वाणः) अथर्वणवेद जाणणारे, धनुर्विद्येंत प्रवीण, शत्रूंचें निवारण करणारे, आरंभलेल्या कृत्यांत दृढनिश्चयानें स्थिर राहणारे (भृगवः) परिपक्वज्ञानानें युक्त, शुद्ध व (सोम्यासः) शांत आहेत (तेषाम्) त्या (यज्ञियानाम्) यज्ञ व सर्व प्रकारचे उत्तम व्यवहार करण्यांत कुशल अशा ज्ञानी माणसांपासून (अपि) निश्चयानें (सुमतौ) विद्याग्रहणरूपी (भद्रे) उत्तम कृत्यांत व (सौमनसे) मनाला सुसंस्कारयुक्त करण्याच्या कृत्यांत (स्याम) आम्ही नेहेमीं तत्पर रहावें. अर्थात् त्यांच्याकडून आम्ही सदुपदेशाचें ग्रहण करून धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चारहि पुरुषार्थ साधावे. ॥ ८ ॥

**ये स॑मा॒नाः सम॑नसः पि॒तरो॑ यम॒राज्ये॑ ॥ तेषां॑ लो॒कः स्व॒धा नमो॑ य॒ज्ञो दे॒वेषु॑ कल्प- ताम् ॥ ९ ॥ यजु० १९ । ४९ ॥**

(ये समानाः) जे पक्षपातरहित व (समनसः) सत्यप्रिय असे (यमराज्ये) नियमन करण्याच्या राजसभेमध्यें न्यायाधिशादिकांच्या स्थानीं नेमलेले व (पितरः) पालन करण्यांत तत्पर असे पूर्वोक्त विद्वान् लोक आहेत, (तेषाम्) त्या विद्वानांचा (लोकः) देश (स्वधा) अमृततुल्य आहे. सर्वांना न्याय मिळत असल्यामुळें तो देश आनंददायक होतो. (देवेषु) विद्वानांच्या ठिकाणीं जे (यज्ञः) यज्ञादि सर्व प्रकारचे उद्योग व राजप्रजेचे धर्म आहेत ते सर्व आमच्यामध्यें (कल्पताम्) येवोत व जे सत्यप्रिय, न्याय निःपक्षपातानें करणारे आहेत त्यांनांच आमचा (नमः) नमस्कार असो. अशा लोकांचाच सत्कार सर्वांनीं करावा. ॥ ९ ॥

**ये नः॒ पूर्वे॑ पि॒तरः॑ सो॒म्यासो॑ऽनूहि॒रे सो॑म- पी॒थं वसि॑ष्ठाः ॥ तेभि॑र्य॒मः सꣳर॒राणो ह॒वीꣳष्यु॒शन्नु॒शद्भिः॑ प्रतिका॒मम॑त्तु ॥ १० ॥ बर्हि॑षदः पितर ऊ॒त्य॑र्वागि॒मा वो॑ ह॒व्या च॑कृमा जु॒षध्व॑म् ॥ त आग॒ताव॑सा॒ शन्त॑- मे॒नाथा॑ नः॒ शंयोर॑र॒पो द॑धात ॥ ११ ॥**

**आहं पितॄन्त्सुविदत्रौं २ अवित्सि नपांतं च विक्रमणं च विष्णोः॥ बर्हिषदो ये स्वधया सुतस्य भजन्त पित्वस्त इहागमिष्ठाः॥१२।**

यजु. १९ मं. ६१ । ६१ । ६६ ॥

(ये) जे (सोम्यासः) शांत व सोमविद्या जाणणारे (वसिष्ठाः) सद्विद्यादि उत्तम गुणांमध्यें वास्तव्य करणारे–विद्येमध्येंच रममाण होणारे, ज्यांणीं (सोमपीथम्) सोमयागविद्येचें रक्षण करून (अनू-हिरे) व पूर्वी आपण स्वतः विद्या शिकून (अनू) नंतर ती सर्व विद्या दुसऱ्यांस उत्तम प्रकारें शिकविली, असे ते (नः पूर्वे पितरः) आमचे पूर्व पितर आहेत. (तेभिः) असे ते (उशद्भिः) परमेश्वरप्राप्ति व धर्मज्ञान यांचीच इच्छा करणारे; (सं-रराणः) विद्येचें दान करणाऱ्या व (यमः) ज्ञानाच्या योगानें सर्व विश्वाची उत्तम व्यवस्था–नियमन–करणाऱ्या परमेश्वराला जाणतात. परमेश्वरप्राप्तीचा मार्ग पुढें दिला आहे (हवींषि) सर्व उत्तम पदार्थ विद्या व ज्ञान (उशन्) दुसऱ्यांनां उदार बुद्धीनें देण्यापासून परमेश्वरप्राप्ति होते म्हणून सर्वांनीं औदार्य हा गुण आंगीं आणावा. अशा मनुष्याच्या–अशा उदार महात्म्याच्या (प्रतिकामम्) सर्व इच्छा (अत्तु) पूर्ण होतात. असा धर्मात्मा सर्व मनकामना पूर्ण झाल्यामुळें सुखी होतो. ॥ १० ॥ (बर्हिषदः) परब्रह्म व विद्या यांत तल्लीन झालेले (पितरः) पालक व विद्वान् लोक (शन्तमेन) अतीशय कल्याण व (अवसा) रक्षण करण्याच्या बुद्धीनें (आगत) आमच्या समीप येवोत. ते आले असतां त्यांनां असें म्हणावें कीं "हे विद्वान् हो! (अर्वाक्) तुम्ही आल्यानंतर (इमा) हे (हव्या) शुद्ध व उत्तम ग्रहण करण्यास योग्य असे पदार्थ (वः) तुमच्यासाठीं आणले आहेत. तर त्यांचे (जुषध्वम्) तुम्ही प्रीतीनें सेवन करा (हे पितरः) (ऊत्या) तुम्हीं आमचें रक्षण केलें असतां, (वः) तुमची सेवा (चकृम) आम्ही करूं. (अथ) तुमची सेवा आम्ही केल्यानंतर (नः) आम्हांला (शंयोः) विज्ञानरूपी सुख (दधात) द्या व अविद्यारूपी दुःखमूलक पाप नाहींसें करून (अरपः) आम्हांला निष्पाप करा; ज्याच्या योगानें आम्ही निर्दोष होऊन सुखी होऊं. ॥ ११ ॥ (आहम्) मी जाणतों कीं, (पितॄन्) पितर हे (सुविदत्राम्) उत्तम विद्या जाणणारे व उत्तम ज्ञानाचा उपदेश करणारे आहेत. (ये) जे (बर्हि-षदः) ज्ञानी लोक (स्वधया) अन्नाबरोबर (सुतस्य) सोमवल्लि वगैरे वनस्पतींपासून काढलेल्या रसांचें (भजन्ते) प्राशन करतात, ते (पित्वः) तें बुद्धिवर्धक सोमरसाचें पान केल्यावर (इह) या ठिकाणीं (आगमिष्ठाः) येवोत. जे असे आहेत त्यांनां ज्ञानाचा उपदेश करणारे असें (आ-अवित्सि) ताबडतोब

मीं समजतों किंवा असें तुम्ही-समजा. अशा उपदेशकांजवळ जाऊन ( विष्णोः) सर्व-व्यापक परमेश्वराची, ( वि-क्रमणम् ) विविध प्रकारची जगाची रचना व ( न-पातम् ) ज्या ठिकाणाचा नाश होत नाहीं असें मोक्षस्थान यांचें ज्ञान तुम्ही मिळवा किंवा आम्ही मिळवूं या. सर्व सुखें ज्ञानापासून मिळतात व ज्ञान विद्वानांकडूनच मिळूं शकते म्हणून सर्वांनीं विद्वानांची संगति धरावी ॥ १२ ॥

उप॑हूताः पि॒तर॑: सो॒म्यासो॑ बर्हि॒ष्येषु नि॒धिषु॑ प्रि॒येषु॑ ॥ त आग॑मन्तु त इ॒ह श्रु॑व॒न्त्वधि॑ ब्रुवन्तु॒ ते॒ऽवन्त्व॒स्मान् ॥ १३ ॥ अग्नि॑ष्वात्ताः पितर॒ एह ग॑च्छत॒ सद॑:सदः सदतसुप्रणी-तयः ॥ अ॒त्ता ह॒वीꣳषि॒ प्रय॑तानि ब॒र्हि-ष्यथा॑ र॒यिꣳ सर्व॑वीरं दधातन ॥ १४ ॥ ये अ॑ग्निष्वा॒त्ता ये अन॑ग्निष्वात्ता॒ मध्ये॑ दि॒वः स्व॒धया॑ मा॒दय॑न्ते ॥ तेभ्य॑: स्व॒राडसु॑नीति-मे॒तां यथा व॒शन्त॒न्वं॑ कल्पयाति ॥ १५ ॥

—यजु० अ० १९ मं० ५७।५९।६० ॥

( उपहूताः ) आमंत्रण दिलेले ( सोम्यासः ) शांत व माननीय असे पितर ( बर्हि-ष्येषु निधिषु) बहुमूल्य पदार्थांनीं बनविलेल्या व ( प्रियेषु ) सुखदायक अशा आसनावर बसून सत्काराचा स्वीकार करण्यासाठीं ) (आगमन्तु ) आम्हांजवळ वारंवार येवोत. (ते इह ) ते येथें येऊन आमचे प्रश्न ( श्रुवन्तु ) ऐकोत व त्यांचीं यथायोग्य उत्तरें ( अधि ब्रुवन्तु ) आम्हांला देवोत. याप्रमाणें आम्हांला ज्ञान देऊन ते ( अस्मान् ) आमचें ( अवन्तु ) रक्षण करोत ॥ १३ ॥ ( अग्नि—सु—आत्ताः ) ज्ञानमय परमेश्व-राची ज्यांणीं उत्तम रीतीनें प्राप्ति करून घेतली आहे असे ( पितरः ) आमचे पितर ( एह गच्छत ) इथें आमच्या जवळ येवोत. ( सु—प्र-नीतयः ) ज्यांची नीति व आचरण उत्तम आहे असे ते ( सदः सदः ) या सभेंतून त्या सभेमध्यें व्याख्यानें देण्या-साठीं किंवा उपदेश करण्यासाठीं ( सदत ) जाऊन बसोत. ( हवींषि ) स्वीकाराई

उत्तम अन्नाचें ( अत्त ) भक्षण करोत. ( अथ ) नंतर ( बर्हिषि ) सभा किंवा अन्य-गृह यांमध्यें राहून त्यांणीं आम्हांला ( रयिम् ) धनप्राप्ति होईल व ( सर्व वीरम् ) आम-च्यांत शूर पुरुष निपजतील असें ( दधातन ) करावें. आमच्यामध्यें, बुद्धि, शरीर इत्यादि प्रकारच्या बलानें युक्त असणारे वीर उत्पन्न होऊन, ज्ञान व संपत्ति यांचे खजिने भरले जावे ॥ १४ ॥ ( ये ) जे ( अग्नि- सु-आत्ताः ) अग्नि, विद्युत् या तत्वांनां आपल्या स्वाधीन ठेवणारे व ( अनू-अग्नि-आत्ताः ) अग्नितत्वाहून इतर वायु, जल, भू इत्यादि तत्वांच्या ज्ञानांत प्रवीण असलेले, ( दिवः मध्ये ) सर्व प्रकाशक परमेश्वरामध्यें लीन होणारे, ( स्वधया ) अन्नानें शरीर व बुद्धि यांचें बल धारण करून ( मादयन्ते ) स्वतः आनंदित होतात व दुसऱ्यांनांहि आनंदित करतात. ( तेभ्यः ) अशा विद्वानांक-डून आम्हीं ( एताम् ) या ( असु-नीतिम् ) आयुष्यांतील नीतीचें, आयुष्य असे पर्यंत कसें वागावें याचें अध्ययन करूं व ( यथा वशम् ) ते व आम्हीं विद्वान होऊन सर्वांवर उपकार करण्याच्या कामांत व नियमांत स्वतंत्रतापूर्वक व स्वार्थाच्या कृत्यांत परतंत्र रीतीनें वर्तन ठेवून सर्वांचें सुख वाढवूं. अशा रीतीनें आम्हीं आमचें वर्तन योग्य ठेवलें असतां ( स्वराट् ) स्वयंप्रकाशी परमेश्वर आम्हांला ( तन्वम् ) योग्य शरीर ( कल्पयाति ) देईल. ज्याच्या योगानें आमच्यांत वारंवार विद्वान् होतील. ॥ १५ ॥

अ॒ग्नि॒ष्वा॒त्तानृ॑तु॒मतो॑ हवामहे नाराश॒ꣳसे सो॑-
मपी॒थं य आ॒शुः ॥ ते नो॒ विप्रा॑सः सु॒हवा॑
भवन्तु व॒यꣳस्या॑म॒ पत॑यो र॒यी॒णाम् ॥ १६ ॥
ये चे॒ह पि॒तरो॒ ये च॒ नेह यां॑श्च॒ वि॒द्म याँ॑
उं च॒ न प्र॑वि॒द्म ॥ त्वं वे॑त्थ॒ यति॒ ते जा॑त-
वेदः स्व॒धाभि॑र्य॒ज्ञꣳसु॒कृ॑तं जु॒षस्व ॥ १७ ॥
इ॒दं पि॒तृभ्यो॒ नमो॑ अस्त्व॒द्य ये पूर्वा॑सो॒ य
उप॑रास ई॒युः ॥ ये पार्थि॑वे॒ रज॒स्या नि-
ष॑त्ता॒ ये वा॑ नू॒नꣳसु॑वृ॒जना॑सु वि॒क्षु ॥ १८ ॥
—यजु॰ १९ मं॰ ६१।६७।६८ ॥

( ऋतु-मतः ) ऋतूंसंबंधीची विद्या जाणणारे असे, ( अग्नि-सु-आत्ताः ) विद्युत्, अग्नि वगैरे भौतिक पदार्थसंबंधी सर्व विद्या व परमेश्वरसंबंधीं ज्ञान हें ज्यांणीं पुरें मिळविलें आहे असे जे आहेत त्यांनां ( हवामहे ) आम्ही बोलावतों. तुम्हीहि त्यांनां नेहेमीं बोलावून त्यांची सेवा करावी. ( ये ) जे ( सोमपीथम् ) सोमरसप्राशन ( आशुः ) करतात व जे ( नाराशंसे ) मनुष्यांनीं प्रशस्त किंवा प्रशंसनीय मानलेल्या कर्मांमध्यें निपुण, ( ते विप्रासः ) ते विद्वान् लोक ( नः ) आम्हांला ( सुहवा भवन्तु ) उत्तम रीतीनें विद्यादान देणारे होवोत. या विद्वानांच्या मदतीनें ( वयम् ) आम्हीं ( रयीणाम् ) संपत्ति, चक्रवर्तिराज्यलक्ष्मी, विद्याधन इत्यादि संपत्तींचे ( पतयः ) स्वामी व पालक ( स्याम ) होऊं अशी इच्छा धरावी. ॥ १६ ॥ ( ये च ) जे ( इह ) या ठिकाणीं आमच्याजवळ ( पितरः ) पूर्वोक्त पितर आहेत व जे ( ये च न इह ) या ठिकाणीं नाहींत अर्थात देशान्तरीं आहेत ( यान् ) ज्यांनां आम्ही ( विद्म ) ओळखतों व ( यान् ) ज्यांनां ते दूर देशांतरीं असल्यामुळें आम्ही ( न प्रविद्म ) चांगल्या रीतीनें ओळखत नाहीं, त्या सर्वांनां ( हे जात-वेदः ) हे परमात्मन्, ( त्वम् ) तूं ( वेत्थ ) जाणतोस. म्हणून त्यांची व आमची मैत्री होऊन त्यांच्यापासून आम्हांला ज्ञानलाभ होईल असें कर. तसेंच हे ईश्वरा! आम्ही ( सुकृतम् ) चांगल्या रीतीनें केलेल्या व ( स्वधाभिः ) अन्नादि सामुग्रीनें सुसंपादित अशा ( यज्ञम् ) यज्ञाचें ( जुषस्व ) सेवन कर कीं, ज्याच्या योगानें आमचीं कर्में उत्तम रीतीनें पार पडून आम्हांला ऐहिक व पारलौकिक सुख मिळेल. ( यति ते ) जितके ते अन्य ठिकाणीं विद्वान् आहेत त्या सर्वांच्या दर्शनाचा लाभ आम्हांला होईल असें कर. ॥ १७ ॥ जे पितर ( अद्य ) आज या ठिकाणीं विद्यमान आहेत व जे पूर्वोक्त अध्यापनादि कर्में करीत आहेत ( ये पूर्वासः ) जे पूर्वींच विद्वान् झाले आहेत, ( ये ) जे ( पार्थिवे रजसि ) पृथिवीसंबंधानें परमाणूरचनाविद्या किंवा भूगर्भविद्या यांमध्यें ( आनिषत्ताः ) उत्तमप्रकारानें निमग्न झालेले व जे ( सुवृजनासु विक्षु ) प्रजेनें निर्माण केलेल्या राजसभेमध्यें आपआपलीं न्यायाचीं कृत्यें करण्यांत ( आनिषत्ताः ) गढून गेलेले असे जे पितर आहेत ते सर्व आम्हांजवळ ( ईयुः ) येवोत. त्या सर्वांनां आमचा ( नमः ) नमस्कार असो. ॥ १८ ॥

**उशन्तस्त्वा निधीमह्युशन्तः समिधीमहि ॥**
**उशन्नुशत आवह पितॄन् हविषे अत्तवे ॥ १९ ॥**

यजु. १९ । ७० ॥

( १ ) ज्याच्यापासून वेद झालेले आहेत तो " जातवेद " होय.

हे परमेश्वरा! ( उशन्तः त्वा ) तुझ्या प्राप्तीची इच्छा करणारे आम्हीं, तूं इष्ट देव आहेस म्हणून आमच्या हृदयाकाशामध्यें तुला ( निधीमहि ) ठेवतों. तसेंच ( उशन्तः ) तुझ्या गुणांनां वश झालेले आम्ही तुझ्या गुणांचें कीर्तन ऐकून व लोकांनां सांगून ( समिधीमहि ) तुझा महिमा सर्वांनां विदित करूं. ( हविषे ) सद्विद्या, धन, अन्न आदि उत्तम पदार्थ व तज्जन्य सुख यांचा ( अत्तवे ) उपभोग मिळावा म्हणून ( पितॄन् ) सत्यविद्येचा उपदेश करणाऱ्या विद्वान्, पालक व वडील यांची प्राप्ति ( आवह ) करून दे. ( उशन्नुशत ) यासाठीं आम्ही तुझी भक्ति करीत आहों, तुझ्या आज्ञेचें उल्लंघन करीत नाहीं, तुला आम्हीं किंवा तूं आम्हांला वश व्हावें अशी आम्हीं इच्छा करीत आहों. ॥ १९ ॥

**पितृभ्यः स्वधायिभ्यः स्वधा नमः ॥ पितामहेभ्यः स्वधायिभ्यः स्वधा नमः ॥ प्रपितामहेभ्यः स्वधायिभ्यः स्वधा नमः ॥ अक्षन् पितरोऽमीमदन्त पितरोऽतीतृपन्त पितरः पितरः शुन्धध्वम् ॥ २० ॥ पुनन्तु मा पितरः सोम्यासः पुनन्तु मा पितामहाः। पुनन्तु प्रपितामहाः पवित्रेण शतायुषा ॥ पुनन्तु मा पितामहाः पुनन्तु प्रपिता महाः । पवित्रेण शतायुषा विश्वमायुर्व्यश्नवै ॥ २१ ॥** यजु० १९ मं० ३६।३७ ॥

( स्वधायिभ्यः ) अमृतरूपी मोक्षविद्या मिळविण्याचा ज्यांचा स्वभाव आहे, चोविस वर्षें ब्रह्मचर्य धारण केल्यामुळें ज्यांनां "वसु" हें नांव प्राप्त झालें आहे, व विद्यादान करणारे असे ( पितृभ्यः ) आपले जनक या सर्वांनां ( स्वधा ) अन्नादिक उत्तम पदार्थ नमनपूर्वक अर्पण करतों. ( पितामहेभ्यः ) चवेचाळीस वर्षें ब्रह्मचर्य धारण केल्यामुळें ज्यांनां "रुद्र" ही संज्ञा प्राप्त झालेली आहे अशा स्वपितामहांनां व विद्यादान करणाऱ्यांनां अन्नादिक उत्तम पदार्थ भक्तिपुरःसर अर्पण करतों. त्याचप्रमाणें

अठ्ठेचाळीस वर्षें ब्रह्मचर्य धारण केल्यामुळें ज्यांनां "आदित्य" ही संज्ञा प्राप्त झाली आहे व विद्येमध्यें जे पूर्ण होऊन निरपेक्ष रीतीनें अध्यापन करीत आहेत त्या (प्रपितामहेभ्यः ) प्रपितामहसंज्ञकांनां आम्हीं प्रीतिपुरःसर अन्नादिक उत्तम पदार्थ अर्पण करतों. या सर्वीनां आमचा नमस्कार असो. ( हे पितरः ) तुम्ही सर्व ( अक्षन् ) भोजनादिक येथेंच करा. ( अमीमदन्त ) आम्ही दिलेल्या पदार्थांनीं आनंद माना व ( अतीतृपन्त ) तृप्त व्हा. आम्हांला विद्या व ज्ञान देऊन आमच्यांतील अविद्या-मत्सरादि दोष नाहींसे करा व आम्हांला ( शुन्धध्वम् ) पवित्र करा. ॥ २० ॥ ( हे पितरः पितामहाः प्रपितामहाः ) हे सर्व पितर हो ! ( मा ) मला ( पुनन्तु ) पवित्र करा. मन, कर्म व वाणी यांच्या द्वारानें माझें वर्तन शुद्ध राहील असें शिक्षण मला द्या. ( पवित्रेण ) ज्यामध्यें पवित्र कृत्यें केलीं जातील अशा ( शतायुषा ) शंभर वर्षांचें पूर्णायुष्य मला प्राप्त होवो व त्याच्या प्राप्तीसाठीं ब्रह्मचर्यादिक पूर्व कर्में माझ्याकडून उत्तम रीतीनें पार पडोत. ज्याच्या योगानें मला ( विश्वमूआयुः ) पूर्ण आयुष्य ( व्यश्नवै ) प्राप्त होईल. [ पूर्व मंत्रांतील "वसु-रुद्र-आदित्य" या संज्ञा विद्वानांनां ब्रह्मचर्य परिपालनानें व विद्येमध्यें मिळविलेल्या प्राविण्यानें प्राप्त होतात असें छांदोग्य उपनिषदामध्यें "पुरुषो वाव यज्ञः ।" या प्रकरणांत सांगितलें आहे. ] ॥ २१ ॥

**वसून् वदन्ति वै पितॄन् रुद्रांश्चैव पितामहान् ॥ प्रपितामहांश्चादित्यान् श्रुतिरेषा सनातनी ॥१ ॥**

मनु. ३ । २८४ ॥

पिता, पितामह व प्रपितामह यांनां अनुक्रमें वसु, रुद्र व आदित्य या संज्ञा आहेत. इ०

### ४ बलि वैश्वदेव.

क्षार किंवा मीठ न घातलेलें व परिपक्व अशा अन्नानेंच वैश्वदेव करावा. वैश्वदेवाविषयीं मनुस्मृतींत पुढील श्लोक आहे—

**वैश्वदेवस्य सिद्धस्य गृह्येऽग्नौ विधिपूर्वकम् ॥ आभ्यः कुर्याद्देवताभ्यो ब्राह्मणो होममन्वहम् ॥ १ ॥**

मनु. ३ । ८४

" द्विजांनीं प्रतिदिवशीं गृह्य अग्नीमध्यें विधिपूर्वक वैश्वदेव करावा. " तसेंच:—

**अह॑रहर्ब॒लिमित्ते॒ हर॒न्तोऽश्वा॑येव॒ तिष्ठ॑ते घा॒सम॑ग्ने ॥ रा॒यस्पोषे॑ण॒ समि॒षा मद॑न्तो॒ मा**

**ते अग्ने प्रतिवेशा रिषाम ॥ १ ॥ अथर्व. १९।७।७॥**

**पुनन्तु मा देवजनाः पुनन्तु मनसा धियः ॥ पुनन्तु विश्वा भूतानि जातवेदः पुनीहि मा स्वाहा ॥ २ ॥ यजु. १९ । ३९ ॥**

( अग्ने ) हे ज्ञानस्वरूप परमेश्वर ! ( ते इत् ) तुझ्यासाठींच, तुझ्या आज्ञेच्या पालनासाठींच ( तिष्ठते अश्वाय ) घोड्याच्या पुढें ( घासम् ) ज्याप्रमाणें चारा व इतर खाण्याचे पदार्थ घालतात त्या प्रमाणेंच ( अहःअहः ) प्रतिदिवशीं अग्नि, अतिथि व प्राणिमात्र यांनां ( बलिम् ) अन्न ( हरन्तः ) आम्हीं देतों हें कृत्य आम्हीं ( समिषा ) सद्बुद्धीनें व श्रद्धेनें करतों म्हणून आम्हांला ( रायः-पोषेण ) चक्रवर्तिराज्यलक्ष्मी व इतर उन्नति ह्या प्राप्त होऊन ( मदन्तः ) आम्हीं आनंदित होऊं (अग्ने) हे परमात्मन्, ( ते ) तुझ्याशीं ( प्रति-वेशाः ) प्रतिकूलतेनें वागून इतर कोणत्याहि प्राण्यांनां आम्हीं ( मा रिषाम ) पीडा देणार नाहीं. इतरांनां दुःख दिलें कीं तुझ्या आज्ञेच्या विरुद्ध वागल्याप्रमाणें होणार म्हणून आम्हीं कोणालाहि दुःख देणार नाहीं. सर्वांशीं मित्रत्वाच्या नात्यानें वागून सर्वांवर नित्य उपकारच करीत राहूं. ॥ १ ॥ ( पुनन्तु मा० ) या मंत्राचा अर्थ पितृयज्ञांतील देवतर्पणाच्या वेळीं सांगितला आहे.

**ओम् अग्नये स्वाहा ॥ ओं सोमाय स्वाहा ॥ ओम् अग्नीषोमाभ्यां स्वाहा ॥ ओं विश्वेभ्यो देवेभ्यः स्वाहा ॥ ओं धन्वन्तरये स्वाहा ॥ ओं कुह्वै स्वाहा ॥ ओम् अनुमत्यै स्वाहा ॥ ओं प्रजापतये स्वाहा ॥ ओं सह द्यावापृथिवीभ्यां स्वाहा ॥ ओं स्विष्टकृते स्वाहा ॥**

( अग्निः ) ज्ञानमय व सर्वांनीं प्राप्त करून घेण्यास योग्य, ( सोमः ) सर्वांनां आनंद देणारा, सर्व जग उत्पन्न करणारा, ( अग्नीषोमौ ) सर्व प्राण्यांच्या जीवनाचा हेतु व दुःख निवारण करणारा, ( विश्वे देवाः ) परमेश्वराचे सर्व गुण किंवा विद्वान् लोक, ( धन्वन्तरिः ) जन्ममरणादि रोगांचा नाश करणारा, (कुहूः चितिशक्ति, अमावास्येष्टिप्रतिपादित, दर्शेष्टि ( अनुमती ) ज्ञानप्राप्तीनंतर जीविषयीं मनन करतां येतें ती चिच्छक्ति, पौर्णमासेष्टि,-( प्रजापतिः ) सर्वरक्षक, (सहद्यावापृथिवी.) ज्या परमेश्वरानें विशिष्टगुणांनीं युक्त असणारी अग्नि व भूमि उत्पन्न केली, ज्यांच्यायोगानें सर्व प्रकारें

आम्हांला सहाय्य होत आहे, ( स्विष्टकृते ) उत्तम व इष्ट सुख देणारा, हे सर्व शब्द परमेश्वराचे वाचक आहेत. त्या त्या शब्दांवरून ध्वनित होणारे ते ते गुण ध्यानांत आणून ( ते मन्त्र म्हणून ) होम व बलिप्रदान करावें.

**ओं सानुगायेन्द्राय नमः ॥ १ ॥ ओं सानुगाय यमाय नमः ॥ २ ॥ ओं सानुगाय वरुणाय नमः ॥ ३ ॥ ओं सानुगाय सोमाय नमः ॥ ४ ॥ ओं मरुद्भ्यो नमः ॥ ५ ॥ ओम् अद्भ्यो नमः ॥ ६ ॥ ओं वनस्पतिभ्यो नमः ॥ ७ ॥ ओं श्रियै नमः ॥ ८ ॥ ओं भद्रकाल्यै नमः ॥ ९ ॥ ओं ब्रह्मपतये नमः ॥ १० ॥ ओं वास्तुपतये नमः ॥ ११ ॥ ओं विश्वेभ्यो देवेभ्यो नमः ॥ १२ ॥ ओं दिवाचारिभ्यो भूतेभ्यो नमः ॥ १३ ॥ ओं नक्तंचारिभ्यो नमः ॥ १४ ॥ ओं सर्वात्मभूतये नमः ॥ १५ ॥ ओं पितृभ्यः स्वधायिभ्यः स्वधा नमः ॥ १६ ॥ इति नित्यश्राद्धम् ॥**

( सानुगाय इन्द्राय ) शाश्वत सद्गुणांनीं युक्त व परम ऐश्वर्यवान् परमेश्वर, ( यमा० ) नियमन करणारा, न्यायकारी, पक्षपातरहित, ( वरुणा० ) विद्यायुक्तम गुणविशिष्ट, सर्वोत्तम, सर्वांचा इष्टदेव, ( सोमा० ) शांतियुक्त, आनंदकारक, ( मरुत्० ) सर्व विश्वांतील व्यापार करणारा, ( अद्भ्यः ) सर्वांनीं प्राप्त करून घेण्यास योग्य, ( वनस्पति० ) वन किंवा लोक यांचा पति, ( श्रियै० ) सर्वांनीं सेवा करण्यास योग्य, सर्व शोभांनीं युक्त, ( भद्रकाल्यै० ) सर्वांनां सुख देणारा, ( ब्रह्म० ) वेद, ज्ञान, ब्रह्माण्ड यांचा स्वामी व पालक, ( वास्तुपतिः ) आकाशांतील सर्व भूतांचा पालक, ( विश्वेभ्यो देवे० ) सर्व दिव्यगुणांनीं युक्त, विश्वव्यापक, ( दिवाचारि० नक्तंचारि० ) रात्र व दिवस यामध्यें व्यवहार करणाऱ्या भूतांनां आधारभूत, ( सर्वात्मभूत० ) सर्वांच्या आत्म्यांचा आधार, इत्यादि विशेषणांनीं युक्त असणारा जो सच्चिदानंद परमात्मा आहे त्याला ( नमः ) आमचा भक्ति व श्रद्धापूर्वक प्रणाम असो. " नमः " शब्दाचा अर्थ " अभिमानरहित होणें व सत्य मान्य करणें " असा आहे. नमन हें केवळ हातांनीं करावयाचें नसून मनोवृत्ति अभिमानरहित झाल्या पाहिजेत हें विसरतां नये. [ या मंत्रांतील " वनस्पति " शब्दानें औषधीपालन व औषधीशास्त्र यांचा बोध होतो व पूर्वीच्या मंत्रांतील "द्यावापृथिवी" या शब्दानें " अग्नि, विद्युत् व पृथिवी " या संबंधाचीं सर्व शास्त्रें यांचा बोध होतो. ]

**शुनां च पतितानां च श्वपचां पापरोगिणाम् ॥**
**वायसानां कृमीणां च शनकैर्निर्वपेद्भुवि ॥ १ ॥**

कुत्रे, कावळे, कृमि, ( कीटपतंग, मुंग्या, ) पतित व दुष्टरोगानें पीडलेले या सर्वांना अन्न मिळावें म्हणून सहा निरनिराळे भाग करून अन्नदान करावें सर्व भूतमात्रांना आनंद प्राप्त व्हावा हा वैश्वदेवयज्ञाचा उद्देश आहे. तो ज्या रीतीनें साध्य होईल त्या रीतीनें गृहस्थ लोकांनीं वागावें.

### ५ अतिथियज्ञ, नरयज्ञ.

अतिथींची सेवा करणें, त्यांना तृप्त करणें हाच अतिथियज्ञ, मनुष्ययज्ञ, नरयज्ञ किंवा नृयज्ञ समजावा. जे पूर्ण विद्वान्, परोपकारी, जितेन्द्रिय, धार्मिक, सत्यवादी छलादिदोषरहित, हिंसारहित व परोपकारासाठीं किंवा उपदेश करण्यासाठीं देश देशांतरीं, ग्रामग्रामान्तरीं भ्रमण करणारे मनुष्य असतात तेच अतिथि होत. याहून अन्य तऱ्हेनें येणाऱ्या माणसांना अतिथि ही संज्ञा नाहीं. या यज्ञाविषयीं वेदांमध्यें पुष्कळच मंत्र आहेत पण विस्तारभयास्तव येथें फक्त दोनच देतों:—

**तद्यस्यैवं विद्वान् व्रात्योऽतिथिर्गृहानागच्छे-त् ॥ १ ॥ स्वयमेनमभ्युदेत्य ब्रूयाद् व्रात्य क्वाऽवात्सीर्व्रात्योदकं व्रात्य तर्पयन्तु व्रात्य यथा ते प्रियं तथास्तु व्रात्य यथा ते व-शस्तथास्तु व्रात्य यथा ते निकामस्तथा स्त्विति ॥ २ ॥** अथर्व० १५।२।११ मं० १।२ ॥

या पूर्वोक्त विशेषणांनीं युक्त ( एवं विद्वान् ) असा विद्वान्, ( व्रात्यः ) व्रत धारण करणारा, उत्तम गुणांनीं युक्त असा पुरुष ( अतिथिः ) ज्याच्या गमनागमनाची तिथि नियत नसते तो "अ-तिथि" होय. असा-अतिथि (यस्य गृहान्) ज्याच्या घरीं (आगच्छेत् ) येईल, ॥ १ ॥ असा विद्वान् व परोपकारशील अतिथि ज्यावेळीं गृहस्थी लोकांच्या घरीं येईल त्या वेळीं त्या गृहस्थानें ( स्वयम् ) स्वतः ( एनम् ) त्या अतिथीला ( अभ्युदेत्य ) सामोरें जाऊन, नमस्कार करून, प्रेमानें नमस्कार करून उत्तम आसनावर बसवावें व नंतर योग्य सेवा केल्यावर ( ब्रूयात् ) पुढें लिहिल्याप्रमाणें त्याला प्रश्न विचारावे. ( व्रात्य ) हे परोपकाराचें व्रत धारणकरणाऱ्या पुरुष-

पुरुषा! ( क वात्सीः ) आपल वास्तव्य कुठें होतें? ( व्रात्य! ) हे सज्जना! ( उदकम् ) हें उत्तम पाणी आपल्यासाठीं आणलें आहे. ( व्रात्य ) हे विद्वद्वर्य ! ज्याप्रमाणें ज्ञानामृत पाजून आपण आम्हांला आनंदित करतां त्याचप्रमाणें हीं आमचीं माणसें आपली सेवा करून आपली ( तर्पयन्तु ) तृप्ति करोत. ( यथा ) जें कांहीं ( ते ) तुम्हांला ( प्रियम् ) आवडतें तें सर्व ( तथास्तु ) आम्हीं तुमच्यासाठीं करतों. ( यथा ते वशः ) जसें तुम्हांला अनुकूल पाहिजे असेल तसें आम्हीं करूं. ( यथा ते निकामः ) जी कांहीं तुमची इच्छा असेल ती सर्व ( तथा अस्तु ) पूर्ण करण्यास आम्हीं यथाशक्ति तयार आहोंत. आम्ही तुमची सेवा करून तुम्हांला आनंद देतों व तुम्हीं ज्ञानाचा उपदेश करून आम्हांला सुख द्या. याप्रमाणें आचरण करून दोघेहि सुखी होऊं. ॥
[ याप्रमाणें पंचमहायज्ञ व त्यांचे उद्देश आहेत. ]

---

## ग्रंथ-प्रामाण्य.

आजपर्यंत निःपक्षपाती, रागद्वेषरहित, धार्मिक, सदाचारी, सर्वांवर उपकार करणारे, आर्य, विद्वान् व महात्मे यांनीं जे जे ग्रंथ स्वतः प्रमाण मानले व जे जे परतः प्रमाण मानले त्यांविषयींची माहिती पुढें दिली आहे. परमेश्वरप्रणीत ग्रंथ स्वतःप्रमाण व मनुष्यप्रणीत ग्रंथ परतःप्रमाण होत. परमेश्वर सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् व भ्रमादिदोषरहित असल्यामुळें त्यानें सांगितलेले चारहि वेद स्वतःप्रमाण आहेत. त्यांच्या प्रामाण्याविषयीं दुसऱ्या कोणत्याहि प्रमाणाची आवश्यकता नाहीं. सूर्याचें अस्तित्व सिद्ध करण्यास ज्याप्रमाणें इतर प्रकाशांची गरज पडत नाहीं त्याचप्रमाणें वेदांचें प्रामाण्य सिद्ध करण्यास वेदच पुरे आहेत. इतर ग्रंथ आधुनिक असल्यामुळें त्यांवरून वेदांचें प्रामाण्य ठरविणें चुकीचें आहे. जे ग्रंथ वेदांच्या विरुद्ध आहेत-वेदांतील ज्ञानाच्या विरुद्ध मजकूर ज्या ग्रंथांत आहे-ते सर्व ग्रंथ त्याज्य होत. वेद व अन्यग्रंथ यांचा ज्याठिकाणीं विरोध येईल त्याठिकाणीं वेदच प्रमाण समजावे; कारण, वेद हे ईश्वरप्रणीत, ज्ञानपूर्ण व स्वतःप्रमाण आहेत. ब्राह्मणग्रंथ हे वेदमंत्रांचीं व्याख्यानें होत; म्हणून ते जर वेदानुकूल असले तरच प्रमाण मानावे. ब्राह्मणग्रंथांतील व वेदांच्या अकराशें सत्तावीस शाखांतील व्याख्यानमय ग्रंथांतील जेवढा भाग वेदांला अनुकूल असेल तेवढा प्रमाण व जेवढा भाग प्रतिकूल असेल तेवढा अप्रमाण समजावा. याचप्रमाणें ( १ ) शिक्षा, ( २ ) कल्प, ( ३ ) व्याकरण, ( ४ ) निरुक्त, ( ५ ) छंद व ( ६ ) ज्योतिष हीं वेदांचीं सहा अंगें व ( १ ) आयुर्वेद -[ वैद्यशास्त्र ], ( २ ) धनुर्वेद -[ शस्त्रास्त्रराजविद्या, ( ३ )

गांधर्ववेद-[ गानविद्या ] व ( ४ ) अर्थवेद-[ शिल्पशास्त्र ] हे चार उपवेद यांविषयींहि जाणावें. चरक-सुश्रुत-निघण्टु इ० हे आयुर्वेदग्रंथ होत. धनुर्वेदाचे ग्रंथ प्रायः लुप्त झाले आहेत, तथापि शोध व प्रयत्न करणारांना तत्संबंधीं सर्व विद्या व क्रिया यांची माहिती अजूनहि होण्यासारखी आहे. अंगिरस प्रभृति ऋषींचे ग्रंथ धनुर्वेदावर पुष्कळ होते. प्रयत्न करणारांनीं इतर विद्यांच्या सिद्धीवर धनुर्वेदाची सिद्धि अवलंबून आहे हें विसरतां नये. पदार्थांचे गुणधर्म माहित झाल्यावर शस्त्रें व अस्त्रें बनविणें हें कांहीं दुःसाध्य नाहीं. गानविद्या हा गांधर्व वेद होय. अथर्ववेदावरील ग्रंथ विश्वकर्मा, त्वष्टा, मय मय इत्यादिकांनीं लिहिलेले आहेत.

( १ ) पाणिनिकृत **शिक्षा,** ( २ ) मानव कल्पसूत्र हा **कल्पग्रंथ,** ( ३ ) पाणिनिकृत अष्टाध्यायी, धातुपाठ, उणादि कोश,-प्रातिपदिक, गणपाठ व पतंजलिकृत महाभाष्य हे **व्याकरणग्रंथ,** ( ४ ) यास्काचार्यकृत निघण्टु व **निरुक्त,** ( ५ ) पिंगलाचार्यकृत **छंदःशास्त्र,** ( ६ )-वसिष्ठादि मुनिप्रणित रेखा-बीजगणित युक्त **ज्योतिषशास्त्र** हीं वेदांचीं सहा अंगें. तसेंच ( १ ) व्यासमुनिकृत भाष्यसहित-जैमिनीमुनिप्रणित **पूर्वमीमांसा.** यामध्यें संपूर्ण कर्मकांड, धर्म व धर्मि यांची व्याख्या आहे. ( २ ) प्रशस्तपाद-कृत-भाष्य-सहित कणादमुनिकृत **वैशेषिक दर्शन.** यांत धर्म व धर्मि यांविषयींचें प्रतिपादन विशेष केलेलें आहे. ( ३ ) वात्स्यायन मुनिकृत-भाष्यसहित गौतम मुनिप्रणित **न्यायशास्त्र.** यांत सृष्टींतील पदार्थासंबंधाचें ज्ञान आहे. ( ४ ) व्यासमुनिकृत- भाष्यसहित पतंजलिमुनिप्रणित **योगदर्शन.** यांत पूर्वमीमांसा -वैशेषिक-न्याय या तीनहि दर्शनांनीं प्रतिपादिलेल्या पदार्थांचा साक्षात्कार करून घेण्याचें साधन सांगितलें आहे. ( ५ ) भागुरिमुनिकृत-भाष्यसहित कपिलमुनिकृत **सांख्यशास्त्र.** यांत तत्वपरिगणना व तत्संबंधीं विचार आहे. ( ६ ) बोद्धायन वृत्यादि व्याख्यानसमेत व्यासमुनिकृत **वेदांतदर्शन.** यांत ब्रह्मविचार आहे. याप्रमाणें हीं वेदांचीं सहा उपांगें होत. यांनांच षड्दर्शनें म्हणतात. या अंग व उपांग ग्रंथांच्या अध्ययनानें वेदांचें अध्ययन सुलभ होतें व वेदार्थ समजण्यास मदत होते. त्याचप्रमाणें उपनिषदांमध्यें ( १ ) ईश, ( २ ) केन, ( ३ ) कठ, ( ४ ) प्रश्न, ( ५ ) मुण्ड, ( ६ ) माण्डूक्य ( ७ ) तैत्तिरीय, ( ८ ) ऐतरेय, ( ९ ) छान्दोग्य व ( १० ) बृहदारण्यक हीं दहा उपनिषदें प्रमाणभूत आहेत. वेद, वेदांगें, उपांगें उपनिषद्ग्रन्थ यांच्या अध्ययनानें चवदाहि विद्या साध्य होतात. यांच्या पठणापासून ज्ञान व क्रिया यांचें पूर्ण ज्ञान होत असल्यामुळें मानसव्यवहार व बाह्यव्यवहार करण्यांत पुरुष चतुर होऊन सर्व प्रकारें तो महान् विद्वान् होतो. म्हणून ईशप्रणित चार वेद व वेदानुकूल ऋषिप्रणित, सत्यधर्मविद्यायुक्त, मंत्र व्याख्यानमय व युक्तिप्रमाणसिद्ध ब्राह्मणग्रन्थ प्रमाणभूत मानावे. **वेदांच्या प्रामाण्यांविषयीं मुळींच शंका घेऊं नये.** पण इतर ग्रंथ-जे अल्पबुद्धि, पक्षपात

व क्षुद्रविचार यांनीं युक्त असणाऱ्या लोकांनीं लिहिलेले ग्रंथ असतील ते सर्वथैव अप्रमाण मानावेत. आप्तपुरुषानें न लिहिलेले, वेदांतील ज्ञानाच्या विरुद्ध असणारे, युक्ति व प्रमाण यांनीं त्याज्य वाटणारे असे जे ग्रंथ असतील ते कोणीहि प्रमाण मानूं नयेत.

( १ ) रुद्रयामलादिक मनाची तमोवृत्ति करणारे **तंत्रग्रन्थ,** ( २ ) ब्रह्मवैवर्तादिक कल्पितगोष्टींनीं भरलेलीं **पुराणें व उपपुराणें,** ( ३ ) मनुस्मृति व इतर स्मृतिग्रंथ यांतील **प्रक्षिप्तश्लोक,** ( ४ ) सारस्वतचंद्रिका, कौमुदी वगैरे **वाद वाढविणारे व्याकरणग्रंथ,** ( ५ ) निर्णयसिंधु वगैरे क्षुद्रगोष्टींचें फाजिल महत्व वाढविणारे **धर्मग्रंथ**, (६) तर्कसंग्रह, जागदीशी वगैरे **न्यायाभासग्रंथ,** (७) हठयोगप्रदीपिकादिक **योगग्रंथ,** (८) सांख्यतत्वकौमुदी वगैरे आधुनिक **सांख्यग्रंथ,** (९) वेदान्तसार, पंचदशी, योगवासिष्ठादिक आधुनिक **वेदान्तग्रंथ,** ( १० ) मुहूर्तचिंतामणी व जन्मपत्रिका; फलादेश इत्यादिकांनां साधनीभूत असणारे व सर्वांनां भ्रमाच्या जाळ्यांत ओढणारे **ज्योतिषग्रंथ,** ( ११ ) त्रिकंडिक, स्नानसूत्र वगैरे श्रौतसूत्रांशीं विरुद्ध असणारे **परिशिष्टग्रंथ,** ( १२ ) मार्गशीर्षादि मासमाहात्म्यें, एकादशी-काशीस्थ- जलसेवन-क्षेत्रयात्रा-मूर्तिदर्शन-नामस्मरण-जडमूर्तिपूजा-इत्यादिक कृत्यांचीं फाजिल महात्म्यें वाढवून, त्यांपासून तात्काळ मुक्ति मिळते व सर्व जन्मींचीं पातकें नाहींशीं होतात असें विधान करणारे वस्तुस्थितिविरुद्ध ग्रंथ ( १३ ) पाखंड साम्प्रदायांचीं सर्व पुस्तकें, ( १४ ) नास्तिक ग्रंथ व ( १५ ) इतर वेदविरुद्ध व युक्तिप्रमाणविरुद्ध सर्व ग्रंथ प्रमाण मानण्यास योग्य नाहींत. जे ग्रंथ पूर्वी दिले आहेत-वेद, वेदांगें व उपांगें व त्यावरील भाष्यें-हींच त्या त्या शास्त्रांत प्रमाण समजावीं.

( प्रश्न ) पुराणादिक ग्रंथांत आलेल्या कांहीं गोष्टींचा भावार्थ उत्तम आहे व कांहीं भागांत सत्याचा अंशहि बराच आहे असें असतां त्या सर्व ग्रंथांचा त्याग करावा असें आपण कां म्हणतां? ( उत्तर० ) विषयुक्त अन्नाप्रमाणें पुराणांची स्थिति झालेली आहे. ज्याप्रमाणें विषमिश्रित अन्न सर्वच टाकावें लागतें त्याप्रमाणें सत्यासत्य कथानकांनीं मिश्रित झाल्यामुळें सर्वांच्या मतांनां घोंटाळ्यांत व संशयांत पाडणारीं पुराणेंहि त्याज्यच होत. पुराणांची प्रवृत्ति झाल्यादिवसापासून वेदांच्या अर्थाकडे लोकांचें मन कमी जाऊं लागलें; त्यामुळें **वेदांचा निर्भय व निःपक्षपाती उपदेश** लोकांच्या कानावर येईनासा झाला व त्यामुळें अज्ञान, मिथ्याज्ञान व भ्रम यांचा प्रसार होऊं लागला. वेद बाजूला राहिल्यामुळें व पुराणांतील कथानकांचा कोठेंच मेळ नसल्यामुळें हवें त्याचें हवें तें स्पष्टीकरण होऊं लागलें व त्याचा परिणाम अज्ञानामध्यें होऊं लागला वेदांनां दूर केल्यामुळें उत्पन्न झालेल्या अज्ञानाचा तंत्रग्रंथ हा कळस होय. पहा:—

मद्यंमांसं च मीनं च मुद्रा मैथुनमेव च ॥ एते पञ्चमकाराश्च मोक्षदा हि युगे युगे ॥१॥पीत्वा पीत्वा पुनः पीत्वा यावत्पतति भुतले ॥ पुनरुत्थाय वै पीत्वा पुनर्जन्म न विद्यते ॥ २ ॥ प्रवृत्ते भैरवी-चक्रे सर्वे वर्णा द्विजादयः ॥ निवृत्ते भैरवी चक्रे सर्वे वर्णाः पृथक् पृथक् ॥ ३ ॥ मातृयोनिं परित्यज्य विहरेत्सर्व योनिषु ॥ लिङ्गं योन्यां तु संस्थाप्य जपेन्मन्त्रमतन्द्रितः ॥ ४ ॥ मातरमपि न त्यजेत् + + + !!!

या प्रकारचे वेदविरुद्ध, व अज्ञानमूलक व दुराचार वाढविणारे शाक्तादिपंथ वेदांच्या निर्भीड उपदेशाचा अव्हेर करून पुराणांच्या गुजगोष्टी ऐकूं लागल्यामुळें सुरू झाले! हाय हाय! अजूनहि अशा शाक्त पंथाचा स्वीकार करून वरील श्लोक शिरसावंद्य करणारे व मद्य, मांस, मीन, मुद्रा, मैथुन हे पांच प्रकार मोक्ष (?) देणारे आहेत असें हट्टानें मानणारे लोक आहेत साधारण विचाराअंतींहि वरील श्लोक निंद्य, हीन व अश्लील असे आहेत हें सर्वांस कळण्यासारखें आहे. यासाठीं असले अश्लील पंथ व त्यांचे ग्रंथ कोणीहि मानूं नयेत. मद्यादिकांच्या सेवनानें बुद्धिभ्रंश होतो व त्याचा परिणाम नरक-दुःखप्राप्ति हाच होय हें कोणालाहि सांगणें नको. असें असतां हे, त्यांपासून व तशा इतर व्यसनांपासून मुक्ति मिळते असें समजतात याला काय म्हणावें? ब्रह्मवैवर्तादिक आधुनिक ग्रंथांमध्यें पुष्कळच खोट्या व विपर्यास केलेल्या कथा आहेत. त्यांपैकीं कांहींविषयीं येथें उल्लेख करतों:—

### कथा १ ली.

## ब्रह्मदेवाचें जारकर्म (?)

चतुर्मुखी ब्रह्मदेवानें आपल्या सरस्वति नामक कन्येशीं जारकर्म केलें. ही खोटी कथा पुष्कळ पुराणांमध्यें दिलेली आहे. या कथेचा मुळचा आलंकारिक संबंध खालील उताऱ्यांत आहे:—

प्रजापतिर्वै स्वां दुहितरमभ्यध्यायद् दिवमित्यन्य आहुरुषसमित्यन्ये तामृश्यो भूत्वा रोहितं भूतामभ्यैत् ॥ तस्य यद्रेतसः प्रथममुददीप्यत तदसावादित्योऽभवत् ॥

ऐ० पं० ३।३३।३४॥ प्रजापतिर्वै सुपर्णो गरुत्मानेष सविता ॥ शत० ब्रा० १०।२।७।४॥ तत्र पिता दुहितुर्गर्भं दधाति पर्जन्यः पृथिव्याः ॥ निरु० ४।२१॥

**द्यौर्मे पिता जनिता नाभिरत्र बन्धुर्मे माता पृथिवी महीयम् ॥ उत्तानयोश्चम्वो ३ र्यो निरन्तरत्रा पिता दुहितुर्गर्भमाधात् ॥** ऋ. मं. १। सू. १६४ मं. ३३॥ **शासद्वह्निर्दुहितुर्नप्त्यङ्गाद्विद्वां ऋतस्य दीधितिं सपर्यन् ॥ पिता यत्र दुहितुः सेकमृञ्जन्सं शग्म्येन मनसा दधन्वे ॥ २ ॥** ऋ. ३।३१।१॥

( प्रजापतिः सविता ) हीं नांवें सूर्याचीं आहेत. त्याची ( दुहिता ) पुत्री ही ( द्यौः–किंवा–उषा ) प्रभातकाल हीच होय. [ दुहिता शब्दाचा निरुक्तांतील अर्थ "दूरेहिता" "दूर ठेवलेली" असा आहे. द्यौ किंवा उषा ही सूर्यापासून फार दूर असते म्हणून ती सूर्याची दुहिता. ] किंवा सूर्याच्या प्रकाशामुळेंच उषःकालाची उत्पत्ति असल्यामुळें सूर्य हा उषेचा पिता व उषा ही सूर्याची मुलगी असें रूपक झालें. ( तां रोहिताम् ) ती उषा जेव्हां किंचित् रक्तवर्णयुक्त झाली तेव्हां किरणांच्या योगानें सूर्य तिच्याजवळ लवकर ( अभ्यध्यायत् ) प्राप्त झाला-याप्रमाणें त्याणें प्रकाशरूपी पुत्र उत्पन्न केला. अर्थात् उषा ही प्रकाशाची माता व सूर्य हा पिता होय. आदित्य हें प्रकाशाला नांव आहे. त्या उषेचे ठिकाणीं किरणरूपी ठेवलेल्या वीर्यापासून प्रकाश किंवा दिवसरूपी पुत्र उत्पन्न झाला हें आलंकारिक तात्पर्य. प्रातःकाळीं पांच घटिका रात्र असतां आकाशाचा जो भाग सूर्यप्रकाशामुळें लाल होत असलेला दिसतो ती उषा होय. ती मूळची सूर्यप्रकाशामुळें उत्पन्न झाली म्हणून सूर्याची मुलगी मानली गेली व तिच्यासह सूर्याचें वास्तव्य झाल्यामुळें आदित्य-दिवस-प्रकाश हा पुत्र झाला. ज्याप्रमाणें मातापित्यांपासून संतान उत्पन्न होतें त्याप्रमाणें याठिकाणीं अलंकाराची रचना केली इतकेंच कायतें. त्याचप्रमाणें पर्जन्य व पृथिवी (किंवा जल व पृथिवी) यांचा पितापुत्री संबंध आहे. कारण "**अद्भ्यः पृथिवी**" "पाण्यापासून पृथिवी उत्पन्न झाली असें सांगितलें आहे.

म्हणून पृथिवी ही पर्जन्याची किंवा पाण्याची मुलगी. तो पर्जन्य वृष्टिद्वारा पृथिवीमध्यें वीर्य घालतो. नंतर पृथिवी औषधींनां प्रसवते. याप्रमाणें हे वेदांमध्यें वस्तुस्थितीचे दर्शक रूपकालंकार आहेत यांविषयीं वर दिलेले वेदमंत्र स्पष्ट खुलासा करतातः– ( द्यौः ) प्रकाश हा ( मे पिता ) माझा पालक आहे. ( जनिता ) सर्व व्यवहारांनां उत्पन्न करणारा तोच आहे. ही पृथिवी ( माता ) मानकर्त्री आहे. ( द्वयोः ) हीं दोन, ( चम्वोः ) पृथिवी व पर्जन्य यांचीं सर्व सैन्यें ( उत्तानयोः ) वर पसरलेलीं आहेत. त्यांत पर्जन्यरूपी पिता ( दुहितुः ) पृथिवीचे ठिकाणीं ( गर्भम् ) जल ( आधात् ) घालतो. सर्व पृथिवीभर पाण्याचा वर्षाव करून धान्य वाढविण्यास मदत करतो. [ अर्थ अलंकारा प्रमाणें जाणावा. ] ॥ १ ॥ ( वह्निः ) अग्निमय सूर्य हा पिता, पूर्वोक्त उषारूपी दुहितेचे ठिकाणीं ( सेकम् ) किरणरूपी गर्भ ठेवून दिवसरूपी पुत्राला उत्पन्न करतो ॥ २ ॥ याप्रमाणें रूपकालंकार मुळांत असतां व तशीच ब्राह्मण व निरुक्त या ग्रंथांत व्याख्या केली असतांहि ब्रह्मवैवर्तादि ग्रंथलेखकांनीं भ्रांतीनें त्याची कशी कथा बनविली व देवहि जारकर्म करतात हें कसें भासविलें याचा स्पष्ट खुलासा होईल. म्हणून असल्या कथा कोणींहि खऱ्या मानूं नयेत.

### कथा २ री.

## सती अहल्या.

देवराज इन्द्रानें गौतमस्त्री अहल्येशीं जारकर्म केलें व त्याला सहस्र भगें पडलीं. त्याचप्रमाणें गौतमऋषीनें अहल्येला शाप दिला. त्यायोगानें ती शिला झाली नंतर रामाच्या पादस्पर्शानें–चरणधूलीनें–तिला पुन्हां मनुष्यपणा प्राप्त झाला. वगैरे प्रकारची कथा पुराणांतरीं आलेली आहे. या कल्पित कथेला जो वैदिक–आधार आहे त्याचें स्पष्टीकरण खालीं दिलें आहेः—

**इन्द्रागच्छेति । गौरावस्कन्दिन्नहल्यायै जारेति । तद्यान्येवास्य चरणानि तैरेवैनमेतत्प्रमुमोदयिषति ॥ शत० कां० ३।३। अ० ३।१।१८॥ रेतः सोमः ॥ शत० कां० ३।३।९।१॥ रात्रिरादित्यस्यादित्योदयेऽन्तर्धीयते ॥ निरुक्त० १२।११॥ सूर्यरश्मिश्चन्द्रमा गन्धर्व इत्यपि निगमो भवति सोपि गौरुच्यते ॥ निरु० २।६॥ जार-आभगः । जार इव भगमादित्योऽत्र जार उच्यते रात्रे-**

**जरयिता ॥ निरु० ३।३।४॥ एष एवेन्द्रो य एष तपति॥ शत० कां० १।६।३।१८॥**

( यः एषः ) जो हा ( तपति ) प्रकाश देतो, भूमीवरील सर्व पदार्थांनां प्रकाशित करितो तोच ( **इन्द्रः** ) सूर्य किंवा तोच इंद्र होय. सूर्यालाच, ( **इन्दति परमैश्वर्यवान् भवतीति इन्द्रः** ) तो परमऐश्वर्यानें युक्त असल्यामुळें इन्द्र असें म्हणतात. हाच सर्व देवांचा–सर्व प्रकाशणाऱ्या पदार्थांचा–राजा. ( **अहल्या-अहःलीयते अस्यां, अहनि लीयमानावा सा** ) जी दिवसांत मिसळून जाते किंवा जिच्यांत दिवस मिसळून जातो ती ( अहल्या ) रात्री होय. रात्रीचा सूर्य हा जार. "**जार**" या शब्दाचा अर्थ ( **जारः–जरयिता** ) वयोहानि करणारा असा आहे. सूर्य हा रात्रीच्या आयुष्याचा नाश करतो म्हणून तो रात्रीचा–अहल्येचा–जार होय. (अहल्या) रात्र ही ( गौतमः ) चंद्राची स्त्री हेंहि उघड आहे. "**गौतम**" हें नांव चंद्राला आहे. ( **गच्छति इति गौः अतिशयेन गौः गौतमः चन्द्रः** ) अतीशय जलद चालणारा तो गौतम. तोच चन्द्र होय. वरील निरुक्ताच्या उताऱ्यांत गौ हा शब्द चंद्राचा वाचक दिला आहे. ही अहल्या चंद्राची स्त्री सर्व लोकांनां सुख देते व हिच्या आयुष्याचा नाश सूर्याच्या आगमनानें होतो. हा भावार्थ वरील उताऱ्यावरून स्पष्ट दिसतो असें असतां पौराणिकांनीं इंद्राच्या ठिकाणीं व्यभिचार व साध्वीला दुराचाराचा कलंक लाविला. या प्रकारच्या विपरीत व मूळ वैदिक मंतव्याशीं विरुद्ध असणाऱ्या कथा पुराणान्तरीं अनेक आहेत.

### कथा ३ री.

## वृत्रासुर.

कोणी एक देहधारी इन्द्र, देवांचा राजा होता. त्याचें त्वष्टृपुत्र—वृत्रासुराशीं युद्ध होऊन त्याचा पराभव झाला; तेव्हां देवांनां फार भय उत्पन्न होऊन ते विष्णूला शरण गेले. विष्णूनें त्यांस उपाय सांगितला कीं, "मीं समुद्राच्या फेनामध्यें प्रवेश करतों. त्या फेनाचा प्रयोग केला असतां वृत्रासुर नाश पावेल." याप्रकारच्या असंबद्ध कथा **पुराण** हें नांव दिलेल्या पण वास्तविक **आधुनिक** असलेल्या ग्रंथांमध्यें पुष्कळ आहेत. त्या सर्व मिथ्या आहेत. ज्या वैदिक आधारांवरून त्या रचल्या आहेत त्या त्या मंत्रांमध्यें या मिथ्या कथांहून भिन्न अर्थ व भिन्न अलंकार आढळतात. पहाः—

**इन्द्रस्य नु वीर्याणि प्रवोचं यानि चकार प्रथमानि वज्री ॥ अहन्नहिमन्वपस्ततर्द प्र-**

**वृक्षणा अभिनत् पर्वतानाम् ॥ १ ॥ अहन्नहिं पर्वते शिश्रियाणं त्वष्टाऽस्मै वज्रं स्वर्यं ततक्ष ॥ वाश्रा इव धेनवः स्यन्दमाना अञ्जः समुद्रमव जग्मुरापः ॥ २ ॥**

ऋ० मं० १।३२। मं० १।२ ॥

( इन्द्रस्य ) सूर्य किंवा परमेश्वर यांचे ते ( वीर्याणि ) पराक्रम मी ( प्रवोचम् ) सांगतों. जे, ( प्रथमानि ) पूर्वीपासून ( वज्री ) प्रकाशमय किंवा प्राणाचा आधार असा सूर्य ( चकार ) करीत आहे. [ **वीर्यं वै वज्रः** शत. कां. ७।४॥ वीर्य हेंच वज्र होय असें शतपथ ब्रा० सांगितलें आहे. ] त्याणें ( अहिम् ) मेघांनां ( अहन् ) मारलें, मेघांचें शरीर छिन्न भिन्न केलें व त्या योगानें ( अनु ) मागाहून पृथिवीवर ( अपः ) पाण्याचा ( ततर्द ) वर्षाव केला, पाऊस पडला. मेघांपासून पाऊस पाडणें हें सूर्याचें काम आहे. त्या पावसाच्या योगानें तुडुंब भरलेल्या ( प्रवक्षणा ) नद्यांच्या जलप्रवाहानें ( ततर्द ) तटादिकांचा नाश झाला [ "ततर्द" शब्दाचा मूळचा अर्थ "नाश केला" असा आहे. ] या नद्या ( पर्वतानाम् ) मेघांपासून ( अभिनत् ) उत्पन्न झाल्या होत्या. मेघांच्या शरीरांच्या नाशानें अर्थात् पर्जन्यानें नद्या वाहूं लागतात. "मेघ व पाऊस" हेंच वृत्रासुराचें शरीर होय. ॥ १ ॥ ( त्वष्टा ) सूर्यानें ( अहिम् ) मेघांचा ( अहन् ) नाश केला. ( अस्मै ) या वृत्रासुरांच्या-मेघांच्या-नाशासाठीं ( पर्वते शिश्रियाणम् ) मेघांमध्येंच असणारें ( स्वर्यम् ) प्रकाशमय असें ( वज्रम् ) स्वकिरणजन्य विद्युतरूपी शस्त्र फेंकून त्या मेघस्वरूपी वृत्रासुराचा ( ततक्ष ) नाश तो करतो, मेघांचे कणकण करून जमिनीवर पाडतो. जमिनीवरील जलाचे कण किरणांच्या द्वारानें तोच सूर्य आकाशांत नेतो म्हणूनच त्वष्टा–सूर्य–हा वृत्रासुर–मेघ–याचा पिता होय. ( आपः ) तें पावसाचें पाणी ( समुद्रम् ) समुद्रापर्यंत ( अवजग्मुः ) वाहत जातें. तें पाणी ( अजः ) व्यक्त व ( स्यन्दमानाः ) चंचल असें असतें. ( वाश्राः ) वांसराची इच्छा करून जाणाऱ्या ( धेनवः ) गाईप्रमाणें वेगानें त्या नद्या–समुद्राला जाऊन मिळतात. पाणी हेंच वृत्रासुराचें शरीर होय. वृत्रासुराचें हनन–अर्थात् जलवृष्टि–हेंच सूर्याचें मोठें व स्तुत्य कृत्य होय.

**अहन् वृत्रं वृत्रतरं व्यंसमिन्द्रो वज्रेण**

महता वधेन ॥ स्कन्धांसीव कुलिशेना विवृक्णाहिः शयत उपपृक् पृथिव्याः ॥३॥ अपादहस्तो अपृतन्यदिन्द्रमास्य वज्रमधिसानौ जघान ॥ वृष्णो वध्रिः प्रतिमानं बुभूषन् पुरुत्रावृत्रो अशयद्व्यस्तः ॥ ४ ॥

ऋ. मं. १।३२ मं. ५।७॥

[ निघण्टु अ० १।१० मध्यें "अहिः" हा शब्द "मेघनामां" मध्यें घातला आहे. तसेंच- "इन्द्रशत्रुरिन्द्रोऽस्य शमयिता वा शातयिता वा तस्मादिन्द्रशत्रु स्तत्को वृत्रो मेघ इति नैरुक्तास्त्वाष्ट्रोऽसुर इत्यैतिहासिकाः। वृत्रं जघ्निवानपववार तद्वृत्रो वृणोतेर्वा वर्ततेर्वा वर्धतेर्वा यद्वृणोत्तद्वृत्रस्य वृत्रत्वमिति विज्ञायते यदवर्धत तद्वृत्रस्य वृत्रत्वमिति विज्ञायते ॥ निरु. अ. २।१७॥" मेघांचा नाश सूर्याकडून होतो म्हणून मेघाला इन्द्रशत्रु असें म्हणतात. जरी ऐतिहासिक लोक त्वष्टृपुत्र राक्षसालाच वृत्र असें म्हणत असले तथापि निरुक्त मंडळाची निश्चयात्मक समजूत अशी आहे कीं, मेघ हाच वृत्र होय. अर्थात् वृत्राला इन्द्रानें मारलें म्हणजे सूर्यानें मेघांचा नाश केला एवढाच अर्थ समजावयाचा. वृत्र शब्दाचा; व्यापणारा, असणारा व वाढणारा असा अर्थ आहे. याप्रमाणें निरुक्तामध्यें वृत्राविषयीं स्पष्टीकरण आढळतें. ] ( इन्द्रः ) सूर्यानें ( महता वधेन ) अत्यंत तीक्ष्ण अशा ( वज्रेण ) विद्युत् किरणरूपी अस्त्रानें ( वृत्रतरम् ) अत्यंत बलवान्, चहूंकडे व्यापणाऱ्या ( वृत्रम् ) मेघाला ( व्यंसम् ) छिन्नभिन्न करून ( अहन् ) नाहींसें केलें. त्यामुळें तो ( अहिः ) मेघ, ( पृथिव्याः ) भूमीवर ( कुलिशेन ) शस्त्रानें छिन्नभिन्न झालेला असा ( शयते ) निजला. अर्थात् मेघाचे विद्युत् शक्तीनें जलरूपी कण बनून जमिनीवर पसरले. ॥ ३ ॥ चवथ्या मंत्रांतहि हाच भावार्थ आहे. ( अपाद्-हस्तः व्यस्तः ) सूर्यानें छिन्नभिन्न केलेला असा तो ( वृत्रः ) मेघ पृथ्वीवर ( अशयत् ) निजला. इ० ॥ ४ ॥ निघण्टुमध्यें "वृत्र" शब्दाचा "मेघ" असा अर्थ दिला आहे. त्याचा नाश करणारा सूर्य म्हणून मेघाला "इन्द्रशत्रु" असें म्हणतात. सूर्य, त्वष्टा व इन्द्र हे एकच होत. सूर्य किरणांच्या योगानेंच बाष्पमय मेघ बनतात म्हणून मेघाला त्वष्टृपुत्र असें म्हणतात कारण, सूर्यालाच त्वष्टा असें नांव आहे. सूर्यकिरणांनींच मेघ बनतात व त्यापासून उत्पन्न होणाऱ्या विद्युच्छक्तीनेंच पाऊस पडतो, नद्या वाहतात व समुद्राला जाऊन मिळतात. याप्रमाणें

हें रहाटगाडगें चाललेलें आहे. "वृत्र" शब्दाचा मूळचा अर्थ "स्वीकारण्यास योग्य, प्रकाशाचें आवरण" असाहि आहे.

**अतिष्ठन्तीनामनिवेशनानां काष्ठानां मध्ये निहितं शरीरम् ॥ वृत्रस्य निण्यं विचरन्त्यापो दीर्घं तम आशयदिन्द्रशत्रुः ॥५॥ नास्मै विद्युन्न तन्यतुः सिषेध न यां मिहमकिरद्ध्रादुनिं च ॥ इन्द्रश्च यद्युयुधाते अहिश्चोता परीभ्यो मघवा विजिग्ये॥६॥**

ऋ. मं. १।३२ म. १०।१३॥

[ या प्रकारचे वृत्रविषयक मंत्र वेदांमध्यें पुष्कळ आहेत. "**वृत्रो हवा इद ँ सर्वं वृत्वा शिश्ये यदिदमन्तरेण द्यावापृथिवी स यदिद ँ सर्वं वृत्वा शिश्ये तस्माद्वृत्रा नाम ॥ ४ ॥ तमिन्द्रो जघान । स हतः पूतिः सर्वत एवापोभिप्रसुस्राव सर्वत इव ह्ययँ समुद्रस्तस्मादु हैका आपो बीभत्सां चक्रिरे ता उपर्युपर्य्यति पुप्रुविरेऽत इमे दर्भास्ता हैता अनापूयिता आपोस्ति वा इतरासु स ँ सृष्टमिव यदेनावृत्रः पूतिरभिप्रास्रवत् तदेवासामेताभ्यां पवित्राभ्यामपहन्त्यथ मेध्याभिरेवाद्भिःप्रोक्षति तस्माद्वा एताभ्यामुत्पुनाति**" ॥ ५ ॥ शत. कां. १।१।३। कं. ४।५॥ "आकाश व पृथिवी यांच्या मध्यभागीं मेघरूपानें राहाणारें पाणी हें वृत्रासुराचें शरीर होय कारण, तो मधली पोकळी व्यापून राहतो. त्याला ( इन्द्रः ) सूर्य मारतो, ( आपः अभिप्रसुस्राव ) त्याच्या शरीरापासून पाण्याची वृष्टि होते. हें पाणी फार पवित्र–स्वच्छ –असतें. इ०" तसेंच–"**तिस्र एव देवता इति नैरुक्ताः । अग्निः पृथिवी स्थानो वायुर्वेन्द्रोवान्तारिक्षस्थानः सूर्योद्युस्थान इति**" ॥ निरुक्त:७।५॥ "निरुक्ताच्या मतें देवता तीन आहेत पृथिवीवर अग्नि ही देवता, अंतरिक्षामध्यें वीज किंवा वायु व द्युलोकांत सूर्य या त्या तीन देवता होत." याप्रमाणें वेदांगग्रंथांत प्रकृत विषयासंबंधानें माहिती आहे. ] ( अति॰ काष्ठानाम् ) सर्व दिशांमध्यें ( वृत्रस्य ) मेघांचें ( दीर्घं तमः ) अंधःकारमय असें ( शरीरम् ) शरीर ( निहितम् ) भरलें आहे. पाण्यानें भरलेले काळे मेघ आकाशांत चहूंकडे आले–आहेत. ( आपः ) जलयुक्त

असलेले ते मेघ ( वि-चरन्ति ) इकडून तिकडे वाऱ्याच्या योगानें फिरतात. ( इन्द्रशत्रुः ) सूर्याशीं विरोध करणारा मेघ सूर्याच्या किरणांच्या योगानें छिन्नभिन्न होऊन-पृथिवीवर ( आ-शयत् ) पर्जन्यरूपानें पडतो. ॥ ५ ॥ वृत्रानें फेंकलेली ( विद्युत ) वीज व ( तन्यतुः ) केलेली गर्जना या दोहोंच्या योगानेंहि-( अस्मै ) या सूर्याचा ( न सिषेध ) पराभव होऊं शकत नाहीं. ( अहिः ) मेघ व ( इन्द्रः ) सूर्य हे दोघेहि-( युयुधाते ) परस्पर युद्ध करतात. ज्यावेळीं मेघ वाढतो व आकाश व्यापतो तेव्हां सूर्याचें तेज फिकें पडतें. पण जेव्हां सूर्याचें तेज वाढतें तेव्हां मेघाला मागें हटावें लागतें. सर्वदा ( मघवा ) सूर्याचाच ( विजिग्ये ) विजय होतो व मेघाला गळून खालीं पडावें लागतें. ॥ ९ ॥ वरील शतपथ ब्राह्मणांतील उताऱ्याचा शब्दशः अर्थ- ( वृत्रः ) मेघ या सर्वांवर ( वृत्वा ) आवरण घालून ( शिश्ये ) शयन करतो म्हणूनच त्याला "वृत्र" असें म्हणतात. मेघाला ( इन्द्रः ) सूर्य नाहींसें करतो. ( सः हतः ) तो मेल्यावर पृथ्वीवर पर्जन्यरूपानें पडतो व काष्ठतृणादिकांशीं संयोग पावून ( पूतिः ) दुर्गंध उत्पन्न करतो. मेघ जेव्हां आकाशांत असतात तेव्हां ते ( आपः ) पाण्याचा ( अभिप्रसुस्राव ) वर्षाव करूं शकतात. हें पाणी ( समुद्रः ) समुद्राप्रत जाऊन तेथेंहि त्याला फार भयंकर स्वरूप प्राप्त होतें. याप्रमाणें पृथिवी, नदी व समुद्र या ठिकाणीं असणारें पाणी सूर्यकिरणद्वारा ( उपरि उपरि ) वर आकाशांत जातें व तेथें त्याचे मेघ बनून पाऊस पडतो. ( ते इमे ) त्यापासून हे ( दर्भाः ) सर्व दर्भादिक औषधी व वनस्पति होतात इ०. याप्रमाणें या कथांविषयीं मुळांतील विचार आहेत. पण त्याच्यावर भलभलत्या कल्पना करून ब्रह्मवैवर्तादिपुराणांमध्यें वृत्रासुर वगैरे विषयीं खोट्याच कथा लिहिल्या आहेत. त्यांमध्यें तथ्य मुळींच नाहीं व त्यांनां इतिहास दृष्टीनें किंमत मुळींच नाहीं म्हणून असले ग्रंथ आदरास पात्र नाहींत.

## देव व राक्षस यांविषयीं.

### देवासुराः संयत्ता आसन् ॥ शत० कां० १३।३।९।१ ॥

सत्यवादी, सदाचारी व सत्पक्षपाती ते देव यांच्या विरुद्ध ते राक्षस होत. हे दोन-भेद मनुष्यांतील होत. या दोन प्रकारच्या लोकांमध्यें नेहेमीं कलह चाललेला होता, सध्यां आहे व पुढेंहि तसाच चालेल.

---

( १ ) "सा-क्ष-राः-" हा शब्द देवाचा वाचक आहे. कारण ( अक्षरेण ब्रह्मणा-सहिताः साक्षराः ) देव हे परब्रह्माशीं उपासनेच्या द्वारानें युक्त झालेले असतात. "सा-क्ष-राः" याच्या उलट "रा-क्ष-साः" हा शब्द आहे. अर्थात् त्याचा अर्थ 'परब्रह्माशीं, वेदाशीं, सत्यतेशीं,

असुरानभिभवेम देवा असुरा असुरतास्थानेष्वस्ता स्था-
नेभ्य इतिवापि वासुरिति प्राणनामास्तः शरीरे भवति
तेन तद्वन्तः । सोऽदेवानसृजत तत्सुराणां सुरत्वमसोरसुरा-
नसृजत तदसुराणामसुरत्वमिति विज्ञायते ॥ निरु. ३।८॥
देवानामसुरत्वमेकत्वं प्रज्ञावत्वं वा नवत्वं वापि वासुरिति
प्रज्ञानामास्यत्यनर्थानस्ताश्चास्यामर्था असुरत्वमादिलुप्तम्॥
निरु. १०।३४॥

सदसद्विवेकात्मक मन व प्राण यांचा विरोध आहे. मननशील मन हें देव व भौतिक प्रवृत्तीमुळें प्राण हे राक्षस होत. म्हणून मनानें प्राणांला ताब्यांत ठेवलें पाहिजे. नाहींतर ते उचंबळून सर्वांनां त्रास देण्यास कमी करीत नाहींत. परमेश्वरानें ( सोः ) प्रकाशमय तत्त्वापासून ( देवान् ) मन व पांच ज्ञानेंद्रियें उत्पन्न केलीं व ( असोः ) अज्ञानमय पृथिव्यादि तत्त्वांपासून ( असुरान् ) पांच कर्मेंद्रियें उत्पन्न केलीं. म्हणून या दोहोंमध्यें इतका नेहेमींचा विरोध आहे. देवांच्या ठिकाणीं प्रकाशकत्त्व, ऐक्य, बुद्धिमत्ता, कल्पकता इत्यादि सद्गुण असतात. इ०

सोऽर्चञ्छ्रम्यंश्चचार प्रजाकामः । स आत्मन्येव प्रजाति-
मधत्त स आस्येनैव देवानसृजत ते देवा दिवमभिपद्या-
सृज्यन्त तद्देवानां देवत्वं यद्दिवमभिपद्यासृज्यन्त तस्मै
ससृजानाय दिवेवास तदेव देवानां देवत्वं यदस्मै ससृ-
जानाय दिवेवास । अथ योयमवाङ् प्राणः । तेनासुरा-

---

विरुद्ध असणारे " असा होतो. खरेखोटेपणांचा विचार न करतां आपल्यापुरतें पाहून व आपल्या सुखासाठीं दुसऱ्यांस रसातळास पोंचविणारे ते राक्षस होत. सध्यां कित्येक म्हणतात कीं शिद्दी वगैरे मागसलेले व दिसण्यांत कुरूप दिसणारे ते राक्षस होत. पण हा समज अगदीं चुकीचा आहे. राक्षसांमध्यें सुंदर राक्षस असत व ते विद्वान्हि असत. ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य-शूद्र यांच्या पोटींहि-राक्षस निपजत असत. रावण हा ब्राह्मणाचाच मुलगा. तो वेदांग जाणणाराहि होता. राक्षस व देव, हा स्वभावावरून व कृतीवरून जाणावयाचा फरक आहे. जसे पूर्वी राक्षस होते तसेच सध्यांहि आहेत व पुढेंहि असेच होणार. फक्त त्यांनां ओळखलें पाहिजे कचासारखे ( देव ) विद्वान् राक्षसांच्या प्रांतांत जाऊन तेथील उत्तम विद्या शिकून येत व त्या विद्येच्या जोरावर राक्षसांचा ते पराभव करीत हेंहि विसरतां नये.

नसृजत त इमामेव पृथिवीमभिपद्यासृज्यन्त तस्मै समृजानाय तम इवास। सोऽवेत् । पाप्मानं वा असृक्षि यस्मै मे ससृजानाय तम इवाभूदिति तांस्तत एव पाप्मना विध्यते तत एव पराभवंस्तस्मादाहुर्नैतदस्ति यद्दैवासुरं यदिदमन्वाख्याने त्वदुद्यत इतिहासे त्वत्ततो ह्येव तान् प्रजापतिः पाप्मना विध्यते तत एव पराभवन्निति । तस्मादेतदृषिणाभ्यनूक्तम् । न त्वं युयुत्से कतमच्च नाहर्न तेऽमित्रो मघवन् कश्च नास्ति। मायेत्साते यानि युद्धान्याहुर्नाद्य शत्रुं न नु पुरा युयुत्स इति। स यदस्मै देवान्त्ससृजानाय दिवेवास तदहरकुरुताथ यदस्मा असुरान्त्ससृजानाय तम इवास ता ँ रात्रिमकुरुत ते अहो रात्रे। स ऐक्षत प्रजापतिः ॥ शत. कां. ११।१।६।७ कं. ७–१२॥

( प्रजाकामः ) सृष्टि उत्पन्न करण्याच्या बुद्धीनें परमेश्वरानें ( आस्येन ) अग्नि-परमाणुमयकारणप्रकृतीपासून ( देवान् ) प्रकाश देणारे सूर्यादिक गोल उत्पन्न केले. ते ( दिवम् ) प्रकाशाला ( अभिपद्य ) प्राप्त होऊन त्याच्या योगानें ( असृज्यन्त ) सर्व व्यवहार करतात. प्रकाश हेंच देवांचें देवत्व आहे. प्राण आणि पृथिव्यादिलोक यांपासून प्रकाशरहित सृष्टि उत्पन्न केली. त्यांणीं पृथिवीवर ( अभिपद्य ) येऊन औषधीवनस्पति वगैरे सृष्टि उत्पन्न केली. प्रकाश देणारे व प्रकाशाला निरोध करणारे यांमध्यें विरोध हा नेहेमीचाच आहे. तसेंच पुण्यात्मे, धर्मात्मे मनुष्य, हे देव व पापी लोक हे राक्षस होत. यांमधील कलहहि पूर्वापार आहे. त्याचप्रमाणें दिवस हा देव व रात्र ही राक्षसी यांतील विरोधहि तसाच आहे. तसेंच—

देवाश्च वा असुराश्च। उभये प्राजापत्याः प्रजापतेः पितुर्दायमुपेयुः ॥ शत. कां. १।७।९।२२॥ द्वयाह प्राजापत्याः । देवाश्चासुराश्च ततः कानीयसा एव देवा ज्यायसा असुराः । यदेवेदमप्रतिरूपं वदति स एव स पाप्मा ॥ शत. कां. १४।३।४ कं. १–४॥ ऊर्गीति देवा

**मायेत्यसुराः ॥ शत. कां. १०।५।६।२०॥ प्राणा देवाः ॥ शत. कां. ६।२।३।१९॥ प्राणो वा असुस्तस्यैषा माया ॥ शत. कां. ६।६।४।६॥ विद्वा ँ सो हि देवाः ॥**
**शत. कां. ३।७।६।१०॥**

देव व असुर यांचा एकोपा कधींहि होणें नाहीं कारण, त्याचा स्वभावच विरुद्ध आहे ( हि ) खरोखरच ( विद्वांसः ) विद्वान् लोक हेच ( देवाः ) देव होत. विद्वान् ज्ञानानें प्रकाशतात म्हणून ते देव होत अविद्वान् अज्ञानान्धःकारानें युक्त असल्यामुळें राक्षस समजावे. यांमध्यें नेहेमीं विरोध असणारच. हे दोनहि ( प्राजापत्याः ) परमेश्वराचे पुत्रवत् होत. त्यांमध्यें ( ज्यायसा असुराः ) प्राणादिक असुर हे श्रेष्ठ–वडील होत कारण ते वायु–अग्नि आदि सृष्टीच्या पूर्वी उत्पन्न झाले आहेत. तसेंच जन्मतः मनुष्य अविद्वान् असतात व मग विद्वान् होतात म्हणून विद्वत्तेपेक्षां अविद्वत्ता ही वडील आहे. म्हणून राक्षस हे वडील व देव हे मागाहून झाले असल्यामुळें लहान समजावें. त्याचप्रमाणें दुसऱ्या पक्षीं सूर्यादिक देव हे वडील व पृथिव्यादिक असुर हे लहान समजावे. तात्पर्य, ज्या ठिकाणीं ज्ञान, प्रकाश इत्यादि गुण दिसतात ते देव व ज्याठिकाणीं अज्ञान, क्रौर्य, अंधःकार इत्यादि दुर्गुण असतात ते राक्षस होत व यांचें युद्ध नेहेमींचेंच आहे. अर्थात् राक्षस पूर्वी होते व आतां नाहींत असें नाहीं. सध्यांहि पूर्वींप्रमाणेंच ते आहेत. ( असु किंवा प्राण या शब्दांचे "देव व राक्षस" असे दोनहि अर्थ आहेत. )

**द्वयं वा इदं न तृतीयमस्ति । सत्यं चैवानृतं च सत्यमेव देवाअनृतं मनुष्याः । इदमहमनृतात्सत्यमुपैमीति तन्मनुष्येभ्यो देवानुपैति । सवै सत्यमेव वदेत् । एतद्ध वै देवा व्रतं चरन्ति यत्सत्यं तस्मात्ते यशो यशो ह भवति । य एवं विद्वान् सत्यं वदति । मनो ह वै देवा मनुष्यस्य ॥**
**शत. कां १।१।१ कं. ४–७॥**

सत्यप्रिय असणारे ते देव व असत्पक्षपाती जे असतात ते मनुष्य किंवा राक्षस होत. जे शरीराविषयींच फक्त काळजी घेणारे, स्वार्थसाधनतत्पर, मायावी, कपटी, दुष्ट व क्रूर ते सर्व राक्षस होत व जे परोपकारशील, निष्कपटी, परदुःखानें दुःखित होणारे, दयाळू, धार्मिक व शांत ते देव होत. यांचा विरोध नेहेमींचाच असल्यामुळें ब्राह्मणादि ग्रंथांमध्यें "ते नेहेमीं लढाई करतात" असें लिहिलें आहे तें सर्व लाक्षणिक आहे. त्याच्या शाब्दिक अर्थापेक्षां भावार्थ खरा आहे. हा खरा अर्थ सोडून त्यावरून

खोट्याच बनविलेल्या ज्या पौराणिक-कथा आहेत, त्या सर्व त्याज्य होत. म्हणून त्या त्याज्य मानून सर्वांनीं मूळच्या अस्सल वैदिक भावार्थ लक्षांत घ्यावा.

## कथा ४ थी.

## कश्यपाची कथा.

मरीचिपुत्र कश्यप ऋषीनें दक्षप्रजापतीच्या तेरा कन्यांशीं विवाह केला. त्यांतील दितिपासून दैत्य, अदितिपासून आदित्य, दनुपासून दानव, कद्रूपासून सर्प, विनतेपासून पक्षी व अन्यस्त्रियांपासून वानर-वृक्षादिक उत्पन्न झाले. याप्रमाणें अज्ञान वाढविणाऱ्या, प्रमाण-युक्तिविरुद्ध व असंभवग्रस्त अशा कथा लिहिलेल्या पुराणान्तरीं आढळतात. त्या सर्व मिथ्याच आहेत. पहा:—

**स यत्कूर्मो नाम । प्रजापतिः प्रजा असृजत यदसृजता करोत्तद्यदकरोत्तस्मात्कूर्म्मः कश्यपो वै कूर्मस्तस्मा-दाहुः सर्वाः प्रजाः काश्यप्य इति ॥ श. ब्रा. ७।५।१।५॥**

( प्रजापतिः ) परमेश्वरानें या सर्व प्रजा-सर्व सृष्टि ( असृजत ) उत्पन्न केली म्हणूनच त्या जगन्नियन्त्याला ( कूर्मः ) कूर्म हें नांव पडलें आहे. [ कूर्म म्हणजे करणारा ] ( कश्यपः ) त्याच परमेश्वराला "कश्यप" असेंहि म्हणतात व ज्या अर्थी त्याणें या सर्व प्रजा उत्पन्न केल्या आहेत, त्या अर्थी "सर्व प्रजा कश्यपापासूनच उत्पन्न झाल्या" असें म्हणण्याचा प्रघात आहे.

**पश्यतीति पश्यकः । पश्यक एव कश्यपः ।[१]**

याप्रमाणें आद्यंत विपर्यय होऊन "कश्यप" शब्द बनला आहे. म्हणून त्याचा अर्थ "द्रष्टा, सर्वसाक्षी, सर्व पाहणारा" असा होतो. अर्थात् "कश्यप" शब्दावरून सर्वज्ञ परमेश्वराची पूर्ण कल्पना होते. याचप्रमाणें गयातीर्थादिक तीर्थांविषयीं भ्रममूलक कल्पना पसरल्या आहेत. पहा:—

**प्राणो वै बलं तत्प्राणे प्रतिष्ठितं तस्मादाहुर्बल ँ सत्या-दोजीय इत्येवं वेषा गायत्र्यध्यात्मं प्रतिष्ठिता ॥ सा हैषा गयांस्तत्रे ॥ प्राणा वै गयस्तत्प्राणांस्तत्रे तद्यद्गयांस्तत्रे**

---

( १ ) ज्याप्रमाणें "हिंस्" धातूवरून "सिंहः" शब्द व "कृत्" धातूवरून "तर्कः" हा शब्द बनतो, तद्वतच हा शब्द झाला आहे. ( हय० सू. महाभाष्ये )

तस्माद्गायत्री नाम ॥ शत. १४।८।१।६।७॥ तीर्थमेव प्रायणीयोऽतिरात्रस्तीर्थेन हि प्रस्नान्ति ॥ तीर्थमेवोदयनीयोऽतिरात्रस्तीर्थेन ह्युत्स्नान्ति ॥शत. १२।२।५।१।५॥ गय इत्यपत्यनामसुपाठितम् ॥ निरु. ३।४॥ अहि ँ सन्सर्वभूतान्यन्यत्र तीर्थेभ्यः ॥ छान्दोग्योपनिषद् ॥ समानतीर्थेवासी ॥ अष्टाध्या० अ०४पा०४ सू०१०७सतीर्थ्यः ब्रह्मचारी । त्रयःस्नातका भवन्ति । विद्यास्नातको व्रतस्नातको विद्याव्रतस्नातकश्चेति॥यो विद्यां समाप्य व्रतमसमाप्य समावर्तते स विद्यास्नातकः ॥ इत्यादि पारस्करगृह्यसूत्रे ॥

नमस्तीर्थ्यायच ॥ ये तीर्थानि प्रचरन्ति सृकाहस्तानिषङ्गिणः ॥ यजुर्वेद अ० १६॥

गयाश्राद्ध म्हणजे काय हें वरील आधारांवरून स्पष्ट दिसेल व गयातीर्थाविषयींची वैदिक कल्पना काय होती हेंहि समजेल. "प्राणा" लाच "गया" हें नांव आहे. व प्राण हेंच कायतें बल आहे किंवा सर्व बल प्राणामध्येंच राहिलेलें असतें. ओजः संज्ञक ज्ञानबलहि प्राणांच्याच आधारानें असतें. त्याच प्राणांमध्यें ( अध्यात्मम् ) परमेश्वरहि भरलेला आहे व गायत्रीमध्यें ब्रह्मविद्येचें अधिष्ठान पूर्णपणें आहे. गायत्रीहि गया नामक प्राणांचा ( तत्रे ) उद्धार करणारी आहे. प्राणांची सद्गति गायत्रीवर अवलंबून आहे. म्हणूनच गयासंज्ञक प्राणाच्या ठिकाणीं श्रद्धापूर्वक समाधीचें साधन करून परमेश्वरप्राप्ति करून घ्यावी. हेंच खरें गयाश्राद्ध होय. गया शब्दाचें सादृश्य पाहून गयानामक गावीं लोक पितृश्राद्ध करूं लागले!

गयान् प्राणान् त्रायते सा गायत्री ।

प्राणांचें रक्षण करणारी गायत्री होय. म्हणून प्राणायामानें प्राणशक्तीला स्वाधीन व स्थिर करणें व मानसीक स्थैर्य प्राप्त झाल्यानंतर श्रद्धेनें अध्यात्मज्ञानमय गायत्रीचा जप–अर्थभावनपूर्वक–करणें, हेंच खरें गयाश्राद्ध होय. तसेंच वर निरुक्ताचा आधार

दिला आहे त्यावरून "अपत्य, प्रजा" असाहि "गया" शब्दाचा अर्थ होतो. अर्थात् त्यांविषयीं जीं योग्य कर्तव्यें करावयाचीं तीं श्रद्धापूर्वक करणें हेंहि एक गयाश्राद्ध होय. माता, पिता, आचार्य, अतिथि, गुरु व इतर मान्य विद्वान् यांची श्रद्धेनें सेवा करणें हेंहि गयाश्राद्ध होय. अपत्यांनां योग्य शिक्षण देऊन त्यांनां विद्वान्, धार्मिक व थोर बनविणें हें पित्याचें पुत्राशीं कर्तव्य होय. हें धर्मश्रद्धापूर्वक करणें हेंहि गयाश्राद्ध होय. गया म्ह० अपत्य व त्यांच्या विषयींचीं कर्तव्यें श्रद्धेनें करणें हें गयाश्राद्ध होय. याप्रमाणें अपत्यापासून तों गुरूपर्यंत सर्वांविषयींचीं कर्तव्यें केलीं असतां, ज्ञानाची प्राप्ति होऊन तद्वारा सर्वव्यापक विष्णूचें ( पद ) स्थान—अर्थात् मोक्ष—प्राप्त होईल. "विष्णुपद" हा शब्द मोक्ष शब्दाचा पर्याय आहे. असें असतां गया गांवांतील दगडावर खोदलेल्या पायाला "विष्णुपद" असें म्हणून त्या विष्णुपदाच्या प्राप्तीसाठीं भलत्याच गोष्टी करणें हें भ्रमाचें लक्षण होय ; म्हणून सर्व मनुष्यांनीं हा भ्रम सोडून खऱ्या मोक्षरूपी विष्णुपदाची प्राप्ति करून घेण्यासाठीं आपलीं ऐहिक कर्तव्यें दक्षतेनें व श्रद्धेनें करून, धार्मिक बनून, प्राणायामादिक अनुष्ठानानें ( पूर्वोक्त पद्धतीनें ) खरें गयाश्राद्ध करावें.

**इदं विष्णुर्विचक्रमे त्रेधा निदधे पदम् ॥**
**समूढमस्य पांसुरे स्वाहा ॥** यजु० ५।१५॥

**यदिदंकिञ्च तद्विक्रमते विष्णुस्त्रिधा निधत्ते पदम् ॥ त्रेधा भावाय पृथिव्यामन्तरिक्षे दिवीति शाकपूणिः। समारोहणे विष्णुपदे गयशिरसीत्यौर्णवाभः। समूढमस्य पांसुरेप्यायनेन्तरिक्षे पदं न दृश्यते ऽपि वोपमार्थे स्यात् समूढमस्य पांसुल इव पदं न दृश्यत इति पांसवः पादैः सूयन्त इति वा पन्नाः शेरत इति वा पंसनीया भवन्तीति वा ॥** निरु० १२।१८ ॥

विष्णु म्हणजे चराचरांत व्यापून राहणारा परमात्मा होय. त्या परमेश्वरानें (इदम्) हें जग ( त्रेधा ) तीन प्रकारांनीं ( विचक्रमे ) केलें. तीन प्रकारांनीं जग स्थापित केलें. पदम् ) हें प्राप्तव्य सर्व वस्तुजात—अर्थात् जगत्—तीन ठिकाणीं ( निदधे ) प्रस्थापित केलें. गुरुत्वविशिष्ट जगत् पृथिवीमध्यें, लघुत्व व वायुपरमाण्वादिक जग अंतरिक्षांत व तेजोमय द्युलोकांमध्यें या प्रमाणें तीन प्रकारची सृष्टि तीन ठिकाणीं परमेश्वरानें व्यवस्थित केली आहे. ( अस्य ) या परमेश्वरानें रचलेल्या जगामध्यें जें कांहीं ( समूढम् )

मोहरहित जड ज्ञानरहित आहे तें सर्व ( पांसुरे ) अंतरिक्षांतच आहे. अर्थात् परमाणुमय हे सर्व गोल असून ते अंतरिक्षांत आहेत. हा सर्व परमेश्वराचा महिमा आहे. त्याचें स्मरण सर्वांनीं नित्य करावें. ( यदिदंकिंच ) हें जें काय दिसत आहे तें सर्व जग परमेश्वरानें रचलें आहे. ( त्रेधा ) पृथिवी, अंतरिक्ष व द्युलोक यांत असणाऱ्या त्रिविध जगाच्या ( भावाय ) उत्पत्तीसाठीं त्याणें आपलें सामर्थ्य प्रकट केलें, तें असें. ( विष्णुपदे ) मोक्षस्थानामध्यें, ( समारोहणे ) आरोहण करण्यास योग्य अशा ( गयशिरसि ) प्राणांच्या शिरोभागींहि तो आहे. तेथें जाऊन–प्राणांच्याहि शिरोभागीं जाऊन परमेश्वराची प्राप्ति करून घेतली पाहिजे. ( पांसुरे ) अंतरिक्षामध्यें ( पदम् ) परमाणुरूप जग जें कांहीं आहे तें डोळ्यांनीं ( न दृश्यते ) दिसत नाहीं इतकें तें सूक्ष्म आहे. ( पादैः सूयन्ते ) पाद म्ह० द्रव्यांचे अंश किंवा परमाणु. त्यांच्यापासून उत्पन्न होणारे ते पांसव होत. या प्रमाणें उत्पन्न झालेले ( पन्नाः ) पदार्थ ( शेरते ) परमेश्वरांत त्याच्या आश्रयानें राहतात. जसें व्यापकत्व हा गुण व्यक्त करणारें परमेश्वराचें नांव "विष्णु" हें आहे तसेंच त्याचें "पूषा" हें नांव पोषकत्व हा गुण दाखविणारें आहे. पहाः—

**पूषेत्यथ यद्विषितो भवति तद्विष्णुर्भवति विष्णुर्विशतेर्वा व्यश्नोतेर्वा तस्यैषा भवति ॥ इदं विष्णुरित्यृक् ॥**
**निरु. १२ । १७ ॥**

विष्णु शब्दाचा अर्थ व्यापक व पूषा शब्दाचा अर्थ सर्वपोषक असा आहे. हे शब्द परमेश्वराचे गुण दाखवितात. याप्रमाणें वास्तविक मूळच्या कल्पना असतां, शब्दसादृश्यानें अनेक भ्रामक कथा लोकांनीं प्रचारांत आणल्या आहेत. तीच गोष्ट तीर्थाविषयींहि आहे. तीर्थ म्हणजे सर्व दुःखें दूर करून सुखांची प्राप्ति करून देणारें स्थान होय. ( तीर्थम् एव प्रायणी० ) जें अतिरात्र नामक यज्ञांतर्गत व्रत असतें तें करून जें स्नान केलें जातें तेंच तीर्थ होय. ( तीर्थेन हि प्रस्नान्ति ) या तीर्थानेंच स्नान करून लोक खरोखर शुद्ध होतात. ( उदयनीयः ) उदयनीयाख्य यज्ञसंबंधीं कर्म करून जें स्नान करतात तें तीर्थ होय. हें स्नान दुःखापासून तारणारें असल्यामुळें याला तीर्थ असें म्हणतात. वेदादि ज्ञानग्रंथांनांहि तीर्थ असें म्हणतात कारण, त्यांच्या योगानें आत्मा शुद्ध होऊन दुःखापासून मुक्त होतो. (तीर्थेभ्यः अन्यत्र) वेदाच्या आज्ञेशिवाय इतरत्र ( सर्व–भूतानि ) कोणालाहि ( अहिंसन् ) कधींहि दुःख देऊं नये. अपराधी, दुष्ट यांनां शासन देणें या प्रकारच्या ज्या वेदाज्ञा आहेत त्या पाळीत असतां दुष्टांनां दुःख झालें तर चालेल पण तशा विधानांशिवाय इतरत्र

कोणी कोणालाहि दुःख देऊं नये. वेद हींच खरीं तीर्थें होत. त्यांत गुरूच्या सहाय्यानें जो स्नान करतो तोच खरा शुद्ध होतो. वेदशास्त्रें, आचार्य, गुरु, माता, पिता, अतिथि हे सर्व ज्ञानदान करून पापमूलक अज्ञानाचा नाश करणारे असल्यामुळें तेहि तीर्थच होत. त्यांची सेवा करणें हें तीर्थस्नान होय. ( त्रयः स्नातकाः ) खरोखर तीर्थामध्यें स्नान करणारे तीन आहेत. ( १ ) **विद्यास्नातक**-जो उत्तम नियमांचें परिपालन करून पूर्ण विद्या शिकतो पण ब्रम्हचर्याश्रम समाप्त करीत नाहीं तो विद्यास्नातक होय. विद्यारूपी तीर्थांत स्नान करणारा. ( २ ) जो विद्या पूर्णपणें न शिकतां मध्येंच ब्रह्मचर्याची समाप्ती करतो तो **व्रतस्नातक** होय ( ३ ) व जो पूर्ण ब्रह्मचर्य धारण करून वेदादि शास्त्रांचें पूर्ण अध्ययन करतो तो **विद्याव्रतस्नातक** होय. हा शुद्धात्मा, शुद्धांतःकरण, सदाचारी, धार्मिक, विद्वान्, परोपकारी असा होतो व सर्वांकडून त्यास मान मिळतो. ( तीर्थ्याय ) प्राण-वेद-विज्ञान इत्यादि तीर्थांमध्यें असणाऱ्या परमेश्वराला ( नमः ) नमस्कार असो. ( ये ) जे विद्वान् लोक ( तीर्थानि ) वेदाध्ययन, सत्यभाषण इत्यादि पूर्वोक्त तीर्थांमध्यें ( प्रचरन्ति ) व्यवहार करतात व जे ब्रह्मचर्यपरिपालनानें सर्व प्रकारच्या बलानें युक्त झाले आहेत व ( सृकाहस्ताः ) विद्या व विज्ञान हेच ज्यांचे दोन हात आहेत, ( निषङ्गिणः ) उपदेशानें सर्व संशयांला दूर करणारे तेच खरे तीर्थांत स्नान केलेले. परमेश्वर, वेद, विद्या, ज्ञान, विद्वान् यांप्रमाणें तीर्थ शब्दाचे खरे व मूळचे अर्थ आहेत; पण त्यांचा संबंध लोकांनीं विवक्षित गांवांशी जोडला[१] आहे! ( प्रश्न ) जल व स्थल यांमध्येंच कांहीं विवक्षित अशी शक्ति नसेल कशावरून कीं, जिच्यायोगानें तेथें जाऊन स्नान केलें असतां मनुष्य मुक्त होईल? ( उ. ) जल किंवा स्थल यांच्या योगानें पापाचा नाश होणें संभवतच नाहीं. असा कार्यकारणभाव आहे असेंहि कोणाला म्हणतां येणार नाहीं. काष्ठमय नौका पुरुषप्रयत्नांवांचून मनुष्याला तारित नाहीं मग नौकेप्रमाणेंच जड व ज्ञानशून्य असणारें पाणी व भूमी कशी मनुष्याला पापापासून सोडवूं शकेल. त्याला वेद व विद्वान् अशींच तीर्थें पाहिजेत. काशीप्रयागादिक स्थानें पापनाशक मुळींच नाहींत. ज्ञानार्जन व विद्वत्समागम हीं तीर्थस्थानें खरीं आहेत. असें असतां स्वार्थी लोकांनीं ग्राममहात्म्यें लिहून लोकांचीं मनें खऱ्या तीर्थापासून एका बाजूला वळविलीं. ( प्रश्न ) "इमं मे गंगे यमुने॰" इत्यादि वेदमंत्रांमध्येंच नद्यांचीं नांवें सांगितलीं आहेत, असें असतांहि तुम्ही त्या नद्यांचें माहात्म्य मानीत नाहीं हें कसें? ( उ. ) वेदांमध्यें त्यांचीं नांवें आलीं असलीं म्हणून तेवढ्यावरून त्या नद्या पापनाशक आहेत असें ठरत नाहीं. एका ठिकाणच्या किंवा एका नदीच्या पाण्यापेक्षां दुसऱ्या

---

( १ ) याचें कारण त्या त्या गांवांमध्यें पूर्वी विद्येचें वसतिस्थान होतें हेंच असावें.

ठिकाणच्या पाण्यामध्यें शारिरीक बाह्यमल किंवा वस्त्रादिकांचा मल साफ करण्याचें सामर्थ्य ज्यास्त असेल; म्हणून तेवढ्यावरून त्या नद्या पापाचा नाश करण्यास समर्थ आहेत असें ठरणार नाहीं. ज्ञानानेंच आत्मा व मन शुद्ध होतें हें सर्वांस मान्य आहे. पाण्याचा गुण पाप नाहींसें करण्याचा नसून शरीराचे बाह्यमल धुवून टाकणें हा आहे. पाप नाहींसें करण्याचा गुण ज्ञानामध्येंच आहे. योगसाधनाच्या पुस्तकांमध्यें इडा, पिंगला, सुषुम्ना, कूर्म या शरीरांतील नाड्यांचीं वर्णनें आलेलीं आहेत व कित्येक ठिकाणीं तर वरील नाड्यांनां गंगा, यमुना वगैरेहि नांवें योजलेलीं आहेत. [ इडा व पिंगला या ज्या ठिकाणीं मिळालेल्या आहेत त्या ठिकाणाला " गंगायमुनासंगम " असेंहि म्हटलेलें आहे. या संगमांत जो स्नान करतो तो दुःखमुक्त होतो असेंहि लिहिलेलें आढळतें. ] पण हे लेख योग्यांसाठीं आहेत. **प्राणायामाच्या द्वारानें जेव्हां योगी इडा व पिंगला यांच्या संगमांतून सुषुम्नाद्वारानें वर जातो तेव्हां त्याला समाधिसुखाचा अनुभव येतो. हा तेथें भाव आहे व तो सर्वथैव खरा व प्रत्येकाच्या अनुभवास येणारा आहे. पण त्या लेखांचा संबंध नद्यांशीं आणून जोडणें हें केव्हांहि इष्ट होणार नाहीं. जें फल गंगायमुनासंज्ञक इडापिंगला नाड्यांच्या संगमांत जाऊन होणार व प्राणायामाच्याद्वारें इतकें साधन केल्यानें जसें खरोखर पाप नाहींसें होतें तसें तेंच फल नद्यांच्या स्नानानें होईल असें मानणें हा वास्तविक अर्थाचा विपर्यास होय.** यासाठीं या भ्रामक वचनांवरून विद्वानांनीं आपलें मन मागें हटवून खऱ्या धार्मिक विचारांकडे लावावें.

" **सितासिते यत्र सङ्गथे तत्राप्लुतासो दिवमुत्पतन्ति ।** " या परिशिष्ठ वचनांतील " सितासिते " हें पद " गंगा व यमुना " या नद्यांचें वाचक नसून " इडा व पिंगला " यांचेंच वाचक आहे व त्याचा अर्थ " जो मनुष्य प्राणायामाच्याद्वारें इडा व पिंगला यां, सुषुम्नेला ज्या ठिकाणीं मिळाल्या आहेत त्या ठिकाणीं जातो, तो पवित्र होऊन सुखात्मक मोक्षस्थानाला जातो." असा वास्तविक असतां "गंगा व यमुना यांचा संगम" असा " सितासिते यत्र संगथे" अर्थ केला. हा अर्थाचा विपर्यास आहे, असें योगशास्त्राच्या पुस्तकांचें ज्यानें अध्ययन केलें आहे त्यास तेव्हांच वाटेल. " इडा " नाडीला " सिता " व " पिंगला " नाडीला " असिता " हा शब्द आहे. गंगा व यमुना या नद्यांच्या संगमावर स्नान करणारे मोक्षानंदाचा उपभोग घेतात असा कोणालाहि अनुभव नसून पूर्वोक्त नाड्यांच्या संयोगाचे ठिकाणीं समाधीच्या वेळीं प्रवेश झाला असतां खऱ्या आनंदाचा अनुभव येतो अशाबद्दल विश्वसनीय आधार आहेत. " **सितासितमिति वर्णनाम तत्प्रतिषेधोऽसितम् ।** निरु. ९ । २ ॥ " प्रकाश व अंधःकार, गोरा व काळा यांचे वाचक " सित व असित "

हे शब्द आहेत. आमच्या अनुभवाला येणारे प्रकाश व अंधःकार हे दोन निरनिराळे पदार्थ परमेश्वराच्या अतर्क्य तेजामध्यें पूर्णपणें मिळून गेले आहेत व त्या ठिकाणापासून पुढें परमेश्वरीय तेज चमकत आहे. समाधीच्या वेळीं प्रकाशांधःकारमय सृष्टींतून योगी परमेश्वरीय तेजामध्यें जातो व तेथें त्याला खऱ्या आनंदाचा अनुभव येतो. हा अर्थ व "इडापिंगला" संबंधानें वर दिलेला "सितासिते" यावरील वचनाचा अर्थ हे वास्तविक एकच आहेत. दोन रीतींनीं केलेले आहेत इतकेंच, पण त्या वचनाचा नदीवाचक अर्थ होणें दुरापास्त आहे. म्हणून सुखाची इच्छा करणाऱ्या प्रत्येक धार्मिक मनुष्यानें खऱ्या संगमावर स्नान करण्याची इच्छा धरावी.

याचप्रमाणें तंत्र व पुराण वगैरे ग्रंथांमध्यें मूर्तिपूजा, नामस्मरण यांचें विधान व माहात्म्य लिहिलेलें आहे. त्याचा मूळ वेदाशीं अगदीं विरोध आहे. पहाः-

न तस्यं प्रतिमा अंस्ति यस्यनामं महद्यशंः ॥ हिरण्यगर्भ इत्येष मा मां हिंसीदित्येषा यस्मान्न जात इत्येषः ॥ १ ॥

यजु० ३२ । ३ ।

( यस्य ) ज्या पूर्ण, अज, निराकार व सर्वव्यापक अशा परमेश्वराचे ( महद्यशः ) मोठें महिमान आहे, ज्याची वेदरूपी आज्ञा पाळणें हाच आमचा धर्म आहे, सत्यभाषणादिक करणें हेंच आमचें कर्तव्य आहे. ( हिरण्य-) सूर्यादिक तेजस्वी गोलांचाहि जो (-गर्भः ) उत्पादक आहे, त्याची सर्व मनुष्यांनीं ( मां मा हिंसीः ) "माझें सर्व प्रकारें रक्षण कर" अशी प्रार्थना करावी. ( यस्मात् ) ज्याअर्थी तो ( न जातः ) कधींहि उत्पन्न झालेला नाहीं, अर्थात् तो अजन्मा आहे म्हणून, ( तस्य ) त्या परमेश्वराची ( प्रतिमा नास्ति ) प्रतिमा, मूर्ति, प्रतिकृति, परिमाण, माप कांहींच नाहीं. परमेश्वर अनुपमेय, अमूर्त, अपरिमेय, निराकार, सर्वगत असा असल्यामुळें एकदेशीय पदार्थाप्रमाणें त्याची मूर्ति होऊं शकत नाहीं. हें अगदीं उघड आहे. परमेश्वराच्या स्वरूपाचें वर्णन पुढें दिलें आहेः-

स पर्यंगाच्छुक्रमंकायमंव्रणमंस्नाविरꣳ शुद्धमपांपविद्धम् । कविर्मंनीषी पंरिभूः

**स्वयम्भूर्याथातथ्यतोऽर्थान् व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ॥ २ ॥** यजु० ४० । ८ ॥

( यः ) जो ( कविः ) विक्रांतदर्शन, सर्वज्ञ, ( मनीषी ) सर्वसाक्षी, ( परिभूः ) सर्वांहून थोर, ( स्वयम्भूः ) अनादि परमेश्वर, ( शाश्वतीभ्यः ) नित्य, ( समाभ्यः ) प्रजांनां; अनंतकालापासून वेदद्वारा ( याथातथ्यतः ) अगदीं बरोबर ( अर्थान् ) सर्व विद्यांनां व सर्व पदार्थांनां ( व्यदधात् ) देतो व धारण करतो तो ( पर्यगात् ) सर्व ठिकाणीं व्यापक आहे. तेंच ब्रह्म होय. तें ब्रह्म ( शुक्रम् ) वीर्य-बलवान्, ( अकायम् ) निराकार, देहरहित, ( अव्रणम् ) छेदभेदरहित, ( अस्नाविरम् ) नाडीबंध-स्नायू यांनीं रहित, ( शुद्धम् ) निर्दोष, ( अपापविद्धम् ) पापरहित या प्रकारचें आहे. त्याची सर्वांनीं उपासना करावी. याप्रमाणें वेदप्रतिपाद्य ईश्वर निराकार, शरीररहित, जन्मबंधविनिर्मुक्त असा असल्यामुळें त्याची मूर्ति करून पूजा होणें अशक्य आहे. वेदांमध्यें जो प्रतिमा शब्द कित्येक ठिकाणीं आलेला आहे त्याचा अर्थ "मूर्ति" असा नसून "परिमाण" असा आहे. पहा:-

**संवत्सरस्य प्रतिमां यां त्वा रात्र्युपास्महे ॥ सा न आयुष्मतीं प्रजां रायस्पोषेण संसृज ॥ ३ ॥** अथर्व० ३ । १० । ३ ॥

**मूहूर्तानां प्रतिमा ता दशच सहस्राण्यष्टौ च शतानि भवन्त्येतावन्तोहि संवत्सरस्य मुहूर्ताः ॥**

शत० कां. १० । ३ । २ । २० ॥

विद्वान् लोक ( याम् ) ज्या रात्रीला ( संवत्सरस्य ) वर्षाचें ( प्रतिमाम् ) परिमाण मानतात व उपासना करतात ( त्वा ) त्याच ( रात्री ) रात्रीरूपी परिमाणाच्या आश्रय करून आम्हीहि ( उपास्महे ) उपासना करतों. ज्याअर्थी तीनशेंसाठ रात्रींनीं संवत्सराचें माप घेतलें जातें त्याअर्थी "रात्री" हें एक माप-परिमाण-आहे. हे ईश्वरा, ( सा ) ती रात्र ( नः ) आम्हांला ( रायस्पोषेण ) धन व पुष्टि देऊन ( आयुष्मतीम् ) दीर्घ आयुष्य देणारी ( संसृज ) होईल असें कर. मनुष्यांनीं असा प्रयत्न करावा कीं, त्यायोगानें प्रत्येक दिवस लाभ व सुख देणारा असा होईल. ( संवत्सरस्य मुहूर्ताः ) वर्षाचे मुहूर्त ( दशसहस्राणि ) दहा हजार व ( अष्टौ शतानि ) आठशें होतात. हेंहि

एक ( प्रतिमा ) वर्ष मापण्याचें परिमाणच आहे. ( ३६०×३०=१०८०० ) दोन घटकांचा एक मुहूर्त, दिवसाचे तीस मुहूर्त व वर्षाचे तीनशें साठ दिवस. या हिशेबानें वर्षाच्या मुहूर्तांची वरील संख्या होते.

**यद्वाचानभ्युदितं येन वागभ्युद्यते । तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥ १ ॥ साम. तलवकार उप० १ । ४ ॥**

( यत् इदम् ) जें हें प्रत्यक्ष दिसणारें मूर्त जग आहे ( इदं न ) तें कांहीं ब्रह्म नव्हे तर जें ( वाचा ) संस्कृत वाणीलाहि ( अनभ्युदितम् ) अविषय आहे पण ( येन ) ज्याणें ( वाक् ) वाणीला ( अभ्युद्यते ) जाणलें आहे ( तदेव ) तेंच ब्रह्म होय. विद्वान् लोक निराकार, सर्वव्यापक, अज, सर्वनियतृ, सच्चिदानंदलक्षण, सर्वसाक्षि अशा ब्रह्माचीच उपासना करतात, त्याची तुम्हीं सर्वांनीं उपासना करावी. तसेंच–

**तुला मानं प्रतिमानं सर्वं च स्यात् सुलक्षितम् ॥**

**–मनुस्मृति ८ । ४०३**

"प्रतिमान म्हणजे तोलण्याचें साधन ( वजन ) होय. तें उत्तम व बरोबर असावें, कमी नसावें." याप्रमाणें मनुस्मृतीमध्येंहि प्रतिमा किंवा प्रतिमान शब्द, परिमाण याच अर्थी वापरला आहे व त्यालाच उद्देशून ( प्रतिमानां भेदकः ) वजनें तोडून लहान करणारे यांनां शिक्षा सांगितली आहे. ( देवतानां च कुत्सनम् ) विद्वानांची निंदा करणें, ( देवतागारभेदकान् ) सज्जनांचीं घरें फोडणें वगैरे अपराध सांगितले आहेत. शतपथांमध्यें "**विद्वांसो हि देवाः ॥**" असें स्पष्ट सांगितलें आहे. विद्वान् हेच देव होत व ते ज्या ठिकाणीं राहतात, विद्याभ्यासंग करतात व उपदेश करतात तीं दैवतस्थानें किंवा देउळें होत. ( देवताभ्यर्चनम् ) विद्वानांचा सत्कार व सेवा हें देवतार्चन. त्यांची निंदा करणें, त्यांच्या वसतिस्थानाचा नाश करणें हे मोठेच अपराध होत. ( छायोल्लङ्घननिषेधः ) त्यांच्या छायेचें उल्लंघन करूं नये. ( प्रदक्षिणानि कुर्वीत ) त्यांनां प्रदक्षिणा करावी. ( दैवतान्यभिगच्छेत् ) त्यांच्याजवळ जावें, त्यांच्या वामभागीं बसावें, त्यांनां उजव्या बाजूला बसवावें. याप्रमाणें मनुस्मृतींत सांगितलें आहे. याप्रमाणें प्रतिमा व देवता यांचें मूळांत अर्थ होते व तेच पुढें कालांतरानें परमेश्वराला लावूं लागले !

---

( १ ) थोर सत्पुरुषांचें स्मरण राहण्यासाठीं त्यांच्या मूर्ति करून ठेवून त्यांची पूजा म्हणजे योग्य सत्कार करणें हें निराळें व त्या मूर्ति परमेश्वराच्या आहेत हें समजणें निराळें. हा फरक येथें लक्ष्यांत ठेवला पाहिजे.

त्याच प्रमाणें सूर्य, चंद्र या ग्रहांची पीडा होते असें समजून ती शांत होण्यासाठीं "आकृष्णेन रजसा०" इत्यादि मंत्रांचा जप करतात. पण वास्तविक त्या मंत्रांचा अर्थ अगदीं निराळाच आहे. **"आकृष्णेन रजसा वर्तमानो०" हा मंत्र** पूर्वी ( पान ९७ ) आकर्षणानुकर्षण प्रकरणांत दिला आहे व **"इमं देवा असपत्नं०"** हा मंत्र ( पान १५९ ) राजप्रजाधर्म या प्रकरणांत दिला आहे, तेथें त्यांचा अर्थ पहावा. शिल्लक राहिलेले मंत्र पुढें दिले आहेत:–

**अग्निर्मूर्धा दिवः ककुत्पतिः पृथिव्या अयम् ॥ अपाꣳरेताꣳसि जिन्वति ॥ ३ ॥**

यजु० ३ । १२ ॥

( अयम् ) हा ( अग्निः ) परमेश्वर किंवा अग्नि ( दिवः ) प्रकाशमय स्थानाचा व ( पृथिव्याः ) प्रकाशरहित अशा पृथिवीचा ( पतिः ) पालक आहे व तो ( मूर्द्धा ) सर्वांच्याहि वर शिरोभागीं विराजमान आहे. ( ककुत् पतिः ) सर्व दिशांमध्यें व्यापून राहिल्यामुळें त्यांचें तो सर्व तऱ्हेनें रक्षण करणारा आहे. ( अपाम् ) प्राण व जल यांचें ( रेतांसि ) सामर्थ्य तोच ( जिन्वति ) वाढवितो. याप्रमाणें अग्नि, विद्युत्, सूर्य इत्यादिकांच्या द्वारें पूर्वोक्तपदार्थांचा तो रक्षक आहे.

**उद्बुध्यस्वाग्ने प्रतिजागृहि त्वमिष्टापूर्ते सꣳसृजेथामयं च ॥ अस्मिन्त्सधस्थे अध्युत्तरस्मिन् विश्वे देवा यजमानश्च सीदत ॥४॥**

यजु. १५ । ५४ ॥

( हे अग्ने ) हे ज्ञानमय परमेश्वर! ( उत् बुध्यस्व ) आमच्या हृदयांत प्रकाशित हो. ( प्रति जागृहि ) अविद्यान्धःकारांत निजलेल्या सर्व जीवांनां विद्याज्ञानप्रकाशांत आणून जागें कर. हे परमेश्वरा! ( इष्टापूर्ते ) धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे, ( संसृजे० ) या जीवानें साधावे व ( त्वम् ) तूं याला सुख प्राप्त होईल असें करावेंस. ( अस्मिन् ) या ( सधस्थे ) लोकांत, शरीरांत ( अध्युत्तरस्मिन् ) परलोकांत, दुसऱ्या जन्मांत ( विश्वे देवाः )सर्व विद्वान् लोक व यजमानहि ( सीदत ) सदोदित असावेत. अर्थात् सर्व धर्मकृत्यें सदोदित चालू राहून विद्या व ज्ञान यांची वाढ व्हावी.

**बृहस्पते अति यदर्यो अर्हाद्द्युमद्विभाति**

**क्रतुमज्जनेषु ॥ यद्दीदयच्छवस ऋतप्र-
जात तदस्मासु द्रविणं धेहि चित्रम् ॥५॥**
यजु० २६ । ३ ॥

हे ( बृहस्पते ) वेदरक्षक ! ( ऋतप्रजात ) वेदविद्याप्रतिपादित जगदीश्वर! तूं ( जनेषु ) यज्ञ करणाऱ्या विद्वान् लोकांत किंवा लोकलोकांतरांत, ( क्रतुमत् ) ज्याच्या योगानें पुष्कळ क्रतु-यज्ञ-होतील असें ( द्युमत् ) सद्व्यवहार प्रकाशक, ( दीदयत् शवसः ) दानाला योग्य अशा बलाला उत्पन्न करणारें व ( यत् ) ज्याच्या योगानें ( अर्यः ) राजा, स्वामी किंवा वैश्य, ( अर्हात् ) इतर धार्मिक जनांत ( विभाति ) शोभतो, अशा तऱ्हेचें ( चित्रम् ) अद्भुत ( द्रविणम् ) धन ( अस्मासु ) आम्हांला ( धेहि ) दे.

**अन्नात्परिस्रुतो रसं ब्रह्मणा व्यपिबत्क्षत्रं
पयः सोमं प्रजापतिः ॥ ऋतेन सत्यमि-
न्द्रियं विपानꣳ शुक्रमन्धस इन्द्रस्येन्द्रिय-
मिदं पयोऽमृतंमधु ॥ ६ ॥** यजु. १९ । ७९ ॥

( क्षत्रम् ) राजकर्म करणारा क्षत्रिय, ( ब्रह्मणा ) वेदविज्ञानी लोकांसह ( पयः ) अमृतात्मक ( सोमम् ) सोमवल्लीचा-( रसम् ) बुद्धि आनंद, शौर्य, धैर्य, बल, पराक्रम इत्यादि सद्गुणांनां वाढविणारा रस-( व्यपिबत् ) पितो, तोच खरा सभाध्यक्ष व खरा राजा. ( ऋतेन ) यथार्थ वेद जाणून ( सत्यम् ) धर्म व राज्यव्यवहार, ( इन्द्रियम् ) विद्यायुक्त शुद्ध मन, ( विपानम् ) विविध राजधर्मांचें रक्षण ( शुक्रम् ) सुखकर, ( अन्धसः ) शुद्ध अन्नाच्या इच्छेला कारणीभूत ( पयः ) व सर्व पदार्थ विद्यासारयुक्त, ( अमृतम् ) मोक्षसाधक (मधु) मधुर, सत्स्वभावयुक्त असें (इन्द्रस्य) परमैश्वर्यवान् परमेश्वराच्या कृपेनें ( इन्द्रियम् ) ज्ञानयुक्त मन मिळून ( इदम् ) सर्व व्यावहारिक व पारमार्थिक सुख मिळतें. ( प्रजापतिः ) परमेश्वर अशी आज्ञा करतो कीं, जो क्षत्रिय राजा असेल त्याणें याप्रमाणें प्रजापालन करावें. ( अन्नात् ) भोज्यपदार्थांपासून जसा ( परि ) सर्व प्रकारें ( स्रुतः ) रस निघतो त्याचप्रमाणें राजानें सर्वांनां आनंदरूपी रस द्यावा. मनांत सुख होईल असें करावें.

**शन्नो देवीरभिष्टय आपो भवन्तु पीतये ॥**
**शंयो रभिस्रवन्तु नः ॥७॥ यजु. ३६ । १२ ॥**

( देवीः ) सर्वप्रकाशक, ( आपः ) सर्वव्यापक परमेश्वर; ( अभिष्टये ) इष्ट आनंद देणारा व ( पीतये ) तृप्ति करणारा होवो. तसेंच ( नः ) आम्हांला ( शम् ) सुखदायक होवो. तो आम्हांवर ( शंयोः ) सुखाचा ( अभिस्रवन्तु ) वर्षाव करो. [ आप्–हा शब्द "आप्लृ–व्याप्तौ" या धातूवरून झाला आहे. म्हणून त्याचा अर्थ "व्यापणारा" असा आहे. "आप् हा शब्द परमेश्वराचा वाचक आहे याविषयीं प्रमाणः–

**"यत्र लोकांश्च कोशांश्चापो ब्रह्म जना विदुः । असंच्च यत्र सच्चान्तः स्कम्भं तं ब्रूहि कतमः स्विदेव सः ॥**
**अथर्व० कां. १० । ४ ॥ २२ । १० ॥**

( जनाः ) विद्वान्‌लोक ( आपः ब्रह्म ) आप् शब्दानें व्यक्त होणारें ब्रह्म ( विदुः ) जाणतात. ज्यामध्यें सर्व लोक व सर्व कोश ( खजिने) भरलेले आहेत. ( असत् सत् ) कार्य व कारण जग ज्यामध्यें राहतें असा तो कोण आहे बरें? ( तं स्कम्भम् ) तो जगताचें धारण करणारा परमेश्वर आहे. तो ( अन्तः ) सर्व पदार्थांमध्यें पूर्णपणें भरला आहे. या मंत्रामध्यें "आपः" हा शब्द परमेश्वराचाच वाचक दिला आहे व शिवाय धात्वर्थावरूनहि परमेश्वराचा एक विशेष गुण व्यक्त होतो हें ध्यानांत येईल. ]

**कया नश्चित्र आभुवदूती सदा वृधःसखा ।**
**कया शचिष्ठया वृता ॥ ८ ॥ यजु०२७ । ३९ ॥**

( कया ) उपासना, ( शचिष्ठया ) सत्कर्मानुष्ठान, (वृता) सद्वर्तन, ( कया ) व उत्तम सद्गुण यांच्या योगानें प्रकाशित झालेला, ( चित्रः ) अनंत सामर्थ्ययुक्त, ( सदावृधः ) आनंदानें पूर्ण असणारा परमेश्वर ( नः ) आमचा मित्र ( आभुवत् ) होईल अशाप्रकारें आम्ही आमचें वर्तन ठेवावें. परमेश्वराची मनोभावानें सेवा व उपासना करावी.

---

( १ ) "क" या शब्दाचे "सुख, सत्व, सद्गुण, उपासना." वगैरे अर्थ आहेत.

केतुं कृण्वन्नकेतवे पेशो मर्य्या अपेशसे॥
समुषद्भिरजायथाः ॥ १ ॥ यजु० २९ । ३७ ॥

हे ( मर्य्याः ) मनुष्यहो! तुम्ही ( उषद्भिः ) परमेश्वरप्राप्तीची इच्छा करणाऱ्या व त्याच्या आज्ञेचें पालन करणाऱ्या विद्वानांशीं संबंध ठेवला असतां खरोखरच ( अकेतवे ) अज्ञानाचा नाश होण्यास कारणीभूत असणारें ( केतुम् ) ज्ञान व ( अपेशसे ) दारिद्र्याचा नाश करणारें ( पेशः ) चक्रवर्तीराज्यादिक धन ( कृण्वन् ) मिळवाल, व तें मिळालें असतां ( अजायथाः ) तुम्हांला परमेश्वरप्राप्तीहि होईल. [ याप्रमाणें हे नवग्रहांचे म्हणून मानलेले नऊ मंत्र आहेत. त्यांच्या अर्थावरून ग्रहांशीं त्यांचा संबंध आहे कीं काय तें वाचकांनीं पहावें. ]

## पठनाधिकार.

( १ ) वेद हे ईश्वरप्रणीत आहेत, ( २ ) वेदांचा उद्देश सर्व मनुष्यांनां सद्धर्मज्ञान करून देण्याचा आहे, ( ३ ) वेदांमध्यें सर्व सत्यविद्या मूलरूपानें आहेत; यामुळें त्यांचें पठन व अध्ययन करण्याचा सर्व मनुष्यमात्रांनां अधिकार आहे. परमेश्वरकृत जेवढे म्हणून पदार्थ आहेत तेवढे सर्व, सर्व मनुष्यांसाठीं आहेत. पृथिवी, पाणी, अग्नि, वारा व इतर पदार्थ हे जसे सर्व मनुष्यांसाठीं आहेत त्याचप्रमाणें विद्या ही सर्व मनुष्यांसाठींच आहे. पहाः—

यथेमां वाचं कल्याणीमावदानि जनेभ्यः ।
ब्रह्मराजन्याभ्या᳕ शूद्राय चार्य्याय च
स्वाय चारणाय । प्रियो देवानां दक्षिणायै
दातुरिह भूयासमयं मे कामः समृध्यता-
मुप मादो नमतु ॥ १ ॥ यजु २६ । २ ॥

( यथा ) ज्याप्रमाणें ( इमाम् ) ही प्रत्यक्ष असणारी वेदचतुष्टयरूप व (कल्याणीम् ) कल्याण करणारी ( वाचम् ) वाणी किंवा विद्या ( जनेभ्यः ) सर्व मनुष्यांनां अर्थात् सर्व जीवांवर उपकार करण्यासाठीं मीं ( आ-वदानि ) सांगितली; त्याप्रमाणें सर्व विद्वानांनीं सर्व माणसांनां तिचा उपदेश करावा. ( ब्रह्मराजन्याभ्याम् ) ब्राह्मण व क्षत्रिय, ( अर्याय ) वैश्य, ( शूद्राय ) शूद्र, ( चारणाय ) अतिशूद्र, अंत्यज ( स्वाय)

स्वकीय पुत्र, भृत्य वगैरे या सर्वांनीं वेदाध्ययन व श्रवण करावें. ज्याप्रमाणें मी ईश्वर पक्षपात सोडून सर्वांवर उपकार करणारा असल्यामुळें ( देवानाम् ) विद्वानांनां ( प्रियः ) आवडणारा व ( दक्षिणायै दातुः ) सर्वस्व दान केल्यामुळें त्यांना प्रिय ( भूयासम् ) झालों आहें त्याचप्रमाणें सर्व विद्वानांनीं परोपकारबुद्धि व सदाचरणी स्व ाव धारण करून वेदांचा उपदेश सर्वांनां करावा. ( मे ) माझी ( अयम् ) ही ( कामः ) इच्छा ( समृद्ध्यताम् ) योग्य रीतीनें तुम्ही पाळा. ही उपदेश करण्याची इच्छा ( सम्-ऋद्ध्यताम् ) उत्तम प्रकारानें वाढली जावो. ( उप मादो नमतु ) तुम्हांलाहि सर्व इष्ट सुख प्राप्त होवो. हा तुम्हांला माझा आशिर्वाद आहे ज्याप्रमाणें मीं ही वेदविद्या सर्वांसाठीं सांगितली त्याचप्रमाणें तुम्हींहि तिचा उपदेश लोकांनां करावा. मनांत वैषम्यभाव कांहींहि आणूं नये. ज्याप्रमाणें माझें आचरण सदैव पक्षपातरहित असतें त्याचप्रमाणें तुमचें आचरण असलें तर माझी तुम्हांवर प्रसन्नता होईल."

या मंत्रांतील "जनेभ्यः" हें पद केवळ "द्विज" एवढाच अर्थ दाखविणारें नाहीं. शिवाय "ब्रह्मराजन्याभ्यां, शूद्राय" वगैरे पदांनीं "जनेभ्यः" याचा स्पष्टच खुलासा केला आहे. याच्या पुढच्या "बृहस्पते अतियदर्य०" या मंत्रांतहि परमेश्वरपरच अर्थ आहे व या मंत्रांतहि तसाच आहे व हाच अर्थ प्रकरणाला अनुकूल आहे. अर्थात् वेदांचें पठन, पाठन व श्रवण करण्याचा अधिकार प्रत्येक मनुष्यमात्राला आहे.

## वर्ण व जाती.

**शूद्रो ब्राह्मणतामेति ब्राह्मणश्चैति शूद्रताम् ॥ क्षत्रियाज्जातमेवन्तु विद्याद्वैश्यात्तथैव च ॥ १ ॥ मनु० १० । ६५ ॥**

( शूद्रः ) जन्मानें जरी कोणी शूद्र असला व त्यानें पूर्णविद्या, सुशीलता इत्यादि ब्राह्मणगुण जर मिळविले तर तो ( ब्राह्मणताम् ) ब्राह्मणत्वाला ( एति ) मिळवितो. ब्राह्मणत्व त्याला मिळतें. त्याचप्रमाणें कुकर्म व अधर्माचरण करणारा जरी ( ब्राह्मणः ) जन्मानें ब्राह्मण असला तरी तो ( शूद्रताम् ) शूद्रत्वाला जातो. निर्बुद्धत्व, मूर्खत्व, पराधीनता, सेवा करण्यास उत्सुक हे शूद्रत्वाचे गुण आहेत. ते जन्मानें ब्राह्मणकुलांत उत्पन्न झालेल्याच्या आंगीं जरी आढळले तरी तो शूद्रच समजावा. ( एवम् ) त्याचप्रमाणें ( क्षत्रियात् ) क्षत्रियापासून ( जातम् ) झालेल्या व ( वैश्यात् ) वैश्यापासून झालेल्याविषयींहि तसेंच समजावें. अर्थात् जसे गुण अंगीं असतील तसा त्याचा वर्ण आहे असें समजावें. तसेंचः-

**धर्मचर्यया जघन्यो वर्णः पूर्वं पूर्वं वर्णमापद्यते जातिप-**

**रिवृत्तौ ॥ १ ॥ अधर्मचर्यया पूर्वो वर्णो जघन्यं जघन्यं वर्णमापद्यते जातिपरिवृत्तौ ॥ २ ॥**

आपस्तम्बसूत्र. प्रपा० २ प. ५ सू. १० । ११ ॥

सत्यधर्माचें आचरण केल्यानें जन्मानें शूद्र असणाराहि वर्णानें वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण होऊं शकतो. धर्माचरण केल्यानें वरच्या वर्णाचे अधिकार प्राप्त होतात. ( **जातिपरिवृत्तौ–जातेर्वर्णस्य** परितः सर्वतः या वृत्तिः आचरणम् ) वर्णाच्या संबंधानें सर्वप्रकारचें नियत कर्म त्या त्या वर्णाच्या मनुष्यानें केलें पाहिजे. त्याचप्रमाणें अधर्माचरणानें जन्मानें उच्चवर्णातील असला तरी तो खालच्या वर्णात जातो. अर्थात् धर्माचरणच उत्तमवर्णाचा अधिकार प्राप्त होण्यास कारण आहे. त्याचप्रमाणें अधर्माचरणानें नीच वर्ण प्राप्त होतो. ज्या ज्या ठिकाणीं "**शूद्रो नाध्यापनीयः । नश्रावणीयः**" अशीं व अशा अर्थाचीं विधानें आलेलीं असतील तेथें त्यांचा अर्थ शूद्र बुद्धिहीन असल्यामुळें, त्या बुद्धिहीन स्थितींत त्याला त्या विषयाचें ज्ञान होणें अशक्य आहे." एवढाच समजावयाचा. पण जर त्याच्या बुद्धीचा विकास करण्याची व्यवस्था केली तर त्याला तो विषय किंवा ती विद्या शिकण्याचा अधिकार प्राप्त होईल.

## पठनपाठनक्रम.

संस्कृत भाषेंतील व वैदिक भाषेंतील शब्दांचा उच्चार योग्य व त्या त्या स्थानांत व्यवस्थित रीतीनें झाला पाहिजे. म्हणून आरंभीं "शिक्षा" शिकवावी. शिक्षाग्रंथाच्या अध्ययनानें अक्षरांचीं स्थानें, त्यांचे प्रयत्न, यांचें ज्ञान होऊन स्वरज्ञानहि उत्तम रीतीनें तयार होतें. जसें:—'प'काराचें स्थान ओष्ठ आहे व त्याचा स्पृष्टप्रयत्न आहे इ०. [ म्हणून 'प'काराचा उच्चार करावयाचा असतां दोनहि ओंठांचा संयोग करणें जरूर आहे. ] तसेंच पतंजलिमुनीनीं म्हटलें आहेः—

**दुष्टः शब्दः स्वरतो वर्णतो वा मिथ्याप्रयुक्तो न तमर्थमाह ॥ स वाग्वज्रो यजमानं हिनस्ति यथेन्द्रशत्रुः स्वरतोऽपराधात् ॥ १ ॥ महाभा० १।१।१ ॥**

स्थान व प्रयत्न यांच्याकडे दुर्लक्ष्य केलें असतां अक्षरांचा योग्य उच्चार होणार नाहीं व त्यामुळें पदलालित्याचा भंग होतो. गाण्यांतील विवक्षित रागामध्यें भिन्न स्वरांचें उच्चा-

( १ ) उत्तर हिंदुस्थानांतील लोक "वेद" न म्हणतां "बेद" म्हणतात व त्यांच्या उच्चारांत ( य ) अक्षराच्या ठिकाणीं ( ज ) हें अक्षर येतें व "श-ष-स" च्या उच्चारांत फरक राहत नाहीं. याप्रमाणेंच पुष्कळ उच्चार अशुद्ध होतात ते, उच्चार करण्याच्या पद्धतीच्या अशिक्षणानेंच होत. ते सर्व उच्चार दुष्ट होत.

रण केलें असतां जसा विरस होतो, तद्वतच अक्षरांचा अव्यवस्थित उच्चार केल्यानेंहि होतो. वेदांमधील सर्व शब्दांचें योग्य उच्चारण अवश्य झालेंच पाहिजे व तें जर झालें नाहीं तर त्यांचा अर्थ बदलतो. अशा वाईट रीतीनें उच्चारलेल्या शब्दाला ( दुष्टः शब्दः ) दुःख व अनर्थ उत्पन्न करणारा शब्द असें म्हटलें जातें. शब्दाचा योग्य उच्चार न करणें हा एक भाषणांतील अपराधच आहे. अशा दुरुच्चारणापासून मूळ उद्दिष्ट अर्थ ( न तम् अर्थम् आह) दाखविला जात नाहीं, म्हणून तो (मिथ्या प्रयुक्तः) अयोग्य रीतीनें उच्चारलेला शब्द फुकट जातो जसें:—"**सकलम्**" शब्दाचा अर्थ "संपूर्ण" असा आहे, पण "**शकलम्**" शब्दाचा अर्थ "खंड–तुकडा" असा आहे. तसेंच "**सकृत्**" शब्दाचा अर्थ "एकवार" असा आहे व "**शकृत्**" शब्दाचा अर्थ "मल" असा आहे. या प्रमाणेंच इतर शब्दांविषयींहि समजावें. दंत्य वर्णाचे ठिकाणीं तालव्य उच्चारण केल्यानें किती भिन्न अर्थ होतो हें वरील उदाहरणांवरून ध्यानीं येईल. वाईट रीतीनें उच्चारलेला शब्द इष्ट अर्थ दाखवीत नाहीं. म्हणून त्याला ( वाग्वज्रः ) अर्थाचा नाश करणारें वाक्शस्त्र असें म्हणतात व तें वाक्शस्त्र ( यजमानम् ) यजमानाच्या अर्थाचा ( हिनस्ति ) घात करतें. [ यजमानाला अर्थानें हीन करतें ] ( यथा ) ज्या प्रमाणें ( इन्द्र शत्रुः ) "इन्द्रशत्रुः" हा सामासिक शब्द, स्वराचा बदल केल्यामुळें विपरीत अर्थाचा बोधक झाला. "इन्द्रशत्रुः" हा शब्द अन्तोदात्त केला तर त्याचा ( इन्द्रस्य शत्रुः ) "इंद्राला मारणारा" असा अर्थ होतो व आद्युदात्त केला तर त्याचा ( इन्द्रः शत्रुः यस्य सः ) "इंद्र आहे मारणारा ज्याचा" असा अर्थ होतो. "इन्द्र" हें सूर्याला नांव आहे व त्याचा शत्रु "मेघ" आहे. ( हा विषय पूर्वी आलाच आहे. ) स्वरभेदामुळें अर्थाचा फरक होतो तो असा:—"इन्द्रशत्रु" हा सामासिक शब्द जर अन्तोदात्त केला तर त्याचा तत्पुरुषसमास होऊन मारण्याची क्रिया सूर्यावर होऊं लागते व जर आद्युदात्त उच्चारण केलें तर बहुव्रीही समासानें "इंद्र आहे शत्रू ज्याचा तो मेघ" असा अर्थ होऊन मारण्याची क्रिया मेघावर होऊं शकते. स्वरभेदानें असा अर्थभेद होत असल्यामुळें स्वरांचा उच्चार नीट व अर्थानुकूल झाला पाहिजे. नाहींतर वाईट रीतीनें केलेले उच्चार भिन्न अर्थ दाखवितील व अर्थाचा अनर्थ होईल.

विद्यार्थ्यांनां शिकवावयाचें तें लिहिणें, वाचणें, ऐकणें, बसणें, उठणें, सामोरें जाणें, अध्ययन करणें, प्रश्न विचारणें, विचार करणें, अर्थ लावणें इत्यादि सर्व विषयांत योग्य

---

( १ ) तेलंगी व मद्रासी लोक "ज्ञ" अक्षराचा उच्चार "ग्न्यँ" असा करतात व महाराष्ट्रीय लोक "द्न्यँ" असा करतात. पण वास्तवीक विचाराअंतीं हे दोनाहि उच्चार चुकीचे आहेत. "ज्ञ" या अक्षराचा खरा उच्चार "ज्ञ" असा आहे. कारण तें अक्षर "ज्+ञ" हीं दोन अक्षरें मिळून झालें आहे.

तऱ्हेनें शिक्षण देऊन त्यांनां उत्तम वळण लावलें पाहिजे. पाठ करण्याच्या विषयांचा त्यांनां अर्थ समजत गेल्यास व त्यांस नीट रीतीनें समजावून सांगण्याचा प्रयत्न केल्यास त्यापासून फारच फायदा आहे. जो कांहींच करीत नाहीं त्यापेक्षां नुसतें पाठ करणारा थोडा बरा, ज्याला शब्दार्थ वगैरे उत्तम समजतात व विषय चांगला तरतरीत राहतो तो त्याहून उत्तम होय व ज्याला सर्व विद्या उत्तम रीतीनें येत असून शुभाशुभ कर्मांचें ज्ञान आहे व स्वतः सदाचारी असून जो परोपकारशील आहे तो सर्वोत्कृष्ट समजावा. याप्रमाणें ( १ ) अभ्यास न करणारा, ( २ ) निव्वळ घोकंपट्टी करणारा, ( ३ ) अर्थज्ञानासह विद्या शिकणारा व ( ४ ) स्वतः उत्तम विद्वान असून परोपकार करणारा, हे चार प्रकारचे मनुष्य आहेत व ते पहिल्याहून दुसरा जास्त श्रेष्ठ असे आहेत याविषयीं वेद व वेदांग ग्रंथांत पुढें लिहिल्याप्रमाणें वचनें आढळतात:—

ऋचो अक्षरे परमे व्योमन् यस्मिन्देवा अधिविश्वे निषेदुः ॥ यस्तन्न वेद किमृचा करिष्यति य इत् तद्विदुस्त इमे समासते ॥२

ऋ० मं० १।१६४।३९ ॥

या मंत्रांत अर्थज्ञानावांचून केल्या जाणाऱ्या घोकंपट्टीचा पूर्ण निषेध केला आहे. ( यस्मिन् ) ज्यामध्यें ( विश्वे ) सर्व ( देवाः ) विद्वान् मनुष्य, सर्व इंद्रियें, सूर्यादिक लोक हे ( अधिनिषेदुः ) राहिले आहेत त्या ( अक्षरे ) नाशरहित, ( परमे ) परमोत्कृष्ट, ( व्योमन् ) आकाशाप्रमाणें सर्वव्यापक परब्रह्मामध्यें ( ऋचः ) ऋग्वेदादिक चारहि वेद राहिलेले आहेत. ( यः ) जो मनुष्य खरोखर ( तत् ) त्यांचा ( न वेद ) अर्थ पूर्णपणें जाणत नाहीं तो ( ऋचा किं करिष्यति ) वेदाची ऋचा पाठ करून त्यापासून काय लाभ मिळविणार? वेदाच्या अर्थज्ञानाचें फल त्याला मुळींच मिळणार नाहीं. ( ये इत् तत् विदुः ) पण ज्यांनां तो वेदाचा अर्थ समजतो ( ते इमे समासते ) त्यांनांच धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचा लाभ होतो; किंवा तेच वेदाच्या दिव्य उपदेशाप्रमाणें आपलें आचरण ठेवूं शकतात. म्हणून वेदाचें अध्ययन अर्थ जाणूनच केलें पाहिजे.

स्थाणुरयं भारहारः किलाभूदधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम् ॥ योऽर्थज्ञ इत्

सकलं भद्रमश्नुते नाकमेति ज्ञानविधूतपाप्मा ॥ ३ ॥ यद् गृहीतमविज्ञातं निगदेनैव शब्द्यते ॥ अनग्नाविव शुष्कैधो न तज्ज्वलति कर्हिचित् ॥ ४ ॥ निरु० १।१८

जो मनुष्य ( वेदम् अधीत्य ) वेद घोकून पाठ करतो व ( अर्थं न विजानाति ) त्याचा अर्थ उत्तम रीतीनें समजून घेत नाहीं, अर्थात् जो अर्थ न समजतां नुसती घोकंपट्टी करतो तो ( स्थाणुः ) लांकडाचा खांब आहे असें समजावें व तो नुसता ( भार हारः ) भारवाहक होय. ज्याप्रमाणें गाढवाच्या पाठीवरच्या गहूं, साखर, तूप, कस्तुरी, केशर इत्यादि पदार्थांचा भारच गाढवाला सहन करावा लागतो, तद्वत पाठ केलेल्या विषयाचा भार तो पुरुष वाहत असतो. विद्येच्या रसास्वादाची गोडी त्याला नाहीं. ( अर्थज्ञः ) जो अर्थ जाणतो त्याच्या ( विधूतपाप्मा ) सर्व पापांचा नाश होऊन त्याला सर्व ( भद्रम् ) सुख ( अश्नुते ) प्राप्त होतें व तो ( नाकम् एति ) आनंदमय अशा मोक्षस्थानाप्रत जातो. म्हणून वेदांचा अर्थ अवश्य समजाऊन घ्यावा. ॥ ३ ॥ ( अविज्ञातम् ) ज्याचा अर्थ समजला नाहीं असें अध्ययन ( गृहीतम् ) ज्याणें केलें आहे, पण जो ( निगदेन शब्द्यते ) तोंडानें भराभर पाठ म्हणतो त्याला त्या पाठ केलेल्याचा कधींहि ( न ज्वलति ) प्रकाश पडणार नाहीं. अर्थात् जो मनुष्य, न समजतां नुसती घोकंपट्टी करतो त्याला त्यापासून कांहीं लाभ होणार नाहीं. ज्याप्रमाणें ( अनग्नौ ) विस्तव नसलेल्या जागीं ( शुष्कैधः ) वाळलेलीं लांकडें जळत नाहींत त्याचप्रमाणें याच्या बुद्धीमध्यें वेदमंत्रांचा प्रकाश पडत नाहीं. ॥ ४ ॥

उत त्वः पश्यन्न ददर्श वाचमुत त्वः शृण्वन्न शृणोत्येनाम् ॥ उतो त्वस्मै तन्वं १ विसस्रे जायेव पत्य उशती सुवासाः ॥ ५ ॥

ऋ० मं० १०।७१।४॥

( उत ) हें खरोखर आश्चर्य होय कीं, कोणी मनुष्य ( वाचम् ) वाणी ( पश्यन् ) पहात असतांहि ( न ददर्श ) त्याला ती नीट पाहतां आली नाहीं. अर्थात् पुस्तकांत

लिहून ठेवलेली विद्या डोळ्यांनां दिसत असतांहि किंवा ते शब्द वाचतां येत असतांहि, ज्याला त्यांचा अर्थ समजत नाहीं त्याला ते वाचतां येत असूनहि न वाचतां येण्या-सारखे आहेत. ( शृण्वन् न शृणोति ) दुसरे कोणी असे आहेत कीं, जे ऐकत असतात पण त्यांचें तें ऐकणेंहि न ऐकण्यासारखेंच आहे. अर्थात् ज्याला अर्थ समजत नाहीं त्याला वेद किंवा दुसरें कांहीं वाचतां किंवा ऐकतां आलें तरी तें निरुपयोगीच होय. पण ज्याला अर्थ समजतो त्याला ( वाक् ) ती विद्या ( तन्वम् ) आपलें स्वरूप ( विसस्रे ) अनेक प्रकारांनीं प्रकाशित करते व आनंद देते. ( सुवासाः ) चांगलें वस्त्र नेसलेली, ( उशती ) पतीची इच्छा करणारी ( जाया पत्य इव ) स्त्री ज्याप्रमाणें पतीला आनंद देते त्याचप्रमाणें अर्थ समजून शिकलेली विद्या सुखदायक होते. ॥ ५ ॥

**उ॒त त्वं॑ स॒ख्ये स्थि॒रपी॑तमाहु॒र्नैनं॑ हिन्व-न्त्यपि॒ वाजि॑नेषु ॥ अधे॑न्वा चरति मा॒य-यै॒ष वाचं॑ शुश्रु॒वाँ अ॑फ॒लाम॑पु॒ष्पाम् ॥ ६ ॥**

ऋ० मं० १०।७१।५॥

( सख्ये ) जर कोणाशीं सख्य करावयाचें असेल तर त्याणें, (स्थिर पीतम्०) धर्मानुष्ठान ईश्वरप्राप्तिरूप फलाचा ज्याणें आस्वाद घेतला आहे अशा पूर्ण विद्वानाशींच मैत्री करावी. अशा पुरुषालाच मित्र असें ( आहुः ) म्हणतात. ( एनम् ) याला ( वाजिनेषु ) कोणत्याहि व्यवहारांत कोणीहि ( न हिन्वन्ति ) त्रास देत नाहींत. वादविवादरूपी वाग्युद्धामध्येंहि त्याचा कधीं पराभव होत नाहीं. पण जो ( अपुष्पाम् ) कर्म, उपासना, अनुष्ठान, सदाचार, ज्ञान या पुष्पांनीं विरहित व ( अफलाम् ) धर्म, ईश्वरविज्ञान, मोक्ष, सुख इत्यादि धर्मांचीं फलेंहि जिला येण्याचा संभव नाहीं अशा ( वाचं शुश्रुवान् ) शब्दमय व अर्थशून्य विद्येचा ज्याणें अभ्यास केला आहे अर्थात् ज्याणें नुसती घोकंपट्टी केली आहे तो खरोखर ( मायया ) कपटयुक्त अविद्येसहवर्तमान या लोकीं ( चरति ) राहतो. अर्थात् तो शिकून न शिकल्यासारखाच आहे. म्हणून अर्थज्ञानपूर्वक अध्ययन करावें ॥ ६ ॥

वेदांचा अर्थ समजण्यासाठीं पाणिनीय अष्टाध्यायी, व्याकरण व त्यावरचें पातंजल महाभाष्य यांचें अध्ययन अवश्य केलें पाहिजे. निघण्टु, निरुक्त, छंद व ज्योतिष यांचें अध्ययन नंतर करावें. नंतर वैशेषिक, न्याय, सांख्य, योग, पूर्व व उत्तर मीमांसा या सहा शास्त्रांचें अध्ययन करावें. मग ऐतरेय, शतपथ, गोपथ इत्यादि ब्राह्मणांचें परि-

शीलन करावें, म्हणजे वेदांचा अर्थ व यज्ञसंबंधीं चालीरीति यांची माहिती होईल. किंवा सामान्य मनुष्यांनीं वेदांचा अर्थ पहावयाचा असल्यास पूर्वोक्त विद्वान् आचार्यांचीं जीं मान्य भाष्यें असतील तीं पहावीं. वेदांचा अर्थ पाहणें हें प्रत्येक मनुष्याचें काम आहे. कारण "**नावेदविन् मनुते तं बृहन्तमिति ।**" "वेद न जाणणारा त्या परमेश्वराला जाणूं शकत नाहीं." तसेंच त्याला विद्या व धर्म यांचेंहि ज्ञान होत नाहीं. वेदांमध्यें सर्व विद्या व सर्व ज्ञान मूलरूपानें भरलेलें आहे. त्यापासूनच साक्षात् किंवा परंपरेनें पृथिवीवरील सर्व विद्या उत्पन्न झाल्या व वाढल्या आहेत. पृथिवीवरील सर्व पुस्तकांमध्यें जो सत्याचा अंश आहे त्याचा वेदांशींच परंपरेनें संबंध आहे. वेदांतील विद्या मनुष्यांसाठीं परमेश्वरानें दिल्या आहेत, म्हणून त्यांचा अभ्यास सर्वांनीं अवश्य करावा.

## वेदांवरीलभाष्यें.

वेदांचा अर्थ करण्याचा प्रयत्न ब्रह्म्यापासून तों याज्ञवल्क्य, वात्स्यायन, जैमिनी पर्यंत ऋषी व महर्षींनीं केला आहे. वेदांवर जैमिनीमुनींच्या पुढच्या कालीं जे जे प्रयत्न झाले आहेत त्यांत **-भाष्यकार मतमतांतराचे अभिमानी असल्यामुळें**-बरेच दोष उत्पन्न झाले आहेत. पण जैमिनींच्या पूर्वीचे ग्रंथ शुद्ध वैदिक अर्थ दाखविलात. ज्याप्रमाणें पाणिनी, पतंजलि, यास्क वगैरे महर्षींनीं वेदांचीं सहा अंगें बनविलीं त्याचप्रमाणें, जैमिनी, व्यास, कणाद वगैरे ऋषींनीं सहा उपांगें निर्माण केलीं. त्याचप्रमाणें उपवेद व वेदांच्या ११२७ शाखाहि वेदवेत्त्या ऋषींनीं निर्माण केल्या. त्या वेदवेत्त्या प्राचीन महर्षींच्या पुस्तकांवरूनच वेदांचा शुद्ध अर्थ सध्यां समजूं शकेल. तसा आधुनिक टीकात्मक लेखांवरून समजणार नाहीं. कारण, रावण, उवट, सायण, महीधर हे मध्यकालीन भाष्यकार ; मोक्षमुल्लर, मूर, मानियर उइलियम इत्यादि शार्मण्यदेशीय व युरोपीय भाषांतरकार व रा. शंकर पांडुरंग पंडित वगैरे एतद्देशीय भाषांतरकर्ते हे सर्व आधुनिक असल्यामुळें व मतमतांतररूपी पाशांत सांपडल्यामुळें कित्येक ठिकाणीं त्यांचीं भाष्यें भ्रामक व मूळ अर्थाला सोडून भलताच अर्थ दाखविणारीं अशीं झालीं आहेत. त्यामुळें त्यांचा सर्वथैव स्वीकार करतां येत नाहीं. त्यांतील दोषांचा थोडासा मासला येथें देतों.

सायणाचार्यांनीं आपल्या भाष्यांत सर्व वेद क्रियाकांडपर आहेत असें म्हटलें आहे. पण वास्तविक पाहतां ज्ञानकांडहि वेदांमध्यें पूर्णपणानें आहे. याविषयींचे मंत्र पूर्वी दिलेच आहेत त्यांवरून लक्ष्यांत येईल कीं, ब्रह्मविद्याविधायक मंत्र वेदांमध्यें पुष्कळ आहेत. [ पहिली ईशावास्य उपनिषद् तर खास यजुर्वेदाचा चाळीसावा अध्यायच आहे व त्याशिवाय उपनिषदांत येणारे मंत्र जसेच्या तसेच वेदांमध्यें आहेत. ] यावरून

उघड दिसतें कीं, वेद हे केवळ कर्मकांडासाठींच नसून ज्ञानकांडासाठींहि आहेत, व त्यांत इतर शास्त्रें व विद्याहि मूलरूपानें आहेत. "**इन्द्रं मित्रं वरुणमग्निमाहु०**" या मंत्राचा सायणाचार्यांनीं दिलेला अर्थ निरुक्ताच्या विरुद्ध आहे. निरुक्तामध्यें "**इममेवाग्निं महान्तमात्मानमेकमात्मानं बहुधा मेधाविनो वदन्तीन्द्रं मित्रं वरुणमित्यादि०** ॥ निरु० ७।१८ ॥ याप्रमाणें "अग्नि" शब्द हा विशेष्य मानला असून इतर शब्द विशेषणें मानलीं आहेत. पण सायणाचार्यांनीं "इंद्र" शब्द विशेष्य मानून इतर शब्द विशेषणें मानलीं आहेत. वास्तविक या मंत्रांत "अग्नि" शब्दाची द्विरुक्ति केली आहे ती तो शब्द विशेष्य आहे म्हणून होय. त्यांतील एक "अग्नि" शब्द विशेष्य असून दुसरा विशेषण आहे व म्हणूनच तो दोन वेळ आला आहे. पण सायणाचार्यांनीं तीं दोनहि विशेषणें मानलीं आहेत. तें भाष्य निरुक्ताला विरुद्ध असल्यामुळें त्याज्य होय. अग्नि, इंद्र आदिक शब्द परमेश्वराचे वाचक आहेत व ते परमेश्वराचे निरनिराळे गुण दाखवितात. म्हणून वेदांतील सर्व नामांनीं परमेश्वराचेंच गुणकीर्तन व हवन केलें जातें. असें असतां सायणाचार्यांनीं "**यज्ञस्य सम्बन्धिनि पूर्वभागे आवहनीय रूपेण अवस्थितम्**" असें या मंत्रावरील भाष्यांत म्हटलें आहे तें पूर्वापर विरुद्ध होय. येथें कोणी असेंहि म्हणेल कीं, परमेश्वर हा सर्व देवतांच्या रूपानें अवतीर्ण झालेला आहे. तर हें म्हणणेंहि असमंजसपणाचें आहे कारण, इंद्रादिक शब्द हे परमेश्वराचे निरानिराळे गुण दाखवितात. वास्तविक सूर्य किंवा चंद्र हीं कांहीं परमेश्वराचीं रूपें नव्हत कारण, "**सपर्यगात् शुक्रमकायं०**" व "**अज एकपाद्**" इत्यादि वेदमंत्रांत परमेश्वराचें वर्णन निराकार रूपानें आलें आहे. त्याला जन्म व शरीर नाहीं. **म्हणून सूर्य किंवा चन्द्र हीं परमेश्वराचीं रूपें नसून तो सर्वव्यापक असल्यामुळें त्यांतहि आहे इतकेंच.** याप्रमाणें सायनभाष्यांत दोषस्थळें पुष्कळ आहेत; त्यांचा पुढें प्रसंगोपात्त उल्लेख करण्यांत येईलच.

महीधराच्या भाष्यामध्येंहि अनर्थकारक दोषस्थलें विपुल आहेत. त्यांतील मासला खालीं देतों:—

**गणानां त्वा गणपतिं ५ हवामहे प्रियाणां त्वा प्रियपतिं ५ हवामहे निधीनां त्वां निधि-**

**पतिं ँ हवामहे वसो मम ॥ आहमजानि गर्भधमा त्वमजासि गर्भधम् ॥ १ ॥**

यजु० २३।१९॥

**महीधर भाष्यम्**—"गणपतिशब्दादश्वो वाजी ग्रहीतव्यः । महिषी यजमानस्य पत्नी यज्ञशालायां पश्यतां सर्वेषामृत्विजामश्वसमीपे शेते । शयाना सत्याह हे अश्व! गर्भधं गर्भं दधाति गर्भधं गर्भधारकं रेतः अहम् आ अजानि आकृष्य क्षिपामि । त्वंच गर्भधं रेतः आ अजासि आकृष्य क्षिपासि ।"

वरील मंत्राचा खरा अर्थः—

**गणानां त्वा गणपतिं हवामह इति । ब्राह्मणस्पत्यं ब्रह्म वै बृहस्पतिर्ब्रह्मणैवैनं तद्भिषज्यति प्रथश्च यस्य सप्रथश्च नामेति ॥ ऐतरेय ब्रा० १।२१ ॥ प्रजापतिर्वै जमदग्निः सोऽश्वमेधः ॥ १४ ॥ क्षत्रं वाश्वो विडितरे पशवः ॥ १५ ॥ क्षत्रस्यैतद्रूपं यद्धिरण्यं ॥ १७ ॥ ज्योतिर्वै हिरण्यम् ॥ १६ ॥ शत० ब्रा० १३। अ० २। ब्रा० ११ ॥ न वै मनुष्यः स्वर्गं लोकमञ्जसा वेदाश्वो वै स्वर्गं लोकमञ्जसा वेद ॥ श० ब्रा० १३।२।१२।१ ॥ राष्ट्रमश्वमेधो ज्योतिरेव तद्राष्ट्रे दधाति ॥ १६ ॥ क्षत्रायैव तद्विशं कृतानुकरामनुवर्तमानं करोति ॥ १५ ॥ अथो क्षत्रं वा अश्वः । क्षत्रस्यैतद्रूपं यद्धिरण्यं क्षत्रमेव तत्क्षत्रेण समर्धयति ॥१७॥ विशमेव तद्विशा समर्धयति ॥ १९ ॥ श० ब्रा० १३। २। ब्रा० ११ गणानां त्वा गणपतिं ँ हवामह इति । पत्न्यः परियन्त्यपह्नुवत एवास्मा एतदतोऽन्येवास्मै ह्नुवतेऽथो धुवत एवैनं त्रिः परियन्ति । त्रयो वा इमे लोका**

(१) हा व या पुढें दिलेले महीधर भाष्यांतील उतारे अगदीं बीभत्स असल्यामुळें ते नुसते संस्कृतमध्येंच दिले आहेत. त्याचें भाषांतर वाचकानीं समजून घ्यावें.

**एभिरेवैनं लोकैर्धुवते त्रिः पुनः परियन्ति षट् संपद्यन्ते षड्वा ऋतवः । ऋतुभिरेवैनं धुवते । अप वा एतेभ्यः प्राणाः क्रामन्ति ये यज्ञे धुवनं तन्वते नवकृत्वः परियान्ति नव वै प्राणाः प्राणानेवात्मन्धत्ते । नैभ्यः प्राणा अपक्रामन्ति । आहमजानिगर्भधमात्वमजासि गर्भधमिति । प्रजा वै पशवो गर्भः प्रजामेव पशूनात्मन् धत्ते ॥**

**—शत० ब्रा० १३।२।२।४।५॥**

आम्ही ( गणानाम् ) पदार्थसमूहांचा ( गणपतिम् ) पालक, जो तूं, परमेश्वर ( त्वा ) त्या तुझा ( हवामहे ) स्वीकार करतों–तुझी उपासना करतों. त्याचप्रमाणें तूं ( प्रियाणाम् ) मोक्षादि आनंदस्थानाचा स्वामी आहेस त्या तुझी ( हवामहे ) आम्ही भक्ति करतों. तसेंच तूं ( निधीनाम् ) विद्या, ज्ञान, शास्त्र व रत्नें यांचा पालक आहेस, त्या तुझा आम्ही स्वीकार करतों. ( गर्भधम् ) तूं सर्व सूर्यचंद्रादिक गोलांनां आपल्या गर्भांत धारण करणारा आहेस. त्या तुला ( अहम् ) मी ( आ अजानि ) तुझ्या कृपेनें पूर्णपणें जाणूं इच्छितों. ( त्वम् ) हे ईश्वरा! तूं ( आ अजासि ) सर्व जाणत आहेस. हे परमेश्वरा! तूं ( गर्भधम् ) प्रकृति परमाण्वादिक सर्व विश्वगर्भाचें धारण करणारा आहेस. विश्वाचा गर्भ धारण करण्यास तूंच समर्थ आहेस. ( ब्राह्मणस्पत्यम् ) वेदांचा स्वामी, ज्ञानाचा रक्षक परमेश्वर आहे. ( ब्रह्मणा ) ब्रह्म किंवा वेद यांच्या उपदेशानें ( एनम् ) या जीवाला किंवा यजमानाला सत्योपदेष्टा विद्वान् ( भिषज्यति ) रोगरहित करतो, त्याच्या दुःखाचा नाश करतो. मुमुक्षु, पूर्णज्ञानी वैद्याची भवरोग दूर करण्यासाठीं नेहेमीं इच्छा करतो. वेदज्ञ व ब्रह्मज्ञानी गुरु हाच आत्म्याची चिकित्सा करणारा खरा वैद्य होय. ( प्रथः ) सर्वत्र व्यापक व ( सप्रथः ) प्रकृति, आकाश व स्वसामर्थ्य यांसहवर्तमान राहणारा हीं दोन नांवें त्याच्या गुणांवरून परमेश्वराला पडलीं आहेत. ( प्रजापतिः ) परमेश्वरालाच ( वै ) खरोखर ( जमदग्निः ) जमदग्नि असें म्हणतातः—

**जमदग्नयः प्रजमिताग्नयो वा प्रज्वलिताग्नयो वा तैरभिहुतो भवति ॥ निरु० ७।२४ ॥**

( प्रजमिताग्नयः प्रज्वलिताग्नयः ) हे सूर्यादिक दैदीप्यमान व पेटलेले अग्नीचे गोल आहेत ( तैः ) त्यांच्यायोगानें, त्यांच्या नियमित गतीनें ( अभिहुतः ) पूज्य परमेश्वर

बोधित होतो किंवा त्यांच्यायोगानें तो पूजित होतो. अर्थात् परमेश्वरालाच जमदग्नि असें म्हणतात व ( सः अश्वमेधः ) त्या परमेश्वरालाच अश्वमेध असेंहि म्हणतात. "अश्वमेध" या शब्दाचा परमेश्वर हा एक अर्थ झाला. त्याचा दुसरा अर्थ– ( क्षत्रं वा अश्वः ) राजा हा अश्व व ( विड् इतरे पशवः ) इतर प्रजा हे इतर पशु होत. ज्याप्रमाणें घोड्याशीं इतर बकरे, गाई वगैरे पशू हीनबल होतात तद्वत् प्रजाहि राजाशीं स्पर्धा करतांना हीनबल होते. राज्यांतील जें कांहीं ( हिरण्यम् ) द्रव्य, ( ज्योतिः ) प्रकाश व न्याय तेंच राजाचें ( रूपम् ) स्वरूप व थोरपण होय. अर्थात् "राजा व प्रजा यांचीं कर्तव्यें" हा दुसरा "अश्वमेध" शब्दाचा अर्थ झाला. "अश्व" शब्दाचा अर्थ परमेश्वर असाहि आहे:—

**अश्वो यत ईश्वरो वा अश्वः। शत० १३।३।८।५॥**
**अश्नुते व्याप्नोति सर्वं जगत् सोऽश्व ईश्वरः॥**

ईश्वर सर्व जग व्यापतो म्हणून त्याला "अश्व" असें म्हणतात. ( मनुष्यः ) सामान्य मनुष्याला ( स्वर्गं न वेद ) मोक्षाविषयीं ज्ञान नसतें. ( अश्वः ) परमेश्वरच ( स्वर्गं लोकम् ) मोक्षाला पूर्णपणें ( वेद ) जाणतो. अर्थात् परमेश्वराच्या अनुग्रहानें मनुष्य परमेश्वराला व मोक्षाला जाणूं शकतो. तसेंच तिसरा अर्थः– ( राष्ट्रम् ) राज्यालाच ( वा अश्वमेधः ) अश्वमेध असें म्हणतात. जो राजा ( राष्ट्रे ) राज्यपरिपालनामध्यें ( ज्योतिः ) प्रकाशाचा अर्थात् न्यायाचा ( दधाति ) अवलंब करतो ( तत् ) तें त्याचें कृत्य ( क्षत्राय ) प्रजांच्या दुःखाच्या नाशाला व राज्याच्या भाग्योदयाला कारणीभूत होतें. राजा आपल्या सुखासाठीं ( विशम् ) प्रजेला ( कृतानुकराम् अनुवर्तमानम् ) आपल्या अनुकूल ( करोति ) करतो. ( क्षत्रं वा अश्वः ) क्षात्रतेज किंवा क्षत्रिय हाच "अश्व" होय. ( हिरण्यम् ) द्रव्य हें ( क्षत्रस्य ) राज्याचें किंवा राजाचें ( रूपम् ) स्वरूप आहे. राजाचें सामर्थ्य आहे. त्याणें युक्त असणाऱ्या राजाच्या सहाय्यानें ( क्षत्रम् ) राज्य ( समर्धयति ) पूर्णपणानें वाढतें; पण प्रजा वाढत नाहीं. ( विशम् ) प्रजेची, ( विशा ) स्वतंत्र स्वभावयुक्त प्रजाजनच ( समर्धयति ) उन्नति करतात. अर्थात् अनियंत्रित राजसत्ता प्रजासुखविघातक होते म्हणून प्रजेच्या अनुकूलतेनें किंवा प्रजेच्या सत्तेनें राज्यप्रबंध चालवावा. ( पत्न्यः ) स्त्रिया, ( परियन्त्यः ) विद्यामय-संतानशिक्षणरूपी यज्ञ करीत असतां ( अपह्नुवते ) त्याच्या सिद्धीसाठीं अपह्नवाख्य यज्ञांगभूत कर्म करतात. ज्या स्त्रिया आपल्या संतानाला याप्रमाणें शिक्षण देत नाहींत त्यांनां विद्वान् लोक दूर करतात. ( एनम् ) या बालकाचें याप्रमाणें ( त्रिः ) त्रिवार

रक्षण करावें. प्रतिदिवशीं त्याचें सर्व प्रकारें रक्षण करून त्याच्या; शरीर, बल व आत्मा यांची पुष्टी करावी. जे ( गर्भधम् ) विश्वरूपी गर्भाला धारण करणाऱ्या परमेश्वराला जाणतात त्यांच्या शरीरांतून प्राण ( न अपक्रामन्ति ) बाहेर जात नाहींत. ते अजरामर होतात. म्हणून मनुष्यानें त्या परमेश्वराचें ज्ञान करून घ्यावें ( प्रजाः ) सर्व सृष्टींतील प्रजा व पदार्थ परमेश्वरापासूनच झाले आहेत. जो या प्रजांमध्यें ज्ञानी असतो तो ही सर्व प्रजा ( आत्मन् धत्ते ) परमात्म्यामध्यें आहे असें समजतो. ( अतति सर्वत्र व्याप्नोति इति आत्मा ) सर्वत्र व्यापतो म्हणून ईश्वराला आत्मा असें म्हणतात. याप्रमाणें शतपथ ब्राह्मणाच्या आधारानें "**गणानांत्वा**" या मंत्राचा अर्थ संक्षेपानें सांगितला. या वरील शतपथ ब्राह्मणाच्या उताऱ्याशीं व त्यांतील अश्वमेधाच्या राष्ट्रीय कल्पनेशीं महीधराची बीभत्स कल्पना वाचकांनींच जुळवून पहावी. म्हणजे महीधरानें " यजमानपत्नीला यज्ञशाळेंत सर्व सभागण पहात असतां घोड्याशीं जारकर्म करावयास लावलें " तें कितपत खरें आहे याचा खुलासा तेव्हांच होईल. तसेंच:—

**ता उभौ चतुरः पदः सम्प्रसारयाव स्वर्गे लोके प्रोर्णुवाथां वृषा वाजी रेतोधा रेतो दधातु ॥ २ ॥** यजु० २३।२०॥

**महीधर भाष्यम्**—" + + अश्वशिश्नमुपस्थे कुरुते । वृषा वाजीति । महिषी स्वयमेव अश्वशिश्नम् आकृष्य स्वयोनौ स्थापयति + + + "

खरा अर्थः—

**ता उभौ चतुरः पदः सम्प्रसारयावेति । मिथुनस्यावरुध्यै स्वर्गे लोके प्रोर्णुवाथामित्येष वै स्वर्गो लोको यत्र पशुꣳसंज्ञपयन्ति तस्मादेवमाह वृषा वाजी रेतोधा रेतो दधात्विति मिथुनस्यैवावरुध्यै ॥ शत० १३।२।२।९ ॥**

पूर्वोक्त आम्ही-[ राजा व प्रजा मिळून ] ( उभौ ) दोघेहि धर्म, अर्थ, काम व मोक्ष या ( चतुरः पदः ) चार पुरुषार्थांनां सदैव प्राप्त करून घेऊन, या चार पुरुषार्थांच्या द्वारें ( सम्प्रसारयाव ) आम्ही आमचा विस्तार करूं. धर्म वाढवूं. ( स्वर्गे लोके० ) त्या योगानें आम्हांला आनंदमयस्थान प्राप्त होईल. ज्या राज्यामध्यें ( पशुम् )

पशूच्या स्वभावाप्रमाणें वर्तन करणाऱ्या माणसाला, परद्रव्यापहार करणाऱ्या स्वार्थी मनुष्याला किंवा अज्ञ व स्वार्थी मनुष्याला विद्योपदेश व कृतापराधाबद्दल दंड करून ( संज्ञपयन्ति ) उत्तम रीतीचें शिक्षण देऊन वळण लावतात, अशा ( एष वै स्वर्गः ) सुख व न्यायमय देशाला स्वर्ग असें म्हणतात. ( तस्मात् ) म्हणून राजा व प्रजा यांच्या सुखासाठीं, ( वृषा-वर्षकः ) विद्यादिसद्गुणांचा उपदेशानें वर्षाव करणारा व ( वाजी ) विज्ञानवान् मनुष्य ( रेतः ) विद्या व बल ( दधातु ) धारण करो. ( रेतोधाः ) विद्या व बल यांनीं युक्त असणारानें आपल्या ज्ञान व बल यांचा विनियोग राजा व प्रजा यांच्या सुखवृद्ध्यर्थ करावा.

**यकासकौ शकुन्तिका हलगिति वञ्चति ॥**
**आहन्ति गभे पसो निगल्गलीति धारका॥**

**यजु० २३।२२॥**

**महीधरभाष्यम्**—"अध्वर्य्वादयः कुमारीपत्नीभिः सह सोपहासं संवदन्ते । अङ्गुल्या योनिं प्रदेशयन्नाह स्त्रीणां शीघ्र गमने योनौ हलहलाशब्दो भवतीत्यर्थः । भगे योनौ शकुनिसदृश्यां यदा पसो लिङ्गमाहन्ति आगच्छति । पुंस्प्रजननस्यनाम हन्तिर्गत्यर्थः। यदा भगे शिश्नमागच्छति तदा धारका धरति लिङ्गम् इति धारका योनिः । निगल्गलीति नितरां गलति वीर्यं क्षरति । यद्वा शब्दानुकरणं गलगलेति शब्दं करोति । यकासकौ० कुमारी अध्वर्युं प्रत्याह । अङ्गुल्या लिङ्गं प्रदेशयन्ती आह । अग्रभागे सच्छिद्रं लिङ्गं तव मुखमिव भासते + + ॥"

खरा अर्थः—

**यकासकौ शकुन्तिकेति । विड्वै शकुन्तिका । हलगिति वञ्चतीति । विशो वै राष्ट्राय वञ्चति । आहन्ति गभे पसो निगल्गलीति धारकेति । विड् वै गभो राष्ट्रं पसो राष्ट्रमेव विश्याहन्ति तस्माद्राष्ट्री विशं घातुकः ॥**

**शत० १३।२।३।६॥**

( विड् वै शकुन्तिका ) प्रजा ही शकुन्त पक्षाप्रमाणें आहे व राजा गिधाडाप्रमाणें आहे. गिधाडापुढें जसा शकुंतपक्षी कांहीं करूं शकत नाहीं तद्वत राजाच्या अनियंत्रित शक्तीपुढें प्रजेचें कांहीं चालत नाहीं. ( विशः वै ) खरोखर प्रजाच ( राष्ट्राय )

राज्यसुखाला (वघ्नति ) ठकली जाते. सदैव क्रूर राजाच्या राज्यांत प्रजेला सुख मिळत नाहीं. (विट् वै गभः) प्रजेला "गभ" असें नांव आहे व "पस" हें राजाला नांव आहे. राजा हा स्वसामर्थ्यानें ( विशि ) प्रजेमध्यें शिरून ( आहन्ति ) सर्व प्रकारें प्रजेला पीडा देतो. ( तस्मात् ) म्हणून ( राष्ट्री ) अनियन्त्रित मत्तराजा ( विशम् ) प्रजेला ( घातुकः ) दुःख देणारा होतो. म्हणून लोकनियुक्त सदाचारी, शुभगुणयुक्त, न्यायकारी व विद्वान् असा सभाध्यक्ष जो असेल त्याला प्रजाजनांनीं राजा असें मानावें.

या शतपथ ब्राह्मणांतील स्पष्टीकरणांत "गभ" शब्दाचा अर्थ "प्रजा" असा स्पष्ट दिला असतांहि महीधरानें त्याचा "योनी" असा मनःकल्पित अर्थ करून वीभत्स अर्थ मुद्दाम केला !

**माता च॑ ते पि॒ता च॒ तेऽग्रं॑ वृ॒क्षस्य॑ रोहतः।**
**प्रति॑ला॒मीति॑ ते पि॒ता ग॒भे मु॒ष्टिम॑तं-**
**ऽसयत् ॥** यजु० २३।२४ ॥

**महीधर भाष्यम्।** "ब्रह्मा महिषीमाह महिषि हये हये महिषि । ते तव माता च पुनस्ते तव पिता यदा वृक्षस्य वृक्षजस्य-काष्ठमयस्य मञ्चकस्य अग्रं उपरिभागं रोहतः आरोहतः तदा ते पिता गभे भगे मुष्टिं मुष्टितुल्यं लिङ्गम् अतंसयत् तंसयति क्षिपति । एवं तवोत्पत्तिः इत्यश्लीलम् । लिङ्गम् उत्थानेनालङ्करोति वा तव भोगेन स्निह्यामि इति वदन् एवं तवोत्पत्तिः ॥"

खरा अर्थः—

**माता च ते पिता च त इति । इयं वै मातासौ पिता-भ्यामेवैनꣳ स्वर्गं लोकं गमयत्यग्रं वृक्षस्य रोहत इति । श्रीर्वै राष्ट्रस्याग्रꣳ श्रियमेवैनꣳ राष्ट्रस्याग्रं गमयति । प्रतिलामीति ते पिता गभे मुष्टिमतꣳसयदिति । विड्वै गभो राष्ट्रं मुष्टी राष्ट्रमेवविश्याहन्ति । तस्माद्राष्ट्री विशं घातुकः ॥** शत० ब्रा० १३।२।३।७ ॥

हे मनुष्या ( इयम् ) ही पृथिवी किंवा ही विद्या तुझी माता होय व हा परमेश्वर, प्रकाश व विद्वान् हे तुझ्या पितृस्थानीं होत. ( आभ्याम् ) विद्या व विद्वान् यांच्या सहाय्यानेंच ( एनम् ) याला ( स्वर्गम् ) सुखात्मक लोकाला ( गमयति ) जातां येतें.

(श्रीः) विद्या, संपत्ति, शुभगुणसमृद्धि हें राष्ट्राचें अग्र आहे. अर्थात् उत्तमांग आहे. ज्या अर्थी (राष्ट्रम्) राजा (विट्) प्रजाजनांमध्यें (मुष्टी-करः) करांच्या रूपानें (आहन्ति) सर्व प्रकारें दुःख उत्पन्न करतो (तस्मात्) त्याअर्थी (राष्ट्री) मत्त झालेला राजा (विशं घातुकः) प्रजेला त्रास देणारा असा होतो. या शतपथ ब्राह्मणांतील अर्थाशीं महीधराचा अश्लील अर्थ तोलून पहावा. म्हणजे महीधरानें मुद्दाम कसा अनर्थ केला आहे तें दिसेल.

**ऊ॒र्ध्वामे॑नामु॒च्छ्रा॑पय गि॒रौ भा॒रᳫं॒ हर॑न्निव।**
**अथा॑स्यै॒ मध्य॑मेधतां शी॒ते वाते॑ पु॒नन्नि॑व॥**

यजु० २३।२६॥

**महीधर भाष्यम्**—" यथा अस्यै अस्या वा वाताया मध्यमेधतां योनिप्रदेशो वृद्धिं यायात् यथा योनिर्विशाला भवति तथा मध्ये गृहीत्वा उच्छ्रापय इत्यर्थः। दृष्टान्तरमाह। यथा शीतले वायौ वाति पुनन् धान्यपवनं कुर्वाणः कृषीवलः धान्यपातं ऊर्ध्वं करोति तथा इत्यर्थः॥" तसेंच:--

**यद॑स्या अᳫंहु॒भेद्याः॑ कृ॒धु स्थू॒लमु॒पात॑सत्॥**
**मु॒ष्कावि॑द॑स्या एजतो गोश॒फे श॑कु॒ला-**
**वि॑व॥** यजु० २३।२८॥

**महीधर भाष्यम्**—" यत् यदा अस्याःपरिवृक्तायाःकृधु-ह्रस्वं स्थूलं च शिस्नमुपातसत् उपागच्छत् योनिं प्रतिगच्छेत् तं स उपक्षये तदा मुष्कौ वृषणौ इत् एव अस्याः योनेरुपरि यजतः कम्पेते। लिङ्गस्य स्थूलत्वात् योनेःअल्पत्वात् वृषणौ बहिस्तिष्ठत इत्यर्थः। तत्र दृष्टान्तः। गोशफे जलपूर्णे गोखुरे शकुलौ मत्स्याविव यथा उदकपूर्णे गोःपदे मत्स्यौ कम्पेते॥",

याप्रमाणें हा महीधराचा अश्लील अर्थ पाहिल्यानंतर शतपथांतील खरा अर्थ पहाः--

**ऊर्ध्वामेनामुच्छ्रापयेति। श्रीर्वै राष्ट्रमश्वमेधः। श्रियमेवास्मै राष्ट्रमूर्ध्वमुच्छ्रापयति॥२॥गिरौ भारᳫं हरन्निवेति। श्रीर्वै राष्ट्रस्य भारः। श्रियमेवास्मै राष्ट्रᳫं सन्नह्यथो**

**श्रियमेवास्मिन् राष्ट्रमधिनिदधाति ॥३॥ अथास्यै मध्यमेधतामिति । श्रीर्वै राष्ट्रस्य मध्य ॰ श्रियमेव राष्ट्रे मध्यतोऽन्नाद्यं दधाति॥४॥शीतेवाते पुनन्निवेति । क्षेमो वै राष्ट्रस्य शीतं क्षेममेवास्मै करोति ॥५॥ शत० ब्रा० १३।२।३॥**

हे मनुष्या! तू राष्ट्रपरिपालन रूपी अश्वमेधयज्ञ कर व राष्ट्रासाठीं संपत्तीचा उत्तम व्यय करून ( राष्ट्रम् ) राष्ट्राला ( ऊर्ध्वाम् ) उर्जित दशेला ( उच्छ्रापय ) आण. राष्ट्राची अवनति करूं नको. ( गिरौ ) पर्वतावर ( भारं हरन् ) भारवान् पदार्थ घेऊन जाणें कठीण आहे तसेंच राष्ट्राची उर्जितदशा आणणेंहि कठीण आहे. ( श्रीः ) सर्व प्रकारच्या संपत्ती हाच ( राष्ट्रस्य भारः ) राज्याचा भार आहे. सभेच्या उत्तम व्यवस्थेनें राज्य चालवून सर्व प्रकारच्या संपत्ती वाढवून राष्ट्र उच्चतम स्थितीला न्यावें. अशा प्रकारें राष्ट्रहित करणारा मनुष्य ( अस्मिन् ) या ठिकाणीं ( राष्ट्रम् ) राज्य संपत्तिमान करून ( अधि-निदधाति ) त्याला सर्वांत श्रेष्ठ करतो. संपत्तीच राष्ट्राचा ( मध्यम् ) मध्य आहे. ( अन्नाद्यं दधाति ) राष्ट्रहित करणारा सर्व प्रकारचे भोग्य पदार्थ राज्यांत उत्पन्न करतो. ( क्षेमः ) स्वस्थता, शांति हाच राष्ट्राचा शीतल वायु होय. राज्य उत्तम सभेच्या सहाय्यानें चालविल्यास तो उत्पन्न होतो व सर्वांस आनंद देतो. [ याप्रमाणें त्याच मंत्राचा ब्राह्मणग्रंथांत अर्थ स्पष्ट दिला असतां महीधरानें उच्चार करण्यासहि अति वाईट व बीभत्स असा अर्थ कोणत्या हेतूनें केला हें समजत नाहीं. त्याच्या अर्थाला अवश्य असणारे "शिश्न व योनी" हे शब्दाहि मंत्रांत नाहींत असें असतां त्याणें ओढताण कशी केली आहे ती वाचकांनीं पहावी ]

**यद्देवासो ललामगुं प्रविष्टीमिनमाविषुः ॥ सक्थ्ना देदिश्यते नारी सत्यस्याक्षिभुवो यथा ॥ यजु० २३।२९॥**

**महीधर भाष्यम्**—"यत् यदा देवासः देवाः दीव्यन्ति क्रीडन्ति देवाः होत्रादयः ऋत्विजो ललामगुं लिङ्गं प्र आविशुः योनौ प्रवेशयन्ति ललामेति सुखनाम सुखं गच्छति प्राप्नोति ललामगुः शिश्नः । यद्वा ललाम पुण्ड्रं गच्छति ललामगुः लिङ्गं योनिं प्राविशत् + + + + + यदा देवाः शिश्नक्रीडिनो भवन्ति + + +"

[ ज्याला मूळ भाष्यांतील बीभत्सपणा पहावयाचा असेल त्याणें महीधरभाष्यच पहावें. तें संस्कृतमध्यें छापणेंहि घातुक वाटल्यावरून आम्ही त्याचें नुस्तें दिग्दर्शन करीत आहों. ] वरील मंत्राचा खरा अर्थ—

( यद्देवासः ) ज्यावेळीं विद्वानांनीं प्रत्यक्ष उत्पन्न झालेल्या सत्यज्ञानाची प्राप्ति करून घेऊन ( विष्टीमिनम् ) विविध प्रकारच्या दयेनें युक्त ( ललामगुम् ) सुख प्राप्त करून देणारा विद्येचा आनंद ( प्राविषुः ) प्राप्तकरून घेतला व सर्वांना प्राप्त करून दिला तेव्हां त्यांच्या प्रज्ञेचा प्रत्यय आला. ज्याप्रमाणें ( नारी ) स्त्री सुवस्त्रानें आच्छादित असते त्याप्रमाणें विद्वानांनीं सुखांनीं राज्यांतील प्रजा व्यापून टाकावी. अर्थात् सर्वांना सुख द्यावें.

**यद्धरिणो यवमत्ति न पुष्टं पशुमन्यते ॥**
**शूद्रा यदर्यजारा न पोषाय धनायति ॥**

**यजु० २३।३० ॥**

**महीधरभाष्यम्** ।—"शूद्रा शूद्रजातिः स्त्री यदा अर्यजारा भवति वैश्यो यदा शूद्रां गच्छति तदा शूद्र पोषाय न धनायते पुष्टिं न इच्छति + + + "

खरा अर्थः—

**यद्धरिणो यवमत्तीति । विड्वै यवो राष्ट्र्ँ हरिणो विशमेव राष्ट्रायाद्यां करोति तस्माद् राष्ट्री विशमत्ति । न पुष्टं पशुमन्यत इति । तस्माद्राजा पशून्न पुष्यति । शूद्रा यदर्यजारा न पोषाय धनायतीति । तस्माद्वैशी पुत्रं नाभिषिञ्चति ॥ शत० ब्रा० १३।२।३।८॥**

( राष्ट्रं हरिणः ) राजा हा हरिण व ( विड् यवः ) प्रजा ही यवरूपी होय. हरिण जसा यव खातो तद्वत् राजा ( राष्ट्री विशम् अत्ति ) प्रजेला कर ग्रहण करून खाऊन टाकतो. प्रजेला फार दुःख देतो. जसा मांसाहारी प्राणी दुसऱ्या पुष्ट पशूला पाहून त्याच्या मांसभक्षणाची इच्छा करतो तद्वत् मत्तराजा स्वसुखासाठीं प्रजेची हानि करतो, प्रजेमध्यें बलवान् होणाऱ्या पुरुषांना नष्ट करतो. ( न पुष्टं मन्यते ) प्रजेमध्यें कोणीहि बलवान् होऊं नये असें त्याला वाटतें. ज्याप्रमाणें

( शुद्रा अर्यजारा ) शूद्रस्त्री वैश्याशीं जार कर्म करते पण त्यायोगें शूद्र धनवान् होत नाहीं तद्वत् जर राजानें प्रजेला समृद्ध केलें नाहीं तर प्रजा समृद्ध होत नाहीं. म्हणून (वैशीपुत्रम्) वैश्य किंवा शूद्र यांच्या पुत्राला त्यांच्या भीरुत्वामुळें ( न अभिषिञ्चति ) राज्यावर बसवीत नाहींत. चांगल्या विद्वानालाच बसवितात. इ०

**उत्स॑क्थ्या॒ अव॑ गु॒दं धे॑हि॒ सम॒ञ्जिं चा॑रया वृषन् ॥ यस्त्री॒णां जी॑व॒भोज॑नः ॥**

यजु० २३।२१ ॥

**महीधरभाष्यम्—**" यजमानोऽश्वमभिमन्त्रयते । हे वृषन् सेक्तः अश्व उत् ऊर्ध्वे सक्थिनी यस्यास्तस्या महिष्या गुदमेव गुदोपरि रेतो धेहि वीर्यं धारय । कथं तदाह अञ्जिं लिङ्गं संचारय योनौ प्रवेशय । यो अञ्जिः स्त्रीणां जीवभोजनः + + + "

खरा अर्थः—( हे वृषन् ) हे सर्व इच्छा पूर्ण करणाऱ्या सभाध्यक्ष! हे राजन्! हे विद्वन्! तूं या प्रजेच्या ठिकाणीं ( अञ्जिम् ) ज्ञान, सुख व न्याय ( संचारय ) यांचा प्रसार कर. ( यः ) जो कोणी ( स्त्रीणाम् ) स्त्रियांच्या ( जीवभोजनः ) आयुष्याला भक्षण करणारा—अर्थात् जारकर्म करणारा—असेल त्याला तूं ( अवगुदः ) खालीं डोकें व वर पाय करून दण्ड कर. त्याचप्रमाणें जी स्त्री ( उत्सक्थी ) व्यभिचारिणी असेल व जो कोणी पर प्राणनाशक असेल त्यालाहि यथोचित दण्ड कर. इत्यादि.

या प्रमाणें महीधरकृत भाष्याचा मासला आहे. त्याच्या अर्थामध्यें व शतपथाच्या अर्थामध्यें किती अंतर आहे हेंहि सारांशरूपानें दाखविलेंच आहे. विस्तारभयास्तव जास्त खुलासा करतां आला नाहीं. तेथें नाइलाज आहे. या भाष्यांवर यूरोप देशांतील पंडितांची सर्व भिस्त आहे. तेव्हां त्यांचीं भाष्यें कशीं झालीं असतील व त्यांची वैदिक धर्माविषयीं काय काय मतें झालीं असतील हें निराळें लिहिणें नलगे. म्हणून यांच्या अनर्थोत्पादक भाष्यांवर कोणीहि विश्वास ठेवूं नये **परमेश्वरानें दिलेल्या दिव्यज्ञानमय मंत्रांचे व सर्व विद्यामय सूक्तांचे असे अनर्थ महीधरासारख्यानें बनवावे व ते आर्यावर्तांतील लोकांनीं प्रमाण मानावे हें फारच आश्चर्य.** ब्राह्मण ग्रंथांत त्या त्या मंत्रांचा स्पष्ट अर्थ दाखविला असतांहि जो मनुष्य मंत्राचा अर्थ मुद्दाम कुत्सित व बीभत्स करतो त्याची योग्यता काय आहे याचा वाचकांनींच विचार करावा.

---

( १ ) " जॄ—वयोहानौ " या धातूवरून " जार हा शब्द बनतो. त्याचा अर्थ " आयुष्य कमीकरणारा " असा होतो व तोच अर्थ " जीवभोजनः " याचा आहे.

# धर्मविषयक प्रश्नोत्तरें.

(प्रश्न) वेदाचे चार भाग कां केले आहेत? (उत्तर) वेदमंत्रांचे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद असे चार भाग केले आहेत ते भिन्न भिन्न विद्या स्पष्ट करून दाखवण्यासाठीं होते. (प्र०) त्यांतील भेद काय? (उ०) द्रुत, मध्यम, विलंबित या तीन भेदांनीं गाण्याचे स्वर तीन प्रकारचे झाले आहेत. एक मात्रेचा ऱ्हस्व, त्याच्या दुप्पट दोन मात्रांचा दीर्घ व तीन मात्रांचा प्लुत होय. या उच्चारांच्या भेदामुळें, त्या त्या स्वरांत तो तो वेदमंत्र म्हणतां यावा म्हणून पुष्कळ मंत्रांची वेदांमध्यें द्विरुक्ति, त्रिरुक्तीहि केलेली आहे व ऋग्वेदांत आलेला मंत्र यजु किंवा सामवेदांमध्येंहि घातलेला आहे. याचें कारण, ते ते मंत्र त्या त्या विशेष स्वरांत म्हटले जावे हेंच आहे. ऋग्वेदानें स्तुति करतात, यजुर्वेदानें यजन करतात व सामानें गायन करतात. ऋग्वेदांतील मंत्रांमध्यें सर्व पदार्थांच्या गुणांचें कथन केलेलें आहे. यजुर्वेदामध्यें पूर्वीं समजलेल्या पदार्थांच्या गुणांच्या योगानें विविधक्रिया कशा कराव्या व अनेक विद्या कशा साध्य कराव्या तें लिहिलें आहे. सामवेदामध्यें ज्ञान, क्रिया व विद्या यांसंबंधी दीर्घ विचार अर्थात् फलप्राप्तिपर्यंतचा विचार सांगितला असून अथर्ववेदामध्यें पूर्वींच्या तीनहि वेदांमध्यें आलेल्या विद्यांचें रक्षण, उन्नति व पूर्ति यांसंबंधानें पूर्ण विचार आहे. या चार भिन्न प्रकरणांचा स्पष्ट बोध व्हावा म्हणून वेदाचे चार विभाग केले आहेत. (प्र०) असे चार विभाग केले नसते तर काय हानि झाली असती? (उ०) अनेक विद्याविधायक मंत्रांचा प्रकरणपूर्वक पूर्वापार संबंध कळला नसता व सुगमतेनें त्या त्या विद्यांचा प्रकाश झाला नसता. म्हणून चार विभाग व त्यांतील प्रकरणांची व्यवस्था जशी केली आहे तशीच होणें अत्यावश्यक आहे. (प्र०) अष्टक, अध्याय, मण्डळ, सूक्त, काण्ड, वर्ग वगैरे व्यवस्था वेदांमध्यें आढळते ती कां? (उ०) सुगमतेनें मंत्रांचें परिगणन करतां यावें व पठनपाठनक्रम सुलभ व्हावा म्हणून तशी व्यवस्था केली आहे. (प्र०) ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद हे चार वेद पहिला, दुसरा, तिसरा व चौथा याच क्रमानें कां मानले जातात? (उ०) पहा, जोंपर्यंत गुण व गुणी, धर्म व धर्मी यांचें योग्य ज्ञान होत नाहीं तोंपर्यंत तत्संबंधीं संस्कार व प्रीति होणार नाहीं. व संस्कारावांचून कशाविषयींहि प्रवृत्ति होणार नाहीं व प्रवृत्तिवांचून कर्म व सुख हींहि होणार नाहींत. ऋग्वेदामध्यें पदार्थमात्रांचे गुणधर्म सांगितले आहेत म्हणून तो प्रथमतः सांगितला. पदार्थांचे गुणधर्म समजल्यानंतर त्यांचा कर्मांकडे विनियोग करून सर्व जगद्धित संपादन करावयाचें हें यजुर्वेदानें साधणारें असल्यामुळें तो दुसरा आहे असें मानलें. ज्ञान व कर्म यांच्या पासून उपासनेची उत्पत्ति प्रसिद्ध आहे.

उपासनेची मजल कोठपर्यंत आहे व तिच्यापासून मनुष्यांची उन्नति किती होते हें सामवेदांत सांगितलें असल्यामुळें तो तिसरा समजण्यांत आला. याचप्रमाणें तीनहि वेदांतील अनंत विद्यांचें परिशिष्ट व त्यांचें रक्षण तोच अथर्ववेद असल्यामुळें तो चवथा मानला गेला. (१) गुणज्ञान (२) कर्म (३) विज्ञान व (४) पूर्णता हे चार मुख्य विषय क्रमानें एकापुढें एक असेच असल्यामुळें ऋग्वेदादि चार वेदहि त्याच क्रमानें मानण्यांत येतात व तसेंच मानणें युक्तिसिद्ध आहे. "**ऋच्–स्तुतौ**"; "**यज–देवपूजा संगतिकरणदानेषु**"; "**साम–सान्त्वने**"; "**षो–अन्तकर्मणि**"; "**थर्वति–चरतिकर्मा तत्प्रतिषेधः**" निरु. ११।१८॥ या धातूंवरून अनुक्रमें ऋक्, यजुः, साम व अथर्व हीं वेदाचीं नांवें सिद्ध झालीं आहेत. या धात्वर्थांवरूनहि त्या त्या वेदांच्या नांवांचे अर्थ समजूं शकतील. (प्र०) प्रत्येक मंत्रावर ऋषि, देवता, छंद व स्वर लिहिलेले असतात ते कां? (उ०) परमेश्वरानें वेदांची स्फूर्ती अग्नि, वायु, रवि यांच्या अंतःकरणांत केल्यानंतर ज्या ज्या ऋषीनें ज्या ज्या मन्त्रांतील योग्यतेला साक्षात्कारानें जाणलें त्या त्या मंत्राची योग्यता दर्शविणारा तो तो ऋषि वेदमंत्र मानला गेला व ज्या ज्या ऋषीनें ईश्वराचें समाधिद्वारा ध्यान करून मंत्रानुग्रह संपादन केला व त्याच्या कृपेनें वेदमंत्रार्थ जाणून त्यांतील ऋषिगुणांचा प्रकाश केला त्या त्याच्या महान् उपकाराबद्दल त्याचें नांव त्या मंत्रावर लिहिणें योग्यच होय. "ऋषयो मंत्रद्रष्टारः" मंत्राचा अर्थ पहाणारे व मंत्राचा साक्षात्कार करून घेणारे ते ऋषि होत. तसेंच निरुक्तांत म्हटलें आहेः—

**यो वाचं श्रुतवान् भवत्यफलामपुष्पामित्यफला स्मा अपुष्पा वाग्भवतीति वा किंचित्पुष्पफलेति वार्थं वाचः पुष्पफलमाह । याज्ञदैवते पुष्पफले देवताध्यात्मेवा ॥ साक्षात्कृतधर्माण ऋषयो बभूवुस्तेऽवरेभ्योऽसाक्षात्कृतधर्मभ्य उपदेशेन मन्त्रान्सम्प्रादुरुपदेशाय ग्लायन्तोऽवरे बिल्मग्रहणायेमं ग्रन्थं समाम्नासिषुर्वेदं च वेदाङ्गानि च बिल्मं भिल्मं भासनमिति वैतावन्तः समानकर्माणो धातवो धातुर्दधातेरेतावन्त्स्य सत्त्वस्य नामधेयान्येतावतामर्थानामिदमभिधानं नैघण्टुकमिदं देवतानाम-**

प्राधान्येनेदमिति तद्यदन्यदैवते मन्त्रे निपतति नैघण्टुकं तत् ॥ —निरु० १।२० ॥

(यो वाचं श्रुतवान्) ज्याणें अर्थज्ञानावांचून विद्याश्रवण व अध्ययन केलें (अफलाम्) त्याची ती विद्या त्याला कधींहि फलद्रुप होणार नाहीं. विज्ञान व ज्ञानानुसार कर्मानुष्ठान हीं दोन विद्येचीं फळें आहेत. जे याप्रमाणें विज्ञानवान् होतात त्यांस ऋषी असें म्हणतात. (साक्षात् कृतधर्माणः) त्यांणीं सर्व गुणधर्मांचा साक्षात्कार व अनुभव केलेला असतो. यज्ञ व अध्यात्म हीं फळें त्यांस प्राप्त झालेलीं असतात. असे थोर ऋषी व मुनी (अवरेभ्यः) वेदज्ञानहीन मनुष्यांनां मंत्रार्थांचा उपदेश करून त्यांच्या अंतःकरणांत मंत्रार्थांचा प्रकाश पाडतात. वेदांच्या अर्थांचा प्रसार व्हावा हा त्यांचा मुख्य उद्देश असतो. (उपदेशाय ग्लायन्तः) जे वेदांचा अर्थ समजण्यास असमर्थ असतील त्यांनां (इमं ग्रंथम्) हा निरुक्त ग्रंथ ते ऋषी शिकवितात. त्यांच्याकडून निरुक्ताचा अभ्यास करवितात. याच्या योगानें वेदांग ग्रंथांचाहि त्यांच्या अंतःकरणांत चांगला प्रकाश पडतो. ज्या ग्रंथांत समानार्थक धातू व समानार्थक शब्द दिलेले असतात त्या ग्रंथास निघण्टु असें म्हणतात. ज्या मंत्रांत प्रधानत्वेंकरून ज्याचें वर्णन व स्तुति असेल ती त्या मंत्राची देवता होय. अर्थात् ज्या मंत्राचा जो अर्थ तीच त्या मंत्राची देवता. म्हणून त्या त्या मंत्राची देवता लिहिण्याचा प्रघात पडला आहे. देवता पाहिल्याबरोबर मंत्राचा उद्दिष्ट अर्थ ध्यानीं येतो. मंत्राचा छंद समजण्यासाठीं त्याचा येथें उल्लेख केलेला असतो व तो तो मंत्र वादित्रवादनपूर्वक ज्या स्वरांत म्हणावयाचा तो स्वर तेथें दिलेला असतो. या सर्वांचा विशेष उपयोग आहे हें विचाराअंतीं प्रत्येकास कळून येईल. मंत्राचा ऋषि हा त्याचा कर्ता नसून, त्याचा द्रष्टा आहे हेंहि या ठिकाणीं लक्षांत ठेवलें पाहिजे.

(प्र०) वेदांमध्यें अग्नि, वायु, इंद्र, अश्विनौ, सरस्वती इत्यादि देवतांचा पाठ याच क्रमामध्यें कां केला आहे? (उ०) पूर्वापरविद्यांचा बोध व्हावा म्हणून प्रथमतः "अग्नि" हा शब्द आला आहे. त्याचा अर्थ "परमेश्वर" व "भौतिक अग्नि" असा आहे. या शब्दानें परमेश्वराचे सर्वज्ञत्व, व्यापकत्व इत्यादि गुण व्यक्त होतात व भौतिक अग्नि शिल्पविद्येमध्यें मुख्य व आमच्या सर्व व्यवहारांत अत्यावश्यक असल्यामुळें त्याचें ग्रहण सर्वांत आधीं केलें आहे. नंतर अग्नीचा सहाय्य–कारी वायु आला आहे. याचेहि "परमेश्वर" व "वारा" असे दोन अर्थ आहेत. याच्या योगानें सर्वाधारकत्व, अनंतबलत्व इत्यादि परमेश्वराचे गुण व्यक्त होतात व भौतिक वायूचे मूर्तद्रव्यांनां आधार, अग्नीला सहाय्य देणारा इत्यादि गुण व्यक्त होतात. इंद्र शब्दानें परमेश्वराचें ऐश्वर्य दाखविलें जातें. इंद्र शब्दानें दाखविला जाणारा भौतिक अर्थ विद्युत्, वायु व प्रकाश

हा आहे हेहि मनुष्याचें ऐश्वर्य वाढविणारे पदार्थ आहेत म्हणून त्यांचें ग्रहण नंतर केलें. "अश्विन्" शब्दाचे अर्थ "विद्युत्, जल, पृथिवी, प्रकाश" इत्यादि होतात व "परमेश्वर" असाहि त्याचा अर्थ होतो. शिल्पविद्या, यानगति, विद्याव्यवहार यांमध्यें वरील पदार्थ विशेष उपयोगाचे असल्यामुळें इंद्राच्या नंतर त्यांचें ग्रहण केलें आहे. "सरस्वती" शब्दानें परमेश्वराचें सर्वविद्यावत्व व्यक्त होत आहे. तसेंच शब्दार्थसंबंध व वाग्व्यवहारहि—सरस्वतीमुळेंच साधणारे असतात म्हणून सरस्वती शब्दाचा पाठ नंतर केला आहे. याप्रमाणें वेदांतील देवतांची व्यवस्था आहे. एकापुढें दुसरी देवता कां आली याचें हें केवळ दिग्दर्शन आहे. विशेष स्पष्टीकरण, शब्दार्थ व मंत्रार्थ यांच्या सहाय्यानें जाणावें. (प्र० ) वेदांमध्यें आरंभीं "अग्नि, वायु" इत्यादि भौतिक शब्दांचा पाठ असल्यामुळें वेदांमध्यें भौतिक पदार्थांचीच उपासना आहे असें ठरतें कीं नाहीं? जर सर्व शब्दांनीं ईश्वराचाच बोध घ्यावयाचा तर अग्निशब्दाऐवजीं परमेश्वर या शब्दाचाच पाठ कां नाहीं केला? (उ० ) अज्ञ माणसांनां संदेह उत्पन्न झाला म्हणून तेवढ्यानें वस्तुस्थिति उलट मानावी असें होत नाहीं "**व्याख्यानतो विशेष प्रतिपत्तिर्नहि संदेहादलक्षणम्**" या (लण सूत्रस्थ) महाभाष्यांतील पतंजलीच्या उक्तीप्रमाणें विचार केल्यास संदेहनिवृत्ति होते. "अग्नि" आदिक शब्दांच्या अर्थासंबंधानें वेद-वेदांग-ब्राह्मणग्रंथ इत्यादि ग्रंथांकडे पाहतां असें आढळून येतें कीं, अग्नि शब्दाचे "परमेश्वर व भौतिक अग्नि" असे दोन अर्थ स्पष्ट होतात. येथें कोणी असें म्हणेल कीं, इतका खटाटोप करण्याचें कारण काय? अग्न्यादि शब्दांचे ठिकाणीं ईश्वर हाच शब्द योजावा म्हणजे झालें. यावर उत्तर असें कीं "ईश्वर" हा शब्द जसा परमेश्वराचा वाचक आहे तसा तो "राजा" या अर्थींहि वापरण्यांत येतो. कोणत्याहि शब्दाचे दोन तीन अर्थ होणें शक्य आहेत व तसे झाले म्हणजे संशय उत्पन्न होणारच. ईश्वर शब्दाच्या प्रयोगानेंहि जर "राजाचें ग्रहण करावें कीं परमात्म्याचें ग्रहण करावें" असा संशय उत्पन्न होतो तर तो "अग्नि" शब्दानें झाला तर काय हरकत आहे. व्याख्यानानें संशयनिवृत्ति होईलच. अर्थात् अग्नि आदिक शब्दांचे प्रयोग जे आहेत तेंच ठीक आहेत. शिवाय अग्नि शब्दानें जसे परमेश्वराचे निरानिराळे गुण दाखविले जातात तसे भौतिक अग्नीचेहि दाखविले जातात. त्याचप्रमाणें वायु, इंद्र वगैरेविषयीं जाणावें. याप्रमाणें एकाच मंत्रानें भौतिक पदार्थांचेहि गुण समजतात व त्याबरोबर परमेश्वराचेहि गुण ध्यानीं येतात. असा दुहेरी लाभ दुसऱ्या कोणत्याहि शब्दयोजनेनें होणार नाहीं. वेदांतील शब्दरचना थोडक्यांत पुष्कळ अर्थ दाखविणारी आहे. परम कारुणिक परमेश्वरानें थोड्या शब्दांनीं अनंत विद्यांचा उपदेश केला आहे. त्यायोगानें पठनपाठनाला सुलभता येते. म्हणून वेदांतील शब्द जे ज्याठिकाणीं योजले आहेत ते विशेष हेतूनें असल्यामुळें त्यांत बदल करण्याची इच्छा धरणें व्यर्थ होय.

## वेदांतील शब्दप्रयोगांसंबंधानें विशेष नियम.

**तास्त्रिविधा ऋचः परोक्षकृताः प्रत्यक्षकृता आध्यात्मिक्यश्च तत्र परोक्षकृताः सर्वाभिर्नामविभक्तिभिर्युज्यन्ते प्रथमपुरुषैश्चाख्यातस्य । अथ प्रत्यक्षकृता मध्यम पुरुषयोगास्त्वमिति चैतेन सर्वनाम्ना । अथापि प्रत्यक्षकृताः स्तोतारो भवन्ति परोक्षकृतानि स्तोतव्यानि । अथाध्यात्मिक्य उत्तमपुरुषयोगा अहमिति चैतेन सर्वनाम्ना ॥ निरु० ७ खं० १।२॥**

( त्रिविधा ) वेदांतील मंत्रांचे अर्थाच्या दृष्टीनें तीन प्रकार आहेत. ( १ ) **परोक्षकृताः**—अदृश्य अर्थविधायक कांहीं मंत्र असतात. ( २ ) **प्रत्यक्षकृताः**—कांहीं मंत्र प्रत्यक्ष विषयक असतात व ( ३ ) **आध्यात्मिक्यः**—कांहीं अध्यात्मविषयक असतात. अदृश्य अर्थविधायक अर्थात् परोक्षविषयक मंत्रांत ( प्रथम पुरुषै० ) तृतीय पुरुषीं प्रयोग असतो. प्रत्यक्ष अर्थविषयक मंत्रांमध्यें ( मध्यम पुरुष० ) द्वितीय पुरुषीं प्रयोग असतो व *अध्यात्मविषयक अर्थात् ज्ञानगोचर आत्मा व परमात्मादर्शक मंत्रांमध्यें ( उत्तमपुरुष० ) प्रथम पुरुषीं प्रयोग असतो. द्वितीय पुरुषाच्या प्रयोगांमध्यें दोन भेद आहेत. ( १ ) प्रत्यक्षार्थी द्वितीय पुरुष होतो व ( २ ) स्तुति करणारे प्रत्यक्ष असून स्तोतव्य अर्थ परोक्ष असेल तेथेंहि द्वितीयपुरुष होतो.

जडपदार्थांच्या ठिकाणीं तृतीय पुरुषीं व चेतनाच्या ठिकाणीं मध्यम व प्रथम पुरुष होतो असा लौकिक व वैदिक शब्दांच्या प्रयोगामध्यें सामान्य नियम आहे परंतु वैदिक शब्दांत जड पदार्थालासुद्धां द्वितीयपुरुषीं प्रयोग होतो.

---

* उपासनेविषयीं उपदेश करण्याचा प्रसंग असतां, परमात्म्याबरोबर आपला अति सम्बन्ध आहे असें जाणून त्या प्रसंगीं ( अस्मद् ) ' मी–मला ' वगैरे प्रथमपुरुषीं प्रयोग आर्षग्रंथांत वापरलेले आहेत. वामदेवादि ऋषींनीं वेदशास्त्रज्ञान प्राप्त करून आत्मज्ञानाचा उपदेश करण्याकरितां ' अहंमनुरभवं सूर्यश्चेति तद्वत ' (बृहद् १।४।१०) इत्यादि प्रथमपुरुषीं प्रयोग वापरलेले आहेत ते लोकांनीं आपली उपासना करावी असें सांगण्याकरितां नसून उपासना करण्याची ईश्वराकडून आज्ञा दाखविलेली आहे. या प्रकारच्या प्रयोगविधीचा खुलासा वेदान्त दर्शनांत प्राणाधिकरण सूत्रांत केलेला आहे. या नियमाप्रमाणेंच गीतेमध्यें महर्षि व्यास यांनीं महात्मा योगेन्द्र कृष्णचंद्र याच्याकडून अध्यात्मोपदेश प्रसंगीं अस्मद् शब्दाचेच प्रयोग घातलेले आहेत.

वेदांतील स्वरव्यवस्था यथार्थ वेदार्थ करण्याच्या उपयोगाची आहे म्हणून तिचें येथें थोडेंसें दिग्दर्शन करतों. स्वर दोन प्रकारचे आहेत (१) उदात्तादि सात व (२) दुसरे षड्जादि सात, पैकीं—

**षड्जऋषभगान्धारमध्यमपञ्चमधैवतनिषादाः ॥ १ ॥**

**—पिंगलसूत्र । छन्द. ३।६४॥**

(१) षड्ज (सा), (२) ऋषभ (री), (३) गांधार (ग), (४) मध्यम (म), (५) पंचम (प), (६) धैवत (ध) व (७) निषाद (नि) हे ते सात स्वर होत. यांची लक्षणव्यवस्था गांधर्ववेदांत प्रसिद्ध आहे. त्यांचा विशेष स्फोट करणें येथें स्थल संकोचास्तव शक्य नाहीं. स्वरांविषयीं पतंजली महामुनीनें खालीं लिहिल्याप्रमाणें म्हटलें आहे:—

**स्वयं राजन्त इति स्वराः । आयामो दारुण्यमणुता खस्येत्युच्चैः कराणि शब्दस्य । आयामो गात्राणां निग्रहः । दारुण्यं स्वरस्य दारुणता रूक्षता । अणुता कण्ठस्य । कण्ठस्य संवृतता । उच्चैः कराणि शब्दस्य । अन्ववसर्गो मार्दवमुरुता खस्येति नीचैः कराणि शब्दस्य । अन्ववसर्गो गात्राणां शिथिलता । मार्दवं स्वरस्य मृदुता स्निग्धता । उरुता खस्य । महत्ता कण्ठस्येति नीचैः कराणि शब्दस्य । त्रैस्वर्येणाधीमहे त्रिप्रकारैरज्भिरधीमहे कैश्चिदुदात्तगुणैः कैश्चिद् अनुदात्तगुणैः कैश्चिदुभयगुणैः । तद्यथा । शुक्लगुणः शुक्लः कृष्णगुणः कृष्णः । य इदानी-मुभयगुणः स तृतीयामाख्यां लभते कल्माष इति वा सारङ्ग इति वा । एवमिहापि उदात्त उदात्तगुणः । अनुदात्तोऽनुदात्तगुणः । य इदानीमुभयगुणः स तृतीयामाख्यां लभते स्वरित इति । ते एते तन्त्रेतरनिर्देशे सप्तस्वरा भवन्ति । उदात्तः । उदात्ततरः । अनुदात्तः । अनुदात्ततरः । स्वरितः । स्वरिते य उदात्तः सोऽन्येन**

**विशिष्टः । एकश्रुतिः सप्तमः ॥ अ० १ पा० २॥ उच्चै-रुदात्त इतिसूत्रभाष्यम् । —पातंजल महाभाष्यम्.**

( स्वयं राजन्ते ) दुसऱ्याच्या सहाय्यावांचून स्वतःच प्रकाशित होणारे ते स्वर होत. ( आयामः ) गात्रांचा निग्रह करणें, ( दारुण्यम् ) वाणीला रूक्ष करणें, उंच स्वरांत उच्चार करणें, ( अणुता ) कंठाचा किंचित निग्रह करणें हे प्रयत्न ( शब्दस्य उच्चैःकराणि ) शब्दाला उदात्त करतात. तसेंच ( अन्ववसर्गः ) गात्रें ढिलीं सोडणें, ( मार्दवम् ) स्वराची कोमलता, (उरुता) कंठ मोकळा-खुला करणें हे प्रयत्न शब्दाला अनुदात्त करतात. ( त्रैस्वर्येण० ) आम्ही तीन प्रकारच्या ( अज्भिः ) स्वरांनीं ( अधीमहि ) वेदांचें अध्ययन करतों. उदात्त, अनुदात्त व उभयमिश्र अर्थात् स्वरित. ज्याप्रमाणें काळा रंग व पांढरा रंग हे निरनिराळे दोन रंग आहेत व त्यांच्या मिश्रणाचा जरी स्वतंत्र असा रंग नाहीं तथापि त्याला अस्मानी, खाकी असें म्हणतात, त्याच-प्रमाणें उदात्त व अनुदात्त यांच्या मिश्रणानें झालेला स्वर जरी वस्तुतः निराळा नाहीं तथापि त्याला "स्वरित" असें म्हणण्याचा प्रघात आहे. या तीन स्वरांचे पुढें थोड्या भिन्नतेनें सात स्वर झाले. ( १ ) उदात्त, ( २ ) उदात्ततर, ( ३ ) अनुदात्त, ( ४ ) अनुदात्ततर, ( ५ ) स्वरित, ( ६ ) स्वरितोदात्त व ( ७ ) एक श्रुति. हे सात स्वर व पूर्वी लिहिलेले गाण्यांतील षड्जादिक सात स्वर हे भिन्न आहेत.

आतां चारही वेदांमध्यें येणारे व्याकरणाचे सामान्य नियम, अष्टाध्यायी, वार्तिक व महाभाष्य यांतील उतारे देऊन सांगतों—

( १ ) **वृद्धिरादैच्** ॥ अ० १।१।१ ( प्र. ) या ठिकाणीं (चोःकुः) या सूत्रानें च-ला क कां होत नाहीं ? ( उ० ) भसंज्ञा आहे म्हणून ( प्र० ) कशी भसंज्ञा ? ( उ० ) अयस्मयादीनिच्छन्दसि ॥ अ० १।४।२० वेदांमध्यें अयस्मयादिक शब्द अशुद्ध नाहींत वास्तविक अयोमयम् असें रूप झालें पाहिजे तें न होतां भसंज्ञा मानून अयस्मयम् असें रूप वेदांमध्यें होतें तसेंच या सूत्रावर वार्तिक **उभयसंज्ञान्यपीतिवक्तव्यम्** वेदांमध्यें भसंज्ञा व पदसंज्ञा दोनहि एक ठिकाणीं होतात. जसें-**ससुष्टुभासऋक्वतागणेन** ॥ याठिकाणीं ऋच्×वता पदसंज्ञा मानून चोःकुः या सूत्रानें चला क केला ऋक्+वता नंतर ( झलांजशोऽन्ते ) या सूत्रानें कला ग होत नाहीं. भसंज्ञा आहे म्हणून. त्याप्रमाणें वृद्धिरादैच् याठिकाणीं भसंज्ञा आहे म्हणून चला क केला नाहीं व वृद्धि-रादैजदेङ्गुण इति याठिकाणीं पद संज्ञा मानून ज केला. याप्रमाणें वेदांमध्यें भसंज्ञा व पदसंज्ञा एका ठिकाणीं मानून कार्यें होतात. (प्र०) अष्टाध्यायी वेद आहे काय ? (उ०) **छन्दोवत्सूत्राणि भवन्ति. महा भा०** । सूत्रें छन्दाप्रमाणें आहेत-तसेंच-

**स्थानिवदादेशोनल्विधौ** ॥१।१।५६ **प्रातिपदिकानिर्देशाश्चार्थतन्त्रा- भवन्ति। न काचित्प्राधान्येन विभक्तिमाश्रयन्ति। यां यां विभक्तिमा- श्रयितुं बुद्धिरुपजायते सा सा आश्रयितव्या ।** वेदांमध्यें प्रातिपादिकाला (शब्दाला) लागणाऱ्या विभक्ति प्रधान नसून अर्थप्रधान आहे. शास्त्र, मूल, युक्ति व प्रमाण यांच्या आश्रयानें होणाऱ्या योग्य अर्थाला विभक्ति बद- लावी लागत असेल तर ती बदलण्यास हरकत नाहीं. म्हणून वेदांमध्यें मंत्रांचा अर्थ करते वेळीं त्यांतील शब्दांची विभक्ति एक असतां अन्य विभक्तीप्रमाणें त्याचा अर्थ करतात. जसें- तत्सवितुः' यांतील 'तत्' या प्रथमान्त पदाचा 'तस्य' असा षष्ठयन्त अर्थ सयुक्तिक असल्यास करण्यास हरकत नाहीं. (१) **नेवेति विभाषा ॥** १।१।४४ ॥ [**अर्थ गत्यर्थः शब्दप्रयोगः**] शब्दांचा प्रयोग अर्थज्ञान होण्यासाठीं आहे. वेदांतील शब्दसमूह अर्थ समजून लाभ व उन्नति करून घेण्यासाठीं आहे. (४) **अर्थवद्धातुरप्रत्ययः प्रातिपदिकम्** ॥ १।२।४५ ॥ [**बहवोहि एकार्थाः शब्दा भवन्ति**] एकाच अर्थाचे पुष्कळ शब्द असतात जसें:-इन्द्रः, शक्रः, पुरुहूतः, पुरन्दरः, कन्दुः, कोष्टः, कुसूलः, इत्यादि-तसेंच [**एकश्चशब्दो बह्वर्थः**] एकाच शब्दाचे अनेक अर्थ होतात-जसें-अक्षाः, पादाः, माषाः, (वेदांमधील अग्नि, वायु, वगैरे अनेक शब्द एका परमेश्वराचेच वाचक आहेत व ते "विस्तव, वारा," इत्यादि अन्य अर्थहि दाखवितात ते याच नियमाला अनुसरून होय-) (५) **ते प्राग्धातोः** ॥ १।४।८०॥ **छन्दसि परव्यवहितवचनं च**] गति व उपसर्ग संज्ञक शब्द लौकिक भाषप्रमाणें वेदांमध्यें क्रियेच्या पूर्वींच न येतां पाहिजे तेथें येतात. जसें- "आयातमुपनिष्कृतम्- । उपप्रयोभिरागतम् ।" यामध्यें वास्तविक "उपाया- तम्" व "उपागमत्" असें झालें पाहिजे. पण वेदांमध्यें तो नियम नाहीं म्हणून उपसर्ग मागें पुढें नजरेस पडतात. (६) **चतुर्थ्यै बहुलं छन्दसि** ॥ २।३।८२॥ वेदांमध्यें चतुर्थीच्या ठिकाणीं षष्ठीहि होते. **षष्ठ्यर्थे चतुर्थी वक्तव्या** ॥वार्तिक ॥ षष्ठीच्या ठिकाणीं चतुर्थीहि होते. जसें-"तस्यै खर्वो जायते" येथें वास्तविक "तस्याः" असें षष्ठयन्त पद पाहिजे. वेदांमध्यें चतुर्थी व षष्ठी एकमेकांच्या जागींहि येतात. असे प्रयोग ब्राह्मणामध्येंहि येतात हें वरील उदाहरणावरून ध्यानीं येईल. (७) **बहुलं छन्दसि** ॥ २।४।३९ ॥ वेदांमध्यें अद धातूच्या ठिकाणीं घस्लृ असा

---

१ यापुढें जीं सूत्रें दिलीं आहेत त्या सूत्रांचा अर्थ दिला नसून त्या वरील महाभाष्यांतील उतारे [ ] अशा कंसात देऊन त्यांचा अर्थ दिला आहे. पुढें कित्येक नियम सूत्रांवरून लिहिण्यात येतील व कित्येक सूत्रभाष्यावरून देण्यात येतील. ते मागील पुढील अर्थ पाहून समजावेत.

आदेश बहुलत्वानें होतो. जसें–'घस्तान्नूनम्' 'सग्धिश्चमे' ( ८ ) **बहुलं छन्दसि** ॥ २।४।७३ वेदांमध्यें शप् (अ) या विकरणाचा विकल्पानें लोप होतो. जसें–'वृत्रं हनति' 'अहिः शयते' 'त्राध्वं नो देवाः। ९० **बहुलं छन्दसि** ॥२।४।७६ वेदांमध्यें शप् (अ) च्या ठिकाणीं श्लु बहुलत्वेंकरून होतो व केंव्हां होत नाहीं. जसें–"दाति प्रियाणि धाति प्रियाणि" कित्येक ठिकाणीं होतो जसें–"पूर्णा विवष्टि विवक्ति" ( १० ) ( **सिब्बहुलं लेटि** ॥ ३।१।३४॥ **सिब्बहुलं छन्दसिणिद्वक्तव्यः** ॥ वा० वेदांमध्यें लेट् लकार करावयाचा असतां होणारा सिप् विकल्पानें णित् होतो व त्यामुळें वृद्धि होते. जसें–'सविता धर्म साविषत्' 'प्रण आयूँषि तारिषत्' ( ११ ) **छन्दसि शायजपि** ॥३।१।८४॥ वेदांमध्यें हिप्रत्यय पुढें असतां किंवा नसतांना श्नाप्रत्ययाला शायच् आदेश विकल्पानें होतो. जसें–'यो अस्कभायत्' 'उद्गभायत्' ( १२ ) **व्यत्ययो बहुलम्** ॥३।१।८५॥ [ सुप्तिङुपग्रहलिङ्गनराणाम् काल हल्च् स्वर कर्तृयङांच ॥ व्यत्ययमिच्छन्ति शास्त्रकृत एषां सोपिच सिध्यति बाहुलकेन ॥१॥ ] वेदांमध्यें विभक्तिव्यत्यय होतो जसें–"युक्तामातासीद्धुरि दक्षिणायाः"। याठिकाणीं 'दक्षिणायाम्' असें पाहिजे होतें. ( वेदांमध्यें क्रियापदांच्या प्रत्ययांत व्यत्यय होतो.) जसें:—"चषालं ये अश्वयूपाय तक्षति।" याठिकाणीं "तक्षन्ति" असें झालें पाहिजे. ( वर्ण व्यत्ययहि होतो. ) जसें:—"त्रिष्टुभौजःशुभितमुग्र वीरम्।" या वाक्यांत "शुधितं" असें पाहिजे, ( लिङ्गव्यत्ययहि वेदांमध्यें आढळतो ) जसें– मधोस्तृप्ता इवासते" यामध्यें "मधुनः" असें पद पाहिजे. ( पुरुषव्यत्यय होतो. ) जसें–" अधासवीरैर्दशभिर्वियूयाः" याठिकाणीं वास्तविक "वियूयात्" असें पाहिजे. ( कालव्यत्यय होतो ) जसें:—"श्वोऽग्निनाधास्यमानेन श्वः सोमेन यक्ष्यमाणेन" याठिकाणीं "आधाता, यष्टा" असें झालें नाहीं.—( आत्मनेपद व परस्मैपद यांचा व्यत्यय होतो ) जसें–"ब्रह्मचारिणमिच्छते" "प्रतीपमन्यऊर्मिर्युध्यति" या वाक्यांत "इच्छति व युध्यते" असें झालें नाहीं. ( याचप्रमाणें स्वरव्यत्यय, कर्तृव्यत्यय, यङ् व्यत्ययहि होतात. ) ( १३ ) **बहुलं छन्दसि** ॥ ३।२।८८ ॥ वेदांमध्यें विकल्पानें क्विप् प्रत्यय होतो जसेः—"मातृहा, मातृघातः" ( १४ ) **छन्दसि लिट्**॥३।२।१०५॥ सामान्य भूताच्या ठिकाणींहि वेदांमध्यें लिट् होतो. जसें:–"अहं द्यावापृथिवी आततान" (१५) **लिटः कानज्वा** ॥३।२।१०६॥ लिटाच्या ठिकाणीं कानच् आदेश विकल्पानें होतो. जसें–"अग्निं चिक्यानः" "अहं सूर्यमुभयतो ददर्श" ( १६ ) **क्वसुश्च** ॥ ३।२।१०७ लिटाच्या ठिकाणीं क्वसु हा आदेश विकल्पानें होतो. जसें–"पपिवान्, जग्मिवान्" ( १७ ) **क्याच्छन्दसि** ॥ ३।२।१७० क्यप्रत्ययान्त धातूवरून वेदांमध्यें तच्छीलादि कर्तृविषय असतां उकार प्रत्यय होतो. जसें "मित्रयुः, सुम्नयुः" **निरनुबन्धकग्रहणे सानुबन्धकस्यापि ग्रहणम्** ॥

या परिभाषेनें सूत्रामध्यें सामान्य क्यपद आहे म्हणून क्यङ्, क्यष्, क्यच्, याप्रत्ययान्त धातूंवरूनहि उप्रत्यय होतो ( १८ ) **कृत्यल्युटोबहुलम्** ॥ ३।३।११३ ॥ कृत्यप्रत्यय व ल्युट् प्रत्यय हे बहुल याअर्थी होतात ( ज्याठिकाणीं सांगितले नाहींत अशा ठिकाणींहि होतात.) " पादाभ्यां ह्रियते पादहारक:" इत्यादि ( १९ ) **छन्दसि गत्यर्थेभ्यः** ॥ ३।३।१२९॥ वेदांमध्यें गत्यर्थक धातूंवरून युच् ( अन् ) प्रत्यय होतो. जसें-"सूपसदनोऽग्निः" (२०) **अन्येभ्योपि दृश्यते** ॥ ३।३।१३०॥ अन्यधातूंवरूनहि युच् प्रत्यय झालेला दिसतो. जसें-"सुदोहनमाकृणोद्ब्रह्मणे गाम्" (२१) **छन्दसि लुङ् लङ् लिटः** ॥३।४।६॥ वेदांमध्यें कोणत्याहि कालीं लुङ्, लङ्, लिट्, हे विकल्पानें होतात जसें-( लुङ् ) " अहं तेभ्योऽकरं नमः " ( लङ् ) " अग्निमद्य होतारमवृणीतायं यजमानः " ( लिट् ) "अयममार" ( २२ ) **लिङर्थे लेट्** ॥३।४।७ लिङ् च्या अर्थी ( विधि, निमन्त्रण इत्यादि. हेतु हेतुमद्भाव आशिर्वाद ) वेदांमध्यें विकल्पानें लेट् प्रत्यय होतो. जसें-" जीवाति शरदःशतम्" (२३) **उपसंवादा शङ्कयोश्च** ॥ ३।४।८॥ उपसंवाद व आशङ्का या अर्थी लेट् प्रत्यय होतो. जसें-"अहमेव पशूनामीशै" " नेज्जिह्मायन्तो नरकं पताम" ( २४ ) **लेटोऽडाटौ** ॥३।४।९४॥ लेट्लापर्यायानें अट् व आट् हे आगम होतात. जसें-" उदधिंच्यावयाति ( २५ ) **आतऐ** ॥३।४।९५॥ आत्मने पदीं लेट् आदेशाच्या द्विवचनस्थ-आकाराच्या ठिकाणीं ऐकार होतो. जसें-"मन्त्र यैते" "मन्त्रयैथे" (२६ ) **वैतोऽन्यत्र** ॥ ३।४।९६॥ वरील सूत्राची ज्याठिकाणीं प्राप्ति नाहीं त्याठिकाणीं असणाऱ्या लेट्च्या एकाराच्या ठिकाणीं ऐकार विकल्पानें होतो. जसें:—" अहमेव पशूनामीशै। ईशेवा " ( २७ ) **इतश्चलोपः परस्मैपदेषु** ॥ ३।४।९७॥ लेट् मधील प्रत्ययांच्या ( परस्मै पदांतील ) इकाराचा विकल्पानें लोप होतो. जसें:—तरति, तराति, तरत्, तरात्; तरिषति, तरिषाति, तरिषत्, तरिषात् इ० (२८) **स उत्तमस्य** ॥ ३।४।९८॥ लेट्च्या उत्तम ( प्रथम ) पुरुषाच्या सकाराचा ( विसर्गाचा ) विकल्पानें लोप होतो. जसें-" करवाव, करवावः; करवाम, करवामः ". इत्यादि. ( २९ ) **तुमर्थे सेसेनसे असेन्क्से कसेनध्यै अध्यैन्कध्यै कध्यैन् शध्यै शध्यैन् तवैतवेङ् तवेनः** ॥३।४।९॥ प्रत्येक धातूवरून तुमुन् प्रत्ययाच्या अर्थी से, सेन्, असे, असेन्, क्से कसेन्, अध्यै, अध्यैन्, कध्यै, कध्यैन्, शध्यै, शध्यैन्, तवै, तवेङ्, तवेन् हे पंधरा प्रत्यय होतात. या प्रत्ययांतील नकार स्वरासाठीं, ककार व ङकार गुणवृद्धिनिषेधासाठीं व शकार शित्वासाठीं आहेत. क्रमानें उदा० वक्षेरायः। तावामेषे रथानां, क्रत्वे दक्षाय जीवसे, श्रियसे, कर्मण्युपाचारध्यै, इन्द्राग्नी आहुवध्यै, श्रियध्यै, पिबध्यै, सहमादयध्यै, सोमामिंद्राय पातवे, दशमे मासि सूतवे, स्वर्देवेषु गन्तवे इत्यादि उदाहरणें जाणावींत—( ३० ) **शकिणमुल्कमुलौ** ॥३।४।१२ वेदांमध्यें शक्नोति धातु उपपद असतां धातु-

मात्रावरून तुमर्थी णमुल् व कमुल् हे प्रत्यय होतात. जसें-"अग्निं वैदेवाविभाजं नाशक्नुवन्" ( ३१ ) **ईश्वरेतोसुन्कसुनौ** ॥३।४।१३॥ वेदांमध्यें ईश्वर शब्द उपपद असतां तुमर्थी धातूहून तोसुन् व कसुन् हे प्रत्यय होतात. जसें-"ईश्वरोऽभिचरितोः" "ईश्वरो विलिखः" ( ३२ ) **कृत्यार्थे तवैकेन्केन्यत्वनः** ॥३।४।१४॥ कृत्यार्थी वेदांमध्यें धातूहून तवै, केन्, केन्य, त्वन्, हे प्रत्यय होतात. जसें-( तवै ) "परिधातवै" ( केन् ) "नावगाहे" ( केन्य ) "दिदृक्षेण्यः" ( त्वन् ) "कर्त्वेहविः" ( ३३ ) **नित्यं संज्ञाछन्दसोः** ॥४।१।२९॥ वेदांमध्यें किंवा संज्ञा असतांना उपधेचा लोप झालेल्या अन्नन्त बहुव्रीही समासाच्या पदावरून स्त्रीलिंगी ङीप प्रत्यय नित्य होतो. जसें-"सुराज्ञी नगरी" "गोःपञ्चदाम्नी" ( ३४ ) **नित्यं छन्दसि.** ४।१।४६॥ वेदांमध्यें बहु आदि शब्दांवरून स्त्रीलिंगी-ङीप् प्रत्यय नित्य होतो. जसें-"बह्वीषु हित्वा प्रपिबन्" ( ३५ ) **भवेछन्दसि** ॥ ४।४।११०॥ सप्तमी समासार्थक प्रातिपदिकावरून "भवे" या अर्थी वेदांमध्यें यत् प्रत्यय होतो जसें-"मेघ्यायच विद्युत्यायच" ( ३६ ) **बहुलंछन्दसि** ॥ ५।२।१२२॥ वेदांमध्यें मत्वर्थी विनि प्रत्यय बाहुल्येंकरून होतो-जसें-"अग्ने तेजस्विन्" व कोठें होत नाहीं जसें-"सूर्यो वर्चस्वान्" ( ३६ ) **तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप्** ॥५।२।९४॥ भूमि निन्दा प्रशंसा अर्थी मतुप् वगैरे प्रत्यय होतात. ( ३८ ) **अनसन्तान्नपुंसकाच्छन्दसि** ॥ ५।४।१०४॥ अनसन्तान्नपुंसकाछन्दसि वा वचनम् ॥ वार्ति० ॥ वेदांमध्यें नपुंसकलिंगी अन्नन्त व असन्त तत्पुरुषाहून टच् प्रत्यय विकल्पानें होतो. जसें-"देवच्छन्दसम्" "देवच्छन्दः" इत्यादि ( ३९ ) **शेश्छन्दसिबहुलम्** ॥ ६।१।७०॥ वेदांमध्यें नपुंसकलिंगी नि ( शि )चा विकल्पानें लोप होतो. जसें-"विश्वाभूतानि" "विश्वानि भूतानि" ( ४० ) **बहुलंछन्दसि** ॥ ६।१।३४॥ वेदांमध्यें ह्वेञ् धातूला विकल्पानें सम्प्रसारण होतें. जसें-"देवीं सरस्वतीं हुवे" "ह्वयामि विश्वान् देवान्" ( ४१ ) **इकोऽसवर्णे शाकल्यस्य ऱ्हस्वश्च** ॥ ६।१।१२७॥ इषा अक्षादिषु छन्दसि प्रकृतिभाव मात्रं वक्तव्यम् ॥ वार्ति० ॥ प्रकृतिभाव होतो जसें-"अक्षा ईमिरे" इत्यादि. ( ४२ ) **देवताद्वन्द्वेच** ॥ ६।३।२६॥ देवताद्वन्द्वे उभयत्र वायोः प्रतिषेधः ॥ वा० ॥ ब्रह्म प्रजापत्यादीनांच ॥ वा० ॥ देवता नामाच्या द्वन्द्व समासामध्यें पूर्वपदाला आनङ् आदेश होतो. जसें-"सूर्याचन्द्रमसौ" "इन्द्राबृहस्पती" पुढील शब्दांत होत नाहीं. जसें-"अग्निवायु" वाय्वग्नी "ब्रह्मप्रजापती" इ० **बहुलं छन्दसि** ॥ ७।१।८ भिस् प्रत्ययाला विकल्पानें ऐस् आदेश होतो. जसें-"देवेभिर्मानुषे जने" ( ४३ ) **सुपां सु लुक् पूर्वसवर्णाच्छेयाडाड्यायाजालः** ॥ ७ । १ ३९ ॥ वेदांमध्यें सुपांचे जागीं सु, लुक्, पूर्वसवर्ण, आ, आत्, शे, या, डा, ड्या, याच्, आल्, हे आदेश होतात. सुपां सुपो भवन्तीतिवक्तव्यम् ॥ वा० ॥ जसें-" ( सुप् ) धुरि-

दक्षिणाया:" तिङां तिङो भवन्तीतिवक्तव्यम् ॥ वा० ॥ ( तिङ् ) " चषालं ये अश्व-रूपाय तक्षति " ( सु ) " अनृक्षराऋजवः सन्तुपन्थाः " ( लुक् ) " परमे व्योमन् " ( पूर्वस० ) "धीती, मती, " ( आ ) " उभायन्तारौ " ( आत् ) " नताद्ब्राह्मणात् निन्दामि " ( शे ) " अग्ने इन्द्रावृहस्पती " ( या ) " उरुया " ( डा ) " नाभा-पृथिव्याम् " ( ड्या ) अनुष्टया ( याच् ) साधुया ( आल् ) वसन्ता यजेत. **इया-डियाजीकाराणामुपसंख्यानम्** ॥ वार्ति० ( इया ) उर्विया ( डियाच् ) सुक्षे-त्रिया ( ईकारः ) सरसीशयानम् **आङ्याजयारामुपसंख्यानम्** ॥ वार्ति० ॥ ( आङ् ) प्रबाहवा ( अयाच् ) स्वप्नया सचसेवनम् ( अयार् ) सिन्धुमिव नावया. **( ४४ ) आज्जसेरसुक्** ॥ ७ । १ । ५० ॥ प्रथमा बहुवचनाच्या जस प्रत्यया-पूर्वी असुक् असा आगम होतो. जसें-" विश्वेदेवासः " " देवासः " **( ४५ ) बहुलंछन्दसि** ॥ ७ । ३ । ९७ ॥ वेदांमध्यें कोठें कोठें इडागमहि होतो. **( ४६ ) छन्दसीरः** ॥ ८ । २ । १५ मतुप् प्रत्ययाच्या मकाराचा वकार होतो. जसें-" हरिवोमेदिनंत्वा " **( ४७ ) कृपोरोलः** ॥ ८ । २ । ८२ ॥ कपिरका, कपिलका. **( ४८ ) घिच** ॥ ८ । २ । २५ ॥ [ घसिभसोर्नसिध्येत्तु तस्मात्सिच् ग्रहणं नतत् ॥ छान्दसो वर्णलोपोवा यथेष्कर्तारमध्वरे ॥ १ ॥] कोठें कोठें वर्णलोपहि होतो. **( ४९ ) दादेर्धातोर्घः** ॥ ८ । २ । ३२ ॥ **हृग्रहोर्भश्छन्दसिहस्यभत्वंवक्तव्यम्** ॥वा०॥ हृ व ग्रहधातूच्या हकाराच्या जागीं भकार होतो. जसें-" सम्भरति " " गृभ्णाति " **( ५० ) मतुवसोरु सम्बुद्धौछन्दसि** ॥८।३।१॥ संबोधनीं मत्वन्त व वस्व-न्ताला रु होतो. जसें-" गोमः, हरिवः, मीढ्वः " **( ५१ ) वाशरि** ॥८।३।३६॥ **खर्परे शरिवालोपो वक्तव्यः** ॥वा०॥ व खरपर शर पुढें असतां विकल्पानें विसर्गाचा लोप होतो; जसें-" वृक्षा स्थातारः " "वृक्षाः स्थातारः" **उणादयो बहुलम्** ॥३।३।१॥ या सूत्रावरील भाष्यावरून शब्दसिद्धिविषयक कल्पना बरोबर ध्यानीं येईल म्हणून तें भाष्य येथें देतों—

**बहुलवचनं किमर्थं । बाहुलकं प्रकृतेस्तनुदृष्टेः । तन्वीभ्यः प्रकृतिभ्यः उणादयो दृश्यन्ते नसर्वाभ्यो दृश्यन्ते । प्राय-समुच्चयनादपितेषाम् ॥ प्रायेण खल्वपि ते समुच्चिता न सर्वे समुच्चिताः ॥ कार्यसाविशेषाविधेश्च तदुक्तम् ।**

---

(१) दक्षिणायाम (२) तक्षन्ति (३) पन्थानः (४) व्योमानि (५) धीत्या-मत्या (६) उभौ (७) नतान्, ब्राह्मणान् (८) वयम् (९) उरुणा (१०) नाभौ (११) अनुष्टुभा (१२) साधु (१३) वसन्ते (१४) उरुणा (१५) सुक्षेत्रिणा (१६) सरसि (१७) प्रबाहुना (१८) स्वप्नेन (१९) नावा.

कार्याणि खल्वपि सशेषाणि कृतानि न सर्वाणि लक्षणेन परिसमाप्तानि । किं पुनः कारणं तन्वीभ्यः प्रकृतीभ्य उणादयो दृश्यन्ते न सर्वाभ्यः । किंच कारणं प्रायेण समुच्चिता न सर्वे समुच्चिताः । किंच कारणं कार्याणि सशेषाणि कृतानि न पुनः सर्वाणि लक्षणेन परिसमाप्तानि । नैगमरूढिभवं हि सुसाधु । नैगमाश्च रूढिशब्दाश्चावैदिकास्ते सुष्ठ साधवः कथं स्युः । नाम च धातुजमाह निरुक्ते । नाम खलु धातुजमाहुर्नैरुक्ताः । व्याकरणे शकटस्य च तोकम् । वैयाकरणानां च शाकटायन आह धातुजं नामेति । अथ यस्य विशेष पदार्थो न समुत्थितः कथं तत्र भवितव्यम् यत्न विशेष पदार्थ समुत्थं प्रत्ययतः प्रकृतेश्च तदूह्यम् । प्रकृतिं दृष्ट्वा प्रत्यय ऊहितव्यः प्रत्ययं दृष्ट्वा प्रकृतिरूहितव्या । "संज्ञासु धातुरूपाणि प्रत्ययाश्च ततः परे ॥ कार्याद्विद्यादनुबन्धमेतच्छास्त्रमुणादिषु ॥ १ ॥

उणादि सूत्र पाठामध्यें थोड्याशा धातूंबरोबर थोडेसे प्रत्यय सांगितलेले आहेत. तें विधान सूत्रामध्यें 'बहुलं' हें पद असल्यामुळें ते प्रत्यय अन्य धातूला पण योजून शब्द सिद्ध करतां येतात. त्याचप्रमाणें त्या ग्रंथांत प्रत्यय पण नमुन्याकरितां थोडेसे दाखविले आहेत. सत्प्रयोग ( वेदांतिल शब्द ) पाहून त्यांतून अन्य नवीन प्रत्ययांची कल्पना केली पाहिजे. जसें ( ऋ फिडः ) या शब्दामध्यें ऋ धातूला फिड प्रत्यय समजला पाहिजे. त्याचप्रमाणें अन्य शब्दांविषयीं पण समजावें. तसेंच कित्येक शब्दांत सूत्रविहित कार्य झालेलें दिसत नाहीं. अविहित कार्यानें शब्द बनलेले दिसतात हा पण बाहुलकाचाच प्रताप होय. जसें दण्ड या शब्दांतिल ड प्रत्ययाच्याऽकाराची इ त् संज्ञा होवूनऽकाराचा लोप झाला पाहिजे तो होत नाहीं. कोणी अशी शंका करील कीं, उणादि पाठांत जेवढ्या धातूंनां जेवढे प्रत्यय दाखाविलेले आहेत आणि त्यामुळें जेवढ्या शब्दांच्या कार्यसिद्धिः सूत्रानें होतात त्यापेक्षां अधिक प्रत्यय कां व्हावें? तर त्याला पंतजलि

मुनि उत्तर देतात :—**नैगमरूढिभवं हिसुसाधु** " नैगम म्हणजे वैदिक शब्द व रूढि म्हणजे वेद शब्दाच्या ज्ञानानें व्यवहारांत आलेले संज्ञावाचकशब्द चांगल्या प्रकारें सिद्ध करावयाचे असले तर ते उणादि गणांतील बहुलं या वचनानें सिद्ध होतात. या बहुलच्या पदामुळेंच अनेक प्रकारचे सहस्र शब्द सिद्ध होतात. या विषयांत निरुक्तकार आणि वैय्याकरणामधें शाकटायन यांचें मत असें आहे कीं, ( रूढि ) संज्ञा दाखविणारे जेवढे शब्द आहेत ते सर्व, धातु आणि प्रत्यय यांचा संबन्ध होवून यौगिक व योग रूढता या अर्थाचा बोध करणारे बनलेले आहेत. अन्य ऋषींच्या मतानुसार सर्व संज्ञा शब्द रूढि अर्थात् अव्युत्पन्न असतात कारण, ते प्रकृति प्रत्यय याचा विचार कमती होत जाऊन प्रचारांत आलेले आहेत या रूढ शब्दाहून वैदिक शब्द भिन्न आहेत हें दाखविण्याचा सर्व वैय्याकरणाचा प्रयत्न लक्षांत ठेवण्यासारखा आहे.

वेदांतील कोणताहि शब्द संज्ञावाचक नसून संज्ञा कशा निश्चित कराव्या तें दाखविणारे प्रकृति शब्द आहेत, या वैदिक व संज्ञावाचक शब्दांविषयीं आणखीं एक विचार करण्यासारखा आहे तो हा कीं, ज्या शब्दांमध्यें धातु किंवा प्रत्यय मुळींच कळत नाहीं तेथें काय करावें? अशा ठिकाणीं असा विचार केला पाहिजे कीं, व्याकरण शास्त्रांत जेवढे धातु आणि प्रत्यय आहेत त्यांपैकीं धातु समजला तर नवीन प्रत्ययाची कल्पना करावी पण असें करण्याला वर्णार्थ सम्बन्धाचें ज्ञान पाहिजे म्हणजे वरील प्रकारच्या शब्दांचें अर्थज्ञान करून घेतां येतें.

दुसरी कल्पना अशी आहे कीं, ऽपरोक्त शब्दांत ज्या अनुबंधानें कार्यदृष्टिगत होईल त्या अनुबंधावरून धातु किंवा प्रत्यय याची कल्पना करावी जसें एखादा आद्युदात्त शब्द आहे तर त्यामध्यें ( ञ ) अथवा ( न् ) अनुबंधाचें बरोबर प्रत्यय आहेत असें समजावें. ही कल्पना सर्वच करावयाची नाहीं तर जे संज्ञा शब्द वेद शब्दावरून रूढींत आलेले आहेत किंवा संज्ञा शब्द तयार करण्याची व्यवस्था दाखविणारे वेद शब्द आहेत त्यांपैकीं ज्यांचे व्याकरणानें प्रत्यय व धातु समजले जात नाहींत अशा शब्दांतही कल्पना करून त्या शब्दांचा अर्थ बोध करून घ्यावा यासाठीं अ शब्दांच्या आदि अक्षरामध्यें धात्वर्थाची आणि अंत्य अक्षरामध्यें प्रत्ययार्थाची कल्पना करावी. ऋषींनीं हा कल्पनेचा बाजार कां मांडला आहे? या प्रकारचा प्रबन्ध केल्यावांचून अपार शब्द सागराचा थांग व्याकरणानें मिळूं शकत नाहीं. कोणी म्हणेल कीं, असें व्याकरण कां बनविलें नाहीं. शब्दसागराचा पार लागण्याकरितां उणादि सूत्रांत दाखविलेली बहुलाची व्यवस्था न करितां शब्दांच्या कितीहि पोथ्या बनविल्या असत्या आणि जन्मजन्मांतरीं शब्दशास्त्रच शिकत राहतों तरी त्याचा पार लागणें दुर्लभ होतें म्हणून हा

सर्व पूर्वोक्त प्रबंध ऋषींनीं केलेला आहे ज्यामुळें थोडक्यांत अफाट शब्दसागराची व्यवस्था करून घेते.

## अलंकार भेद.

अलंकाराविषयीं थोडक्यांत माहिती खालीं दिली आहे.

लुप्तोपमालंकार आठ प्रकारचे आहेत. ( १ ) वाचकलुप्तोपमा ( भीम इव बली भीमबली ). ( २ ) धर्म लुप्तोपमा ( कमलनेत्रः ), ( ३ ) धर्मवाचक लुप्तोपमा ( व्याघ्र इव पुरुषः पुरुषव्याघ्रः ) ( ४ ) वाचकोपमेय लुप्तोपमा ( विद्यया पण्डितायन्ते ) ( ५ ) उपमानलुप्ता ( ६ ) वाचकोपमानलुप्ता ( ७ ) धर्मोपमानलुप्ता ( ८ ) धर्मोपमानवाचक-लुप्ता ( काकतालीयो गुरु शिष्य समागमः ) याप्रमाणें आठ प्रकारच्या या लुप्तोपमा आहेत. याशिवाय पूर्णोपमा हा अलंकार स्वतंत्र आहे. यामध्यें उपमान, उपमेय, उपमावाचक व साधारण धर्म हे चार गुण असले पाहिजेत. उ० " स नःपितेवसूनवेऽग्ने सूपायनो भव ! " " हे अग्ने, ईश ! तूं आह्मांला पित्याप्रमाणें आहेस." ही पूर्ण उपमा आहे. या पूर्णोपमेंतील चार अवयवांपैकीं एक एक कमी होऊनच पूर्वोक्त आठ लुप्तोपमा झाल्या आहेत, हें विचाराअंतीं समजेल. दुसरा—रूपकालंकार याचे सहा भेद आहेत. ( १ ) अधिकाभेदरूपक–( अयं हि सविता साक्षायेन ध्वान्तं विनाश्यते. ) ( २ ) न्यूनाभेदकरूपक–( अयं पतञ्जलिः साक्षाद्भाष्यस्य कृतिना विना ). ( ३ ) अनुभया भेदरूपक–( ईशः प्रजामवत्यद्य स्वीकृत्य समनीतिताम् ) ( ४ ) अधिकताद्रूप्यरूपक–( विद्यानन्दे हि संप्राप्ते राज्यानन्देन किं तदा ! ) ( ५ ) न्यूनताद्रूप्यरूपक–( साध्वीयं सुखदा नीतिरसूर्य प्रभवा मता ) ( ६ ) अनुभयताद्रूप्यरूपक–( अयं घनावृतात्सूर्याद्विद्यासूर्यो वीभज्यते ) याप्रमाणें रूपकालंकाराचे भेद आहेत. तिसरा श्लेषालंकार तीन प्रकारचा आहे. ( १ ) प्रकृतानेकविषयः ( २ ) अप्रकृतानेकविषयः ( ३ ) प्रकृताप्रकृतानेकविषयः यांचीं क्रमानें उदाहरणें:–( १ ) " नवकम्बलोऽयं मनुष्यः ", ( २ ) " हरिणा त्वद्बलं तुल्यं कृतिना हितशक्तिना " ! ( ३ ) उच्चरन्भूरियानाढ्यः शुशुभे वाहिनीपतिः । याप्रमाणें हीं तीन श्लेषांचीं उदाहरणें आहेत. याशिवाय वेदांमध्यें येणारे असे अनेक अलंकार आहेत. पण विस्तारभयास्तव येथें इतकेच पुरेत.

**विश्वा॑नि देव सवितर्दुरि॒तानि॒ परा॑सुव ॥**
**यद्भ॒द्रं तन्न॒ आसु॑व ॥ १ ॥ यजु० ३०।३॥**

हे ( देव ) ज्ञानदीपा ! ( सवितः ) जगदुत्पादक परमेश्वरा ! आमचीं ( विश्वानि ) सर्व (दुरितानि ) दुःखें ( परासुव ) नाहींशीं कर. ( यत् ) जें कांहीं ( भद्रम् ) हित-कारक असेल ( तत् ) तें ( नः ) आम्हांला ( आसुव ) दे. आमचें सर्व प्रकारें रक्षण करून आमची उन्नति करण्यास आह्मांला ज्या प्रकारची बुद्धि पाहिजे व जशी कर्तृत्वशक्ति पाहिजे त्याप्रकारची बुद्धि व कर्तृत्वशक्ति आम्हांला दे. इत्योम् शान्तिः शान्तिः शान्तिः ।

---

# शुद्धिपत्रक

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६ | ३ | कत्तमः | कतमः |
| १३ | २९ | १९६०८५३००५ | १९७२९४९००५* |
| २५ | ३० | उत्तमोत्तम ण | उत्तमोत्तम गुण |
| २६ | २० | दोनं | दोन |
| २६ | २८ | पृथिव्याः | पृथिव्याः |
| ३१ | २ | वायुतून | वायूंतून |
| ३५ | ६ | सत्व | स्वत्व |
| ४१ | २ | आहे. | आहेत. |
| ४२ | ७ | तदांदिव्य | तदादित्य |
| ५१ | २ | गादश्च | रादेश्च |
| ५४ | १४ | वृष्टाद् | वृक्षाद् |
| ५५ | २२ | देताः | देवाः |
| ५७ | १२ | " शब्द व शन्नोदे० " | शब्द व " शन्नोदे० " |
| ६६ | ६ | अचरणानें | आचरणानें |
| ७४ | ८ | तस्मादग्नीन्प० | तस्मादग्नीन्प० |
| ८१ | १२ | ( नियमः ) | ( निगमः ) |

*युगानां सप्ततिः सैका मन्वन्तरमिहोच्यते ॥
कृताब्दसङ्ख्यातस्यान्ते सन्धिः प्रोक्तो जलप्लवः ॥ सूर्यसिद्धान्त ॥

प्रत्येक मनूचे आरंभीं कृतयुग वर्ष संख्या १७२८००० आदि संधि वर्षे मिळविलीं पाहिजेत. हल्लीं वैवस्वत मनु चालू आहे व तो सातवा आहे म्हणून त्यासह पूर्वीचे सात संधि—एक एक संधि कृतयुग वर्षसंख्येप्रमाणें म्हणजे १७२८०००×७=१२०९६००० वर्षे १९६०८५३००५ या वर्षांत आणखीं मिळविलीं पाहिजेत. १९६०८५३००५+१२०९६०००=१९७२९४९००५ इतकीं वर्षे सृष्टीच्या उत्पत्तीला होतात. ब्रह्मदेवाच्या सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंतच्या ३० घटकेंत ४३२०००००० वर्षे होतात, तेव्हां एका घटकेंत १४४००००० वर्षे होतात. एका पळांत ६० अक्षरें असतात म्हणून एका अक्षरांत ४०००० वर्षे होतात व याच करितां **चत्वारिंशत्सहस्राब्दैर्विधेरेकाक्षरः क्रमः** असें पञ्चांगात लिहिलें असतें. या कोष्टकाप्रमाणें वर दिलेल्या ब्रह्मदेवाच्या चालू दिवसाच्या वर्ष संख्येच्या घटका १३ पळें ४२ व अक्षरें ३ येऊन बाकी २९००५ वर्षे राहतात. कांहीं पञ्चांगांत १३ घटका ४२ पळें ३ अक्षरें गेलीं असें लिहिलेलें असतें.

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ८३ | २७ | नारण्याग्राम्या | नारण्यान् ग्राम्या |
| ८४ | २६ | वर्षन्ति | पर्षन्ति |
| ८७ | २३ | ( अवभ्रान् ) | ( अवध्रन् ) |
| ८८ | ३१ | " अजयन्त " | " अयजन्त " |
| ८८ | ३२ | " आलभन्त " | " अलंभन " |
| ९० | ११ | परिपश्यान्ति | परिपश्यन्ति |
| ९५ | १३ | पृधिवी | पृथिवी |
| ९७ | १५ | केले आहेत. | केलें आहे. |
| ९७ | २४ | ( मत्यम् ) | ( मर्त्यम् ) |
| १०१ | २२ | अंकगणित ज्ञान पदार्थो- | अंकगणित अज्ञातपदार्थो- |
| १०२ | २१ | सेनाकार | श्येनाकार |
| १०७ | ६ | ( दूर | ( दूरम् |
| ११२ | ६ | व्रिभुः | व्रिभूः |
| १२५ | २४ | निर्विषयमन | निर्विषयं मनः । |
| १३३ | २२ | लोक गोल | गोल |
| १३३ | २४ | तोच | त्यालाच |
| १३७ | १२ | पोंचणाऱ्या | पोंचणारीं |
| १३७ | २७ | सम्यद्ग्र | सम्यगद्र |
| १४३ | २३ | पुनर्द्यो | पुनर्द्यौ |
| १४८ | २३ | ( सौभागत्वाय ) | ( सौभगत्वाय ) |
| १५२ | २२ | पकार | उपकार |
| १५७ | १९ | आधिकरण | अधिकरण |
| १६५ | २९ | ( एतेनेद्रण ) | ( एतेनेन्द्रेण ) |
| १६७ | २३ | सल्यानें | सल्ल्यानें |
| १६८ | १६ | वाढतें | वाढतें |
| १७६ | ५ | विरजेत | विरजेत् |
| " | १९ | व्रह्मचर्येण | व्रह्मचर्येण |
| १७७ | २ | सारांष | सारांश |
| १७८ | ३ | ह्यर्चेथेन्द्भूति- | ह्यर्चेयेन्द्भूति- |
| २०१ | १५ | सोमयन्ना | सोमयज्ञ |
| २०५ | २ | ( य ) | ( ये )

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २०७ | ३ | बर्हिषदो | बर्हिषदो |
| २०९ | ७ | (अन्–अग्नि–आत्ताः) | (अन्–अग्नि–सु–आत्ताः) |
| २११ | २३ | आपले | व आपले |
| २१४ | २२ | विश्वयापक | विश्वव्यापक |
| २१७ | ८ | अथर्ववेदावरील | अर्थवेदावरील |
| २१८ | २४ | मतांला | मनांना |
| २१९ | १० | शावती ।दंपथा | शाक्तादिपंथ |
| २२५ | १३ | तस्मा ्त्रा | तस्माद्धत्रो |
| २३० | २५ | वेषा | वैषा |
| २३१ | १ | कश्यपाची कथा | गयातीर्थ. |
| २३३ | १ | ,, ,, | विष्णुपद व तीर्थे. |
| २३५ | १ | ,, ,, | गंगायमुनासंगम |
| २३७ | १ | ,, ,, | प्रतिमा शब्दाचा अर्थ. |
| २३९ | १ | ,, ,, | नवग्रहांचे मंत्र. |
| २४१ | १ | ,, ,, | ,, ,, |
| २४५ | ३१ | "द्रयँ" | "द्रयँ" |
| २४७ | १९ | (शुकैधः) | (शुष्कैधः) |
| २५४ | ४ | त्यांच्या शरीरांतून प्राण (न अपक्रामन्ति) बाहेर जात नाहींत. ते अजरामर होतात. | (तेभ्यः प्राणाः) त्यांच्यापासून बलपराक्रमादिक (न अपक्रामन्ति) दूर होत नाहींत व ते कीर्तिमान् होतात. |
| २५९ | १९ | पशुमन्यत | पशुं मन्यत |
| २६० | ७ | यस्त्रीणां | यः स्त्रीणां |
| २६१ | ५ | होते. | होत. |
| २६२ | १४ | वेदमंत्र | वेदमंत्राचा |
| २६५ | २० | पुरुषीं | पुरुष |
| ,, | २२ | पदार्थाला सुद्धां | पदार्थाचा सुद्धां |
| ,, | २६ | अहंमनुरभववं | अहंमनुरभवं |
| २६८ | ३ | काचित् | कांचित् |

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २७३ | १७ | धातूंबरोबर | धातूंवरून |
| ,, | ,, | तें विधान | तथापि |
| ,, | १८ | धातूला पण योजून शब्द | धातूंलाहि लावून आणि शब्द |
| ,, | १९ | प्रत्यय पण | प्रत्यय |
| ,, | २२ | शब्दांविषयीं पण | शब्दांविषयींहि |
| ,, | २३ | हा पण | हा सुद्धां |
| ,, | २४ | ड ग्रत्ययाच्या | ड प्रत्ययाच्या |
| ,, | २७ | कां व्हावें ? | कां मानावे ? |
| २७४ | ५ | वहुलच्या | " बहुल " |
| ,, | १० | कमती | कमी |
| ,, | ११ | वैय्याकरणाचा | वैय्याकरण्यांचा |
| ,, | २३ | सर्वच | सर्वत्र |
| ,, | २४ | वेद शब्द | वैदिक शब्द |
| ,, | २६ | अ शब्दांच्या | अशा शब्दांच्या |